# जा माझ्या माहेरा

संपादिका

डॉ. सरोजिनी बाबर

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिति

मूल्य रु. ३-५०

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य माला, पुष्प ८ वें

# संपादकीय

महाराष्ट्र सरकारच्या लोकसाहित्य समितीच्यावतीनें गेल्या वर्षी 'बाळराज' या ग्रंथाचें प्रकाशन झालें. या ग्रंथाचें स्वागत मराठी वाचकांनीं मोठ्या आवडीनें केलें. स्वाभाविकच त्यामुळें समितीस नवें प्रकाशन करण्यास हुरूप आला. आणि समितीच्या सर्व सभासदांनीं त्यासाठीं 'सासर–माहेर' विषयक लोकसाहित्याचें प्रकाशन करावें असा एकमतानें निर्णय घेतला.

या नव्या प्रकाशनाचें नांव "जा माझ्या माहेरा" असें निश्चित करण्यांत आलें. त्याप्रमाणें लोकसाहित्याची जुळवाजुळव सुरू झाली. या ग्रंथाला आपल्या संग्रहांतील लोकसाहित्य पाठविण्याबद्दल अनेकांना वैयक्तिक पत्रें गेलीं. कित्येकांशीं समक्ष बोलणीं झालीं. आणि बहुतेक सर्व प्रादेशिक वर्तमानपत्रांतून व नभोवाणी-वरून या संबंधींचें निवेदन प्रकाशित व प्रसारित करण्यांत आलें. त्याचप्रमाणें कांहीं तज्ज्ञ मंडळींचेकडून या विषयासंबंधींचे असे लेखहि मागविण्यांत आले; व त्यासाठीं फक्त लोकसाहित्यच आधारभूत म्हणून घेण्याविषयीं विनंति करण्यांत आली.

महाराष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांतून या योजनेचें सहर्ष स्वागत झालें. अनेकांचेकडून पत्रद्वारें विचारणा झाली व लोकसाहित्यही पुरविलें गेलें. निरनिराळ्या लोकांचेकडून शेंकडों पत्रें आलीं. आणि भरपूर साहित्यही जमा झालें. आतां त्यांपैकीं निवडक लोकसाहित्यावर आधारलेला असा हा ग्रंथ प्रकाशित होत आहे.

या ग्रंथामध्यें लेख, ओव्या, गाणीं, उखाणे व म्हणी यांचा समावेश झालेला आहे. त्यासाठीं जवळजवळ शंभराचे आसपास अशा संग्राहकांनीं हातभार लावलेला आहे, हें या ग्रंथाचें वैशिष्ट्य होय. या ग्रंथाचें आणखी एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे लोकसाहित्याच्या एक संग्राहिका सौ. सविता जाजोदिया, नवी दिल्ली, यांनीं परिश्रमपूर्वक तयार केलेला लेख हें होय. या लेखासाठीं त्यांनीं भारतामधील बहुतेक सर्व भाषांतील 'सासर माहेर' विषयक लोकगीतांचा उपयोग केलेला आहे. तसेंच या सर्व लेखनामध्यें विविधता यावी म्हणून मी स्वतः कथात्मक पद्धतीनें लेखन केलें असून प्रा. वामनराव चोरघडे यांनीं नाट्याचा अवलंब करून वऱ्हाडी बोलीचा वापर केलेला आहे.

या ग्रंथामध्यें ग्रामीण भागांतील कांहीं लोकप्रिय **रांगोळ्या** दिल्या असून स्त्रियांचे हातांवर गोंदल्या जाणाऱ्या **गोंदणांचींही** कांहीं छायाचित्रें दिलीं आहेत. त्यामुळें हा ग्रंथ आणखी वैशिष्ट्यपूर्ण झाला आहे असें वाटतें.

महाराष्ट्र सरकारच्या प्रकाशन विभागाचे संचालक श्री. विनोद राव यांनीं 'बाळराज' प्रमाणें याही ग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारली आहे हें नमूद करण्यास आनंद वाटतो. श्री. विनोद राव यांच्या या सहकार्याबद्दल ही समिति त्यांची ऋणी आहे.

या ग्रंथामध्यें महाराष्ट्रांतील आदिवासींचेकडून कांहीं लोकसाहित्य मिळवून घालणें अगत्याचें होतें. परंतु पुष्कळ प्रयत्न करूनही ठरलेल्या मुदतींत ही उणीव भरून काढणें शक्य झालें नाहीं, याची समितीस जरूर जाणीव आहे.

**सरोजिनी बाबर**

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

# संपादकीय (दुसऱ्या आवृत्तीचें)

लोकसाहित्याचीं संकलनात्मक पुस्तकें आजवर पुष्कळ निघालीं आहेत. त्यांचें त्यांच्या त्यांच्या मानाप्रमाणें मराठी माणसानें स्वागतही केलें आहे. ऐपतीप्रमाणें कोणी अशीं पुस्तकें विकत घेतलीं तर कोणी ग्रंथालयांतून आणून वाचलीं. पण या विषयाची आवड असेल तोच या फंदांत पडला. संशोधकांनीं मात्र सवडीप्रमाणें ह्या पुस्तकांशीं स्नेहभाव जडविला. त्यांचा अभ्यासही केला.

परंतु लोकसाहित्य समितीनें प्रकाशित केलेल्या गेल्या वर्षीच्या '**जा माझ्या माहेरा**'नें मात्र एक जगावेगळींच करामत करून दाखविली! २८ जून १९६३ ला प्रकाशित झालेलें हें पुस्तक जुलै-ऑगस्टमध्यें लोकांच्या हातीं गेलें. या पुस्तकावर आलेल्या सुंदर अभिप्रायांनीं जनलोकांचें विशेष लक्ष वेधलें गेलें. आणि सांगावयाचें म्हणजे एकदां दृष्टीस पडलेलें हें पुस्तक मराठी माणूस तें खालीं न ठेवतां वाचीत सुटला. जसें काय त्याला जिवाभावाचें, जिव्हाळ्यानें हितगुज करणारें असें घरचेंच कोणी भेटावें अशा डामडौलानें या ग्रंथाशीं त्याची मैत्री जुळली. त्यामुळें हा ग्रंथ एवढ्या भराभर विकला गेला की, आलेली मागणी पुरविणें दुरापास्त व्हावें! अवघ्या तीनचार महिन्यांतच या ग्रंथाची पहिली आवृत्ति उडाली!!

म्हणून जनलोकांना अपूर्वाईचें वाटलेलें हें 'जा माझ्या माहेरा' आज नव्यानें प्रकाशित होत आहे. अगोदरच आकर्षक झालेलें हें पुस्तक यावेळीं आणखी आकर्षक

करण्याचा प्रयत्न केलेला आहे. तीन तिरंगी सुंदर चित्रें या ग्रंथांत समाविष्ट करण्यांत आलीं असून जागोजाग आवश्यक तेथें तळटीपाही दिलेल्या आहेत, कठीण शब्दांचा अर्थ देण्यांत आलेला आहे. शिवाय मुख्य म्हणजे पूर्वीच्या त्याच किमतींत हा ग्रंथ वाचकांना देण्यांत येत आहे.

महाराष्ट्राच्या प्रकाशन विभागानें या ग्रंथाची ही दुसरी आवृत्तीही पूर्वीच्याच उत्साहानें प्रकाशित करण्याची तसदी घेतली याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत.

'जा माझ्या माहेरा'ची ही दुसरी आवृत्तीही पूर्वीपेक्षां झपाट्यानें जनलोकांच्या हातीं जाईल अशी खात्री आहे. कारण कमी शिकलेल्या माणसाप्रमाणेंच सुशिक्षित व विद्वान् मराठी माणसानेंही या ग्रंथाचें विशेष जिव्हाळ्यानें वाचन केलेलें आहे.

**—सरोजिनी बाबर**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

१ मे १९६४

# महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

अध्यक्ष

**डॉ. सरोजिनी बाबर**

सभासद

प्रा. वामन चोरघडे

श्री. सोपानदेव चौधरी

सौ. कुमुदिनी पवार

प्रा. गजमल माळी

श्री. वि. वा. जोशी

प्रा. राजा महाजन

श्री. बाजीराव पाटील

डॉ. डी. जी. व्यास

चिटणीस

**श्री. एम्. ए. बंबावाले**

सहसंचालक, शिक्षण विभाग, महाराष्ट्र




मानवी जीवनांत जिव्हाळा ही एक अपूर्वाईची गोष्ट मानली जाते. या जिव्हाळ्या-खेरीज आयुष्य सुखी होऊं शकत नाहीं, असा माणसाचा अनुभव असतो. आणि याच अनुभवाच्या बळावर त्यानें कांहीं निर्णय घेतलेले असतात. त्यासाठीं त्याला त्याच्या घराण्याची संस्कृती उपयोगी पडलेली असते. आणि याच घराण्याच्या संस्कृतीवर त्याच्या मनाची जडणघडण झालेली असते, विचार आचार पोसलेले असतात. म्हणून या घराण्याबद्दल माणसाच्या मनांत विलक्षण श्रद्धा वसत असते. विशेषतः मुलामुलींच्या लग्नाचे वेळीं ही श्रद्धा उफाळून वर येते; आणि जिवाभावाची, ऋणानुबंधाची, कसून पहाणी केली जाते. त्यासंबंधीं बोलणीं केलीं जातात.

अशा वेळीं पुरुषांच्यापेक्षां स्त्रिया अधिक भावनाप्रधान असलेल्या दिसून येतात. त्यांना आपल्या घरची सोयरीक जुळवितांना आपल्या सासर-माहेरची संस्कृती एकत्र राखायची असते. ऋणानुबंधाशीं जुळणारेंच नातें नव्यानें शोधून हवें असतें. त्यासाठीं त्या जिवाचें रान करतील पण वाटेल तें खपवून घेणार नाहींत. आणि म्हणूनच लेकीच्या जन्माचें 'ओझें' त्यांच्या शिरावर असतें. त्यासाठीं त्यांना

---

१ सोईर संबंध, घराणें.

काळजीनें घेरलेलें असतें. म्हणून खेडोंपाडींची मंडळी घराण्याचा 'पदर पालव'[१] कसोशीनें पारखून घेतात. एकमेकांची संस्कृती जुळतीमिळती राहील यासंबंधीं दक्षता घेतात.

त्यामुळें स्वाभाविकच मुलीबाळींच्या कानांवर सासर-माहेरच्या गोष्टी वारंवार पडतात; आणि त्या या ना त्या कारणानें त्यांच्या वाणींत रुळूनही जातात. म्हणूनच कीं काय लहानपणीं भोंडला (हादगा) घालतांना

*"सासरच्या वाटे कुचुकुचू काटे"*

किंवा

*"अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं*
*अस्सं माहेर गोड बाई खेळाया धाडीतं"*

असलीं गाणीं पोरीबाळी म्हणतांना ऐकूं येतात. त्याचबरोबर हीं गाणीं शिकविणारी त्यांची वडीलधारी आजी अगर आई किंवा मावशीही—

*"तुपांतलं कारलं आजीरलं ग सई*
*गोजीरलं ग*
*कोण्या सुग्रीणिनं रांधलन् ग सई*
*रांधलं ग...."*

असल्या गोष्टी अगर—

*"नणंदा भावजया दोघीजणी*
*शिंक्यावरचं लोणी खाल्लं कोणीं..."*

या प्रकारच्या गोष्टी गीतांतून गुंफवीत मोठ्या आत्मीयतेनें रंगून गेलेल्या आढळून येतात. आणि अखेरीस—

*"तुपांत तळली, साखरेंत घोळली*
*जिलबी बिघडली...."*

या न्यायानें सासरपेक्षां माहेरच कसें चांगलें असतें, याच्या बहारदार कहाण्या ऐकवीत रहातात. अशा वेळीं त्यांना होणारें समाधान पोरीबाळींच्याही हाडींमासीं उतरतें! आणि सासरपेक्षां माहेरच चांगलें वाटून त्या सदैव—

*रुणझुणत्या पांखरा रे*
*जा माझ्या माहेरां*

*कमानी दरवाजा रे*
*त्यावरी बैस जा*
*घरच्या आईला रे*
*सांगावा सांग जा*
*दादाला सांग जा रे*
*ने मला माहेरा*

या गीताच्या पठणांत आणि गाण्यांत गुंगून जातात. जणुं या परीच्या संस्कारानें त्या भारावतात. आणि लग्न ठरायच्या वेळेपासूनच माहेरच्या 'मुराळ्या'ची वाट बघून आपल्या जिवाची घालमील करून सोडतात!

आजकाल लहानपणीं लग्न होत नाहीं. कायद्यानेंच वयांत आल्यानंतर विवाहाचें बंधन स्वीकारण्याची ताकीद माणसाला दिलेली आहे. त्या कारणानें जुन्या काळच्या बालविवाहामुळें उद्‌भवणाऱ्या अनेक प्रश्नांचा आपोआप निकाल लागला आहे.

परंतु असंख्यांच्या अनुभवांची बेरीज करून स्त्रीमनानें सासर-माहेरबद्दलचा हा जिव्हाळा आपल्या स्थायीभावांतच जमा करून टाकला आहे! म्हणून या ऋणानुबंधाची गोडी कधीं कमी झालेली नाहीं आणि दीर्घकाळ तरी ती कमी होईल असें वाटत नाहीं. कारण आपल्या लेकीचें सासरीं कसें होईल या चिंतेनें प्रत्येक आईचें काळीज सचिंत झालेलें असतें; आणि आपला सासरीं कसा निभाव लागेल, ही भीती प्रत्येक नववधूच्या मनांत घर करून बसलेली असते.

अर्थात् या गोष्टीला अपवाद आहेत. पण ते फार थोडे. हा स्थायीभाव सर्व-सामान्यांचे ठायीं वसत आलेला आहे ही गोष्ट बरीक खरी.

मध्यंतरी या स्थायीभावाचा एक मासलेवाईक नमुना बघून मी देखील भारावून गेलें ती!

वास्तविक नवे वधूवर कोवळ्या वयांतील असले तरी पूर्वपरिचयाचे. नेहमींच्या बैठकींतले. वाडवडिलांच्या पारखीचे. खाऊनपिऊन दोन्ही घराणीं सुखीं. माणसें चालीरीतींचीं. सर्व कांहीं उभय पक्षांच्या मनासारखें जुळून आलेलें. म्हणजे वधू-मायच्या चिंतेला थारा मिळूं नये अशीच वस्तुस्थिती. पण ऐन लग्नाचे वेळीं भलताच चमत्कार घडून आला! वधूमायप्रमाणेंच वधूचे वडीलही हुंदक्यानें दाटून गेले!! लग्नघर त्यामुळें भारावलें आणि तीं दोघे कष्टी झालीं होतीं म्हणून अनेकांच्या डोळ्यांना

पदर लागलेला दिसला!!! आणि उत्तर त्यांतून बाहेर आलें तें शकुंतलेला कण्व-मुनींनीं सासरीं धाडतांना असेंच घडलें त्या प्रसंगाचें!

'कन्या ही परक्याची धन' मानून तिला सासरीं पाठवितांना मातापित्यांना दुःख झाल्याचीं उदाहरणें आजवर अनेक कवींनीं चित्रित केलेलीं आहेत. पण सासर-माहेरच्या या ऋणानुबंधासंबंधीं बोलणीं करणारी गाथा मात्र लोकगीतांनीं विशेष अपूर्वाईनें सांगितलेली आहे.

 

जुन्या काळच्या घरांत मुलीच्या मामानें तिला स्थळ पाहून द्यावयाचें अशी चाल तरी होती. त्यामुळें तिच्या आईवडिलांनीं नेहमीं म्हणावें कीं, आम्ही कुणाचें कोण तिला देणारे? तिचे मामा समर्थ आहेत. त्या कारणानें शुक्राच्या चांदणीसारख्या लेकीला—

*नवरी पाहूं आले आले गडाचे गणपती*
*भांगतुन्या लक्ष मोतीं उषाताईच्या*

पहायला येणारे याच थाटामाटाचे असत. आणखी—

*उभ्या मी गल्लीं जातें खडा हालना भुईचा*
*येल शीतळ जाईचा*
*उभ्या मी गल्लीं जातें नीट धरून पासवा[1]*
*कुन्या गरतीचा[2] कुसवा*
*उभ्या मी गल्लीं जातें न्हाई हालत पापनी*
*नांव बापाचं राखुनी*

या रीतीनें त्या पोरीची जोपासना झालेली असायची. शिवाय—

*नदीच्या पल्याड ग काडी हालती लव्हाळ्याची*
*तिथं माजी हैती बाई मामा मावशी जिवाळ्याची*
*हिरव्या चोळीवरी कुणीं काढीली गवळण*
*ह्या ग नारीला सांगूं किती घरीं हौसची मावळण*
*उचकी लागयिली कां ग उचकी तुजी घाई*
*मायेच्या आज्जीनं ग सई काडीली कशापाई*

---

१ पदर. २ सुगृहिणी, संसारी सभ्य स्त्री.

*जागा बगुनी दिल्या पागा वतनं बगूनी दिल्या लेकी*
*चुलत्या ग दौलताला शाना चातुर म्हनूं किती*

या प्रकारच्या गोतावळ्यानें तिचा लाड झालेला असायचा. म्हणून मग—

*लुगड्याची घडी बाई यीना ग माज्या मना*
*बापा नेसूं दे तुमच्या सुना*

तिला असल्या कौतुकाची संवय झालेली. त्यामुळें अशा लेकीचें लगीन म्हणून त्या घरची हौसमौज कोणीं न् किती पुसावी? कारण

*हलदीनं साडी रंगलीय गो*
*लग्नाचं पातळ आणलंय गो*

ह्या दिमाखानेंच लग्नाच्या सामानाची तयारी व्हायची हें ठरलेलें. त्याशिवाय—

*देवळाचे दारी कोगबीवर कोगबा दाटली वो, दाटली वो*
*ती कोगबा[१] तोडुनी भरील्या परड्या*
*सयांच्या साड्या रंगविल्या वो, रंगविल्या वो*
*ती साडी नेसली चंद्राची भारजा[२] न्*
*तुळशी पुंजायला गेली वो, गेली वो*
*तुळशी पुंजतांना चांदसूर्व्या पुसतो*
*साडीचं मोल काय बोला वो, बोला वो*
*दोन लाख साडी न् लाखाची चोळी*
*चुड्याला गणीत न्हाई वो, न्हाई वो*

ह्या ऐश्वर्यानें तिच्या लग्नाच्या कपड्यांचा विचार झालेला. तिथें बोलणार तरी कोण आणि कसें? अशा वेळीं लग्नघर कौतुकानें न् मानपानाच्या उपसाभरीनें एवढें भारावलेलें असतें कीं, शब्दांनीं पुढें होऊन कांहीं सांगायचें धाडसच करूं नये! तर काय?

आणि लग्नाला आमंत्रण तरी कोणाकोणाला धाडलेलें असतें म्हणून पुसावें तर—

*ताला[३] भरला राते कंबलांनीं*
*एकेक कंबाल भोलूबाईचे पूंज*

---

१ आमसूल. २ भार्या, स्त्री, पत्नी. ३ तळें, तलाव.

भोलबाईनं यावं
वाजंत्रीं तुऱ्यांनीं

अशी तरी तिथं भाषा चाललेली किंवा—

आवातनं[1] गेलं पाटलाच्या देवा
पाटलाच्या देवानं येवावं
नवऱ्याला हळद लावावी
आवातनं गेलं चांदसूर्व्या देवा
चांदसूर्व्या देवांनीं येवावं
नवरीला हळद लावावी....

ह्या परीच्या बोलण्यानें तरी तिथें आपलें प्रस्थ मांडलें असावें असाच प्रकार. शिवाय रत्नामाणकांनीं, हिऱ्यामोत्यांनीं, सोन्यानाण्यांनीं मढवलेल्या मंडपावर वरमायेची इच्छा म्हणून शीतल जाईच्या पालवीनें झाकलेला मंडप दारीं उभा! तो बघून बोलणाराची हिंमत तरी कशी व्हावी? आणिक—

मांडवाच्या दारीं हळदीबाईचं वाळवान
नवऱ्या बाळाला केळवान
मांडवाच्या दारीं हलग्या शिंग्याची एक घाई
नवरा कळशीं पाणी न्हाई
वाजंत्री वाजत्याती पानमळ्याच्या टिपरीखालीं
नवरा सोन्याच्या छत्रीखालीं

असल्या नखऱ्यांत पुढें व्हायची हिंमतच व्हावी कोणाची? कारण ह्या खेरीज तिथें आणखी खंडीभर गोताची, दणकेबाज मानपानाची आणि सव्वाखंडीच्या मापानें होणाऱ्या भोजनाची सूर्याच्या साक्षीनें धांदल उडालेली! तर ती बघूनच जीव खुळाभैरा व्हायचा मग बोलणार कोण न् कुठें? तशांतच तिथें—

कृष्ण देवजी, देवजी नवरा झाला
शिरीं बाशींग, बाशींग तुरा या लेला
मोडीव मंदील, मंदील भगवान् लेला
कृष्ण ग देवाच्या, देवाच्या नवरीसाठीं

---

१ निमंत्रण.

*तोडे घडवीले, घडवीले मध्यानूरातरीं*
*पैंजण जडवीले, जडवीले नानायापरी*

असलीं नवऱ्याबाळाचीं वर्णनें चाललेलीं.! त्या दिमाखानेंच एखादा भुलून जायचा. तर मग तो तोंड उघडीलच कसा? उलट—

*झुन् झुन् वाजंत्रीं वाजतीं म्होरं कळवातनी नाचती*
*नवरा आला शिवेपाशीं शिवपुंजान देईन*
*नवरी जितून[1] नेईन*

या थाटांत नवरी जिंकून नेणारा नवरा येतेला बघूनच त्याची तिरपीट उडायची न् काय? मांडव खंडून घायचा, करवलीचा मानपान व्हायचा, वऱ्हाडानें रुसून गाडे जुंपायचे, झालझेंडा व्हायचा आणि एखाद्यानें त्याच धांदलींत—

"ऐका, मंडळी ऐका. नवरीच्या बापानं घेतला पैका. घेतला असल तर जगाला दिसल.

डोंगराशेजारी डोंगर. डोंगराचा तुटला कडा. बारा बैलांचा जुंपला गाडा. गाड्याला लागली उटी. पावण्यांनीं केली दाटी. पावण्यांला दिला फेटा. कोळ्याचा मान मोठा. कोळ्याची पुजली कावड. पुढं आली सोन्याची लगड. वर्धावा गेला शेवाया खायाला. काळं लागतं गालाला. दिष्ट होईल लालाला...."

असली कांहीं भाषा केली म्हणजे मग तर त्याची तहानभूकच हरपून जायची. तशांतच जर कां एखादी वरमाई पिवळ्या पायांनीं दाराशीं येऊन पायघड्यावरून चालतांनाही रुसली तर मग लग्नमंडपांतील धांदल विचारायचीच सोय नसते. शिवाय बहिणीचा रुसवा काढण्यासाठीं नगारा—नौबत झडायची, सांडणीस्वार यायचे, पालख्या—अब्दागिरींची रेलचेल उडायची, हवाईनळा न् फुलबाजा उडायचे, वाजंत्र्यांचा थाट असायचा, पांची पक्वान्नांचीं ताटें रांगोळ्या काढलेल्या पाटासमोर यायचीं, उदबत्त्यांचा घमघमाट सुटायचा, हंड्यागल्लासांचा लखलखाट उडायचा इ. गोष्टींची बेरीजवजाबाकी याच गडबडींत होत राहिली म्हणजे तर वधूमायच्या जिवाची घालमील उडतेली बघून पहाणारा भुलूनच जायचा. आणि घरच्या माणसांनीं लेकीच्या जन्माकारणानें सोसाव्या लागणाऱ्या मानापमानाची चवड रचून लेकीचा जन्मच वाईट असलीं बोलणीं करीत आणि कष्टांचा उपसा करीत रहायचें!

१ जिंकून.

पण अशाही वातावरणांत सुखाची चंद्रकोर उगवायची हें पण ओघानेंच ठरलेलें असायचें. नव्या नवरीला चांगल्या प्रकारें सांभाळायची तिच्या सासरच्या मंडळींना विनंती करून नवऱ्याचें नांव घेण्याची गोष्ट निघाली म्हणजे एकदम समाधानाचें व खेळकर वातावरण उभें रहातें. अशा वेळीं नवी नवरी जेवढ्या हौसे-मौजेनें लाजत मुरकत नवऱ्याचें नांव घेईल तेवढ्याच उमेदीनें तिच्या मैत्रिणी, जावा नणंदा आणि वडीलधाऱ्या बायकाही आपापल्या नवऱ्याचें नांव घेतांना दिसून येतात.

ह्या नांव घेण्याच्या निमित्तानें दर घडीला उभी केली जाणारी त्या त्या घराण्याची संस्कृती वाखाणण्याजोगी असते. लग्नकार्याला तिच्यामुळें चांगली शोभा येते असें मानलें जातें. आणि नव्या नवरीला जेवढे म्हणून चांगले उखाणे घालतां येतील तेवढ्यावरून तिची तारीफही केली जाते. दोन्ही घरचे ऋणानुबंध जोडण्याची वैभवशाली ताकद या उखाण्यांत असल्या कारणानें "नांव घेणें" हाही एक मानपान लग्नघरीं फार महत्त्वाचा असा मानला जातो.



आपल्या शिणजोडीच्या इष्टमैत्रिणी एकत्र जमल्या आणि भोंवतीं वडील-धाऱ्यांचा घोळका जमला असतांना उखाणा घालून पतीचें नांव घ्यावयाचें म्हणजे नववधूला मोठी परीक्षेची वेळ वाटते. कारण सासर-माहेरच्या कुळशीलाची उत्तम जोपा होईल आणि पतिदेवाचा मानमरातब राखला जाऊन आपलेंही बुद्धिवैभव चांगल्याप्रकारें प्रकट होईल हा त्रिवेणीसंगम तिला साधावयाचा असतो. म्हणून ती अलंकारानें सजलेली भाषा आणि यमकबद्ध रचना यांचा आश्रय घेऊन आपलें मनोगत प्रकट करीत असते. उत्साहानें बोलत रहाते. शालीनतेची वागणूक ठेवते.

त्यामुळें उखाणा कसला वापरला जातो इकडे इतर पोरीबाळींचें व स्त्रियांचें बारीक लक्ष रहातें. म्हणून—

*"सुपभर मोतीं मोजूं कशी, गळ्यांत ठुशी वाकूं कशी, पायांत पैंजण चालूं कशी, आत्याबाई बसल्यात तुळशीपाशीं ××× रावांचं नांव घेतें सत्यनारायणाच्या महापूजेच्या दिवशीं."*

असलें कांहीं शोधून काढायचा प्रयत्न नांव घेणारी करते. त्यासाठीं आपल्या स्मरणशक्तीचा ती उपसा करते आणि ध्यानांत धरलेल्या असंख्य कल्पनांच्या गोण्या उलथ्या पालथ्या करीत सुटते. अशा वेळीं तिला——

*"काळी करूळी, दाजीबाची आरूळी, तेलच्याची चवड,[1] नंदाव्याची दवड, तेलच्याची पाटी, नणंदेची दाटी, ताकाचा डेरा, आत्याबाईचा फेरा, रुप्याची माडी, पाटलाची उडी न् ××× रावांच्या हातांत शंभराची नवी घडी."*

ह्या गोष्टी आवडतात. ती चटकन् बोलून मोकळी होते. पण एखादे वेळीं पैजच निघाली तर 'शेजीचं घेणं न् सवाई देणं' या थाटांत तिचें मन उखाणे शोधीत बसतें. मग जर मधेंच कोण्या एकीनें—

*"कुरुंदाची सहाण, चंदनाचं खोड ××× रावांचं नांव अमृतापेक्षां गोड."*

अशा रीतीचें नांव घेतलें तर ती ह्या साध्या, सुटसुटीत बोलण्याचा नाद सोडून देते. कांहीं तरी लांबलचक बोलणें करून आपल्या संस्कृतीचें दर्शन घडवायचा मोह तिला होतो. अशा वेळीं कधीं अतिशयोक्तीची ती कास धरते तर कधीं विनोदाची परवड करून सोडते. मग ती घाबरत नाहीं, भीत नाही. बेशक कुठें तरी ऐकलेलें ती सर्वांच्यासमोर टाकून देत बाजूला होते—

*"पंढरपूरचा पुडा, काशीचा चुडा, मथुरेचं पान, खायला छान, कलमी आंबा, त्याच्या करतें फोडी, आईबापांची गोडी, सिताच्या काखेला दुधाची कळशी, दुधाचं करतें ताक, ताकाचं काढतें लोणी, अशी मी अंतरीं शाणी की ××× रावांच्या रागाचं तवाच करतें पाणी."*

मग खूप हंशा पिकतो. एकमेकींत कुजबूज होते. बोलण्यावरून बोलणें निघतें न् स्वतःचें घर जरी चंद्रमौळी असलें तरी एखादी मोठ्या दिमाखानें आपला रुबाब सांगते—

*"कोलापुरी तपेलं आंघूळीला, चांदीचा पाट बसायला, जरीकाठी धोतर नेसायला, साण ईडलीची, खोड बडूयाचं, केसरी गंध ल्यायाला, शीवपानी पूंजला, गंगाभागीरथीचं पाणी प्यायाला, सोन्याचीं ताटं जेवायला, आंबे मोहराचा भात, वर केशरी वरण दाट, तबक बिंदलीचं, डबा म्हाहुलीचा, डब्या गजनीच्या, कात कोंकनचा, चुना भोकराचा, पान रामटेकाचं, जायपत्री जायगांवची, लवंग विजापूरची, चिकनी सुपारी सोलापूरची, लाल गादी मुंबईची, लोड सातार्‍याचं, उशी पुन्याची किनखापाची, पलंग कराडचा, हंड्याझुबरांचा लखलखाट न् ××× रावांच्या जिवावर हळद कुंकवाचा गजर दाट."*

---

१. उतरंड, एकावर एक असा रचून ठेवलेला ढीग.

त्यामुळें मग प्रत्येकाला ईर्षा चढते. उखाणे भराभर बाहेर पडतात. तोंडांत बोट घालून ऐकत रहावें असें नानापरीचें नवल ऐकायला मिळतें.

अशा वेळीं एखाद्या उखाण्यांतून जुन्या काळचा तपशील सांपडतो, इतिहास गवसतो, संस्कृती लक्षांत येते.

म्हणून असे उखाणे घालीत घरचा दिमाख बोलून दाखवायची सवय स्त्रियांना बाळपणापासूनच असते. फुगडीच्या उखाण्यांनीं या गोष्टीला प्रारंभ होतो. आणि रुखवताचे उखाणे घालतांना त्यांना बाळसें येतें. त्यामुळें—

*"पाऊस येतो झिरीमिरी भिंती झाल्या काळ्या, सोनाराच्या पोरीच्या लांब भिगबाळ्या"*

या फुगडीच्या हलक्याफुलक्या उखाण्यापेक्षां—

*"पहिली दुरडी फुलाचा भार, इवाय[1] मिळाला हौसेदार, दुसरी दुरडी केळाची फणी, रुखवत उघड नवऱ्याचे भैनी, तिसरी दुरडी साकरशाई, रुखवत उघड नवऱ्याचे आई. चौथी दुरडी गव्हाची लापशी, रुखवत उघड नवऱ्याचे मावशी. पाचवी दुरडी गव्हाची सोजी, रुखवत उघड नवऱ्याचे आजी. साव्वी दुरडी अनारसे लाडू, रुखवत उघड नवऱ्याचे साडू. सातवी दुरडी ताजा खांडवा, रुखवत उघड नवऱ्याचे वंधवा. आठवी दुरडी साखरभाता, रुखवत उघड नवऱ्याचे गोता. नववी दुरडी भरलें काजू आणिक आतां पाहिजे तर × × × रावांचं नांव घेतें पण ह्या बघूं सगळीजणं ह्याकडनं बाजू."*

रुखवताचा हा उखाणा गमतीदार व भारदस्त वाटतो.

रुखवताचे असे अनेक उखाणे आहेत. त्यांत सर्व प्रकारच्या फळांचा, भाज्यांचा, गणगोतांचा, गात्राशिवांचा, इतिहास–भूगोलाचा, चालरीतींचा, देवादिकांचा, कलाकुसरींचा असा समावेश झालेला दिसून येतो. त्यामुळें अशा वर्णनावरून ह्या उखाण्यांचा काल ठरविणें शक्य होतें. लोकांच्या शारीरिक व मानसिक कसाची दिशा उमगते. हौसमौज ध्यानांत येते.

अशा विविध प्रकारच्या उखाण्यांच्यामुळें सासर-माहेरचे धागेदोरे एकत्र येऊन मजबूत होण्यास मदत होते. आणि ह्या उखाण्यांचा एखाद्या पार्श्वसंगीताप्रमाणें उपयोग होत असल्यानें मानवी जीवनाला एकपरीची तालबद्धता प्राप्त होते.

उखाणे घालण्याची ही चाल महाराष्ट्रांत फार जुनी आहे. ज्ञानेश्वरीमध्यें—

---

१ व्याही.

*"जैसे न सांगणें वरी । काळा पतीसी रूप करी ।*
*बोलु निमालेपणें विवरी । अचर्चा तें"*

(अ. १५।४६८ साखरेप्रत)

या उखाण्याचा असा मागोवा लागतो. म्हणजे नवी नवरी नवऱ्याचें नांव न उच्चारतांच जसें तें अकर्तेपणें सुचविते, तसेंच ब्रह्माचें वर्णन कांहीं न बोलूनच करतां येतें असें ज्ञानदेवांनीं इथें सुचविलेलें आहे, म्हटलेलें आहे.

उखाण्यांचा जन्म सहजस्फूर्त असा आहे. मनांत आलें तें बोलून दाखविलें असा त्यांचा स्वभाव आहे. म्हणून एखादी बाई आपली मनची गोष्ट बोलून दाखवितांना सहजच सांगून जाते कीं—

*"पायीं साखळ्या तोडं वाळं, कानीं फुलं झुबं दंड,[1] गळीं धाकटं डोरलं,[2] मोठं डोरलं, थोरल्या डोरल्याला वाघनखं, वाघनखाला पानाड्यांचे घस न् पाटल्याचं फासं, बंदोबस्त चक्री बुगड्या, कुलपी घाट, नऊ, गोंड्याचं झालं वज्जं म्हणून ××× रावांचं नांव घेतें तुमच्या मनाजोगं."*

त्यामुळें स्त्रियांच्या इच्छा आकांक्षांची व त्यांचे ठायीं वसणाऱ्या बुद्धिमत्तेची कल्पना येते. आणि मग—

*"आला आला रुखवत त्यावर ठेवला दागिन्यांचा डबा, आंत उघडून बघतें तर इंद्रलोकींची सभा."*

या बोलण्याचा अर्थ लक्षांत येतो. एवढेंच नाहीं तर ही उखाणे घालण्याची रीत म्हणजे स्त्रीच्या बुद्धिवैभवाची एक वैभवशाली खूणगांठ आहे, याचाही प्रत्यय आल्याविना रहात नाहीं. शिवाय या उखण्यांनीं जुळविलेले व सांभाळलेले वाडवडिलार्जित ऋणानुबंधही किती मोलाचे आहेत, याचा मागोवा घेतां येतो तें निराळेंच.



बहिणीला भाऊ म्हणजे विसाव्याचें झाड. लेकीला आईवडील म्हणजे तीर्थाचे सागर. नणंदेला भावजय म्हणजे दैवाची लक्ष्मी. सासुरवाशिणीला माहेर म्हणजे केळीचें दाट न् हिरवेगार बन. मैत्रिणीला मैत्रीण म्हणजे इंद्रसभेची पद्मिनी. कष्टावतीला[3] जातें म्हणजे जिवाभावाची गोष्ट करूं देणारा ईश्वर. आणि दुःखाच्या उमाळ्यानें दाटलेल्या पोरीला आपला स्वतःचा भावनाविष्कार म्हणजे जणुं जीवाची अलिखित गाथा.

---

१ शोभणें. २ मंगळसूत्र. ३ कष्ट घेणारी स्त्री.

एखाद्या सासुरवाशिणीच्या अशा अनेक सुखदुःखाच्या गोष्टी ज्यांनीं ऐकल्या असतील त्यांना त्याचा अर्थ उमगला असेल. आईच्या कुशींत बसून तूपपोळी खातांना जिभेला येणारी चव समजली असेल. कोडकौतुकानें माखलेल्या माहेरच्या अंगणांत खाव्या वाटणाऱ्या पदार्थांच्या सुटलेल्या गोण्यांत काय आनंद असतो तो ओळखीचा झाला असेल. माहेरच्या पाणंदीनें[1] दर्शन दिलें कीं होणाऱ्या अपार सुखाचा अर्थ माहीत झाला असेल. चंद्रसूर्यासारख्या भावांच्या कोडकौतुकानें येणाऱ्या मुराळ्याच्या दर्शनानें होणारा ब्रह्मानंद लक्षांत आला असेल; आणि त्या सुखस्पर्शानें भारावून गेलेल्या त्याच्या मनानें सासुरवाशिणीला होणाऱ्या यातनांच्या कारणानें येणारी व्याकुळताही अनुभविली असेल.

त्यामुळेंच कीं काय—

*आधीं ववी गातें बाप्पाजी रायाला*
*मागून हळदीच्या येलाला मायबाईला*
*राया बाप्पाजी चंदन मायबाई गोंदन*
*मला झाली वाट दोही झाडांच्या मधून*
*बाप्पाजी समींदर बया मालन व्हाती गंगा*
*दोघांच्या सावलींत कर आंगूळ शिरीरंगा*
*बाप्पाजीराया माझा समींदराचा ग साठा*
*माय मालनीचा बाई गंगेचा ताफा मोठा*
*माझ्या गौळणीचं दूध अमृताचा पान्हा*
*सावळ्या बंधुराया वाटून पिऊ सरावना*
*माझे ग मायबापा सये तुळशीची रोप*
*त्येंच्या ग सावलीला लागून गेली झोप*

अशा प्रकारच्या ओव्या गातांना निर्माण होणाऱ्या जिवाभावाच्या प्रीतीची पारख त्याला अनुभवानें पटली असेल. आणि आईवडिलांच्या ठायीं सामान्य स्त्रीमनानें उभा केलेला हा पूज्यभाव बघून त्याची तहानभूकही हरपून गेली असेल.

सासुरवाशीण ज्यावेळीं जात्या ईश्वराच्या साक्षीनें आपल्या गीतांचा अमृतकुंभ या रीतीनें रिता करीत रहाते, त्यावेळीं जीवनांतील सर्वोत्कृष्ट काव्याचा आस्वाद घ्यायला मिळतो; आणि मानवी जीवनांतील ऋणानुबंधांचे स्नेहभाव ओळखीचे होत

१ शेताकडेची अरुंद पाऊलवाट.

जाऊन आपल्या चित्ताची सावधानता नाहींशी होऊन जाते. उमाळ्याचे कढ उरीं दाटून येतात आणि त्यांच्या अस्फुट हुंकारानें जीव वाराहुरा होऊन जातो. अशावेळीं सासुरवासानें खंगून गेलेली पोर जर—

*माझी ग जातकूळ कोण पुशीतो भंजूळ[1]*
*चळा दावीतें आजूळ*
*माझी ग जातकूळ कोण पुसतो खांदीगुंदी[2]*
*सुर्ती रुप्पाया[3] खरी चांदी*
*माझ्या बाप्पाजीचं कूळ काय पुसशील भल्या गड्या*
*तुला सांगतें सात पिढ्या*
*माझ्या काकाजीचं कूळ काय पुसतां तुमी दाजी*
*उच्च कुळीची माझी आजी*

या रीतीनं बोलून आपला मोठेपणा व्यक्त करतांना दिसेल तर मग काळीज तुटूं लागतें. आणि असल्या पोरीला सासुरवास कुणीं केला याचा वेध घ्यायला मनाला उड्डाण घ्यावेसें वाटतें. कारण ही पोर—

*उभ्या गल्लीनं जातें पदराची बंदोबस्ती*
*मला ताकीद केली होती*
*उभ्या गल्लीनं जातें घेऊं पदर कुठवरी*
*चौक्या बसल्या वाटेवरी*
*उभ्या गल्लीनं जातें म्यां सोडींना पासवा*
*गरती माजीचा कुसवा*
*उभ्या गल्लीनं जातें चालनी माझी तशी*
*शान्या तुजी मी मावशी*
*उभ्या गल्लीनं जातें बघतें मी मातीला*
*माझ्या अस्सल कुळीला*

या ईर्षेनं वाढलेली असते. या अभिमानानें जगलेली असते. तिला उणेंपुरें म्हणूनच खपत नाहीं. आपल्या आईला सोडून ती सासरीं आलेली असते. आईवडिलांचें नांव राखतांना तिच्या जन्माला दिलेली गाजराच्या वाफ्याची उपमा तिला सार्थ करून दाखवायची असते. आणि म्हणून ती कष्टी झाली कीं तिला वाटतें—

१ चावट. २ सामान्य माणूस. ३ संपूर्ण चांदीचा. खणखणीत. खानदानी.

*सासूचा सासूरवास कोणापाशीं सांगूं देवा*
*मनधरनीचा यावा बंधुराया*
*सासूचा सासुरवास सोशीतें नखींबोटीं*
*अशीलाच्या[1] नांवासाठीं बंधुराया*
*सासूचा सासुरवास किती सोसावा हरनी*
*येक्या भ्रताराकारनीं मायबाई*

तिचा जीव उडून जातो. सासूच्या दारीं फुललेल्या मोगऱ्यापायीं ही जाई आली आहे, तर चिताकाचा फासा गळ्याला रुतावा तसा जाच सासूनें करूं नये, अशी तिची भावना असते. कारण तिनें तसा कांहींच गुन्हा केलेला नसतो. म्हणून ती सासरीं गेलेल्या आपल्या लेकीचा आठव[2] करून आपल्याकडे पहा असें सासूला सुचवूं इच्छिते. तिच्या मनीं भावनांचा कल्लोळ उडून जातो. अशावेळीं जरी ती—

*परपंचाचा गाडा लोटतां लोटना*
*हात लावा नारायणा देवराया*

देवापुढें हात जोडीत ही विनंति करीत असली तरी तिचा जीव शांत होत नाहीं. तिची नजर ठरते ती—

*माहेराची वाट कोण पुशीती यशेवदा*
*सांगीतें तुला बाई माडी दिसं कळसासुद्धां*
*जिवाला वाटतं पांखराच्या पायीं जावं*
*वाड्यावरी उतरावं बंधुजीच्या*
*धन संपता ग बाई काय करावी लोकाची*
*मला सावली झोकाची बाप्पाजींची*
*दैवा नारायणा आगाशीं तुझी छाया*
*अमृत द्यावा प्याया बंधु माझा*
*ववी मी गातें बाई देसाई सागराला*
*निरशा[3] दुधाच्या घागरीला भाईराया*

याच एका कल्पनेवर खिळून रहाते. आणि मग सुंदर शिंगीवर बसून येणारा भाऊ तिला दिसूं लागतो. घरच्या उतरंडीचे तामसाळ तांदूळ तिच्या चुलीवर शिजूं लागतात. आणि एखाद्या कोयाळ[4] राधेनें बोलावें तशी ती आपल्या सासूला कळवळून

---

१ खानदानी, अस्सल. २ आठवण, स्मरण. ३ आकडी दूध. ताजें, निर्मळ. ४ कोकिळा.

सांगते कीं, "नका, सासूबाई घरीं उतरंडी भरल्या असतांना माझ्या दादाला उपाशी नका घालवूं हो. त्याच्या घरीं अमाप आहे. माझें विसाव्याचें झाड तें. मला बरें नाहींसें ऐकून तो शुक्राची चांदणी उगवायच्या आंत आला आहे. दारींच्या चांफ्याच्या कळ्या पडल्याकारणानें त्याला माझ्या आजारपणाची गोष्ट उमगली आहे. म्हणून माझें सांगणें आहे. त्याचें स्वागत करा. प्रेमानें माझें माहेरचें मूळ सांभाळा. दुसरें मला कांहीं एक नको आहे."

पण एवढें करूनही भाईराजा वेळेला आलाच नाहीं, तर मग मात्र तिचा धीर सुटतो आणि ती—-

*'गुळ्ळव मण्ण तरलिल्ल, गुलगुंजचि आडलिल्ल*
*सुळ्ळ होत यनूप्यव्वा नागरपंचमी ॥ सुव्वा नारी ॥'....*

या कानडी गीतांत नमूद केल्याप्रमाणें निदान नागरपंचीम खेळायला तरी भावानें येऊन न्यावें अशी इच्छा प्रकट करूं लागते. अशावेळीं दारीं फुगडी झिम्मा खेळत गीतें गाणाऱ्या पोरीबाळी न् झुल्यावर खेळणारे बंधुराज तिच्या नजरेंत येऊं लागतात आणि तिचें काळीज ठाव सोडूं लागतें! भाऊ कां आला नाहीं या चिंतेनें ती व्याकूळ होते आणि—

*भाईराजा परीस भावज मालन चांगली*
*राया देसायाला घडी रंगाची लागली*
*मालन कुंकू लावी बारीक गव्हावानी*
*भाईराजसा माझ्या रूप तुला देवावानी*
*सावळी भावजय जशी शुक्राची चांदणी*
*चंद्र डुलतो आंगनीं भाईराजा*

अशा ओव्या गाऊन ऐकणाराच्या काळजाला हात घालीत, ती स्वतः बेभान होऊन जाते. आणि ऐकणारा—

*बंधुजी म्हनीयीतो भैना दिल्या घरीं ऱ्हावं*
*भांडं न्हवं तें बदलावं*
*आज सासूरवाशीन घरी जात्याचं झाडनं*
*उद्यां फिटल पारनं*

या कल्पनेनें तिला समजावण्याचा प्रयत्न करतो. अशावेळीं तिऱ्हाईत माणूसदेखील या सासूरवाशिणीशीं जिव्हाळ्याचे ऋणानुबंध जोडूं लागतो. जिव्हाळ्याची दुनिया

वाढत्या वयाचें लेणें लेतें. काळजानें माखलेल्या कल्पनांचा शिडकावा सुरू होतो. कष्टाच्या उपसाभरीने काळवंडून गेलेलें मन मायेच्या उबीनें साजिवंत होतें. आणि दु:खांत सुख म्हणून हावशा कांताचा आधार सासुरवाशिणीला गवसतो. मग ती येणाराजाणाराला—

*वाटेच्या वाटसरा नको करूंस उभा घोडा*
*कंथ[1] माझा जंगलांत मोजे वाघिणीच्या दाढा*

असें पूर्वीसारखें कांहीं एक न सांगतांना—

*थोरलं माजं घर हंड्या[2] गल्लास लोंबत्याती*
*सासूबाईचं बाळराज धनी वाड्याला सोबत्याती*
*हिरव्या चोळीनं ग दंड करीतो रसारसा*
*हावशा कांतायानं छंद पुरविला व्हावा तसा*

असलें कांहीं बोलून दाखवूं इच्छिते. मग तिच्या जिवाला विसावा सांपडतो. त्या नादांत तिचें मन मोहरून निघतें आणि हुंकार घालतें कीं—

*गोड भरताराचं सुख सये सांगतां येतां जातां*
*भर दिवसा डोलला ग बाई सुरव्या पाणी पितां*
*माडीवर ग माडी सये सासर मामंजीची*
*उभी राहुन बघतें मी लंका तिथून म्हायाराची*

बस्स ! एवढ्या आधारावर ती सारें दु:ख व कष्ट विसरून जाऊं शकते. आणि मग एकलीच एकांतांत असली म्हणजे तिला पुन्हां वाचा फुटते—

*गुज बोलायाला दार माळीचं ढकलावं*
*लाडके भैनाबाई मग हुरदं[3] उकलावं*
*दिव्याला भरायान घाला दिव्याला जोडवाती*
*लाडके भैनाबाई गुज बोलूंया साऱ्या रातीं*

तशांतच जर कां—

*अंतरीचं गुज माज्या हुरदीं झाली गोनी[4]*
*मायेची शेजी[5] माजी माप घेनार झाली रानी*

---

१ नवरा, पती. २ झुंबरे. ३ हृदय, मन. ४ मोठं ओझं, भार. ५ शेजारीण.

असा तिला अनुभव आला कीं, उभें भावविश्व तिच्या काळजाचा ठाव घेतें. भावना झिरपूं लागतात. उमाळा दाटूं लागतो. कढ हुंकार घालूं लागतात. आणि त्या धांदलींत मग मोत्यापोवळ्यांच्या साजशृंगारासहित ती कुलदेवतेची ओटी भरून स्वतः भाग्यवती व्हायचा प्रयत्न करते. आणि—

*सदरीं सोप्यामंदीं नारुशंकर तांब्या लोळे*
*लाडका बाळराज माजा जावळाचा खेळे*
*रांगत रांगत बाळ जातंया उंबऱ्यांत*
*लाडका बाळराज हिरा झळकतो बंगल्यांत*

या सुखाच्या राशीवर लोळून स्वतःला केव्हांच आपण विसरून गेलों आहोंत याचा अनुभव घेते. कारण हा ऋणानुबंध तिला सर्वांत जवळचा असतो.



माणसाच्या जीवनांतील ऋणानुबंधांचीं अशीं चित्तवेधक चित्रें मराठी लोकगीतांनीं अनेक प्रकारांनीं रंगविलेलीं आहेत. त्यांचे साद व पडसाद इतर भाषांतील लोकगीतांतूनहि उमटलेले आहेत. त्याच जिव्हाळ्यानें व त्याच उमाळ्यानेंही. म्हणून स्त्रीजीवनांत या सासर-माहेरच्या ऋणानुबंधाला स्थायीभावाचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे.

देशकाल परिस्थितीप्रमाणें या भावभावनेला नानाविध प्रकारांनीं वाचा फुटलेली आहे. भाषेचा साज सोडला तर सर्वत्र मूळ भाव एकच आहे. तो भाव व्यक्त करण्याचा प्रकारही जवळजवळ सारखाच आहे.

त्यामुळें भारताच्या सर्व भाषांनीं गुंफलेला हा यापरीचा ऋणानुबंध श्रवणीय आहे, वाचनीय आहे, उल्लेखनीयही आहे.

रचनाचातुर्य, कल्पनाविलास, शैली आणि आलंकारिकता इत्यादि गोष्टींनीं हें साहित्य नटलेलें असल्यामुळें तें असामान्य झालें आहे. या साहित्यामधील काव्य-शक्ती उच्च दर्जाची आहे. सहृदय व समर्पक दृष्टांतांची इथें खैरात झाली आहे. त्यामुळें—-

*तुझ्या गालावरी कुणीं ग गोंदलें*
*फूल कुणी ग टोचलें गुलाबाचें*

यापरीच्या सौंदर्यामुळें या काव्याची भव्यता वाढली आहे. आणि—

*माझे हे कीं चुडे[1] बत्तीस बंदांचे*
*तेत्तिस कोटी देवाजींचे आशीर्वाद*

या कल्पनेनें तें सौभाग्यसंपन्न झालें आहे. त्याचप्रमाणें इथें प्रकट झालेला भाव—

*समुद्राच्या पाण्या स्वस्थता अणु नाहीं*
*नाचतें हालतें सदा खालींवर होई*

या कल्पनेप्रमाणें नांदत आलेला आहे. आणि—

*सूर्य उगवला किरीट किरणांचा*
*पांखरा फुटे वाचा झाडांवरी*

या रीतीनें त्याचा जन्म झालेला आहे. तसेंच—

*माझें तान्हें बाळ देवाचें मंगल*
*अमृताचें फळ संसाराचें*

ह्या समाधानांत त्याची जोपा झाली आहे. म्हणून ह्या भावभावनेनें केलेलीं बोलणीं काळजाला जाऊन भिडतात. हृदय उचंबळून आणतात. जिवाभावानें हुंकार घालतात. आणि म्हणूनच त्यामागचें एकच साधें मामुली मागणें असतें—

*जिवाच्या जिवलगा प्रेमाच्या सागरा*
*सुखाच्या माहेरा येई गा तूं*
*अपराध पोटीं प्रेम थोरांचे घालित*
*येई धांवत धांवत भाईराया*
*नको धन नको मुद्रा नको मोतियांचे हार*
*देई प्रेमाश्रूंची धार भाईराया*

१ सौभाग्य अलंकार, बांगड्या, पती, नवरा.

# अनुक्रमणिका

## भाग २ रा : ओवीगीतें–(अ)

संग्राहक—

लोकगीतें–गाणीं (ब)

संग्राहक—

भाग ३ रा : उखाणे व म्हणी

संग्राहक—

## जानपद-उखाणे



## फुगड्याचे उखाणे



## रुखवताचे उखाणे

५

# ओळख-पाळख



जात्याच्या चित्ताकर्षक पार्श्वसंगीतावर भोळ्या भाबड्या मनोभावानें घातलेला हुंकार आजवर अनेकांनीं टिपून घेतला आहे. त्या संबंधींचें बोलणें केलें आहे. चिंतन केलें आहे. मनन केलें आहे. आणि त्यानंतर मनांत उभ्या रहाणाऱ्या भावविश्वाला लिपीबद्ध करून त्याचें प्रकाशन करण्याचाही महान् प्रयत्न झालेला आहे.

'सासर-माहेर' च्या भावफुलोऱ्यानें शृंगारलेले असे मनोभाव लेखाच्या, निबंधाच्या रूपानें साजिवंत करण्याचा प्रयत्न आज येथें होतो आहे. त्यासाठीं महाराष्ट्राचे महान् कलाकार व भाष्यकार येथें एकत्र आले आहेत. त्यांनीं आपापल्या कल्पनांचें एक सुंदर कमलपुष्प महाराष्ट्रशारदेच्या चरणीं वाहिलेलें आहे.

या कमलपुष्पाची दरवळ देखणी आहे. जीव भुलवून सोडणारी आहे. काळजाचा ठाव घेणारी आहे. आणि सुखदुःखांनीं माखलेल्या नेत्रदीपक गंगायमुनांच्या साक्षीनें जीवनगाथेची उकलही करून देणारी आहे. तर तिच्याबद्दल मी अगोदरच अधिकउणें कशाला बोलूं ?

माझें म्हणणें कीं, मी कांहीं बोलण्यापेक्षां आपणच या कमलपुष्पाचें प्रत्यक्ष दर्शन घ्यावें. कारण लोकगीतांच्या अमृतकलशानें पावन झालेल्या या कमलपुष्पाची प्रत्येक पाकळी आपल्याला साजिवंत केल्याशिवाय रहायची नाहीं अशी माझी श्रद्धा आहे.

# मोतीदाणे-विविधलेख

अनुक्रम

# जिव्हाळ्याची गीता

## सौ. लीलाराजे पटवर्धन

सासर आणि माहेर ! बायकांच्या जीवन-नदीच्या दोन्ही अंगाचे दोन किनारेच जणुं कांहीं. माहेराची शिकवण व माहेराची पुण्याई बरोबर घेऊन सासरच्या कडेकपारींच्या, डोंगर-टेकड्यांच्या कांठाकांठानें बायकांच्या आयुष्याचा ओघ वहात असतो. कधींमधीं असंतोषाचें, रागालोभाचें वादळ त्यावर उठलें तरी त्या पाण्याचा स्वभाव जन्मतःच शांत, समाधानी आणि खेळकर असतो.

माहेरच्या मातींत उगवलेली, आई-वडिलांच्या मायाममतेच्या आळ्यांत तरारलेली, आणि भावंडांच्या रुसव्या-फुगव्याच्या उन्हानें पानोपानीं तकतकीत झालेली, ही स्त्रीजीवनाची आकाशवेल कुण्या परक्या घरंदाजाच्या मांडवावर जाऊन पसरते; फुलते आणि सुफळ होते. तें परक्याचें घर आपलें करते; नुसतें आपलेंच करून रहात नाहीं, तर त्याचा स्वर्ग बनविते; भ्रताराचें घर तिचें तीर्थक्षेत्र बनतें; तीच तिची पंढरी-भूवैकुंठ ! स्त्रीच्या जीवनवेलीची इतिश्री सासरीं होते. भरल्या कुंकवानें परलोकीं जाण्याची इच्छा करणारी स्त्री भ्रताराला देव आणि सासराला राऊळ मानते.

पण या वेलीचीं मुळें असतात माहेरच्या मातींत. त्या मातीची ओढ तिच्या मनींमानसीं ताजी असते. सासरची ओढ लागली, कंथाच्या जीवाशीं भाव जडला,

सासूसासऱ्यांच्या छायेंत आईबापाची मूर्त बिंबल्यासारखी वाटूं लागली, मुलाबाळांचे प्रेमाचे लागेबांधे ओटींपोटीं आणि गळांडोळां पडून कामाकाजाचा, मायामोहाचा व्याप वाढला, तरी कधींमधीं, शांत वेळीं, दुखावल्या भावनांच्या अवेळीं, काळजी कांच्याच्या तिन्हीसांजेला माय आठवते; बाबांची सय येते; भाऊ बंधूंची, बाळसवंगड्यांची, त्या जन्मघराची अन् गांवशिळेची आठवण येऊन काळजांतून भावनांची हांक उठते; डोळे ओले होतात आणि चांदिण्यांसारखे नितळ[1], तुळशीसारखे निर्मळ, अन् साखरेसारखे गोड शब्द तोंडावाटें बाहेर पडतात. त्यांचें रूपांतर ओव्यांत होतें. क्षणभर थांबलेला काळ त्या ओव्या टिपून घेतो. जिवाचा अंमळ सूर लागतो. एक, दोन, तीन, किती तरी मंजुळ ओळी बाहेर पडतात; जीव त्या घोळवून ठेवतो. त्याच ओळी आठवणींत रुजतात आणि वेळप्रसंगीं, बरोबरीच्या मुलीबाळींत, शेजीबाईच्या समोर, पैपाव्हण्यांच्या गोतावळ्यांत, श्रावणांत, अंगणांत, जात्यावर, पाण्यावर, पाळण्यापाशीं....परत उमटतात; आणि मग, हिच्या तिनं तिच्या तिनं, अशा ऐकून व ऐकवून गांवोगांवीं पसरतात. अशा वेळीं बाळाच्या, शेताभाताच्या, देवाच्या, भ्रताराच्या, कुणाच्या का असेनात; पण जशा सासरमाहेराच्या ओव्या तशाच सगळया ओव्या, स्त्रीच्या भावनोत्कट हृदयाला पडलेल्या मायेच्या पिळांतून तळमळीनें, काकुळतीनं बाहेर पडलेल्या शब्दांच्या माळा होतात. त्यांना मातीचा वास आहे; कुळाचें ओज आहे, कारुण्याची चाल आहे; सुगरणीचा साज आहे आणि घरंदाज घरमालकिणीचा साटोपहि[2] आहे.

या ओव्या जीवींच्या जिव्हाळ्यानें ओल्या असल्यामुळें अगदीं सरळ आणि अर्थवाही शब्दांनीं झुळझुळणाऱ्या आहेत. त्यांत आपल्या कुळाशिळाचें, आपल्या गांवशिवेचें, आपल्या घरंदाज आचारविचारांचें चित्र रंगविलेलें असतें. जसे आपले सौभाग्याचे अलंकार तशाच या ओव्या! हीं लेणीं खास मराठमोळा वळणाचीं आहेत. त्यांची जडणघडण खास मराठीयेचे नगरीं वसणाऱ्या सोनारांच्या हातीं घडली गेली आहे; सुबक, नेटकी पण वजनदार!

आपला गांव कसा, आपलें मूळचें रूप कोणतें, आपले आईवडील कसे होते, आपलें समाज-मन कसें निर्मळ, निर्व्याज आणि भावुक, प्रेमळ होतें, हें अजमावयाचें असेल तर या ओव्या मनाशींच म्हणाव्या. ही स्नेहलांचीं जीवगाणीं आहेत. या ऐकण्याचें भाग्य लाभलें तर अमृताशीं बरोबरी करणारी मराठी बोली कशी गोडाळ आणि सुकुमार आहे, तें कळून येईल. त्यांच्या वाचनानेंहि तोच अनुभव येईल;

---

१. स्वच्छ. २. आवाका, सामर्थ्य.

फक्त त्या वाचनानंदांतून मायमाउल्यांच्या गोड गळ्यांतून निघणाऱ्या सुरांची गोडी तेवढी वजा जाते इतकेंच....

आतां या संदर्भांत कृष्णाकांठापासून पंचगंगेच्या परिसरापर्यंत मिळालेल्या ओव्यांपैकीं कांहीं वानगीच्या[1] ओव्या आपण पाहूं या. पाहिलात हा कसा मोहाचा मासला आहे! अपूर्वाई तरी किती!! जसे काय सुवासिक अन् मऊ मोत्यांचे सरच!!!

*बहिणा जातीया सासराला हात करीत गडणीला[2]*
*घोडं लागलं चढतीला लवंगा टाकीतें फोडणीला*

बहीण सासऱ्या निघाली आहे. जिवाभावाच्या मैतरणीला हात पालवून खुणावते आहे; तिचा निरोप घेते आहे. डोंगरवाट चढणीची; डोंगराच्या पल्याल बाईचें सासर "पथरानीं चढणींत, घोडें थकून चूर" अशी स्थिति झाली आहे. सासऱ्या निघालेल्या कोमळेच्या डोळां आंसूंची झड लागली आहे; रडून रडून नाक लाल झालेंय् तिचें, तिच्या गडणीचें, तिला निरोप द्यायला पुढें सरलेल्या माय-माउल्यांचें, साऱ्यांचे नाक, कान, गाल लालीलाल झाले आहेत. उमाळ्याचे कढ येताहेत; पण ते दाबायला हवेत. पोर सासरीं निघाली आहे; जायलाच हवें; पोरीच्या जातीला सासरच निदानींचें; याच आंसवांच्या, उसाश्यांच्या, सुस्काऱ्यांच्या आणि गरम श्वासोच्छ्वासाच्या लवंगा तर फोडणीला नाहीं ना पडल्या?

*लेक निघाली सासरीं तिच्या ओटींत घाला गहूं*
*ज्याची त्यांनीं नेली सई चला माघारी जाऊं*

बाई सासऱ्या निघाली; तिची ओटी गव्हानें भरा. गहूं म्हणजे शेतकऱ्यांचे मोतीदाणे. कोंकणांत—त्या मायमावल्या तिची ओटी तांदुळांनीं भरतील. ती जायचीच होती एक दिवस. मालनबाईला कटींखांदीं खेळवली, लाडागोडांत वाढवली, ती साऱ्या माहेरच्या जिवलगांना सोडून निघाली आहे. पण आतां मनें आवरायला हवींत; ज्याची होती त्यानें नेली; तिला आनंदानें जाऊं द्या. नका गऽ नका रडूं आणि तिला पण रडवूं. चला घरोघर परत जाऊं, ती दिसेनाशी झाली, दूर गेली.

शकुंतलेला निरोप द्यायला महर्षि कण्व जरा दूरपर्यंत गेले; त्यांनीं तर भावनांना जिंकलें होतें; पण शकूबाई जातांना त्यांच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें;

---

१ नमुना. २ मैत्रिणीला.

कंठ दाटून आला. त्या वेळीं त्या आश्रमांतील सख्या साजिऱ्यांच्या मनीं हीच ओवी स्फुरली नसेल का? "ज्याची त्यांनीं नेली सई। चला माघारी जाऊं।"

सारें खरें. पण आईचें अंतःकरण कसें मायाममतेचें मोहळ. तिनें लेकीच्या सांगाती पाठराखीण धाडली. फुलासारख्या नाजूक लेकीला सासरच्या रामरगाड्यांत नवेनवे वाटेल, जीव हिंपुटी[1] होईल, आईबाची, बंधुमैतरावी सय येईल, म्हणून चंद्रज्योतीसारखी पाठराखीण लेकीसंगें पाठवण्यांत येते. ती पाठराखीण जिव्हाळ्याची, हुषार, चपळ आणि साटोपाची!

*बाळ सासऱ्याला जाती मागं फिरून हे ग पाहती*
*माझ्या बाळीला सांगी[2] देती संग मुराळी[3] चंद्रज्योती*

आईच्या आंतड्याचें तेवढेंच समाधान.

आपल्या या माहेरवाशिणीचा भाऊराया आहेच तसा तेगाराचा[4] आणि जिवाभावाचा. बहिणीचें किती कोडकौतुक? तिला काय हवें नको बघायची किती अपूर्वाई!

*बंधुजी घेतो चोळी भावज गुजरी पुढं पुढं*
*दोघांच्या सावलीनं माझ्या चोळीला रंग चढं*

भाऊ-भावजयीच्या प्रेमाच्या सावलींत बाळीच्या चोळीला रंग चढतो आहे. अहाहा! काय बहारीची कल्पना आहे ही!! बहिणा थोरामोठ्या तालेवाराची घरधनीण झाली. बाळपण सरून सासरीं गेली. नवतीची अंगलट, हाडपेर मजबूत, सासरीं लिंबासारखी रसरसली, रेशमाची चोळी अंगीं दाटली, चोळीच्या मोरपंखी रंगावर तेज चढलें, शोभा आली पण कशी? दादा-वहिनीच्या मायेच्या सावलीनें! प्रेमाच्या सावलीनें प्रेमळांच्या अंगलटीला तेज चढतें! हळुवार कवींचीं महाकाव्यें गाळून, देवासारख्या चित्रकारांच्या चित्रींचे रंग घोळून, ही जीवाला लोभावणारी कल्पना निर्माण केली कीं काय, असा मनाला प्रश्न पडतो! हा मराठी भाषेचा विलास, हीच अमृताशीं पैज मारणारी मराठी बोली!

कुठें कुठें असेंहि होतें कीं, बंधुराया प्रेमाचा असावा तर भावजय ज़रा तोऱ्याची निघावी. पण बहीण माहेरीं आलेली, ती काय भावजयीच्या एवढ्यातेवढ्या

---

१ हिरमुसलेला. २ सांगावा, निरोप. ३ सासुरवाशिणीस माहेरीं आणणारा माणूस. ४ दिमाख.

उण्यादुण्याला मोजणार? छे:, मुळीच नाहीं. भावाची लाडकी बहीण काय म्हणते पाहा :

*बंधुजी घेतो चोळी भावज गुजरी देईना दोरा*
*चांदाच्या उजेडांत काय चांदनी तुझा तोरा*

सर्व माणसें सारखीं कशीं असणार? हाताचीं बोटें पांच, पांचांची तऱ्हा वेगळी तसेंच भावजयांचें. पण बहिणा लटक्या रागानें म्हणते, "अग चांदणी, तूं आगळी आहेसच; पण माझा भाऊ चांद आहे. त्याच्यापुढें तूं फिकीच!" भावजयीवर प्रेम आहे. बहिणीच्या मनीं राग नाहीं; रुसवा आहे म्हणूनच तिला चांदणीची उपमा ती देते. भावानें मनपसंत खण आणला चोळीसाठीं, पण भावजय शिवायला दोरा देईना म्हणून, म्हणून हा लटका राग!

आईबापांची पावन सांवली किती दिवस टिकायची! पिकलीं पानें कधीं तरी गळायचींच तीं. आईवडिलांच्या मागें भाऊरायाचा अम्मल सुरू होतो. सासरीं गेलेल्या ताईला, आक्काला चार दिवस सुखदुःखाचे, विरंगुळ्याचे काढायला माहेराची साउली हवीच. बहिणीच्या प्रेमळ भावाचा स्वभाव, त्याचें अगत्य आणि जीवभाव गाणाऱ्या या ओव्या पाहा :

*पाटानं पाणी जातं सरळ सापावाणी*
*बंधू इमानी बापावाणी*
*लुगडं घेतीयलं दोन्ही पदर टोपायाचे*
*माझ्या बंधूजीचे इष्ट मैतर गोकाकाचे*
*हिरव्या चोळीवरी राघू काढीती कुंकवाचा*
*बंधु मुराळी हुकूमाचा*

अशा जिवाभावाच्या भाऊरायाच्या कौतुकाच्या किती म्हणून ओव्या सांगाव्या! पाटानें सापासारखें जाणारें पाणी आणि भावाचा सरळसूत स्वभाव यांची लावलेली जोडी पाहून मन हरखून जातें. भावानें ताईला दोन्ही पदर टोपाचे असलेलें लुगडें घेतलें. त्यानें ते गोकाकहून आणलें असेल का? गोकाकचीं रंगीत खेळणीं प्रसिद्ध तसेच ताईच्या भावाचें इष्ट मैतर रंगी आणि खेळ्ये, असा तर भाव नाहीं ना या ओळींत प्रकट केलेला?

ताई म्हणाली, दादा माझ्या चोळीवर राघू काढ. दादा ताईचें मन झेलणारा, त्यानें कुंकवाच्या रेषांनीं हिरव्या अंगाचा राघू काढला चोळीवर! सौभाग्याचा,

समृद्धीचा रंग हिरवा, त्याच्यावर अहेवाची[1] लाल चिरी–कुंकवाची रेषा! शब्दांच्या मागें उभी असलेली अबोल पण चमकदार अशी ही कल्पना किती मनोज्ञ आहे.

माहेर चार दिवसांचा स्वर्ग. कुळवंताच्या लेकी दो दिसांचें माहेरपण करून लगबगीनें सासरीं जातात. सासर श्रीमंत असेल तर देवच पावला. आणि लेखीं सासर गरीबीचें असेल; दादला[2] तालेवार[3] हिंमतीचा नसेल तर....तर काय? भल्या आईबापाची लेक तशाही फाटक्या, थिट्या सासराला संभाळून तगवून धरते. घरंदाज लेकीसुनांनीं ढवते संसार सांभाळले; झांकल्या मुठी आंसवांनीं भिजविल्या पण जल्मभरीं लाखामोलाच्या राखल्या. भाऊ धनवंत असला तरी त्याच्या कारभाराचा बहिणाला हेवा नाहीं, ती म्हणते :

*दुबळ्या भर्तीराचे मी ग लोटुनी राहितें घरदार*
*समृत[4] बंधुजीचा नको करूसा कारभार*

अशा पिळाच्या लेकीबाळी असतात म्हणून संसार सजतात, गरीब घरादारांना बरकत[5] येते, रिवाजरीतींचीं रोपें रुजतात.

अर्धे मन माहेरीं ठेवून आलेल्या लेकींच्या मनीं सासर, सासूसासरे, नणंदा आणि भ्रतार यांच्याबद्दल भावना असतात त्या किती उदात्त, किती हळुवार न् किती गोड शब्दांत बोलक्या झाल्या आहेत पाहा :

*साऱ्या गोतामंदीं नंदबाईची आवईड*
*माझ्या पती पाटची शालजोड*

साऱ्या गणगोतांत नणंदेची किती आवड? नणंद सगळ्यांच्या आवडीची. नवऱ्याच्या पाठची ती बहीण आणि म्हणूनच ती पाठीं ल्यायची पश्मिना[6] शालजोडी ही कल्पना किती हृदयंगम आहे.

हें नणंदेचें कौतुक झालें गुणांचें; पण तिच्या तोऱ्याचेंहि कौतुक आहे सासुरवाशिणीला :

*नणंद आक्काबाई तुम्हीं नणंदपना दावा*
*सोन्याच्या करंडाला तुम्हीं मोत्याचे घस लावा*

---

१ सौभाग्य. २ नवरा. ३ श्रीमंत. ४ सामर्थ्यवान. ५ समृद्धि. ६ काश्मिरी लोकरीचें महावस्त्र.

नवऱ्याच्या बहिणीचा तोरा[1] कसा मन राखून सांभाळला आहे! सोन्याच्या करंड्याला जसे मोतियांचें घोस तसा नणंदेचा तोरा! सोन्याच्या करंड्यांत सवाष्णीचें कुंकू सांठवलेलें; त्या मोलाच्या करंड्याला—भर्ताराला—पाठच्या बहिणीचा तोरा मोत्यांच्या घोंसासारखा शोभतो; असा भाव गाणाऱ्या सुना धन्य होत.

सासुसासरे म्हणजे तर या सासुरवाशिणींचे देव; विठ्ठलरखुमाईसारखे पूज्य. त्यांच्या कौतुकाच्या आणि आदर भावनेच्या ओंव्या कितीतरी आहेत. त्या किती म्हणून सांगाव्या? पण तीर्थोदकाचें आचमन, एवढ्या बेताच्याच इथें वानगीसाठीं पाहूं या?

*सासुसासरा माझ्या देव्हाऱ्यावरलं सोनं*
*त्यांच्या उजेडांत मी लोटतें चारी कोन*
*सासु नी सासईरा माझ्या वाड्याची दोन दारं*
*दोघांच्या सावलीनं नाहीं लागत ऊनवारं*
*सासूचा सासुरवास सासू नव्हं ती बयाबाई*
*ताट करून वाट पाही*
*सासु सासईरा दोनी शंकर पार्वती*
*नणंद माझी भागिरथी दीर माझा गणपती*
*पती माझा चंद्रज्योती*

सासुसासऱ्यांबद्दलचा पूज्य भाव वानूं[2] जातां शब्द थिटे पडले. त्यांना देव्हाऱ्यावरलं सोनं म्हटलं. त्यांच्या उजेडांत चारी ठाव भरलेल्या वाड्याचे चहूंकोन झाडून लोटून ही गुणाची गुणावती निर्मळ करते. "हात फिरे तिथें लक्ष्मी फिरे" अशी म्हण आहे. ही घरंदाजाची लेक अशी केरवारे करीत असतां कुणा पाप्याचांडाळाची, कुणा परक्या बाहेरच्याची, दृष्ट संसाराला लागेल? सासुसासऱ्यांचा जागता उजेड आहे ना घर उजळायला, मग काय कमी आहे बाईला? तिच्या चौसोपी वाड्याचा तट म्हणजे सासुसासरे! त्याच्या आसऱ्याला बाईचा संसार फुलतो, फळांनीं बहरतो. भिंतीचा आडोसा थंडी, उन, वारा, पाऊस आणि सारीं संसारावर येणारीं संकटें, यापासून मालनबाईचें रक्षण करतो.

चित्र तर उदात्त आहेच; पण त्यावर ओसंडणारी आदराची भावना आणि ऋणाईतीचा देकार[3] मनोरम आहे; स्नेहाच्या उबेनें रंगलेला आहे.

---

१ ऐट, दिमाख. २ वर्णन करणें. सांगणें. ३ आविष्कार.

सासरमाहेरच्या जीवनांत पहिला, जिव्हाळ्याचा अंतरींच्या उमाळ्याचा, लडिवाळ लळ्याचा मान अर्थातच भरताराला आहे. त्याच्याभंवतीं ही ओव्यांची ओढ रुंजी[1] घालते. त्याला पाहून जीवींच्या जिवांतून गोड, मऊसूत शब्द आषाढाच्या ढगांसारखे भरभरून येतात. उरींच्या उमाळ्याला नाजुक ओठांची गोडी येते. या स्त्रीप्रेमाच्या आर्द्रा आदरानें ओल्याचिंब होऊन अंगी-उरीं सरसरून येतात. ओव्यांच्या वरून सारीं प्रेमकाव्यें ओवाळून टाकलीं तरी न् त्यांना लागलेले पायांच्या दृष्टीचें लागीर[2] उतरूं म्हटलें तरी उतरणार नाहीं.

*भरतार पुशित्यात कां ग अस्तुरी अबोल्यानं*
*तुझ्या डोरल्याचं सोनं न्हाई जोखलं ताजव्यानं*
*गेल्या कुन्या गांवीं माझ्या सईचा मोहन*
*त्याच्याबिगर ग तिला ग्वाड लागेना जेवण*
*रागीट भरतार नागाचा धुस्सकार*
*मी का हांसूनी केला गार*
*गांवाला गेलं म्हनूं वाट पाहिते दारांतून*
*हळदीकुकवाचं जहाज आलंया शेरांतून*
*हौस भर्ताराची उसुशी कंवळाची (कमळाची)*
*माझी ती मैनाबाई वेनी रुतली कुरळाची*

किती म्हणून नांवाजलें आहे आपल्याला जिवलगाला या प्रेमळ बायकांनीं ! नवरा विचारतो, "कां ? आज अबोला का ? तुमच्या कटी-खांदीं, नाकाकानांत आणि गळाभर असलेले दागिने ताजव्यानें तोलले नाहींत आम्हीं. मणावारी सोनं सोनाराघरीं धाडलं; कांहीं म्हणतां कांहीं हयगय केली नाहीं; मग बोलणं का बंद ?"

असा मनधरणी करणारा साजन गांवीं गेल्यावर मग सजणीला जेवण कसें बरें गोड लागेल ?

पण नवऱ्याची माया म्हणे त्याच्या पोटांत आहे. तरीसुद्धां मोठ्या खुबीनें आणि चातुरीनें तिला वागावें लागतें. नवरा रागीट, कधीं फुस् करील त्याचा नेम नाहीं. त्याचा राग म्हणजे नागाचा धुस्सकार. पण ही साजरी त्याला हंसून गार करते. तिच्या गालावरचें हंसूं पाहून तो नाग डोलायला लागतो !

---

१ पिंगा. २ बाधा.

आपला नाजुक बांधा, सुंदर चेहरा, धुतल्या मोगरीसारखी कांती, काजळानें भरलेले डोळे आणि अंगापेराचा गोड गाभा कुण्या वेळीं त्या फुसकारणाऱ्या नागाला मऊ मेण करण्यासाठीं वापरायचा हें त्या साजणीला कसें बिनचूक ठावें आहे! ती म्हणते "मी का हांसून केला गार!"

कुळवंताच्या मुखरणी[1] अशा हुषार हव्यात तरच संसार निभाऊन जातो. आणि नवरा घरांत रमतो. नाहीं का?

हो; पण कामाकाजासाठीं त्याला बाहेरगांवीं, तालुक्याला, शहराला जावें लागणारच. तसा तो गेलेला असतांना ही विरहिणी प्रिया काय काय गाते आहे, ऐकावेंच. आपला नवरा गांवाला गेला म्हणून दारांतून इथें ती वाट पहाते आहे तों, तो आल्याचें कळतें. वेशीवर साजन आला. म्हणजे देशांतराहून हळदीकुंकू भरून जणुं जहाजच आलें. किती भव्य कल्पना! काळजांत कोरून ठेवलेला नवरा चारआठ रोजां परगांवीं गेला. बाईच्या काळजाला ओढ लागली. मनीं चिंता ताणली. वाईटबऱ्याची बोंच मनीं रुतायला लागून प्राण हुळहुळे झाले. कामाकाजांतून वेळ काढून, दारीं उभी राहून, गांवशिवेकडे लावलावून नजरा शिणल्या....आन् एकदांचा साजन आला. मालन मनीं हरखली, पण सुखाची कल्पना जिवाला शिवली नाहीं. जिवींच्या जिव्हाळ्यानें, भावनांच्या गरुड-पंखांनीं आकाशाला गवसणी घालणारें उड्डाण मांडलें. वेशीवर हळदीकुंकवाच्या भारानें लादलेलें जहाज अकाशाला शीड फडकावीत आहे असें चित्र त्या सुंदरीला दिसलें. कुठवर म्हणून स्तुति करावी? परसदारांतल्या शेवंतीवरल्या फुलपांखरानें सहज चंद्रावर झडप मारावी तितकें उदात्त आहे हें!

सासर-माहेरच्या दोन्ही कुळांचें नांव उजळ करणाऱ्या सुनालेकींचें मन, त्यांचे जीवींच्या जिवांतील नाजुक भाव आणि प्राणापलीकडे जपलेले, पण कधीं मधीं एकटेपणाच्या जडपणांत स्वतःशींच गुणगुणलेले कांहीं आत्मीय विचार मन कातरतात.

मानी मनांचें गुज हळुवार नजरेनें पाहायला हवें, कोमल हातांनीं हें गोवें[2] उकलायला हवेत.

बाईला संसाराचें चोज[3] आहेच. तिनें प्राणांच्या ज्योती उजळून संसार दिपावला. पण ती ज्या घरून आली तें घर धर्माचें होतें. तिच्या घरीं जें धार्मिक शिक्षण-वळण मिळालें तें तिच्या मानसीं मूळ धरून आहे. देवाच्या भेटीआड

---

१ सुगृहिणी. २ गुपित, गुंतलेले धागे. ३ कौतुक, हौस.

कंथाची मिठी तिला आवडते पण परवडत नाहीं. "लई झालं आतां....आतां पुरं" असें ती मनाशीं म्हणते. पण इलाज काय. तिचें शहाणपण दाराआड !

*गीता नी भागवत माझ्या गळ्याचं हाई तें सोनं*
*बापाजी दौलईत त्यानं शिकविलं शहानपन*

तिचें शहाणपण ती माहेराहून घेऊन आली आहे. तिच्या मोठ्या बुद्धीला गीताभागवताचें मूळ आहे अशी ही सगुणा या घरीं नांदायला आली; तिनें या घरादाराचा स्वर्ग केला. तिनें आपला कुसवा चिरून लाखांच्या दौलतीला कमी म्हणायला लावतील अशीं मुलें, मुली आपल्या नवऱ्याच्या घरीं जन्माला घातलीं; पण ती प्रेमळ पोर या घरीं कशी आली माहीत आहे का तुम्हांला ? कळीकळालाहि कळलें नसतें हें गुपीत. पण तिच्या काळजांतून न कळत वाहणाऱ्या ओळींतून ते ठिपकलें :

*बंधु इवाही करईला[1] यीनी[2] नाईत माझ्या तोला*
*सरदार बंधु तुम्हांसाठीं मी शब्द दिला*

भाऊ विवाह करायला आला. ठरलेविलेल्या जाग्याचीं माणसें तोलामोलाचीं नव्हतीं....पण भाऊ मोठा मनाचा; त्याच्या शब्दांसाठीं या लग्नाला होकार मिळाला होता.

अशी मनाविरुद्ध मालनीला त्या जागीं दिली, पण औक्षभर तिनें कधीं असंतोषाची हिरमुष्टीची ओळखसुद्धां दिली नाहीं. अशी सोशीक, अशी शहाणी ! !

तिच्या मनांतली गोष्ट तिनें आपल्या जन्मदात्या पित्याच्या स्वप्नांत जाऊन त्याला सांगितली. किती हळुवार, किती सोज्वळ, किती निर्मळ आहे ही कल्पना ! किती कोवळा आहे हा भाव !

*बापानं दिली लेक देस सोडून कोकणांत*
*आली बापाच्या सपनांत गेंद रुतली चिखलांत*

"बाबा, बाबा, पहा हो, तुमची गेंदासारखी लाडकी चिखलांत रुतली आहे. तुम्हीं मला कोंकणांत दिलीत पण मनचें बोलतें. राग धरूं नका, या चिखलांत किनई माझं मन लागत नाहीं !"....

---

१ केला. २ विहीण.

जीव चिरीत जातात हे शब्द आर्त....करुण....

ती रुसली, पण कुणावर? सासरच्यांवर नाहीं; माहेरच्या माणसांवर! तें रुसणें सुद्धां जीवींच्या शल्यामुळें नव्हें हो; तर हंण्या-खेळण्याचें, लेण्या-बोलण्याचें! अशा लेकीवाळी साधुसंतांनीं असार म्हटलेल्या संसारांत सार आणतात; तो गोड करतात. त्या रडतात मनच्या मनीं; त्या हंसतात सुखविण्यासाठीं....लेक मालन आपल्या आईजवळ हट्ट करते आहे.

*अंबर डाळिंबाचा त्याचा आलाय मला काव*
*बया माझी मालईनी राजवरकी जोडी लाव*
*भरल्या बाजारांत चोळी देखिली कांदापात*
*माझी ती बयाबाई मन रुतलं घाल हात*
*लुगड्याची घडी मी ग टाकीतें चांफ्यावरी*
*माझा रुसवा बापावरी*

अशा तऱ्हेनें रुसत फुलत तिचें आयुष्य सासरीं नवल्याचें नवें, नव्याचें जुनें आणि जुन्याचें म्हातारें होत असतें. काळ जात असतो.

मुलींच्या या संसाराचें सुख पाहून माहेर सुखी होत असतें :

*सयांनों पाहू चला बहिणा माजीचा सवंसार*
*इच्या नवऱ्याचा कृष्णदेवाचा अवतार*

असें दिसलें कीं, माहेरच्या माणसांना मूठभर मांस चढतें. माहेर म्हणत असतें कीं दुःख सोस, काम कर, दागिन्यांचा सोस करूं नको, भरताराची, सासुसासऱ्यांची मर्जी सांभाळ आणि कुळवंताच्या लेकीला डाग लागेल असें वागूं नको. पोर म्हणते :

*"उभ्या मी गल्लीं जातें दंड भुजया झांकोनी*
*नांव पतीचं राखोनी*

आणि माहेर या परीनें धन्य होतें. माहेरीं, सासर साजरें करून गोड करायची शिकवण मिळते. आणि समाज, घरदार, संसार टिकायला, नांवारूपाला यायला अशा गुणी मुलींची गरज असते. या गुणी मुलीच पुढें गुणी सुना होतात. आणि गुणी सुनाच गुणी मुलांना जन्म देतात :

*डाळी डोरल्याचं सोनं सोनाराच्या दुकानाचं*
*कपाळीचं कुंकू बरहमदेवाच्या ठिकाणींचं*

असें मानून संसार नेटकेपणानें तडीला नेणाऱ्या लेकीबाळींच्या, मायमाऊल्यांच्या जिवाभावाची ही गीता—या ओव्या—आमचें धन आहे. आमचा समाज सुखी होणार असेल तर त्याचीं मुळें या जीवगाथेंत रुतलीं आहेत, रुजलीं आहेत असें मी मानतें.



# कर्मयोगिनीचें जीवन-

श्री. न. शे. पोहनेरकर

मराठी स्त्री जन्मल्यापासून तिचें लालनपालन आईवडिलांच्या घरीं–माहेरीं–होतें. आपल्या बहिणभावंडांच्या मेळाव्यांत ती वाढते, मोठी होते. आयुष्यांतील प्रेममय बालपणाची तिची भूक येथें भागते. संसाराच्या सवत्या उभारणीची, सासरच्या सहजीवनाचीं मुळाक्षरें ती येथें गिरविते. परंतु याचें प्रात्यक्षिक म्हणून जेव्हां ती आपल्या स्वतांच्या घरीं जाते तेव्हां एका अनोळखी घरांत आणि अपरिचित व्यक्तींच्या सहवासांत तिला आपल्या ऊर्वरित आयुष्याचा आकार घडवावा लागतो, संसार थाटावा व मांडावा लागतो. तथापि सासरीं गेलेल्या मुलीला आपल्या माहेरची आठवण विसरणें अशक्यच असतें. आपल्या येथील स्त्रीजीवनांत 'सासुरवास' या शब्दाला एक विशिष्ट अर्थ प्राप्त झालेला आहे. योगायोगानें या बिचाऱ्या माहेरवासिनीला सासुरवास ह्या रूढ अर्थानें अनुभविण्याची जर का पाळी आली तर मग कांहीं विचारायलाच नको. माहेरच्या अनुभविलेल्या आस्थेवाईक ओलाव्याची आठवण करीत तिला आपलें सासुरवासाचें जीवन कर्तव्य म्हणून कसें तरी गोड घेऊन रहाणें भाग असतें. गेल्या पिढीचें स्त्रीजीवन म्हणजे अशा कर्मयोगी योगिनींचें जीवन आहे. तिला पावलोपावलीं आपल्या माहेरच्या ममतेची आठवण होते

*ईळ जाई कामाखाले रातीं झोप नाहीं आली*
*अग माझे मायबाई तुझी मला सय झाली*
*सासर ग वासिनीला रात खरी मायबहिन*
*असा कोंबडा दुस्मान बांग टाकी टक्कारून*

आपल्या आईनें आपल्याला ज्या कांहीं गोष्टी हिताच्या म्हणून सांगितल्या आणि शिकविल्या त्या, ती आपल्या मनांत सारख्या वागवीत असते. सासरीं असलेली अनेक नात्याची मंडळीं परंतु त्यांतहि पहिल्याप्रथम कुणाची दखल घ्यायची असेल तर तीं आपल्या पतिराजाची. बायको ही 'पायाची दासी' अशा परंपरागत भावनेनें भारलेले हे पतिराज माणुसकीला पारखे नसले म्हणजे मिळविली. नाहीं तरी अनेक नात्यांच्या एकत्रकुटुंबांत सर्वांचेच स्वभाव सारखे असणार नाहींत. असत नाहींत. पण त्यांतहि पतिराजाची बडदास्त ठेवणें हें गृहिणीचें आद्य कर्तव्य! म्हणूनच तिच्या मनांत आपल्या आईची शिकवण सदैव जागी असते.

*अग भर्ताराचा राग घेईना ग गंध पानी*
*अग माझे सईबाई घाल पिरतीची मव्हनी[1]*
*भर्ताराचा राग जसा इस्त्याचा इंगूळ*
*बाई नेनंते ग माझे त्याची मरजी सांभाळ*
*भर्ताराचा राग दुधावरली उकली*
*नेनंते ग बाई माझे नको होऊं उतावळी*

भर्ताराच्या मर्जीनें वागत असतांनाच इतरांच्याहि विषयीं तिला दक्ष असावें लागतें. सासू, सासरा, नणंद, दीर, भावे या अशा सर्व गोतांत रहावयाचें म्हणजे जुन्या काळीं सासुरवासिनीला मोठें दिव्य असें. सर्वजण तिच्या चुकांबद्दल पाळूनपाळून बोलण्याची संधि वाया घालवीत नसत. आणि अशा प्रत्येकाचें बोलणें मनाला लावून घेऊन वागणारी एखादी हळव्या मनाची मुलगी तेथें असल्यास तिला किती मानसिक त्रास सहन करावा लागत असेल याची कल्पना केलेली बरी. बोलणीं बंद होणारीं नव्हेत, तीं अपरिहार्य आहेत, ही जाणीव तिच्या मनाला असणें अत्यंत आवश्यक असे. आणि म्हणूनच माहेरवासांत या भाबड्या जिवाला तिची मायाळू माता आधींपासूनच शीक[2] देत असे :

---

१ मोहिनी. २ शिकवण

*सासु सासऱ्याचं येऊं देऊंने गाऱ्हानं*
*अन माझे मंगूबाई लेकी नांदावं भारानं*
*नंदा जावांच बोलनं जसे सराट्याचे येल*
*अग माझे सईबाई सखे तुडवीत चाल*

ही मंडळी नेहमींसाठीं बोलणारच. परंतु यांच्याकडे लक्ष देऊन मनाला लाऊन घेणें हें मात्र गृहिणीनें करूं नये. मात्र एक गोष्ट निश्चित. बोलणीं ऐकून घेऊन सुद्धां आपल्या कर्तव्यांत तिनें कसूर करावयाची नाहीं. सर्वांची सेवा हें तिचें व्रत. त्यांत ती दक्ष असावयाला हवी. आणि म्हणूनच तिचें जीवन कर्मयोगी सेविकेचें असें. नात्यागोत्यांतील मंडळींशीं वागावयाचें कसें हें जसें माहेरीं शिकविलें जाई. त्याच-प्रमाणें आपल्या घराबाहेरील मंडळींशीं वागतांना सुद्धां कशा प्रकारें वागावें याचेंहि पाठ या स्त्रीला माहेरींच मिळत असत. जुन्या कुटुंबांत घरंदाजपणाला एक विशेष अर्थ असे. सभ्यतेचें कांहीं संकेत असत. परकीय पुरुषांबरोबर वागण्याबोलण्यांत घ्यावी लागणारी दक्षता, पाळावयाचे परंपरागत शिष्ट संकेत, समाजांत एका ठराविक पद्धतीनें आचरले जात. आणि त्याचीहि माहिती आपल्या बालपणांतच या महिलेला करून देण्यांत येत असे :

*जाईना ग उभ्या रस्त्यां पाहीना ग कूनाकडे*
*मायबाई देसायाला समुद्राला पानी चढे*
*पराया ग पुरुषाला बोलूं ने ग येकायेकी*
*अग माझे सईबाई अपुन अशीलाच्या[1] लेकी*
*पराया ग पुरुषाला माघूने ग कात चुना*
*नेनंते ग सईबाई आपुन अशीलाच्या सूना*

हे सर्व संकेत पाळावयाचे. आपल्या कर्तव्यांत कसूर होऊं द्यावयाची नाहीं. सासरी भारदस्तपणानं नांदायचें परंतु एखाद्या वेळीं जर मनांत उश्रमा[2] वाटला तर पोट उफळावयासाठीं[3] जागा कुठें मिळावयाची ? मनाचें गुपित कुठें सांगायचें ! आपल्याच प्रमाणें ज्या सासुरवासिनी संसार करीत असतील त्यांच्याशीं आत्मीयता, सुहृद्भव साधायचा आणि मनाला वाटणारें आश्रम्याचें ओझें हलकें करायचें :

---

१ खानदान. २ संताप. ३ मोकळे करण्यासाठीं.

*शेजी आली घरा बस म्हणतें ग तीला*
*मायबाईच्या ग माझ्या हरनीचा शीक मला*

शेजीशीं आपलेपणाचें नातें, मैत्री जमवून घेणें हें आवश्यकच असें. सासरीं कुणाजवळहि कांहीं सांगण्याची सोय नाहीं. मायेची शाल कोण पांघुरविणार ! म्हणूनच माहेरचा एक महामंत्र या बालिकेला पढविला जाई :

*पराया ग परदेशी ग आपलं ग नाहीं कोनी*
*अग माझे सखे बाई शेजी कर माय वहिनी*

आईच्या उपदेशाची आणि शिकवणीची महती आपल्या सासरच्या जीवनांत या गृहिणीला फार वाटे, कारण आपली आईदेखील आपल्याचप्रमाणें मायेच्या मांडवाखालीं लहानाची मोठी झाली व तिलाहि सासुरवासाच्या कष्टमय जीवनाचा आपल्याप्रमाणेंच अनुभव घ्यावा लागलेला आहे ही जाणीव मनांत असल्यानें, तिच्या शिकवणुकींतील अनुभवाची एक विशेष धार या भाबड्या मनाला प्रत्ययाला येई. आपल्या आईनें कोणत्या परिस्थितींत आपणास वाढविलें, लहानाचें मोठें केलें, किती खस्ता खाल्ल्या याची मनोमन कल्पना येत असल्यामुळें आईविषयींचा तिचा आदर अमाप आणि अत्यंत कमालीचा असे :

*मांडीचा ग पाळणा डोळ्याचा ग केला दिवा*
*मायबाईचा ग माझ्या उपकार फेडूं कव्हां*
*नऊ महीने ग वझं असं वागविलं माझं*
*हरन ग मायबाई गंगाबाई नांव साजं*
*नव महीने ग वझं माझं वागविलं कुशी*
*मायबाई हरनीला फिरूनी ग बोलूं कशी*
*समुद्र ग सोखील्यानं जाईना ग माझी तहान*
*अशी माझी मायबाई गंगा भरली आसमान*

याचा अर्थ आपल्या वडिलाविषयीं तिच्या मनीं आदर व प्रेम नसे असा नाहीं. बापाच्या मायेचा असोशी[1] येथें आहेच. परंतु घरांतील कर्ता पुरुष म्हणून एकत्र कुटुंबपद्धतींत सुद्धां बापाला एक अधिकाराचा दर्जा आणि स्थान असें. वडीलधाऱ्या

---

१ जिव्हाळा

नातेवाईकांत कां असेना, त्याला एक विशेष महत्त्व असे. म्हणून वडिलांच्या विषयीं आदरप्रेम असूनहि आईविषयींचा जिव्हाळा हा लोकसाहित्यांत आगळ्या वैशिष्ट्यानें दिसतो. कारण :

*बाप चा ग उपकार काशी गेल्यानं ग फीटे*
*मायबाईचे ग मह्या हरनीचे कष्ट मोठे*
*देसाई ग राया माझे काशी खंडीचे ग ऋषी*
*माय हरण माझी विष्णुपदाची तुळशी*

आपल्या बापाला ऋषि म्हणून या महिलेनें त्याच्या विषयींचा आदरभाव निश्चित प्रगट केला आहे; परंतु त्यांतहि आपल्या आईला विष्णुपदाची तुळस म्हणण्यांत स्त्रीजीवनाच्या आत्मसमर्पणाची संपूर्ण भावना येथें सुस्पष्ट रीतीनें सांगितली आहे. ज्या ज्या वेळीं आई वडील यांच्या पूज्यतेचा एकत्र उल्लेख करण्यांत येतो, त्या त्या वेळीं या उभयतांना दिलेल्या उपमा तिच्या आंतरिक भावनेचें कसें मनोहर आणि यथार्थ चित्रण करतात हें पाहण्यासारखें आहे :

*देसाई ग राया माझा काशी खंडीचा ग वड*
*हरन ग मायबाई त्रिवेनीचं पानी गोड*
*देसाई ग राया वड मायबाई ग गोंदन*
*काशीची ग वाट जाती दोन्ही झाडांच्या मधून*

आणि म्हणूनच आपल्या आईबापांनीं यशस्वी रीतीनें कुटुंब चालविलें, प्रपंच केला, याची तिच्या मनाला अतिशय धन्यता वाटते. नाहीं तरीं आईबाप जन्माचे धनी थोडेच असतात? कर्माचे धनी आपलें आपणच असतों. तरी परंतु आपल्या आईबापांच्या स्मृतीला ती आदरानें नेहमींच नतमस्तक असते. कारण तिला हा आत्मविश्वास आहे कीं :

*प्रपंच करूनी परमार्थ केले दोन्ही*
*असे माझे माय-बाप मोक्षाचे झाले धनी*

सासरच्या सुखी संसारांतसुद्धां स्त्री आपल्या माहेरच्या ममतेला विसरूं शकत नाहीं. कारण तिच्या जीवनाची पहिली पायाभरणी तिच्या मातापित्यांनीं केलेली असते. आप्ततेची आणि आत्मभावनेची जाणीव, तिच्या शरिरांत प्राण असेपर्यंत विसरणें शक्य असत नाहीं; होत नाहीं.

सासरच्या जुन्या जीवनांत दळण, कांडण या कामांना विशेष महत्त्व असे. एकत्रकुटुंबपद्धतीमुळें पंधरावीस माणसांचें कुटुंब हमखास असावयाचेंच. खेरीज भाकरी करावयाला लागणाऱ्या दैनंदिन पिठासाठीं गिरण्यांची सोय नसायची. म्हणूनच प्रत्येक घरांत जातें आणि उखळ या दोन वस्तु अपरिहार्य असत. स्त्रीगीतांचें जन्मस्थान म्हणून या दोन वस्तूंना अतिशय महत्त्व आहे. म्हणूनच ती आत्मविश्वासानें म्हणते :

*दळन ग कांडनाला आहे बाह्या बळ माझं*
*हरन ग मायबाई वाघिनी ग दूध तुझं*
*थोरलं ग माझं जातं म्यां ग वढून पाहीलं*
*मायबाई हरनीचं दूध कारनीं लागलं*
*दळना ग परीस दे ग निघळन भारी*
*मायबाईच्या दुधाची झडती ग देते नारी*

एखादी लाडकी सून अशा धबडग्याच्या कामाला घाबरणें कांहीं अशक्य नाहीं. परंतु अशी एखादीच. बहुतेकींना या कामांचे सक्रीय पाठ माहेरीं मिळतच असत. अशा एखाद्या लाडक्या गृहिणीशीं दळावयाचा प्रसंग आला आणि जातें मोठें असलें कीं ती घाबरायचीच ! परंतु तेव्हांहि—

*थोरल्या ग जात्याला नार झाली ग घाबरी*
*मायबाईच्या दुधाच्या पेलें मधाच्या घागरी*

ही महिला आपल्या आईच्या ममतेच्या उबींत आपलें कर्तव्य आनंदानें आणि निष्ठेनें पार पाडीतच असते.

स्त्रीजावनांतील सर्वांत महत्त्वाचा प्रसंग म्हणजे विवाह. जन्मापासून पाळलेली, वाढलेली आणि संभाळलेली आपली कन्या दानासाठीं उभी करावयाची आणि एका अनोळखी व अपरिचित कुटुंबांत तिला आपल्या हातानें पाठवावयाचें, हा प्रसंग स्त्रीजीवनांत अतिशय अजोड असा आहे. जुन्या काळीं बालविवाहाची पद्धति असल्यानें प्रत्यक्ष बोळवण करण्याचा प्रसंग येईपर्यंत ह्या भाबड्या बालिकेला कन्यादानांतील करुण गंभीरतेचा बोध यथार्थतेनें होणें कठीणच! परंतु बोळवणीच्या वेळीं मात्र तिला आपल्या या ताटातुटीची कल्पना येत असे. आईबापांचें आंतडें आणि त्याची व्यथा ही शब्दानें वर्णन करणें अशक्य आहे. माय म्हणते :

*बारा वर्सं तप तप केलं रे बामना*
*बाळ नेनंती ग माझी कन्यादानीं देवंगना*

*सावळ्या ग जावयानं दिवसा ग चोरी केली*
*बाळ नेनंती ग माझी माळ पुतळ्याची नेली*
*सावळा ग जावाई सोन्याचं ग इंद्रावन*
*बाळ नेनंती ग माझी देली तुळस लावून*

आपण स्वतां लग्न ठरवायचें. कारण मुलगी ही परक्याचें धन. आपण तिचे केवळ राखणदार. जन्मदाते. बोळवणीच्या वेळीं तर भावनांना उधाण येई. अर्थात् आईचें अंतःकरण या वेळीं व्याही आणि विहिणींना असाहाय्यपणें पदर पसरून विनंती करते :

*हात जोडून ईनंती यीहिनीबाई कागदांत*
*बाळ अन्हाड[1] ग माझी सई घ्यावी पदरांत*
*हात जोडून ईनंती यीहिनीबाई ग गडनी*
*बाळ नेनंती ग माझी देलं काळीज तोडूनी*
*हात जोडून ईनंती हे ग यीहिनीबाई तूझी*
*अशी अन्हाड म्हनूनी हरण सांभाळावी माझी*

सर्वांच्याच आयुष्यांत येणारा हा प्रसंग. आजच्या विहिणीलाहि उद्यां आपल्या लेकीसाठीं दुसऱ्या एखाद्या विहिणीपुढें पदर पसरून अशाच प्रकारें विनंती करण्याची पाळी येणार. त्यामुळें आधींच विहीण सांगते कीं :

*सासऱ्या ग सासरवास नग करूं यीहिनीबाई*
*बाळ नेनंती ग माझी अन्यावा[2] ग जोगी नाहीं*

वयानें लहान असल्यानें अर्थातच जाणूनबुजून अन्याय ती करणार नाहीं. काम अवश्य सांगा. तें करणें हा तिचा धर्मच आहे. पण त्यांत एकच गोष्ट बघावयाची नवीनपणामुळें काम हळूं होईल. तेवढें संभाळा :

*हात जोडून ईनंती याद्या परीस यीहीनीची*
*सखे बाईची ग माझ्या भूक जानावी तान्हीची*
*हात जोडुन ईनंती यीहिनीबाई तूं ग गंगा*
*बाळ नेनंतीला माझ्या जेवूं घालून काम सांगा*

---

१ अडाणी, अज्ञान. २ अन्याय.

*हात जोडुन ईनंती यीहिनी बाई तूं ग साळू*
*अन्हागड ग बाळ माझी नवीनाचं काम हळू*

अशा आर्जवानें आपलें काळीज दुसऱ्या घरीं पाठविण्याचा प्रसंग ही महिला अनुभविलेली असल्यानें आपल्या आईबापांच्या अथांग प्रेमाची तिला पुरेपूर कल्पना असे, जाणीव असे; आणि म्हणूनच तिच्या सासरच्या संसारांतहि ती आपल्या माहेरच्या ममतेला विसरूं शकत नसे. कारण इतर कुठेंहि ती आपलें पोट उकलूं शकत नसे. माहेरच्या मांडवाखालींच तिला ही जागा मिळावयाची. आपलेपणाच्या प्रेमाची पांखर तेथेंच निर्व्याज्यपणें तिला लाभण्याची शक्यता होती.

विहिणी विहिणींच्या या विनंती होऊन जेव्हां प्रत्यक्ष गाडींत चढून निघण्याची वेळ येई तेव्हां तर वियोगाच्या भावनेला भरपूर उधाण येई आणि सर्वांच्या डोळ्यांतून मायेची गंगा पाझरावयाला लागे. वधूला साहजिकच, आपणाला पुन्हां माहेरीं केव्हां येणें होणार याची असोशी असे तर तिच्या आईबापांनाहि तीच ओढ लागलेली असायची. म्हणून तशाहि अवस्थेंत मातृहृदयाची आपल्या लेकीसाठीं बुझावणी[1] होई :

*लेक सासऱ्याला जाती डोळ्याला ग येती गंगा*
*नेनंत्या ग मयनाला महिन्याची बोली सांगा*
*लेक सासऱ्याला जाती वाईट ग नको मानूं*
*नेनंते ग बाइ माझी आठ दिसां तुला आनूं*

बालपण ओलांडीत असतांनाच एकदम सासरच्या संसारांत या नववधूचें मन रमणार नाहीं हें ध्यानांत घेऊनच, लग्नाच्या पहिल्या वर्षाचें सर्व सणांना मुलीला माहेरीं बोलावून घेण्याची पद्धति आपल्या इकडे पडलेली आहे. मंगळागौर, दिवाळी, संक्रांत, नागपंचमी, भाऊबीज या सर्व सणांचे दिवस म्हणजे नववधूला केवढा उत्साह आनंद. शिष्टाचाराच्या आणि संसाराच्या मर्यादांतून आपण आतां आपल्या माहेरीं जाऊं, आपल्या बहीणभावाच्या, आईबापांच्या प्रेमाची लयलूट करूं, स्वतंत्र-पणानें नाचूं–बागडूं. थोडक्यांत म्हणजे विवाहानें आपल्याभोंवतीं पडलेल्या बंधनांतून दोनतीन दिवसांसाठीं कां असेना मुक्त होऊं याचा मानसिक आनंद ती उपभोगीत असे. आणि प्रत्येक सणाला माहेरचा मुऱ्हाळी केव्हां येतो याची आतुरतेनें वाट पहात असे.

१ समजावणी

*अशी सांगून धाडीतें आल्या गेल्या हातीं तुला*
*भाई राजसानं माझ्या पंचमीला न्यावं मला*
*दिवाळी ग दसरा माझ्या जिवाला आसरा*
*भाईराजस ग माझा मूळ नीघतो उशीरा*

सासुरवासाचीं पहिलीं कांहीं वर्षे जातात. मग सासर हें नित्याचेंच म्हणून आंगवळणीं पडूं लागतें. आपल्या स्वतःच्या घरांत, नात्यागोत्यांत ही बालिका रुळते, तरी देखील माहेरची मोहिनी तिच्या मनांतून जात नाहीं. आपण ज्याप्रमाणें आपल्या घरांत स्वतांसाठीं कांहीं स्थान मिळविलें आहे, त्याचप्रमाणें आपल्या भाईरायानेंहि आपल्या वडिलांचा बारदाना संभाळला आहे. आणि पहिल्याच टेक्यानें सर्व काम आणि प्रपंच खुशाल चालू आहे ही माहेरची वार्ता तिच्या अंतःकरणाला आनंदाच्या गुदगुल्या करते. आपणाला हक्काचें घर आणि हट्ट पुरविणारा मायेचा हक्कदार आहे ही जाणीव तिच्या मनांत उत्साहाचें वातावरण निर्माण करते. आपल्या भाईरायाच्या शेतीपोतीचा, त्याच्या मोठ्या माणसांत वावरण्याचा, त्याच्या पिढीजाद श्रीमंतीचा तिला अद्याप अभिमान असे. आईबापांच्या नंतर तिच्या माहेरच्या प्रेमाचे धागेदोरे तिच्या भाईरायाच्या जीवनाशीं गुंतलेले असत. भावाच्या प्रत्येक गोष्टीचा तिला अभिमान आहे :

*वाटच्या वाटसरा काय पाहाशी शेताला*
*भाईरायाच्या रे माझ्या ढवळेनंदी आऊताला*
*पान्या पावसाचं आभाळ ग आलं मोडी*
*सावळा ग भाऊराय तिपनीचे नंदी सोडी*
*अरे तुझ्या जीवासाठीं आभाळांत व्हईन घार*
*भाईराजसा रे माझ्या छाया करीन तुजवर*
*गांवाला ग गेलीयाची म्यां ग चिंता न्हाई केली*
*भाईरायाच्या ग माझ्या सोबतीला अंबा गेली*
*कचेरीचं बलावनं मागं पुढं ग मानूस*
*असा माजा भाईराय मधे मोत्याचं कनीस*

आपल्या भावाचें भूषण आपल्यासाठींच मानते असें नव्हे, तर ज्यांनीं आपणाला जन्म दिला आहे त्या आईबापांचा म्हातारपणाचा आधार, त्यांच्या घराचा मालक म्हणूनहि ती त्याला विशेष जपते. आपल्या आयुष्यापेक्षां तिला आपल्या भावाच्या दीर्घायुष्याची अधिक काळजी आहे.

*माझं रे आयुक्ष कमी करावं पुरतं*
*भाई सावळ्याला माझ्या घाल शंभरावरतं*

अंबाबाई आणि खंडोबा किंवा देवी आणि मल्हारीम्हाळसाकांत हीं दैवतें महाराष्ट्राचीं वैशिष्ट्यें आहेत. सामान्यतः प्रत्येक घरांत 'आईराजा उदोउदो' असा जगदंबेचा जयजयकार आणि 'येळकोट येळकोट घे' असा मल्हारीचा मानाचा गजर आपणाला त्या त्या सणाला ऐकूं येतो. जातपातीचा येथें प्रश्न नाहीं. ब्राह्मणापासून अगदीं वन्य समाजापर्यंत ही उपासना महाराष्ट्रांत मूळ धरून आहे. म्हणून आपल्या सासरीं सुखाचा संसार करणारी ही गृहिणी त्या त्या सणाला आपल्या माहेरच्या कुलाचारांची आठवण करते. आपला भाऊ आस्थेवाईकपणें या दैवतांची सेवा करीत असतो हें तिला माहीत आहे म्हणून ती त्यांना विनविते :

*भाईरायाच्या ग घरीं आज सटीचं मेहून*
*देवा मल्हारी रे राया यावं म्हाळसा घेऊन*
*नऊ दीस नवरात्र भाईरायाच्या ग घरीं*
*दयाळू ग अंबामाय फुलाच्या ग शेजवरी*
*अंबामाय माऊलीचं आसन ग रुंदावलं*
*भाईरायाला ग माझ्या भगताला भाग्य आलं*
*लक्षमी ग बाई आली तांब्याभर ताक पेली*
*भाई सावळ्याला माझ्या जलमाची भाक देली*
*सुखी राख देवा मांझ्या कुळाचा दीपक*
*सये माझा भाईराज बहेनीला भाऊ येक*

जुन्या स्त्रीगीतांतील जीवनांत दिवाळी हा विशेष महत्त्वाचा सण. कारण अमावस्येच्या दिवशीं मुलीनें वडिलांना ओवाळून, ओवाळणी घ्यायची, तर भाऊ बीजेच्या दिवशीं भावाला ओवाळून ती घ्यायची :

*दिवाळीच्या दिशीं ववाळीतें बापाला*
*सई नेनंती ग माझी मोतीं मागती कापाला*
*हे ग दिवाळीचे दिशीं तबकीं ग पांच केळ*
*अग माझे मायबाई ववाळीतें तुझं बाळ*

तथापि या सर्व सणांत भाऊबीजेचें महत्त्व फार. त्याची असोशी किती तरी दिवस आधींपासून या बिचारीला दरवर्षी असते. लुगडचोळी फाटली तर त्याला ठिगळ लावीत नाहीं. कारण मनांत म्हणते 'आतां काय भाऊबीज आलेली आहेच.'

*चोळी ही ग फाटली ठिगळ लावीना बाहीला*
*बहेना ग बाई माझी आऊक्ष मागती भावाला*
*माझ्या चुडीयाचा ठसा इथं कोनाला येनार*
*आतां माझा भाईराज भाऊबीज करनार*

दिवाळी येत असतांना बहिणीचे डोळे आपल्या माहेरच्या मुऱ्हाळ्याकडे लागलेले असतात. ती त्याची वाट पहात असते :

*दसऱ्या पासून दिवाळी ग ईस रोज*
*नेनंती ग बाई माझी वाट पहातां नीज*

भावानें आपल्याला मूळ यावें हें तर खरेंच. परंतु त्यांतहि कामाधामाच्या जांगजोडींत एखाद्या वेळीं सवड होते न होते. म्हणून दुसऱ्या एखाद्या माणसाला पत्र देऊन मूळ धाडावें लागतें. अशा वेळीं त्या मूळ जाणाऱ्या माणसाला माहेरच्या माणसांनीं कांहीं सूचना केलेल्या आढळतात. त्याही मजेदार आहेत :

*मुऱ्हाळ्या रे मूळ जाशी घोडं बांध शेवंतीला*
*सखेबाईला ग माझ्या आधीं भेट नेनंतीला*
*मुऱ्हाळ्या रे मूळ जाशी खून सांगतें दूरी*
*सखेबाईची ग माझ्या मैना खेळती वसरीं*

आतां बहिणहि लेकुरवाळी आणि भाऊहि लेकुरवाळा अशा स्थितींत आपल्याला मूळ कुणी यावें याबद्दलची या बहिणीची इच्छा पहा :

*नेनंत्या ग मुऱ्हाळ्याची हौस माझ्या ग मनाला*
*भाच्या माझ्या नेनंत्याचा हात पुरना जीनाला*

एवढ्या उत्सुकतेनें दिवाळीची वाट पहाणाऱ्या या बहिणीला ओवाळणी म्हणून येणाऱ्या वस्तूबद्दल तेवढी आस्था नसते. दोन्हीहि घराणीं श्रीमंत असतील तर त्यांचा प्रश्नच नाहीं. परंतु बहिणीचें घर श्रीमंत असेल आणि योगायोगानें भाऊ साधा सामान्य असेल, तरी देखील तिला भावाच्या ओवाळणीचें मोल अतिशय वाटतें. आपल्या श्रीमंत भावाला एखादी म्हणतहि असेल कीं :

*दिवाळी चोळी व्हइल जातयाचं झाडनं*
*भाईराजस रे माझा द्यावा डागीना धाडून*

परंतु दैवगतीनें भाऊ गरीब असला तरी बहिणीला त्याच्या वस्तूपेक्षां आपलेपणाच्या मायेचें आणि प्रेमाचें कौतुक फार मोठें असतें. स्वतः श्रीमंत असणारी बहीण सुद्धां याचसाठीं आपल्या गरीब भावाच्या साध्या चोळखणाची भुकेली असते :

*पाटाऊ रे पइठनी आहे माझं रे नेसनं*
*परी माझ्या भाईराया तुझ्या चोळीचं भूषनं*
*शेजी पुसत्यात चोळीला ग काय देलं*
*भाईराजसाला माझ्या दिवाळीला ववाळीलं*
*दिवाळीच्या दिशीं तबकीं ग चंद्रहार*
*भाईराजस ग माझा ववाळीला सावकार*

अर्थात चंद्रहार असो कीं, साधा चोळखण असो, बहिणीला आपल्या भावाच्या हृदयाची श्रीमंती पाहिजे आहे. तेथें वस्तूची किंमत नाहीं. पै-पैशाच्या भावानें ती त्याचें मोल करीत नाहीं. करणार नाहीं. माझ्या माहेरचा हा दिवा आहे, हक्काचें विश्रांतिस्थान आहे, म्हणून ती त्याच्याकडे पाहते आणि आर्जवानें भावाला विनंती करते कीं :

*दिवाळीची चोळी संक्रांतीला तीळ-लाडू*
*भाई राजसा रे माझ्या नको माझी आस मोडूं*

भाऊबीज भावानें बहिणीला करायची तर दुसऱ्याच दिवशीं बहिणतीज ही बहिणीनें भावाला करायची! भावालाहि आपल्या बहिणीच्या आतिथ्याची असोशी असतेच. नाहीं तरी प्रेमाची ही वीणा दोन तारांनींच वाजत असते. उभयपक्षीं त्याचें आकर्षण त्यामुळेंच :

*अशी चंदनाची उटी बाळा तुला कुठं झाली*
*सखेबाईनं ग माझ्या वहिनीनं बीज केली*
*दिवाळी ग दसरा आपल्या ग घरीं केला*
*सये माझा भाईराय बीजला म्यां बलावीला*

लेकुरवाळी बहीण आपल्या घरीं आली म्हणजे भावाला तिचें कौतुक असायचेंच. एकाच काळजाचे हे दोन तुकडे. आपल्या बहिणीला आणि तिच्या मुलांना प्रत्येक वेळीं जपणें हें त्याचें काम. आणि त्यांत त्या बहिणीलाहि केवढा अभिमान. बहिणीचें मूल कडेवर घेऊन आपलें लेकरूं हातांत धरून चालवीत नेणाऱ्या भावाविषयीं

बहीण काय म्हणते पाहा....तिला किती धन्यता वाटते त्यांत. बहिणीचें प्रेम व भावाचें व्यवहारचातुर्य यांची किती सुरेख जुळणी यांत आहे :

*बहेनीचं घेतो कडे आपलं ग धरीं हातीं*
*भाईराजस ग माझा मनधरनीचा किती*

इतकेंच नव्हे तर भावाच्या आपलेपणाविषयीं ती आपल्या लेकराला सुद्धां सांगते :

*मामा मांडीतसे पाट मामी काढीती रांगोळी*
*अरे माझ्या तान्ह्या बाळा तुझं कवतिक आजोळीं*

मात्र-व्यवहाराच्या वागण्यांत सर्वच ठिकाणीं आनंदीआनंद असतो, अशी कल्पना करणें वस्तुस्थितीला धरून होणार नाहीं. सासरीं सुख, माहेरीं आनंद असें भाग्य फार थोड्यांचें. माहेरीं प्रेमाचें वातावरण हमखास असायचें ही जरी संभवनीयता अधिक असली, तरी एखाद्या वेळीं नणंद-भावजयींच्या व्यवहारांत तेथेंहि खालींवर होणें अशक्य नाहीं. अशा वेळीं भावाचा आपलेपणा कितीहि असला तरी घरधंद्यांत भावजयीचें आधिराज्य या बहिणीला दुःखदायक होण्याचीहि शक्यता कमी नसे. अशाच प्रकारचें एक खालील चित्र माहेरच्या ममतेंत पण व्यवहाराच्या चौकटींत कसें दिसतें पहा :

*भाऊ ग आपूला भावजय ग पराई*
*अग माझे सये बाई मनधरनी करावी*
*भाईराज ग म्हनीतो बहेनीला कर भात*
*भावजय ग बोलली साळी पडल्या पेवांत*
*हे ग भाऊ म्हनीतो बहेनीला वाढ दही*
*भावजय ग म्हनीती दूध इरजलं नाहीं*
*हे ग भाऊ म्हनी बहेनीला वाढ तूप*
*भावजय ग बोलली गवळ्यांनी नेलं माप*
*भाऊ चोळी शीवी भवजय ग रागांत*
*भाईराजस ग माझा शिंपी बलावी बागांत*

नात्यागोत्यांतील हे हेवेदावे आणि इतर प्रकार आजहि व्यवहाराला पारखे आहेत असें नाहीं. मनुष्यस्वभाव हा सर्वकाळीं एकसारखाच आहे. परिस्थितिमानानें

व्यवहाराचें स्वरूप बदलेल, थोडीशी मुरड पडेल तेवढीच. अशा प्रकारें माहेरच्या ममतेंत अंतर पडलें म्हणजे ही बिचारी सासुरवाशीण शेवटीं म्हणते :

*अभंड्या[1] नारीनं सये कुभांड रचीलं*
*भाईरायाचं ग माझ्या मन सख्याचं मोडीलं*

माहेरच्या ममतेंतून सासरच्या संसारांत गेल्यानंतर माहेरविषयीं ओढ आणि आपलेपणा असला, तरी देखील तेथील हक्क नाहींसा होतो, याची जाणीव या नववधूला कालांतरानें होते. दैवयोगानें सासरीं सुख लागलें तर ठीकच. नसतां सासुरवासाच्या कसालांत दिवस काढण्याची पाळी आली म्हणजे माहेरच्या मायपोराची ओढ अतिशय वाढत जाते. दुर्दैवानें तेथेंहि एखादी 'अभंड नारी' भावजय म्हणून असली तर मग या बिचारीला आपलें जीवन निश्चित कंटाळवाणें वाटणें साहजिकच आहे. आपलें दुर्दैव, आईबापांची अगतिकता यांचा विचार करून ती सांगते की :

*लेकीचा जलम घालूं नग देवराया*
*मायभाई हरानीचे केले कष्ट गेले वाया*
*लेकीचा जलम परघरची ग धन*
*भाईराजस ग माझा चंद्र वाड्याला राखन*
*लेकीचा जलम नग घालूं देवराया*
*लेक देऊन पडा पाया केले कष्ट गेले वाया*

नाहींतरी यापेक्षां ती अधिक काय म्हणणार?

व्यवहाराचे असे अनंत प्रकार आणि बारकावे आहेत. लोकसाहित्यांतून विशेषतः स्त्रीगीतांतून यांची पखरण फार मोठ्या प्रमाणांत आपणांस आढळते. केवळ अशा दृष्टीनें पाहिलें तरी अशी प्रत्येक ओवी म्हणजे एक स्वतंत्र मोतीदाणा आहे. रचना, भावना व आविष्कार या प्रत्येक दृष्टीनें त्याचें स्वतंत्र मोल आहे. लोकसाहित्याच्या या विशाल सागरांत असे अनेक मोतीदाणे आहेत.

---

१ अमर्याद, खोडसाळ.

❧ ❧

# माझिया माहेरा जा-

सौ. आनंदीबाई शिर्के

*झुण झुण पांखरा । हूं हूं.*
*जा माझ्या माहेरा । हूं हूं.*
*माझ्या माहेराचा । हूं हूं.*
*कमानी दरवाजा । हूं हूं.*
*त्यावर बस जा । हूं हूं.*
*माझा निरोप । हूं हूं.*
*सांग माझ्या बयेला । हूं हूं.*
*दिवाळी सणाला । हूं हूं.*
*ये मला नेयाला । हूं हूं.*

प्रातःकालीं सडसंमार्जन करणारी किंवा गाईगुरांचें शेणघाण काढणारी खेड्यांतील अल्पवयी सासुरवाशीण असो किंवा सकाळच्या चहाची तयारी करणारी प्रौढ-सुशिक्षित, सर्व हक्क स्वाधीन असलेली गृहिणी असो. वरील गीताचे शब्द तिच्या कानीं पडले तर तिचें हृदय क्षणभर हलून गेल्याशिवाय रहाणार नाहीं हें खचित. माहेरच्या आठवणींत अशीच भावनेची सांठवण भरून राहिलेली असते. त्यामुळें अशा भावना हलवून सोडणाऱ्या गीताच्या श्रवणानें कोणत्याहि थरातील सासुरवाशीण असो, काम

करतां करतां तिचें मन एकदम माहेरघरीं उड्डाण घेतें. तिला आपलें बालपण—जाणतेंपण सारें सारें आठवतें. प्रातःकालच्या गुलाबी थंडींत गळ्यापर्यंत पांघरूण गुरफटून घेऊन आपण यावेळीं माहेरीं कशी साखरझोंप घेत असूं, आईनें बळें बळें उठवून दिलेला चहा आणि न्याहारीला दिलेले पदार्थ मनास न येऊन किंवा इतर भावंडांपेक्षां कमी जास्त वाटून केलेली चिडाचीड, आईनें ममतेपोटीं घातलेली समजूत तिला आठवते. आणि त्याऐवजीं आतां लौकर उठून करावीं लागणारीं कामें व तीं मनास न आल्यानें खावीं लागणारीं बोलणीं यांच्या तुलनेनें मन गहिंवरून आल्याशिवाय रहात नाहीं. एकाएकीं पडलेल्या जबाबदारीमुळें मन किंचित् अंतर्मुख होऊन विचार करूं लागतें.

"अरेरे, इथें आपण एवढं राबतों. पण माहेरीं असतांना आईला कांहींच मदत केली नाहीं. तिचे कष्ट हलके करून तिला सुखविलें नाहीं." ही जाणीव होतांच सासुरवाशिणी मुलीचें मन तीव्रतेनें हुरहुरतें. आईला कधीं भेटतें आणि कधीं या हलगर्जीपणाचा वचपा काढतें असें तिला होऊन जातें. आईनें दिवाळीला किंवा संक्रांतीला मुऱ्हाळी धाडण्याचा केलेला वायदा आठवून तें हळवें झालेलें अल्लड मन दिवस मोजूं लागतें. आपण सासरीं निघालों तेव्हां आईनें आपलें मुख कुरवाळून संक्रांतीला आणायचें आश्वासन दिलें होतें. "अन् संक्रांत तर तोंडावर आली. तरी मुऱ्हाळी येण्याचें चिन्ह कांहीं दिसत नाहीं ! आई विसरली कीं काय ? छे ! आई विसरणं शक्यच नाहीं. दादाचाच पत्ता नसेल—कुठं बरं गेला असेल ? वैनीला पोंचवायला सासुरवाडीस तर गेला नसेल ? माझ्या आधीं वैनी माहेरीं जाणार ? माझ्यासाठीं थांबणार नाहीं ? अशा विचारांत दंग असतांना मग तिला आईची ती ओवी आठवते.

*संकराती सण बाई आला एकाएकी*
*नेणंती माझी मैना आपण ववसूं मायलेकी*

नाहीं नाहीं. थांबेल वैनी. मी सांगून आलें होतें तसं तिला." तरी पण तिचें मन हुरहुरतें, त्या पांखराचें "हूं हूं" तिला असह्य वाटतें. चांगले पंख असतांना भुर्रकन उडत जाऊन माझ्या आईला निरोप सांगायचं सोडून हें वेडं हुंहूं कसलं करीत बसलंय इथं ? याला माझी अधीरताच कशी कळत नाहीं ?"

माहेरच्या आठवणीच्या ऊर्मी तिच्या मनांत उचंबळून येतात. माहेराची चढउताराची वाट आठवते. वाटचालीनें शिणलेले पाय आणि माहेरीं पोंचल्यानंतर त्यावर होणारे सोपस्कार आठवतात. हृदय पुलकित करणारी ती आनंदी आठवण कुणाला तरी सांगावीशी वाटते. त्यासरशीं ती स्वतःशींच गुणगुणूं लागते—

*"काय सांगूं सई माझ्या माहेरच्या रीती*
*तांब्याच्या पराती भावजया पाय धुती*

प्रातःकाळच्या शीतल प्रहरीं सड्याचे शिंतोडे पायांवर उडून शहारे आणीत असतां तें उनउन्ह तेलाचें मालीश आणि त्यावर गरम गरम पाण्यानें चोळून चोळून पाय धुतले जाणें हें सुखकर सोपस्कर आठवून तिला एकदम गलबलल्यासारखें होतें. अकालीं प्रौढत्व आणणारें हें जबाबदारीचें ओझें कधीं एकदां फेकून देतें अन् आईकडे जाऊन कधीं एकदां तिच्या कुशींत विसावते असें तिला होऊन जातें. ती भिरी भिरी दूर क्षितिजाकडे पहाते. कुठें दूरवर धुरळा दिसतो का? भाऊ किंवा दुसरा कुणी मुऱ्हाळी घरची गाडी घेऊन येतोय का? क्षणभर तिचें काम थांबतें. पण लगेंच सुरूहि होतें.

"नुकतीच कुठें ओळख झालेली. फारसें बोलणें झालें नाहीं कीं सेवा घडली नाहीं. आणि फारा दिवसांनीं स्वारी घरीं आली असतां रोजच्या रहाटगाडग्याला कंटाळून आपण माहेरीं जायला निघालों? स्वारीला काय वाटेल आपल्याबद्दल?"

या विचारानें तिचें मन अशा वेळीं द्विधा होतें. एकीकडे माहेरीं जाण्याची अत्यंत ओढ लागलेली असतांना, इकडे सासरचा एक नाजूक रेशमी पाश हळुवारपणें आपलें हृदय ओढीत आहे, याची मधुर जाणीव होऊन तिला खुदकन् हंसूं येतें आणि तिच्या नेत्रांतून आंसवेंहि ओघळूं लागतात. तें मधुर दृश्य पाहून तिला घ्यायला आलेला भाऊ विरघळतो आणि "रावसाहेबांकडे रदबदली करून तुला परवानगी मिळवून देण्याचा आपण प्रयत्न करूं" असें बहिणीला आश्वासन देतो.

बहीणभावांचा हा सुखसंवाद दुपारच्या वेळीं सारीं विश्रान्ति घेत असतांना चाललेला असतो. चार दिवस बहिणीच्या घरचा पाहुणचार घेऊन भाऊ बहिणीला घेऊन जातो.

माहेरीं आल्यावर उरलें सुरलें प्रौढत्व पार नाहींसें होतें. "हें घे, तें हाताळ. हें हवें. तें हवें." अशा नित नव्या मागण्या सुरू होतात. बहिणीच्या या बालिशतेवर भाऊ जर कांहीं बोलला, तर बहीण लगेच म्हणते, "तुमचं नाहीं घेत कांहीं बरं का भाऊराया आईबाबांचं घेतेंय!" आणि काव्यांत उत्तर देते :

*माय तों माहेर बाप तों येऊं जाऊं*
*पुढं आणतील भाऊ लोकाचारा*
*माय तों माहेर बाप तों माझी सत्ता*
*नको बोलूं भाग्यवंता भाईराया*

बहिणीचें हें वक्तव्य ऐकून भावाला दुःख होतें. त्याचा उतरलेला चेहरा पाहून त्या विषादाचें प्रतिबिंब बहिणीच्या चेहऱ्यावर लगेंच उमटतें. त्या भावना व्यक्त करणाऱ्या खालील ओंव्या पहा :

*बहिणींचे बोल जशी दुधाची उकळी*
*मैनाबाई माझी आहे मनाची मोकळी*
*बहीणभावंडाचा झगडा रानींवनीं*
*बहिणीच्या डोळ्यां पाणी बंधू चिंतावला मनीं*

भावाचा कोमेजलेला चेहरा पाहून बहीण विव्हळ होते आणि लगेंच प्रांजळपणें म्हणते, "नाहीं रे दादा! तुला लागावं म्हणून नाहीं बोललें रे मी. मला तर :

*"पोटच्या परीस मला पाठाच्याची गोडी*
*ताईत बंधू माझ्या आपली बाळपणची जोडी!*

दादा, सहज बोलण्याची नको रे अढी धरूं.

*लिंबाच्या झाडाखालीं निंबोण्या पसरल्या*
*भावाला झाल्या लेकी बहिणी भाच्या विसरल्या*

असं नको करूं रे. मी बोलतें आपली. पण खरं सांगूं?

*"लेन्हं वा लुगडं नाहीं मजला लागत*
*ताईता बंधू माझ्या तुझ्या जिवाचा आगत"*

एवढ्या खुलाशानंतर बहीणभावंांची दिलजमाई झाली नाहीं तरच नवल. मुलें आनंदानें किलबिलतांना पाहून आईचा आनंद पोटांत मावेनासा होतो. पंख भिजल्यामुळें एवढीशी दिसणाऱ्या चिमणीसारखी शरीर आणि मन संकोचून बसलल्या बहिणीकडे नजर जातांच नणंदेला आपलें सासरचें वास्तव्य आठवतें. त्यासरशीं ती एकदम वहिनीला मिठी मारते. तो त्रिवेणीसंगम पाहून आईच्या हृदयाला भरतें येतें.

माहेर हें स्त्रीचें विश्रांतिस्थान आहे. त्याची ओढ ग्रामीण आणि मध्यमवर्गांतल्याच सासुरवाशिणीला लागत असें नाहीं. अगदीं राजाराणीच्या स्वाधीन संसार असलेल्या प्रौढ, सुशिक्षित गृहणीला सारीं सुखें अनुकूल असतांना सुद्धां पहिलीं कांहीं वर्षें माहेरची ओढ लागल्याशिवाय रहात नाहीं. कारण जन्मापासून लग्न होईपर्यंत १५।१८ त २० वर्षांचा काळ जिथें खेळून, खाऊन सुखानें घालविला असतो, तें

माहेर स्त्रियांचें विश्रांतिस्थान आहे. सुरुवातीला थोडथोड्या अंतरानें कांहीं दिवस तरी माहेरीं रहावयास मिळालें तर तें नवोढा सासुरवाशिणीचा मानसिक आणि शारीरिक ताण नाहींसा करून तिला हुरूप आणि आनंद प्राप्त करून देतें. आमच्या सणावारांची आणि 'सासर माहेर' करण्याची योजना याला धरूनच आहे. म्हणून बायका आवर्जून नेहमींच गातात :

*बहिणीला भाऊ एक तरी तो असावा*
*चोळीचा एक खण एक रातीचा विसावा*
*संवसारामधीं किती असती नातीं गोतीं*
*बहीणभाऊ हीं मोलाचीं माणिक मोतीं !*

आणि तें अगदीं खरें आहे.

# अंतरीचें गुज

## सौ. कुमुदिनी पवार

लग्नाच्या वेळीं बोहल्यावर चढतांना नाना तऱ्हेच्या शंकाकुशंकांचें काहूर माझ्या मनांत माजलें होतें. अगोदर अजिबात ओळखदेख नसलेल्या नवरदेवाला माझा समजून जीवनसर्वस्व अर्पण करायचें माझ्या सुशिक्षित मनाला खटकत होतें. याच नादांत, भानांत, असतांना मधला अंतरपाट केव्हां दूर झाला याची दादहि मला लागली नाहीं. कारण अंतरपाट दूर झाला त्याचवेळीं माझी नजर पटकन वरती गेली. नेमके त्याचवेळीं हे माझ्या गळ्यांत माळ घालायला वाकले. त्यावेळीं गोडसें हसूं त्यांच्या तोंडावर होतें. मी मात्र खरोखर बावरून गेलें होतें आणि फार लाजलेंहि होतें. तोंवर भटजी म्हणाले, 'नवरीनें प्रथम माळ घालायची!' मग तर माझी मान आणिकच खालीं गेली. तेव्हां मात्र माझी बहीण ओरडली, 'अग अगोदर माळ घाल ना त्यांना. मग लाज.' त्यावेळीं मात्र त्यांना आणिकच हंसूं आलें. तेव्हां मी मनांत म्हटलें, 'नवरा तरी निदान हंसतमुख दिसतोय, पुढचं पुढं बघतां येईल.'

लग्नाच्या वेळच्या या प्रसंगानंतर सप्तपदीच्या वेळींहि मी वेगळ्याच विचारांत होतें. लग्न यांच्याशीं झालें पण संसार सर्वांशीं करायचा आहे. घरांतलीं इतर माणसें कशीं आहेत कोण जाणे ? प्रत्येकाचा स्वभाव उमजून घेतांना त्रास पडूं नये, सर्वांशीं मिसळून वागावें म्हणून माझ्या आईनें मला आतांपर्यंत इतकें शिकवलें,

सांगितलें आहे कीं, कसलींहि माणसें मला मिळूं देत—मी त्यांच्याशीं समरस होईन, इतकी माझ्या मनाची तयारी झाली होती. तरीहि मी आत्तांपर्यंत शहरांत राहिलेली, वाढलेली, खेड्यांत सासरीं जाणार म्हणून माझ्या मनानें धसकाच घेतला होता.

त्यामुळें लग्नानंतर ह्यांचें नांव घेतांना देखील मी कावरीबावरीच होतें. आणि :

*सासुरवासिनीला न्हाई आधार कुणायाचा*
*बोलती भैनाबाई कंथ देवाच्या गुणायाचा*
*सासूरवशिनी ग बस माझ्या तूं वसयिरी*
*लाडकी माजी बाळ नांदं तुझ्याच सासरीं*
*सावळ्याचा पाय सये पडला चिखलांत*
*गडयिनी बोलती ग तुला दिली गोकूळांत*

असलें कांहीं आठवल्यामुळें माझा जीव उगाचच उडून गेला होता. म्हणून मग :

*"उत्तम कुळांत जन्मलें, थोर कुळांत आलें*
*×××रावांच्या जिवावर भाग्यशाली झालें"*

असा मी घेतलेला उखाणा ऐकून सर्वांनीं मला शाबासकी दिली तरी मी आपली खुळीच! आपलें कसें होईल हीच मला धास्ती. म्हणून माझें नांव घेणें इतरांना पटलें तरी मला कशाचेंच कांहीं नाहीं. त्यामुळें नांव घेतलें कीं नाहीं हें लक्षांत न आल्याकारणानें माझी मीच जेव्हां :

*"राधाकृष्णांची मूर्ति पहातें मी आरशांत न्*
*×××रावांचं नांव घेतें आयाबायांच्या घोळक्यांत."*

त्यावेळीं पुन्हां 'नांव' घेतलें तेव्हां सर्वांना असें हंसायला आलें कीं विचारूंच नये. त्यांचें तें हंसणें जेव्हां माझ्या लक्षांत आलें तेव्हां बरीक मी काय समजायचें तें समजलें न् झाल्या गोष्टीचा जास्त बोभाटा नको म्हणून तिथून पळालें. त्या वेळीं मग बराच वेळ आमच्या घराचा कोपरा मीं सोडलाच नाहीं. मग कोणी कांहीं का म्हणेना, म्हटलें.

होतां होतां मग सासरचें सारें माझ्या अंगवळणीं पडत गेलें. माझ्या जिवांत जीव आला. शिवाय आईनें दिलेली शिकवण माझ्या सोबतीला होती ती अमृतापेक्षां श्रेष्ठ होती. जन्मभर पुरेल एवढें उपदेशाचें भांडार त्यांत साठलें होतें. आईची माया मनापासून माझ्याशीं तिथें बोलत होती. तें मी मुकाटपणें हृदयावर टिपून ठेवलें होतें.

हेंच अमोलिक धन मी जवळ बाळगून माझ्या घरांत प्रवेश केला होता. म्हणूनच मी आज माझ्या जीवनांत संपूर्ण सुखी झालें आहें. माहेरीं लाडकी होतें तशी सासरींहि सर्वांची आवडती झालें आहें. सर्व प्रकारच्या सुखानें ओथंबून गेलें आहें. आणि त्याच संदर्भांत मी आज नकळत आईच्या हृदयाशीं एकरूप होऊन गेलें आहें. त्यामुळें "आई, तुझ्यामुळें मी आज सुखांत आहें असें पुन्हां पुन्हां तुला सांगतें. सासरच्या आणि माहेरच्या प्रत्येकाशीं समरस होऊन माझें मन हितगुज करीत आहे. "आई, ऐक हं नीट—" असा बोलायचा मोह मला होतो आहे.

आई, तूं मला जेव्हां तूं ऐकलेल्या सासुरवासाची कथा सांगायचीस तेव्हां माझ्या अंगावर काटा उभा रहायचा बघ. तरी पण तूं म्हणायचीस :

*"सासर एवढा वस नका करूंसा सासूबाई*
*दारींच्या चांफ्यापाई दूरदेशाची आली जाई*
*आईबाप बोले हरबऱ्याची डाळ*
*जाशील परघरीं तिथं होईल तुझी राळ*
*सासर बाई वस जिऱ्यामिऱ्याएवढा घास*
*माझें तूं बाळाबाई जातीवंताचे लेक सोस"*

तुझे हे बोल मी नीट ऐकलेवते आणि हृदयावर टिपून ठेवलेवते. आई, तुझी माया तरी किती माझ्यावर ग? आणिक तूं माझे लाड तरी किती केलेस? माझ्यावरची तुझी मायाच तुला बोलती करते.

*सासऱ्याला जाते लेक कुणाची तालीवर*
*हात भरूनी बिलवर*
*सासऱ्यास जाते ऊन लागतं माझे बाई*
*दोन्ही बाजूंनीं लावीन जाई*
*सासऱ्याला जातां ऊन लागतं माझ्या बाळं*
*दोन्ही तर्फांनीं चांफा डोल*

हीं तुझीं गीतं आठवलीं म्हणजे मला तुझी फार काळजी वाटते बाई! तूं इतकी सुखांत ठेवलीस मला. लाडांत वाढवलीस आणि आतां माझें कसें चाललें असेल म्हणून काळजी करतेस असें दादा मला परवांच म्हणत होता. तर दादा पहिल्यांदां माझ्या घरीं आलेला, मला इतका आनंद झाला म्हणून सांगूं! नुसतीच भांबावून गेलें होतें. मला कांहीं सुचेनाच. खरं ना? पण इथलें माझ्या घरचें वातावरण

पाहून दादा अगदीं आनंदांत होता हं! माझें सुख बघून तो मोहरून गेला होता. म्हणूनच मीं त्याला बजावून सांगितलें, "दादा, मी अगदीं सुखांत आहें हें आईला सांग" :

*अंतरीचं गुज बांधी शेल्याच्या पदरांत*
*माझ्या बंधुराया सोड बयाच्या हुरद्यांत*

पण आई, माझ्या ह्या सुखाला तूं आणि बाबाच कारणीभूत आहांत. तुमची शिकवण मला सतत सावलीसारखी सोबत करते. तरी पण पुष्कळ वेळां तुझी याद येते. माहेरची ओढ वाटते. इथें मी कितीहि मजेंत असलें तरी तुम्हांला विसरत म्हणून नाहीं आणि—

*बापाजी माझा वड बया मालन पिंपरण*
*दोघांच्या सावलीं झोंप घेतें मी संपूरण*
*सावली शितळ हितं उतरील वज्जं*
*मावली माजी बया इसाव्याचं झाड माजं*

अश्शी माझी मीच मग खूप वेळ बोलत रहातें.

बरं का ग आई, परवां एकदां सहज जाऊबाई पिठल्याची डाळ दळीत होत्या. तर दळतांना ओव्या म्हणीत होत्या हं! कसल्या सांगूं?

*सासू सासरे दोन्ही देव्हांरीचे देवू*
*बसले पूजेला आम्ही जोडीनं फुलं वाहूं*
*चांदीची उतरडी त्याला सोन्याचं झाकण*
*सासूसासरे माझी घराला राखण*
*माझ्या अंगणांत गरड्या लिंबाची सावायिली*
*सया मी किती सांगूं सासू नव्हे ती मावयिली*

खरोखर किती भक्तिभावानें त्या या ओव्या म्हणत होत्या. आई ग, माझे सासूसासरे खरेंच अतिशय प्रेमानें आमच्याशीं वागतात व आम्हालाहि वागवतात. त्यामुळें तर आमचा एवढा मोठा प्रपंच अगदीं आनंदांत चालला आहे. प्रत्येक जण दुसऱ्याला सुख देण्यासाठीं धडपडतो आहे.

मला पहिल्यांदा वाटे भीति. मी शहरांत राहिलेली. वेगळ्या वातावरणांत वाढलेली. पण इथल्या वातावरणाशीं मी लवकर एकरूप झालें. याचें कारण तूं

मला म्हणाली होतीस–'बाई, तूं शिकलेली असलीस तरी आपली संस्कृति रीतरिवाज संभाळून वाग." हेंच ध्यानांत ठेवून मी इथें राहिलें, वावरलें. म्हणूनच तर इथले सर्वजण माझें कौतुक करतात. मी कशी वागतें तें ऐकशील तर खरी तूं—

*जातें मी उभ्या गल्लीं वाजूं देईना जोडवं*
*चुड्यानूला माझ्या लावीना आडवं*
*जातें मी उभ्या गल्लीं झाकुनी पाकूनी*
*वडिलांचं नांव माझ्या पित्याचं राखुनी*
*जातें मी उभ्या गल्लीं हालूं देईना हाताला*
*लावयीनां बोल दोन्ही तर्फेच्या गोताला*

त्यामुळें मीं सर्वांना जिंकलें आहे. खोटं नाहीं हं सांगत. हवें तर विचार कुणाला पण.

आई ग, अग तुला एक गंमत सांगायची आहे ! मध्यें एकदां काय झालें, हे कशावरनं तरी चिडले होते. तेव्हां मीं त्यांचा राग बघून पटकन् सरबत त्यांच्यापुढें केलें आणि बोलून गेलें :

*भरताराचा राग डाव्या डोळ्याचा तराटणी*
*अंतरीची मी शानीबाई हंसून देतें पाणी*

तशी त्यांचा राग थोडा कमी झाला. म्हणाले, 'आईसाहेबांनीं ही कला पण शिकवलेली दिसते.' केव्हां तरी असा प्रसंग येणारच म्हणून मी हंसलें. राग पार पळून गेला. पण यांचा स्वभाव चांगला आहे म्हणून मी खरी समाधानांत आहें. हे एवढे शिकून सुद्धां आपलें गांव सुधारण्यासाठीं, शेतवाडी बघण्यासाठीं, इथें राहिले याचेंच सर्वांना कौतुक आहे. या सर्व व्यापांतून ते माझी सर्व हौस-मौज भागवतात हं. कशी सांगूं ? :

*भरतार नव्हं माझा सये पूरवीचा राजा*
*मावलीवाणी छंद पुरवीला माझा*
*भरतार नव्हं माझा मखमली शेला*
*त्येच्या सावलीमंदीं माजा फुलला पानमळा*

आतां माझ्या भाऊजींबद्दल आणि जाऊबाईंबद्दल बोलायचें तर तीं दोघेंहि समंजस

आहेत. दोघेहि भाऊभाऊ एकदिलानें आहेत. त्यामुळें आम्ही दोघीहि जावाजावा प्रेमानें रहातों आहोंत. म्हणून सासूसासरे खुशींत आहेत.

*माझी ती जाऊबाई परसदाराची तुळयिस*
*माझा तो दीरराजा राजवाड्याचा कळयिस*

अशीं आहेत माझ्या घरचीं सर्वजणं. पण नुसतें सांगून समाधान होत नाहीं. तुझ्या लाडक्या लेकीचा संसार बघायला तूं एकदां यावेंस असें फार वाटतें. परंतु तूं आणि बाबा एवढ्या पुढारलेल्या जगांत वागूनहि मूल झाल्याशिवाय लेकीच्या घरीं जायचेंच नाहीं असें मानून बसलात! त्यामुळें तुमचे पाय माझ्या घराला अजून लागले नाहींत!! तूं येशील तेव्हां मला पाहून नक्की म्हणशील :

*सासरीं म्हायेरीं मैना माझी आवडली*
*धन्याची कोथिंबीर कशी गुणाला निवडली*

पण आई, एक गोष्ट खरी कीं, मी कितीहि माझ्या सासरच्या माणसांचें कौतुक केलें तरी तुमची सर्वांची याद मला वरचेवर येतेच. विशेषतः तुझ्या हातच्या भाकरीची पण फार आठवण होते :

*बारीक पिठाची बाई भाकरी चौघडी*
*बया माजीच्या जेवणाची याद होतीया घडोघडी*

त्या वेळीं असें वाटतें की, एका झेपेंत तुझ्याकडे यावें आणि मनमुराद तुझ्या मांडीवर लोळावें! तेव्हां तुझ्या कौतुकाला आणिकच उधाण येईल. पण त्याच वेळीं हेंच कौतुक मला सतत लाभावें म्हणून तुझी आवडती ओवी पुन्हां तूं म्हणशील :

*सासर एवढा बस नको करूंसा सासूबाई*
*दारींच्या चांफ्यापाई दूर देशाची आली जाई*

पण हे सगळे मनचे खेळ आहेत माझ्या. तोंवर माझा हा मनापासून दिलेला सांगावा नीट ऐकून घे. परवां मी सहजच गुणगुणत होतें हं :

*माडी वर ग चढली माडी*
*बाई सासर मामंजींची*
*लंका तिथूनी बघतें बाई मी*
*माझ्या ग माहेराची*

तर गंमत काय झाली कीं, हें मामंजींनीं ऐकलें. पण मला माहीत नव्हतें ते जवळ आहेत हे! तशी म्हणतात कसे—"दोनचार दिवसांत मी तुला नेणार आहें तुझ्या आईकडे! कंटाळलेली दिसतेस इथें. जाऊं हं आपण."

यावर मी लाजलें आणि धुम् घरांत पळालें. असा आनंद झाला म्हणून सांगूं? पण थांब, त्याबद्दल आपण समक्षच बोलूं या. हं!



# गोष्ट मनींची बोलते

## रामकृष्ण आनंदराव कदम

भावनाशील स्त्री-मनास माहेरचा मोह कितीहि असला, माहेरची स्मृति त्यांना कितीहि विह्वल बनवीत असली तरी त्यांचा जीव रमतो तो सासरींच! त्यांची भाव-पूजा खऱ्या भक्तीनें व रूपानें नटते ती सासरींच! त्यांच्या हृदयेश्वराचें अधिष्ठान हें सासरच. माहेर हें तिला तोडीत असतें तर सासर हें तिला जोडीत असतें. माहेर दूर करतें तर सासर जवळ घेतें. दुःख आणि आनंद यांचें तें सुरस मिश्रण असतें.

स्त्री आणि तुळस ह्यांचें नातेंहि तसेंच कांहीं अगम्य! अनोख! त्यांचे जन्मोजन्मींचे कांहीं वेगळेच जणुं ऋणानुबंध आहेत. आणि म्हणूनच त्या अबोल नि सोज्ज्वळ जीवाकडे स्त्री-मन पाहतें तें एका वेगळ्याच भक्तीनें, वेगळ्याच श्रद्धेनें, वेगळ्या अनुभूतीनें—आकांक्षेनें! तिचें नित्य जीवन सुरू होतें तें 'तुळसीबाई'च्या आठवणीनें, दर्शनानें :

*" सकाळीं उठुनी – तोंड पाहिलं एकीचं !*
*– दारीं तुळशी सखीचं ! !"*

दारींच्या तुळशीशीं सखीचें नातें जोपासतांना, उरीं बाळगतांनादेखील तिचें मन आगळ्याच आंकाक्षेनें भरलेलें असतें.

*"सकाळीं उठुनी — मला एक लाभ झाला !*
*तुळशीपुढं करंडा — कुंकवाचा सांपडला ! !"*

तुळशीइतकेंच किंबहुना अधिकच तिच्या श्रद्धेचें दुसरें स्थान म्हणजे आई ! तुळशीबरोबर आईचें परमनाम चिंतन तिजकडून सहज केलें जातें. ती ओव्या गाईल तर सुरुवात करील आईपासून ! पहिल्या ओवीचा मान आईचा ! पहिली भावांजलि आईच्या चरणीं :

*"पहिली माझी ओवी — आईला गाईइली !*
*बया माझी गवळण — तुळस न्हाइईली !*
*पहिली माझी ववी — मायबापाला गाती एक !"*
*— गिरजा शंकराची लेक !"*

सासरच्या घरकर्तव्यांत रममाण असतांनाच तिच्या मनाचें वेडें पांखरूं माहेरचीहि भरारी हरघडी मारून येत असतें—आणि तिचें तें पोक्त मन म्हणतें कीं :

*"बापाजी माजा वडु — तीची पारूंबी ठायीं ठायीं*
*— येल इस्तार बयाबाई*
*बापाजी मजा वडु — गेली पारूंबी वाऊ वाऊ*
*बयाच्या कुसव्याचा — झाला विस्तार गांवु गांवू !"*

ती ज्या कुलवंताची कन्यका आहे तो एक विशाल वटवृक्ष आहे व त्याच्या लांबच लांब पारंब्या ठायीं ठायीं विखरून राहिल्या आहेत. त्यामुळें तर त्याची भव्यता ही अधिकच उठून दिसते. त्या वंशवृक्षाचा व मातेच्या कुशींचा विस्तार तिथेंच थांबलेला नाहीं. तो जागजागीं, गांवांगांवांतून पसरलेला आहे.

पित्यासंबंधींची तिची पवित्र श्रद्धा अधिक स्पष्ट करतांना तिचें मस्तक नत होतें, विनीत बनतें ! जणुं कांहीं कृतज्ञतेनें सहस्रमुखें पाझरत असतें. म्हणून तिचा आंतरिक जिव्हाळा बोलूं लागतो :

*"बापाजी माझा वडु — वडाचं पान रुंदु*
*— गार सांवली करवंदु !*
*"बापाजी माझा वडु — उभी वडाला टेकुइनी*
*— गार सांवली देकुइनी !"*

हा जो वटवृक्ष आहे तो कांहीं अपुऱ्या अन्नावर पोसलेला देह नाहीं! लेचेंपेचें अगर दुबळें त्याचें शरीर—वैभव—नाहीं. त्याचीं तीं हिरवींगार रुंदरुंद व भलीं जाड पानें आहेत. आणि त्यामुळेंच तर त्याच्या आश्रयाला टेकून उभें रहावें असें कुणाच्या मनांत येणार नाहीं? आणि हें तर मग लेकीच्या हक्काचेंच आश्रयस्थान! तिथें परकेपणा तो कसला?

असा हा शीतल छाया वर्षविणारा विशाल वृक्ष एका बाजूस ताठ मानेनें व धिप्पाड छातीनें उभा आहे व त्याच्याच शेजारीं 'गोंदईन' उभी आहे. दोन्ही झाडें पवित्र भावनेनें एकमेकांच्या सान्निध्यांत समाधानी आहेत. त्यांच्यामधून जाणाऱ्या पाऊलवाटेचें पावित्र्य कांहीं न्यारेंच आहे! या दोहोंच्या शीतल छायेंतून गेल्यानें काशीदर्शनाच्या पुण्याईचा लाभ इथेंच लाभूं शकतो :

*"बापाजी माझा वडु—बया माझी गोंदईन।*
*काशीला गेली वाटु—दोन झाडांच्या मदईनं!"*

संसाराच्या रामरगाड्यांत पिचल्या जाणाऱ्या माऊलीचें मन मात्र अतिशय भक्कम असतें. त्यांत एक प्रकारची वेगळीच धमक असते. स्वतःच्या उच्च कुलत्वाबद्दलचा आत्यंतिक अभिमान तिच्या नसानसांतून ओसंडत असतो; रोमरोमांतून उसळत असतो. तिची अस्मिता सूर्यप्रकाशाइतकीच दीप्तिमान असते. तिच्याकडे डोळे वर करून पाहण्याची कुणाची छाती नाहीं व्हायची! तिला माहीत असतें कीं, "माझं प्रत्येक पाऊल हें लक्षावधि डोळे न्याहाळीत असतात. आणि त्यामुळंच तर जीव मुठींत घेऊन माझा जीवन-मार्ग मला आक्रमिला पाहिजे."

या संदर्भात आतां हेंच पहा ना :

*"उभ्या मी गल्लीं जातें—पदराखालीं हातु,*
*बयाच्या कुसव्याची—लंकला गेली मातु!*
*उभ्या मी गल्लीं जातें—पदर डाव्या मुठीं*
*पित्या नानाला म्हनित्यानी—कुन्या अशिलाची बेटी!*
*माजी जात कुळ—काई पुसशील वेड्या नांव,*
*पित्या दौलत नाना माजा—साऱ्या जवारीला ठावं!*
*उभ्या मी गल्लीं जातें—खालीं बघून माजी चाली*
*पित्या माज्या दौलताला—सारी सभा नांवजली!*
*माजी जातकुळ—काय पुसती सांदिईचा*
*पित्या माज्या दौलताचा—वाजे रुपया चांदिईचा!"*

ज्या वेळीं तिच्याविषयीं, तिच्या जातकुळीविषयीं, कुणी कांहीं सहज जिज्ञासा म्हणून जरी प्रश्न करूं जाईल तेव्हां ती डिंवचलेल्या नागिणीप्रमाणें फणा काढील व उंच मानेनें उभी राहील. मग त्यानें ओळखावें, कीं हें पाणी कांहीं निराळेंच आहे. या अस्मितेचा थांग घेतां येणें शक्य नाहीं. तीच विनयशील सासुरवासिणी पुढें म्हणते :

*"उभ्या मी गल्लीं जातें – दंडभुजा झांकुइनी*
*भरील्या सबमंदी – नांव पित्याचं राकुइनी*
*उभ्या मी गल्लीं जातें – खडा हालना भुईइचा*
*चावडी म्होरं सभा बोले – योल शिताळ जाईइचा !*
*उभ्या मी गल्लीं जातें – खालीं बगुनी माजी चाली*
*भरील्या सबमंदीं – माज्या काशीला नांवजली !*
*उभ्या मी गल्लीं जातें – माजी हालईना पापईनी,*
*– घरीं वाघाची जाचईनी !*
*उभ्या मी गल्लीं जातें – कोण काडिल माजं नांवू*
*माजं ती बाळराज – वागासारिक ऽ उमरावू !"*

रस्त्यानें चालणारी ही मराठमोळा ललना मनानें मोठी खंबीर, व अस्मितेनें तिखट आहे. वेगळ्या नजरेनें तिच्याकडे पाहणाऱ्यालाहि धाक बसवणारी ती आहे, तशीच ती अत्यंत कोमलहि आहे. चावडीकडील वाटेनें जात असतांना तिचा सर्व श्वास उरांत कोंडलेला असतो, सर्व प्राण कानांत गोळा होऊन बाहेरील प्रत्येक चाहूल टिपून घेत असतात. अधीर व धडधडत्या मनानें ती जात असतांना भुईवरील खडा देखील हालणार नाहीं, अशा बेतांनींच तिचीं कोमल व मर्यादेशील पावलें पडत असतात. तिथें असणारी ती सभा देखील तिचें गोड कौतुक करते. तें कौतुकहि तिच्या कानांवर येतें. शीतळ, मृदुल असा जाईचा वेलच आहे ती जणुं कांहीं ! जाईचा वेल का कधीं कुणाला दुखावेल ? स्वतःचेंच अंग चोरून घेऊन तो आपल्या मार्गापुढील वाटेनें वाढत जाईल ! ही वंशवेल कुलवंताच्या घरांत निपजलेली आहे, वाढलेली आहे !

रस्त्यानें जातांना तिची इकडेतिकडे पापणी होईल ? कसें शक्य आहे ? घरामध्यें 'वाघ' आहे ! त्याच्या हुकुमाची जरब, नजरेची जरब, त्याचें गुरगुरणें इतकें प्रभावी आहे कीं, त्या धाकानें तिची पापणी कुठेंहि सदैव अवनतच राहील. तथापि स्वतःच्या शारीरिक कुवतीबद्दल तिला विश्वास आहे; नव्हे, पुरा भरंवसा आहे.

तिच्याकडे धनवैभवानें जरी कानाडोळा केलेला असला तरी स्वतःच्या शरीर-वैभवाची तिची अस्मिता कधींहि काळवंडलेली नाहीं. तिच्या दुबळेपणांतूनहि तिचा धीर व विश्वास चमकून उठतात :

*दुबळं माजं पनु — न्हाई दुबळी माजी काया*
*बापाजी बयाबाई — चुनगती माजा पाया !*
*दुबळं माजं पनु — न्हाई दुबळं माजं तोंड*
*बापाजी बयाबाई — चुनगती माजा पिंड*

सासुरवासिणीसाठीं विसांव्याचें एक दुसरेंच स्थान असतें. आणि तें म्हणजे शेजीचें घर! शेजारणीचा गोड सहवास! तिच्यासंबंधींहि ती आपलीं भावनेचीं फुलें वेंचून सुंदर भावमाला गुंफते. क्वचित्प्रसंगीं तिच्यावर रागावतेहि. पण तो राग एकमेकींच्या गैरसमजांतून निर्माण झालेला असतो :

*शिजीच्या घरला गेलें — सहज मी बसायला*
*शिजी मागाऱ्या बोलती — आली आसल उसन्याला ।*
*शिजीचा शेजायारू — माजं आरदं म्हाइयारू,*
*शिजीच्या पारावरू — हुबा न्हाऊंया खिनभरू !*
*चांगलं माजं पनु — जिबवु माजी माता*
*बया गवळणी सारईक्या — धुरा जूडिल्या जातांजातां !*

अत्यंतिक ऐश्वर्यालादेखील दुबळेपणाच्या आधाराची गरज केव्हां ना केव्हां ही भासतेच! त्यांतून मग किती केलें तरी हा शेजारधर्म आहे! एकमेक एकमेकींकडे नडल्या—अडल्यास जाणारच. उसन्या-पासन्याचे व्यवहारदेखील गोडीगुलाबीनें होत राहणारच :

*शीजी तूं आईबाई — उसनी द्यावी सूजी*
*— बाळ पावनी आली माजी !*
*शीजी तूं आईबाई — उसना द्यावा गुळू*
*— माज्या भैनाचं आलं बाळू !*

इतकी महति शेजीची असली तरी तिच्याजवळ काय बोलावें नि काय बोलूं नये, काय सांगावें अगर काय सांगूं नये याचा आवाका मात्र तिला नक्की असतो. तिच्याजवळ गुजाच्या गोष्टी बोलल्यास त्याा कुठंपर्यंत पसरतील तेंहि ती पूर्णपणें जाणून असत

*शीजी पशी गुजु — उपनिलें वारं*
*— माजं गुजाचं घर न्यारं !—*

शेजीकडून जें जें कांहीं उसनें आणलें जातें त्याची फेड ही केव्हां ना केव्हां होतच असते. पण शेजीच्या उसन्याशिवाय दुसरींहि कांहीं उसनीं तिच्याकडे असतात, अनेक ऋणांचा बोजा तिच्यावर असतो; कीं ज्यांचा उल्लेख ती आपल्या हृदयाशीं पुन्हां पुन्हां करीत राहते. तीं ऋणें फेडण्याचें सामर्थ्य तिच्याजवळ नसतें, कारण तीं मोलाचीं आहेत :

*शीजीचं उसईनं — आडसिरी पायइली*
*बयाच्या उसन्याची — याद कुणाला ऱ्हाईइली !*
*शीजीचं उसईनं — तिच्या हुंबऱ्या पसईनं !*
*बयाचं उसईनं — माज्या जलमा पसईनं !*
*शीजीचं उसईनं — बाई मी फीडीन भाजीपाल्या*
*बयाचं उसईनं — मला फिटंना काशी गेल्या !*
*शीजीच्या उसन्याची — तिची जरूर वर्दी झाली*
*माज्या बयाच्या उसन्याची — तिची रिकामी वाटी दिली !*

मातेचें ऋण तें कोणतें हें सुद्धां मनमोकळ्या प्रांजळपणें ती सांगून मोकळी होते :

*आठ धाई धारा — पेलें मी कुण्यारंगं*
*बया माज्या द्वारकानं — केला मांडीचा चवरंग !*
*आठ ग धाई धारा — पेलें मी बसुइनी*
*— मांडीवर बयाच्या बसुइनी !*
*लेकीच्या आईईला — लेकी वाचुन गमईना*
*सारीवल्या भिंती — वर काडिल्या कामिईना !*

ही जी अनुभूति आहे, ती अनुभवण्याअगोदरची तिची मनाची अवस्था तर कांहीं विचित्रच असते :

*शिंपिनी शीव चोळी — टाक उगच शिवदोरा*
*बाळ जातिया सासऱ्याला — जीव झालाया वाराहुरा !*

*सासऱ्याला जाते — धरनी मारिलया म्यादू*
*— बंधु मुराळी देतें उटू !*
*म्हायागरीची वाट — म्हाई लावित बगायाला*
*— बाळ धाडिती आणायाला !*
*बिन मुराळ्या वांचुईनी — बाळ उतरीना पायईरी*
*तानिवाईला किती सांगू — चुलता सजतो भाईईरी !*

किती परोपरीनें आई आपल्या लेकीची समजूत काढण्याचा प्रयत्न करीत असते. कर्तव्य, रुढि, इभ्रत यांपुढें भावनांचे बंध अगतिक बनतात हेंच खरें! लेकीची समजूत काढून तिला धीर येण्यासाठीं ती आणखी कांहीं पुढें म्हणते.

मुलगी सासरीं नांदते आहे. तिथें जनरीतीप्रमाणें जाच का कधीं चुकणार आहे ? पण त्यांतूनहि आपुलकीच्या भावनेनें व समंजसपणानेंच आईचें हृदय विहिणीला विनवूं लागतें :

*सांगुन धाडीइती — यीनी मनाला दोन गोष्टी*
*— बाळ खेळुन माझी हुती !*
*सांगुन धाडिइती — यीनी माज्या ग सारजला*
*— माज्या संबाळ गिरजाला !*
*सासुर एवडा वासु — नकु करूंस सासुबाई*
*— बाळ आनेवा जोगी न्हाई !*
*सासुर एवडा वासु — नकु करूंस सासईव*
*माज्या त्या बाळईच्या — डोळ्यां भरलीं आसईवं !*

नवपरिणीत सूनबाईची, हळदीच्या पिवळेपणानें खुलून दिसणारी सौंदर्य-संपदा व तें लोभस कुरळ्या केसांचें श्यामल रूप पाहून सासूबाईंच्या मनांत कांहींसें कालवल्यासारखें होतें; ह्या गोष्टीचीसुद्धां आईच्या अंतःकरणास नेमकी जाणीव होते. अशा वेळीं ती अभिमानानें सांगते :

*नवास एवडं केलं — लेकी वालुच्या केसाईला*
*— दिस येगळ सासुईला*
*लेकाचं नवायासु — लेकी वालुला सारिल्यात*
*सिंगाळ बकईरं — तिच्या जावळा मारिल्यात !"*

लाडक्या लेकीचें जावळ, हें सटवाईचें सर्व प्रकारचे नवस फेडण्यासाठीं सिंगाळ बकरें मारल्यानंतर काढलें आहे.

लेक आतां सासरीं नांदते आहे. तिथें ती रुळली सुद्धां. अगदीं रमूनहि गेली आहे. तरी पण आईचें वेडें मन स्वतःशींज गूज करूं लागतें. लेकीच्या रमण्याचें गुपित किती कुशलतेनें आई उकलून दाखविते पहा :

*म्हायाराची वाटु – इसरली गोरी*
*तानीबाईच्या माज्या – हातीं पाळण्याची दोरी !*

या लेकीच्या भाग्यशाली जीवनाचे इतर पैलूहि ती सांगते—

*पांचे ग उतरंडी – परूपरीचीं झांकईनीं*
*माजी ती तानीबाई – जावानंदांत देकईनी।*
*पांची ग उतरंडी – त्या का गेल्यात्या गंगनाला*
*माज्या त्या बाळईला – चौगी सुना चांगुणाला !*

सासरीं जिचें जीवन रमलें आहे, रुळलें आहे, त्या लेकीनें आपणाकडे येऊन राहावें असें आईच्या मनांत कधींहि येत नाहीं. आपल्या प्रेमभावनेवर ती संयमपूर्ण धीराची जडशीळ भारणी ठेवते, व लेकीच्या कल्याणासाठींच तिला चार हितप्रद अनुभवाचे बोल ऐकविते :

*सासू सुंदरीचा तिचा कुसवा वेलीं गेला*
*माजी तूं बाळाबाई हायत्या धाकल्या जावा तुला !*
*सासु सासईरा सोनियाचीं फुलं*
*त्येंच्या उजिडानं तुजीं वागत्यालीं मुलं !*
*जोडव्याचा पाय हलुं टाकावा गरतीबाई*
*सोप्यां बसले दादाभाई !*

लेकुरवाळी लेक आपला स्वतःचा संसार सुखानें करून त्यांत रममाण झालेली पाहून आईचें मन समाधानानें भरून येतें. ती सुटकेचा निःश्वास टाकते ! आणि मग तिला स्वतःच्या गतजीवनाची स्मृति गोंजारूं लागते. त्या स्मृतींनींच ती रोमांचित बनते. आणि ते फुललेले रोमांचच या मंत्रमुग्ध अबोलीला बोलकी बनवितात. म्हणून आपल्या जीवनाचा एकएक पैलू ती पुढें मांडूं लागते :

*थोरला माजा दीर — म्हनीतु मुलीबाई,*
*— बसा चौरंगीं धुते पाई !*
*थोरल्या जावईला — मी का म्हनीती बाई बाई,*
*— तुमच्या वडिलपनापाईं !*

अशा सुखाचा संसार आहे तिचा. त्यांतहि सुखदुःखें आहेत, श्रम आहेत. सर्वांकरितां झिजण्याची मनाची जिद्द आहे.

*जातं मी बडीइती — नखां बोटांच्या आगयारीं*
*काशीचं पेलें दूध — जशा मधाच्या घागइरी !*
*जातं मी वडीतांना — चोळी भिजून पदर वला*
*काशीचं प्यालें दूध — आकरी दूधाला कढ आला !*
*जातं की वडीतांना — सोडी बाह्या ह्या मोकळ्या*
*— पडं पिटाच्या डिकइळ्या !*

दळण दळतांना जात्याला जणूं ती भिंगरी घालीत असते. बोटांच्या अग्रांवर ती त्याला नाचवीत असते. पण हें काम वाटतें तितकें साधें मात्र नव्हे. अशा वेळीं मात्र तिची सर्व चोळी ओलीचिंब होऊन वरील पदरदेखील भिजून जातो.

कांहीं वेळां लेक गांवांनच दिलेली असते. अशा वेळीं त्या आंदान दिलेल्या गायीचीं अवखळ वासरें आजीच्या वाड्यावर वात्सल्याच्या उबीच्या ओढीनें व रसमधुर गोड गोड चाऱ्याच्या आशेनें पळत येत असतात. त्यामुळेंच तर तिचें नेहमींचें ओढाताणीचें जीवन तिला सुसह्य होतें :

*लाडक्या लेकीईचं — तिचं गांवांत सासईर*
*आंदान दिल्या गाई — वाड्यां येत्याती वासइरं !*

त्यांतूनहि मायबापांची आठवण तिला पुन्हां पुन्हां बोलके बनवीत असते.

*मायबापांची आशा थ्वारू — भावाची भैन पुरीं*
*— भाच्या बाळाचीं लंका दुरीं !*
*बापाजीं म्हणइतु — लेकी नांदूनीं कर नांवु*
*तूझ्या घरला येऊं जाऊं — तुझ्या रांजनीं पानी पिऊं !*
*समरत सोईइरा — बाई करनीसाठीं केला*
*माज्या तूं बंधुराया — सोयऱ्या येईना तुज्या तोला !*

*समरत सोईइरा – जसा भिंतीवईला चुना*
*उमराव माजा बंधु – खांब हवेलीचा जुना !*

भिंतीवरल्या चुन्याची नि जुन्या पुरानन हवेलीच्या खांबाची का कुठें तुलना होऊं शकते ? त्याच्या तोडीस चुना कसा येऊं शकेल ? सर्व हवेलीचा अवाढव्य बोजा ज्यानें पेलण्याचें महान् सामर्थ्यशाली कार्य केलें आहे, त्याची बरोबरी त्या हलक्याफुलक्या, वरवरच्या चुन्याला कशी येऊं शकणार आहे ?

स्वतःचें श्रमिक जीवन ती कुठलाहि आडपडदा न ठेवतां प्रांजळपणें विशद करते. प्रसंगीं उपाशीपोटीं राबावें लागलें असलें तरी त्याची तिला पर्वा नाहीं. त्याचा ती गवगवादेखील करणार नाहीं....सर्व कांहीं धीरानें सांवरून नेईल. पोटांतील भूक जर जागी झाली तर ती त्या 'भुके'ला धमकावणीच्या स्वरांत चुचकारून घेईल, तिला समजावून सांगेल व व्यवस्थितपणें निभावून नेईल.

*भूक लागली माज्या पोटा – येडी झालीस माज्या भुकंऽ*
*ह्या ग गांवांत न्हाई सखी – ती का न्हाइली दुरल्या लंकं ऽ !*
*भूक लागली माज्या पोटा – बाई मी निज्या देतें गांठी*
*– पित्या नानाच्या नांवासाठीं !*

पोटांतील भूक शमविण्याकरितां ती स्वतःच्या कुलशीलाचा होम कधींहि होऊं द्यायची नाहीं. बावडीवर उभी राहून स्वतःची इज्जत वाऱ्यावर सोडणार नाहीं :

*आगिणीच्या पुढं जळतं वलंचलं*
*माईबापावांचुनी कोण म्हणील काम केलं ?*

अशा प्रकारें आई-बापाइतकीच तिची भावशीलता गणगोतांसंबंधींहि संवेदन-शील असते. पण तिचे अनुभव–अंदाज–प्रत्यक्षांत कटु ठरतात. वेळप्रसंगीं कुणीहि गणगोत तिच्यासाठीं धांवून येणार नाहीं हें तिला अनुभवांनीं पटलेलें असतें :

*खंडीभर गोत – वाया येरतीचा पाला*
*अंतःकरान भेटइलं – मनींचा शिणु गेला !*
*खंडीभर गोत – आला पेंडीला बसईना*
*अंतःकरनावांचुइनी – अंतःकरान दिसईना !*

*खंडीभर गोत — माळावईलं गवायात*
*माजी ती बयाबाई — गार हराळी लवनांत !*
*अंतरींचं गुजु — बांधी शेल्याच्या पदरांतु*
*माज्या तूं बाळराया — सोड बयाच्या हुरद्यांतु !*

अशा रीतीनें आपल्या काळजाच्या वेदना जीवींच्या श्रद्धास्थानाकडे ती पाठवून देईल. पण तेंसुद्धां मऊ मुलायम रेशमी शेल्याच्या पदरांतून !—अगदीं घट्ट बांधून !



# नांदतें मी भाग्यानें

सौ. तारा परांजपे

मुलगी जन्माला आल्यापासून ती परधन आहे याची जाणीव मुलीच्या आई-वडिलांच्या मनांत सतत सलत असते अन् म्हणूनच मुलीचा जन्म पुष्कळांना नकोसा वाटतो.

*बाई लेकीचा जलम । घालूं न्हव्हं तो घातिला*
*परघरंच जातिला*

जसं म्हटलं जातं नी गाईची उपमा देऊन स्त्रीजन्माच्या असहाय्यतेचं वर्णन केलं जातं :

*लेकीचा जलम । घालूनी देवा काई*
*नेल्या बाजाराला गाई । पराई दावं लावी*

मुलगी जन्माला आल्यापासून ती कधीं तरी परघरीं जाणार या विचारानें जीव व्याकुळ होत असला तरी ती एकदांची परघरीं गेल्यावांचून आईवडिलांना सुखाची झोंपहि येत नाहीं :

*"लेकीच्या बापाला । नेत्राला नाहीं झोंप*
*कोठं घावं शामरूप"*

या विरोधाभासांतच स्त्रीजन्माचं सारसर्वस्व सांटलेलं आहे.

मुलगी लहान असल्यापासूनच तिच्या लग्नाचा ध्यास लागलेला असल्यामुळें खेडयांतून पुष्कळशा मुलींचीं लग्नें लौकर होतात. एकदां मुलगी उजवून टाकली कीं, आईवडिलांच्या डोक्यावरचा भार उतरतो. पण तो सगळा भार त्या येवढ्याशा कोवळ्या अंकुरावर येऊन पडतो. तिचे असनात हंसण्याचे, खेळण्याचे, हुंदडण्याचे अन् बागडण्याचे दिवस पण तिला जावं लागतं सासरीं, सासूच्या जाचांत, नणंदेच्या कांचांत अन् जावांच्या दुस्वासांत. अर्थातच मुलीला सासरीं जातांना ब्रह्मांड आठवतं अन् त्यामुळं सासरीं जातांनाच परत माहेरीं केव्हां आणायचं याचं तिला आश्वासन द्यावं लागतं :

*सासरीं जातांना । नेत्रासी आली गंगा*
*महिन्याची बोली सांगा*

मुलीप्रमाणेंच आईवडिलांच्या डोळ्यांनाहि यावेळीं खळ नसतो. त्यामुळें,

*सासरीं जातांना । डोळ्यांना येतें पाणी*
*बाप म्हणे माझी तान्ही*

अशी त्यांची अवस्था होते.

मुलगी सासरीं जाते पण मन माहेरीं ठेवून जाते. तिचें सगळें लक्ष माहेरच्या वाटेकडेच असतें. त्यामुळें

*माहेरची वाट । दिसे सोनियासरसी*
*कधीं जाईन मी बाई । वारियासरसी*

असा तिला ध्यास लागलेला असतो. सकाळीं उठून दळण घातलें कीं, तिला आईची आठवण होते आणि ती आईला ओव्या गाते :

*दळन दळीतें । बाह्या माज्या लोखंडाच्या*
*गुटी देल्या येरंडाच्या । मायबाई हरनीनं*

सासरीं तिला कुणी तरी विचारलें, "तुला भाऊ किती आहेत?" तर ती अभिमानानं काव्यमय भाषेंत उत्तर देते,

*जनलोक पूसती । तुला भाऊ हैत किती*
*हजाराचें चार मोतीं । नथेला शोभा देती*

शेजारच्या बाई कुणी बसायला आली कीं, तिचें स्वागत करते अन् म्हणते :

*शेजी गे घरां आली । पाट देतें बसायला*
*हरणीचा शीक मला । मायबाईचा*

सासरीं तिला काम खूप पडतें तेव्हां ती मनांतल्या मनांत म्हणते :

*मायबाईच्या ग राज्यीं । राज्य केलें मोंगलाई*
*भरला तांब्या देला नाहीं । माय माज्या हरनीला*

दारावर कासार आला तर त्याला भरल्या डोळ्यांनीं ती म्हणते :

*कासारा रे माज्या दादा । धरूं नको माजा हात*
*मन माजं कारल्यांत । माय माजी म्हायेरांत*

गांवांत कधीं चांगली साडी आली कीं ती लगेच बेत रचते :

*काळी ग चंद्रकळा । लेवूं वाटली जिवाला*
*आलाय् रंगारी गांवाला । घ्याया लावीतो भावाला*

तिच्या आईनं दिलेलीं कर्णफुलं मोडून जातात. सासरीं तिला नवीं कर्णफुलं तर मिळत नाहींतच पण तीं मोडल्याबद्दल पुष्पांजलि मात्र मिळते. मोडलेली कर्णफुलं कशी तरी एकदांची जोडून मिळतात. अशा वेळीं तिला असं वाटतं कीं, हें सगळं सविस्तर रीतीनं आईला कळायला हवं. पण कळवणार कोण? निरोप कसा पाठवायचा? शेवटीं ती एका पांखराबरोबरच निरोप पाठवते :

*गुरगुंज्या पांखरा, जाय माझ्या माहेरा*
*माहेरच्या बुरुजावर शेवंती मोगरा*
*तिंत कीं बसावं मातेला पुसावं*
*मातेच्या लेकीच्या गेंद्या कीं मोडल्या*
*मोडल्या तर मोडल्या*
*टिका लावुन जोडल्या*
*टिकचा उजेड फार*
*अंगनीं भरलाय् बाजार*
*अंगनीं भरलाय बाजार*

आईची आठवण काढीत नि पडेल तें काम करीत व कसेबसे दिवस कंठीत असतांना तिला तिच्या वयाच्या मुली फुगडी खेळतांना दिसतात तेव्हां तीहि त्यांच्या फुगडींत सामील होते, इतकेंच नव्हें तर एक उखाणा घालून मनांतला विषादहि ओकून टाकते :

*काळ्या वानरांत माय कारल्याचा येल*
*तेथ्यं उतरले माय नांदेडचे सोनार*
*त्याहिच्या पेटींत मोत्याचा घोस*
*'लेव लेव माय' "कशीं लेवूं दादा*
*घरीं नन्दा जावा, करतील हेवादावा"*
*"ननन्दा घरोघरीं हेवा परोपरी"*
*फुइ फुई फुगडी, फुइ फुई फुगडी*

पंचमी जवळ आली तर तिला वाटतं माहेरीं जावं, नटावं सजावं, गोड-धोड खावं अन् मनसोक्त हुंदडावं. सकाळीं उठून प्राजक्ताचीं फुलें वेंचावीं, दुपारीं उंच उंच झोके घ्यावे, गाणीं गावीं, आणि दमलें-भागलें कीं, रात्रीं आईच्या कुशींत शिरावं. म्हणून ती म्हणते,

*सनामंदे बाई सन । नागपंचीम खेळायाची*
*वाट पहातें बोलाव्याची*

मनांतल्या मनांत ती भाईरायाला आळवते,

*पंचमी दिवाळीला । लोकांच्या लेकी येती*
*बहेना तूजी वाट पहाती । भाईराया*

जसजशी पंचमी जवळ येत चालली तसंतसं तिचं सारं लक्ष दाराकडे लागतं शेवटीं एकदांची तिची आशा सफल होते.

*माज्या ग दारांत । घोडीनं हिस्स केला*
*भाऊ नव्हं भासा आला । मूळ मला*

असं अगदीं आनंदानं सर्वांना सांगत हिंडते. हातानं काम करतां करतां मनानं बेत करते :

*माहेरा जाईल । बमल सांवलीला*
*कमळ तुमच्या हावेलीला । देसाईराया*

माहेरीं कोण भेटेल, काय म्हणेल याचेहि विचार तिच्या मनांत चालू असतात :

*माहेरा जाईल । बसल पारावरी*
*भासा राघव विचारी । आत्याबाई कवां आली*

माहेरीं जायला निघाल्यावर वाटेंत थोडासुद्धां अडथळा तिला खपत नाहीं. ती म्हणते :

*वाटेच्या वाटसरा । होय वाटेच्या आगळा*
*जीव लागला सगळा । माय हरणीकडं*

माहेरीं पोहोचलें कीं, आईच्या गळ्यांत गळा घालून

*तुज्या माज्या भेटीला ग । वरीस बाई लोटलं*
*कसं तुला ग कंठलं । मायबाई*

मायलेकींचं हितगुज सुरू होतं तें मध्यानरात्र झाली तरी संपत नाहीं. शेवटीं लेक म्हणते,

*गूज ग बोलतांना । सपर्षी आले माथां*
*शेजेला जाय आतां । मायबाई*

मैत्रिणी मग भेटायला येतात अन् त्यांतली अगदीं जिवाभावाची मैत्रीण असते ती तिला एकीकडे विचारते, "खरं सांग, तुझी सासरची मंडळी कशी आहेत स्वभावानं!' मैनाच्या डोळ्यांत टचकन् पाणी उभं राहतं आणि ती आडवळणानं उत्तर देते—

*सासरचं बाई गोत । कडूनिंबाचा ग पाला*
*नांवासाठीं गोड केला । देसाईरायाच्या*

आईनं तर आल्याबरोबरच ओळखलेलं असतं कीं,

*सासूचा सासरवास । नन्देचें टालेटोले*
*इचें काकून ढिलें झालें*

महिना दोन महिने माहेरपण झाल्यावर पुन्हां सासरीं जाण्याची वेळ येते. आईचा विरह अन् सासरच्या कटु स्मृति यांनीं मैना व्याकूळ होते. आईला वाटतं लेकीला पाठवण्याची थोडी टाळाटाळ करावी :

*लेक सासऱ्याला जाती । माय आडामोडा घाली*
*बंदु शिनगारीतो घोडी*

सासरीं जाण्याच्या आदल्या दिवशीं त्यामुळं आईची धांदल उडते अन् ती लौकर उठण्याची घाई करते :

*लेक सासऱ्याला जाती । आडबड गडबड माईचं*
*वाळू तापलं भोईचं । लेकी लंकाला जायाचं*

मैनाचें वडील तिच्यासाटीं इतकी भारीची साडी आणतात कीं पाणवठ्यावर बायका आश्चर्यानं तोंडांत बोट घालतात :

*बाप करी बोळवण । पदरीं रामसीता*
*नवल केले पानवंता*

लेकीला सासुरवास आहे याची आईला कल्पना असते पण तिच्या जीवनाचं तत्त्वज्ञानच असं असतं कीं,

*सासूचा सासरवास । शितासारकीला व्हता*
*आपुली काय कता ?*

त्यामुळं ती लेकीला उपदेश करते,

*सासूचा सासरवास । सोसल्यानं काय होतं*
*दोनी कुळा नांव येतं*

लेकीला सासरीं काम फार पडतें म्हणून ती सुकली हें माहीत असूनहि आई तिला सांगते :

*दहाच्या घरामध्यें । कामानं होतं नांव*
*माणसाई पुढं व्हावं । लेकीमैना*

लेक आतां वयांत आलेली असते, तिला कुणी एवढंसुद्धां उणं उत्तर बोलूं नये अशी आईची तळमळ. म्हणून ती सांगते :

*जोडव्या विरोल्याचा । पाय ठेवावा जपून*
*लेकी भल्याच्या आपुन*

नुसत्या बोलण्याचालण्यांतसुद्धां सासरीं दोष काढले जातात म्हणून तिला ती बजावून सांगते,

*जोडण्याचा पाय । हळूं टाकावा मालनी*
*देराभायाची बोलनी । हिची उधाट चालनी*

सगळ्यांत महत्त्वाचं म्हणजे पतिराजांची मर्जी सांभाळ. कारण

*भरताराचा बाई राग । जसा पेटारीचा नाग*
*त्याच्या मरजीनं वाग*

नंतर मैना सासरीं आली. तिनं येतांना प्रतिज्ञाच केली होती कीं,

*चंदनापरीस । म्यां आपुल्याला झिजवीलं*
*नांव दुरवरी नेलं । देसाईरायाचं*

त्याप्रमाणं तिनं आपल्या गोड बोलण्यानं अन् सेवावृत्तीनं हळूंहळूं एकेकांचीं मनं जिंकायला सुरवात केली. यांत पतिराजांचा पहिला नंबर होता हें सांगायला नकोच. आतां ती शेजारणीला सांगते,

*सासूचा सासरवास । नन्दच्या लावन्या*
*कंथ करी संपादण्या*

त्यामुळं सारंच सुसह्य वाटतं. पतिराजांना आईविरुद्ध बोलायची हिंमत नसते पण राणीसाहेबांना तर खूष करायची इच्छा असते. मग ते तिनं मागितलेला जिन्नस आणून देतात. मैना कौतुकानं सांगते :

*भरल्या बाजारांत । लुगडं होतं काय सवान*
*संगं शेजचा दीवान । मोडीना माजं मन*

पुढं पुढं तर अशी अवस्था झाली कीं सासूबाईंचं सुनेला सांगणं,

*कचेरीला जातां येळां । निघना याचा पाय*
*वसरीला उभी राह्य । सून मालन*

आतां दोघांच्या मनांची मिळणी झाली त्यामुळं ती पतिराजांना हक्कानं कामं सांगूं लागली.

*सांगूनी धाडीतें । कागदावरे ओळी*
*उभी भर्ताराजवळी*

आईनं काळजी करूं नये म्हणून तिला पत्र जातं,

*माझे ग मायबाई । करूं नको माजा घोर*
*मला देलं राज्यावर । देसाईरायानं*

दररोज सकाळीं ती सूर्यनारायणाची पूजा करते आणि म्हणते :

*नारायेना बाप्पा । सोन्याचा उगव*
*हातीं कुखाचं बगवं*
*नारायना बाप्पा । तुजी पिंवळी रे छाया*
*कुंकु मागतें लेवाया । हळदीवरे शोभा*

आतां हळूंहळूं घरांत सर्वांनाच ती आवडायला लागली. धाकटा दीर तर तिला आईप्रमाणंच मानीत असे.

*धाकला माजा देर । मला मनीतो ग बाई*
*मर्जी वंडाळीली न्हाइ*

एकदां तर त्यानं शहरगांवाहून एक सुंदर लुगडं आणलं आणि म्हणाला,

*आतां हिरवं लुगडं । पदरीं मोतींघोंस*
*देर मने भावी नेस । सत्येनारायनाला बस*

अशा या मुलासारख्या आवडत्या दिराचं लग्न ठरलं तेव्हां मैनानं कामासाठी अगदीं उत्साहानं कंबर कसली, लग्नाचे एक एक पाहुणे यायलाहि लागले :

*घरां पाव्हनी ग आली । शेजी पूसते ती कोन*
*माज्या चूड्याची ग बहीन । नन्द ग मालन*

नणंदेला ती म्हणते :

*माज्या की ग अंगनांत । अंथरीतें बाई बाजा*
*नन्दाबाई पती तूजा । नातीयानं बदूं माजा*

नवीन जाऊ घरांत आल्यावर मैनाची अन् तिची चांगलीच मैत्री जमली. पण पैसा मोठा वाईट. त्यानं भावाभावांतच भांडण लावलं. तेव्हां मैना म्हणते,

*भावाभावाचं भांडन । शेतीं पडल्यात दोऱ्या*
*जन मने जावा बऱ्या । अशीलाच्या लेकी खऱ्या*

ती आपल्या घरांत बजावून सांगते,

*भावाभावाचं भांडन । जावांचं एक चित्त*
*नका घालूं आडवी भिंत । बाळ जाईल रांगत*

'बाळ जाईल रांगत' असं ती म्हणते अन् एकदम जीभ चावते....आणि लाजेने चूर होते. पण तिचं गोड गुपित तर फुटलंच. तेव्हां पतिराज चौकशी करूं लागतात,

*पहिल्यानं गरभार । कंथ पूसे रंगम्हालीं*
*तुज्या तोंडावरे लाली । कोन्या महीन्यांत न्हाली ?*

मैनाला माहेरीं जाऊनहि फार दिवस झाले होते अन् शिवाय सासरीं तिचं कितीसं कोडकौतुक होणार म्हणून तो तिला म्हणतो,

*गर्भिन्या नारीला । खाऊं वाटलं काय काय*
*आपुल्या म्हायेराशीं जाय । खाऊं घालील तुजी माय*

मैना तर काय सदैव माहेरीं जायला आसुसलेलीच असते.

माहेरीं पोहोचल्यावर आई तिच्यावर कौतुकाचा वर्षाव करते. तेव्हां तिला वाटतं,

*पोतीमंदे पोथी । भागवत भारी*
*गोतामंदे मातोसरी*

आतां तेंच महन्मंगल मातृपद तिलाहि मिळतं. बाळराजाच्या आगमनानं हरखलेली अन् मातृपदाच्या जबाबदारीनं मूळचीच समंजस पण आतां अधिक समंजस व समतोल विचारसरणीची झालेली मैना सासरीं जायला निघते. आईनं आणखी राहण्याचा आग्रह केला तेव्हां ती म्हणते,

*माईनं माहेर । बापानं ग गोत सारं*
*राज्य भर्ताराचं बरं । दिसतं शोभींवंत*

तेव्हां आतां मला जाऊं दे.

आई लगेच घरच्या लोकांना सांगते, 'इतके दिवस मैनाची ये-जा घोड्यावर झाली पण आतां तिला गाडी हवी.'

*घोडीची बसनार । तिला गाडी लागल आतां ।*
*लेकुरवाली झाली शीता । मैनाबाई*

सासरीं निघण्याची सर्व तयारी सांगोपांग झाली.

*बाप करी बोवळन । माय करीते झोळणा*
*गाय वासरूं पाळणा । देलाय् ग बंधूजीचं*

आणि मग मैना सासरीं निघाली,

*सासरीं ग जातां वेळां । भावजई धूते पाय*
*पदर लावी डोळां माय*

मैना सासरीं गेली. कांहीं कालानंतर निसर्गाच्या नियमाप्रमाणं पिकलीं पानं गळायला सुरवात झालीं अन् मैनाला वाटायला लागलं :

*माय असतां माहेर । बाप असतां येणं जाणं*
*बंधू कोणाचे ग कोण*

त्यांतूनहि भावाची इच्छा होती बहिणीसाठीं कांहीं तरी करावं म्हणून. पण भावजय कुठें ऐकते. ती तर होती फटाकडी.

*सांवळ्या भावजईचं । बोलनं ठसाठसा*
*माजा कल्यानी आरसा । भाऊराय*

असं म्हणून मैना आपल्या भावांचं कौतुक करीतच होती. त्याला ती अगदीं काकुळतीनं निरोप पाठवी,

*दिवाळी पंचेमी । वरसाचे दोन सण*
*करूं नको माझ्यावीण । भाईराया*

कधींकाळीं घरीं आला तर आग्रह करून ती त्याला ठेवून घ्यायची,

*घोडीचा लगाम । धरीतें मज्या मुटीं*
*आज राहये मज्यासाठीं । भाऊराया*

त्याच्यासाठीं परोपरीचे जिन्नस करायचीं,

*घरां पावना ग आला । आताच्याला दाळभात*
*बुंदी करितें सारी रात*

भाऊसुद्धां बहीण घरीं आली कीं तिचं कौतुक करतो, तिला चोळी घेतो पण....

*भाऊ ग चोळी घेतो । भावजय डोळे मोडी*
*नको सक्या तुळी चोळी । लेन्याची काय गोडी*

मग तिला वाटतं :

*मायबापाच्या ग राज्यीं । गोरे लुटावं नगर*
*भाऊ भाशियाच्या राज्यीं । ठाणं बसलं जबर*

तरीपण मैना मुळांतच समंजस. ती म्हणते,

*भाऊ ग आपुला । भावजई पराई*
*तिची मुरवत धरावी । अपुल्या भावासाठीं*

तिची खात्री असते. वेळकाळाला तोच उपयोगी पडेल. कारण,

*पान्या ग पावसाचा । येतो कीं वसाडा*
*भाऊ भयनीला असावा । जुन्या चोळीला इसांवा*

त्याचबरोबर भावाचं कौतुक करायला बहीणही पाहिजेच.

*भैन न्हाई त्या भावाचा । जलम बाई सूना*
*नित ववी आरजुना । बंधुराया*

आई गेल्यावर दर दिवाळीला ती भावाला ओवाळते अन् स्वर्गांतल्या आईला बजावून सांगते,

*दिवाळीच्या दिसीं । आरतींत पांच कोंद*
*ओवाळीला तूजा गेंद । मायबाई*

हळूहळू मैनाचीं अन् तिच्या भावाचीं मुलं मोठीं होतात. तिला वाटतं भावाची लेक सून करून घ्यावी. म्हणून ती तसं घडवून आणते पण होतं उलटंच :

*भाऊ यीवाई म्यां क्येलों ! करायचा नव्हता केला*
*होता तोही रंग गेला । झरीच्या पाटावाचा*

अशी अवस्था होते. कारण मुलीला वळण असतं तिच्या आईचं :

*भाऊ यीवाई म्यां क्येलों । भाची सून पडना पायां*
*घरला चला भाईराया । लेकीची रीत पाहा*

असं म्हणायची तिला पाळी येते. शेवटीं तर

*भाऊ यीवाई म्यां क्येलों । नाहीं की घरां आला*
*शिवंवरूनी ग गेला । लेक देऊन वैरी झाला*

इतके संबंध तुटतात !

इतकें झालें तरी मैना मूळचीच समंजस. त्यामुळं तिनं आपणहून भावाच्या घरीं जाऊन भांडण मिटवलं,

*बहीन भावाचं भांडान किलीविली*
*न्हाई तुला शिवी दिली बंधूराया*

असं म्हणून तिनं त्याची समजूत घातली.

मैनाच्या सासर-माहेर या दोन धाग्यांनीं विणलेला जीवनपट आतां पूर्णपणें आकाराला येतो. तिला पांच मुलगे अन् दोन मुली होतात,

*पांचजण बाई ल्याक । सहावा भरतार*
*गळां माझ्या चंद्रहार । बंधूराया*

असं सासरमाहेरच्या गोताचं वर्णन करीत करीतच ती समाधानाचा निःश्वास टाकते आणि संसारांत कृतकृत्य झाल्याच्या जाणिवेनं म्हणते,

*पांची ग उतरंडीं । पांचीला झांकण*
*लेकीसुना सौभागीन । मीं ग नांदतें भाग्यानं*

# सासुरवाशीण

श्री. पां. र. शिंदे

आमची जुनी कुटुंबसंस्था म्हणजे एक नांदतें गोकुळ होतें. आनंदानें भरलेलें. मायेच्या मेळाव्याचें. स्नेहाळ श्रद्धेचें. आणि कधीं कधीं तापत्या ग्रीष्माचेंहि! कोण म्हणतो तें सारें लयाला गेलें म्हणून? नाहीं. अजून भारतांतल्या तसेंच महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यांत अशीं गोकुळं नांदत आहेत. पहिलें वैभव राहिलें नसलें तरी आहे त्यांतहि वैभवच आहे. तिथें घर आहे. घरांत माणसें आहेत. फक्त चिमणा नि चिमणीच नाहीं तर तिथें सारीं नातींगोतींहि आहेत. एकमेकांसाठीं जीव पांखडणारीं. वडीलधाऱ्यांच्या शब्दाला मान देणारीं. एकमेकांची मर्यादा सांभाळून वागणारीं. दुसऱ्यासाठीं झिजणारीं. आपल्या माणसासाठीं जिवाची बाजी लावणारीं. त्यांच्यांतच आमची सई आहे. तिथेंच आमची मालन नि लक्ष्मीहि आहेत. पण त्या आहेत सासुरवाशिणी! क्षणांत हंसणाऱ्या, दुसऱ्या क्षणीं डोळ्याला पदर लावणाऱ्या! सुखानें फुलणाऱ्या. दुःखानें कुढणाऱ्या. सासुरवाशिणींच्या रूपानें घराघरांत नंदादीप जळत आहेत. चंदनाचीं खोडें झिजत आहेत. दुसऱ्यासाठीं जिवाची पंचारती करून त्या सर्वांना ओवाळीत आहेत! आपल्या दैवतासाठीं! आपल्या कुंकवाच्या धन्यासाठीं! सुख दुसऱ्यांना सांगतां येतें. पण दुःख? आमची सई आपलें दुःख दुसऱ्याला का म्हणून सांगेल? तिला तिचीं माणसें प्राणप्रिय आहेत. त्यांच्या नांवाला, तिच्या

कुळाला बट्टा लागेल असें ती कोणतेंच वर्णन करणारी नाहीं. पण तिलाहि मन आहे. दुःख सांगून हलकें होतें म्हणतात. पण ती आपलें दुःख जात्या ईश्वराला सांगते आहे! तिचा दाटलेला ऊर तिथें मोकळा होतो आहे :

*हंसुनी खेळुनी गोड करीतें मनाला*
*कींलवाणी[1] तोंड दिसूं देईना जनाला*
*माझिया जीवाला मीं त आटींतें पिटींतें*
*पित्याच्या जीवासाठीं नांव पाण्यांत लोटींतें*

होय. केवळ पित्यासाठीं! त्याच्या नांवासाठीं! त्यानें तिला तिची सोयरीक जमून आल्याबरोबरच सांगितलें होतें. माणूस जात पहाते. पण मत लवकर कसें कळेल!

ज्या दिवशीं तिचें लग्न झालें त्याच दिवशीं ती स्वतःची राहिली नाहीं. आईबापांची राहिली नाहीं. तिनें सत्त्व जणुं सोडलें. आईबाप सोडले. पतीसाठीं! लग्नाच्या जोडयासाठीं!

*लग्नाचा जोडा गळ्यांतली गळपेटी*
*सोडलें गणगोत एकल्या जीवासाठीं ॥*
*लग्नाचा जोडा माझ्या गळ्यांत ताईत*
*ब्राम्हनानें दिली गांठ सर्व गोताला माहीत ॥*

याच दिवशीं कुशींत कुरवाळून बापानें साश्रुनयनानें तिला सांगितलें होतें :

*बाप म्हणे लेकी नांदुन करी नांव*
*सोयऱ्या धायऱ्याचं भंवताली गांव ॥*
*बाप म्हणे लेकी कर्माची खटखट*
*शेवाळली वीट पाय दे ग बळकट ॥*

जीवनाच्या शेवाळल्या विटेवर पाय बळकट ठेवीत असतांना तिनें आपल्या चुडयाला आयुष्य मागितलें. त्याच्यासाठीं आपल्या जीवाचें मोल द्यावयास ती तयार झाली. साऱ्या देवांना तिनें आळविलें. ओसरीवर ऊन घेऊन आलेल्या सूर्यालाहि ती म्हणाली :

---

1 केविलवाणी

*नारायणबाप्पा तुमच्या सांगतें कानांत*
*माझ्या कपाळीचं कुंकू ठेवा बेलीच्या पानांत ॥*

त्याच्या गर्द सावलीचें ती सुख मागत आहे. आणि त्याचा मोबदला म्हणून ती आपल्या देवाच्या जिवासाठीं काय वाटेल तें करायला तयार आहे.

*तुमच्या जीवासाठीं जीव मपला देईन*
*घार गंगनीची होईन तुमच्या भेटीला येईन ॥*
*तुमच्या जीवासाठीं होईन रानींची चिमणी*
*आतां माझे राघू तुम्ही बाग मी लिंबोणी*
*तुमच्या जीवासाठीं उभी राहीन उन्हांत*
*आतां माझे राघू तुम्ही शेले मी बनात ॥*

पति हे तिचें विश्रांतीचें–विश्वासाचें–ठिकाण. आणि त्याचा थारा तिथें हिला निवारा. म्हणून सासरचीं माणसें तिला आपलींच वाटतात. त्यांच्याविषयीं तिला जिव्हाळा, प्रेम, आत्मीयता वाटूं लागते. 'माझा सासरा, माझे दीर, माझी सासू'–'मामुजी'–'आत्याबाई'–'दादाजी' हेच हेच शब्द तिच्या ओटांवर नाचतात, ती सुखानें मोहरून जाते. क्षणभर आपलें माहेरहि विसरते! माझें घर! माझ्या सत्तेचें घर! याविषयीं तिला जवळिक वाटते. आणि मग ती नवऱ्याबरोबरच सासु–सासरे, दीर यांचेहि गोडवे गाते :

*सासु सासऱ्यानं करण्या केल्या मोठमोठ्या*
*शेतांत रामकाठ्या सुना उतरती पाट्या ॥*
*सासुसासऱ्यानं वसरी भरली दीरानं*
*तांब्याची घागर जोतें चढते भारानं ॥*
*दारावरी उभी मी त आपुल्या भारानं*
*सावळ्यांनीं माझी मर्जी राखली दीरानं ॥*
*विसनिलं पाणी हंड्याशेजारीं घंगाळ*
*आंघोळ करितेत दीर मपले वकील ॥*
*सासुसासरे माझे देव्हाऱ्याचे देव*
*पडतें मी त्यांच्या पाया मनीं नाहीं दुजाभाव ॥*

सासरची मौज अशी आहे. पण ही मौज नवरा चांगला आहे म्हणून आहे हें ती कधींच विसरत नाहीं. पण कधीं कधीं तिचा नवराच तिच्यावर रागावतो. खुशाल

जात–कुळाचा उद्धार करतो! मग संताप होतो हिच्या जीवाचा. लाही लाही होते. तिचें मन नागिणीसारखें चवताळून उठतें. पण उद्धटासारखें कसें बोलणार? ती सारें सहन करते. पण शरिराला नि मनाला भारी शीण होतो. मग ती बोलते :

*सासुचा सासुरवास काय सांगूं सई–बाई*
*रांजणाखालीं जाई उगवत नाहीं ॥*
*काम करूं करूं दुखनात दंड बाह्या*
*विसाव्याला नाहीं बया सत्तेच्या भावजया ॥*

ज्याच्या खांद्यावर आपण आपली मान विश्वासानें टाकली तोच कसा केसानें गळा कापूं शकतो! तो नवरा म्हणून? काय सुख या नवऱ्याचें! काय भरंवसा या नवऱ्याचा? तिचें मन उलटी दिशा घेतें आणि मनांतला संताप शब्दाशब्दाला भाजून बाहेर पडतो :

*भ्रताराचं सुख कोण सांगती निलट*[1]
*पेटारीचा नाग घडोघडीला उलट ॥*
*नको म्हणूं बाई माझा भ्रतार ग भोळा*
*गारुडीयाचं मत केसानं कापिला गळा ॥*
*बोलला गव्हर*[2] *आंबट आंब्यावाणी*
*सुकली माझी देही ऊंसाच्या डांभ्यावाणी ॥*

आपल्या पतीला इथें रोख-ठोक जबाब दिला जातो! पण तो प्रत्यक्ष ऐकत नाहीं म्हणून बरें! :

*अशिलाची लेक अशिल माझा खाणवटा*[3]
*आइबरी शिव्या नको देऊं आरगटा*[4]
*अशिलाची लेक कमशील कामून होईन*
*पित्याच्या नांवाला बट्टा कामून लावीन*
*वाघाच्या पोटींची मी त आहे ग वाघीण*
*बोलला गव्हर झाली देहाची आगीन ॥*
*वाघाच्या पोटीची मला वाघाचें कलम*
*काय करूं बाई पडला अस्तुरी जलम ॥*

---

१ निर्मळ. २ नवरा. ३ खानदान. ४ उद्धट, रागीट

आतां नाहीं सोसवत! चार दिवस माहेरींच जाऊन यावें. जखम तेवढीच खपली धरील. मनाला विरंगुळा वाटेल. मग निरोप कोणा हातीं द्यायचा? कोण येतेंय भलत्या वेळीं! तो बघा वासुदेव आलाच कीं! माहेरीचा वासुदेव आल्यावर तिचा ऊर आनंदानें भरून येतो. डोळे पाझरतात. माहेराची खुशाली या जासुदाकडून कळेल. आपलाहि निरोप जाईल :

*माझ्या मोहराचा जासूद आला बाई*
*सातपुडी आंबा मिन्यावाणी त्याची कोई ॥*
*जासुदाच्या मुला जव जेव दूधकाला*
*माझ्या माहेराचा खुशाली सांग मला ॥*
*जासुदाच्या मुला सांग गिन्यानी भावाला*
*बोलला गव्हर बोल लागला जीवाला ॥*
*सांगून धाडितें मी त तुला लवलाह्या*
*तिथं जेवलास इथं यावं पाणी प्याया*

निरोप सांगितल्यावर मन फुलून जातें. डोळ्यापुढें माहेर उभें रहातें. एका अननुभूत सुखसंवेदनेचा प्रवाह देहावर शहारून उठतो. त्याकारणानें माहेराचा महिमा नकळत तिच्या तोंडून बाहेर पडतो :

*आईवांचून माया, माया कोणाला फुटेना*
*पावसावांचून रान हिरवं दिसेना ॥*

तिला माहेराची ओढ लागली आहे. तिच्या बयेशीं तिला रात्र उजाडेतों गूज करायचें आहे. तिच्या धाकट्या भावांना तिल भेटायचें आहे. म्हणूनच ती मुऱ्हाळ्याची वाट पाहूं लागली आहे. पण तिला थोडी काळजी आहे! मुऱ्हाळी येईल तो लहान भाऊ. नेणंता मुऱ्हाळी! तो अजून इकडे कधीं आलाच नाहीं. अन् आला असला तरी लहानच. त्याला कसें घर सांपडणार? त्याकरितां ती त्याला सांगते,

*नेणंता मुऱ्हाळी, खूण सांगतें वाडियाची*
*दारीं चौकट चांदियेची ॥*

एवढ्या खुणा ती सांगते तरी तिला वाटतें, आपल्याला नेण्यास कोणी तरी शहाणें सुरतें यावें. वाटेचें काम आहे. सोयऱ्यांच्या घरीं यायचेंय! त्यांची मनधरणी करील असें माणूस बरें. एवढा पोंच असतो का लहानग्यांना? म्हणूनच तिला वाटतें कीं :

*नेणंता मुऱ्हाळी नको लावू माझ्या बापा*
*वाड्यामध्यें चांफा शिंगी खाते गपागपा ॥*
*नेणंता मुऱ्हाळी रहा म्हणतां राहीना*
*अवकळ्या पाऊस पाणी चौकांत माईना ॥*

तरीपण मुऱ्हाळी आला तो नेणंताच !

*नेणंता मुऱ्हाळी येऊन कौलाला दडला*
*बंधवाच्या माझ्या उजेड चंद्राचा पडला ॥*

अशा वेळीं धांवत पळत शेजारणीकडे जाऊन ती आपला भाऊ आल्याची वर्दी देते....कांहीं तरी उसनें–पासनें–आणते....ही तिची गडबड चालली असतांना दोघे मेहुणे मोठ्या दिलखुलासपणें गप्पा मारीत आहेत. आपले कुंकवाचे धनी धाकल्या मेहुण्यास बरेच जपताहेत. हें पाहून तिची कळी खुलते.

आतां उद्यां जायचें ! आपले धनी एकांतीं कधीं भेटतील? अन् भेटले तर कशी परवानगी काढायची? मग तिकडून काय म्हणणें होईल?....'अन् जीवाला जपा'....सई मनाशींच बोलत होती. या गोड स्वप्नांत सगळा वेळ निघून जात होता....शेवटीं सई आतां माहेराच्या रस्त्याला लागली आहे.

*चाल शिंगीबाई तूं ग हंसत हिसत*
*तुझ्या पाटीवरून माझं माहेर दिसतं ॥*

आतां तिला कोण आनंद झाला आहे !

*माझिया माहेरीं मीं त जातें आनंदानं*
*भाऊ माझे दिले मला देवा गोविंदानं ॥*

आणि तें पहा माहेर. आज आईला सारख्या उचक्या लागत आहेत. दारावरच्या भिंतीवर कावळा कावकावत आहे. चुलींतलें जळतें लाकूड फुरफुरत आहे. भाकऱ्या भाजण्याचा तवा हंसत आहे. कारण आज सई येणार आहे. आणि सई! सई वेशीजवळ आलीसुद्धां. वेशीचें दार ती स्वतःच पुढें करते आहे.

*माझ्या माहेराची वेस मी त उघडितें अंगं*
*पाठीचा बंधु माझा मुकादम माझ्या संगं ॥*

आतां आईची मायेची मिठी. बंधूचें स्नेहाचें बोलणें. भावजयांचें पाया पडूं येणें. आपल्या इतर सासुरवाशिणी बहिणींचें गुज ऐकणें यांतच दिवस भर्रकन्

निवून जाईल. सईचा जीव एवढा होतो. आणि भावाची आपल्या बहिणींकरितां कोण धांदल! त्यांचे लाडकोड पुरविण्याकरितां तो किती उत्सुक आहे पाहा :

*सासुरवासिनी माझ्या बंधुच्या बहिणी*
*खांद्यावरी माळा, आला वैराळ होऊनी ॥*
*वैराळदादा हात रीता ठेवूं नको*
*संसारी माझा पिता उधारीला भिऊं नको ॥*

पण आपला बाप, आपले भाऊ दुबळे–पाबळे आहेत, गरीब आहेत याचें तिला वाईट वाटतें. ते सदा सुखी राहोत म्हणून त्यांच्या घरीं धन–संपदा असावी असें तिला मनोमन वाटतें. दारीं लक्ष्मीचा गाडा आला आहे; अशा वेळीं मनोभावें हात जोडून ती जें प्रार्थिते तें ऐकून तर आपल्या अंतःकरणांत गलबलल्यासारखें होतें :

*लक्ष्मीबाई कोणीकडं केलं येणं*
*बंधुचं दुबळंपण तुला सांगितो कोण ? ॥*
*आई लक्ष्मी तुला शेवायाचा थाळा*
*सुखांत राहूं दे माझ्या माहेराचा मेळा ॥*

एकदां कां होईना, भावाची भेट झालीच पाहिजे. ही ओढ अजून कायम आहे. असेनात भावजया! न करीनात आपली ऊठबस! पण भाऊ तर आपलेच आहेत ना? वर्षाची आपली माहेरची चोळी हक्काचीच आहे. म्हणून तिची चोळी वा लुगडें फाटलें म्हणजे ती म्हणते :

*फाटली माझी चोळी लुगडं आलं आकाराला*
*बंधवाला माझ्या सांगून धाडीन सरकाराला ॥*
*फाटली माझी चोळी नाहीं ठिगळ घायाचं*
*बंधुच्या ग माझ्या गांवा सख्याच्या जायाचं ॥*

भावासाठीं जीव टांगला म्हणून ती माहेराला येते. पण तिथें आनंद होतो तो फक्त तिच्या भावाला! अन् भावजय!....याच 'पराया' नारीनें एकाच शिंपांतलें दोन मोतीं वेगळे केले! हिनेंच नात्यागोत्याची ताडातोडी केली! बहीण-भावाची 'जाळी' तोडण्यास हीच 'आभंड' राणी कारणीभूत झाली! हें काय विपरीत पहाते आहे सई? भाऊ तिच्याकरितां जीव टाकतो आहे अन् मग हिला त्याबद्दल कां वाईट वाटत आहे? ती मानिनी आहे. पण भावाकरितां ती भावजयीचा तुसडेपणा–दुस्त्रास सोसते.

*बंधू घेतो चोळी भावजय तिथं गेली*
*रुपयाचा खण पावली कमी केली ॥*

आतां मात्र सईला राहवत नाहीं. तिचा सारा अभिमान उफाळून वर येतो. तिला वाटतें, माझ्या घरीं काय कमी आहे ? आणि असलें तर असलें दुबळेपण ! तें काय तसेंच बसून रहाणार आहे? आणि मोठेपण—श्रीमंती व दुबळेपण कांहींहि असलें तरी ही हिणकस वागणूक कोण सहन करील ? ती परखडपणें बोलूं लागते.

*वेड्या माझ्या जीवा तुला उलीस कळना*
*आईबापासारखी कुठं दौलत मिळना ॥*
*आईबापाच्या राजीं शिंक्यावरलं ग लोणी*
*भावजयीच्या राजीं जेव म्हणेना ग कोणी ॥*

ही बोचरी खंत तिला असह्य होते. उरांतला कढ डोळ्यांत तरळतो. त्याला आवर घालणें तिच्या शक्तीपलिकडलें होतें.

*चोळ्या बांगड्याच्या आशेकरितां नव्हतें आलें*
*पाठीच्या बंधू माझ्या भेटीला लईंदी झाले ॥*

बस्स ! मला यापेक्षां कांहीं नको !

अशी आहे सासुरवाशिण ! महाराष्ट्रांतल्या प्रत्येक खेड्यांतून ती तुम्हांला दिसेल. आतां तिचें माहेर दुरावल्यासारखें झालें असलें तरी तिची माहेराची ओढ कायम आहे. म्हणून या ना त्या निमित्तानें ती माहेराला जाणार आहे ! बहीण म्हणून नाहीं तर विहीण म्हणून ! भावाचीच मुलगी आपल्या मुलाला करून घेणार आहे ती ! म्हणून ती कौतुकानें म्हणणार आहे :

*बापाची सासुरवाडी लेकानं बळकाविली*
*बाळानं ग माझ्या मेहुणी राणी केली*

हें रक्ताचें नातें असेंच टिकणार आहे. अन् त्याचीं गीतें अशींच गाइलीं जाणार आहेत. न जाणो उद्यां तिच्या राज्यांत भावजयीसच म्हणावें लागणार आहे कीं :

*काळी कुळकुळीत जांभळं, जांभळ पिकली शिवाला*
*लेकीची समसम[१] आईबापाच्या जीवाला ! ॥*

कोणी सांगावें ? हें जीवनचक्र असेंच गरगरत फिरतें आहे !! फिरणार आहे !!!

१ हुरहूर, काळजी.

# सई जाते माहेराला-

## प्रा. सौ. विमल थत्ते

स्वभावतःच भावनाप्रधान असणाऱ्या स्त्रियांनीं आपल्यांतील ह्या 'मी' ची अतिशय हळुवारपणें जपणूक केली आहे. 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति' ह्या सुभाषिताप्रमाणें आपल्याला प्रिय असणाऱ्या प्रत्येक गोष्टींबद्दल स्त्रियांनीं अपूर्वाई दाखविली आहे. शतकानुशतकाच्या परंपरेनें खेडोपाडीं घराघरांतून पहांटेच्या वेळेस गायिलीं जाणारीं भावपूर्ण गाणीं ऐकलीं कीं, ह्या भावड्या स्त्रियांनीं त्यांच्याभोंवतीं निर्माण केलेल्या भावविश्वाचा साक्षात्कार घडतो.

लोकगीतांतून स्त्रियांनीं विविध व्यक्ति वर्णील्या आहेत. पण प्रमाण पाहूं जातां स्त्रियांची वाणी विशेषत्वानें रमते ती त्यांना प्रिय असलेल्या व्यक्तीभोंवतीं! जें वय वास्तविक पहातां अल्लडपणें हंसण्याखिदळण्याचं त्या वयांतच जुन्या काळांत विवाह होऊन मुलगी परक्या घरीं जावयाची!

म्हणून आईची 'ही प्रागसई', 'नेणती मैना' आल्यागेल्या हातीं पहा किती काकुळतीनें निरोप पाठवीत आहे! :

*दूरच्या देशींची मी। माझा जीव ऊदासला।*
*बंधू माझ्या सोयऱ्याला। वेगी धाडा जासूदाला॥*

*नीरोप करीतें ! आल्यागेल्याला पाहून ।*
*भाईराजसाला माझ्या । सांगा वाड्यांत जाऊन ॥*
*निरोप करीतें । आल्यागेल्या परोपरी ।*
*भाईराजसा रे माझ्या । भेटी यावं सरासरी ॥*
*पानवंताच्या बायांनो । सांगा माय हरनीला ।*
*उतावीळ ग मयना । बेगी धाड बंधवाला ॥*

आपण पाठविलेल्या निरोपाबरहुकूम आपल्याला न्यावयास येणार तो आपला सख्खा भाऊच! भावाला संबोधिलेला 'जासूद' हा शब्द किती योग्य आहे! आईच्या व तिच्या प्राणसईच्या विश्वासांतील असा हा 'जासूद' आहे. पण निरोप करूनहि कित्येक दिवस लोटले तरी अजून भावाचें येणें जमत नाहीं! सईचें कामांतील लक्ष पार उडतें! पहांटेच्या वेळीं ताक करतांकरतां ओसरीबाहेर कोणाचा तरी बोलण्याचा आवाज येतो व ह्या भावडीला वाटतें, 'आला वाटतें भाऊ!' म्हणून रवी तशीच डेऱ्यांत सोडून देऊन ती कानोसा घेते. पण....निराशाच पदरीं पडते तिच्या! बाहेर कोणीं एकमेकांना 'रामराम' म्हणतांच ह्या सईला वाटतें, आला आपला भाऊ! कानांत प्राण आणून ही सई आपल्या भावाची वाट पहाते!

*माहेरीं जाईल । माहेरीं मायबाई ।*
*भाईराजसाची राणी । विसाव्याला भावजई ॥*
*भाऊच्यासारखा । कोन बोलला वाड्यांत ।*
*करीत होतें ताक । रवी सोडली डेऱ्यांत ॥*
*घरांत करतें काम । बाहेर माझं मन ।*
*भाऊच्यासारखं । कोनीं केलं 'रामराम' ॥*

सईच्या ह्या उत्कंठेला सीमा रहात नाहीं! काम करतांकरत शंभरदां उगीचच बाहेर डोकावून पहावयाचा नाद लागतो तिला! शेवटीं वाट पाहूनपाहून व्याकूळ झालेली सई म्हणते :

*तुझी वाट रे पाहून । डोळे झाले कुंखावानी ।*
*सोयऱ्या बंधवा । कशी माया लोकावानी ॥*
*तुझी वाट रे पाहून । माझे डोळे झाले गारा ।*
*सोयरा बंधू माझा । गुंतला संसारां ॥*

*तुझी वाट रे पाहून लाली डोळ्याची फांकली ॥*
*बंधवाला माझ्या ! आन गळ्याची घातली ॥*

दाराच्यापुढें दृष्टीच्या टप्प्यांत दूरवर पाहूनहि भावाचें येण्याचें चिन्ह दिसत नाहीं म्हणून ही बहीण अतिशयच व्याकूळ होते. तिच्या मनांत नाना शंकाकुशंका थैमान घालूं लागतात. एरवीं महिन्यामहिन्याला भेटून जाणारा भाऊ कित्येक दिवसांत फिरकला तर नाहींच पण निरोप पाठवूनहि अजून आला नाहीं ? कां बरें असें व्हावें ?

*महीना महीना । भाईराजसाचं घोडं ।*
*सख्या राजसाला माझ्या । बहीणीचं फार वेड ॥*
*सहा महीन्याची भेट । वर्षावर गेली !*
*निष्ठूर माया केली । भाईराजसानं ॥*
*भावजय ग सांवळी । कोन्या राजाची मयना ।*
*सोयरा भाईराज । सखा भेटीला येईना ॥*

वहिनी आली आणि भावाची आपल्यावरील माया तर कमी झाली नाहीं ना ?....पण नाहीं–नाहीं–वहिनी तरी असं आपल्यांत अंतर पाडणार नाहीं ! अशा उलटसुलट विचारांच्या लपंडावांत सईचें मन गुरफटून जातें !

*बहीण ग भाऊ । एक्या वेलाची बाळकं ।*
*आली परायाची लेक । तिनं केली ताटातूट ॥*
*बहीणभावाची । बाळपणीं गोडी ।*
*आली परायाची लाडी । तिनं केली मनमोडी ॥*
*बहीणभावंडं । एक्या झाडाचीं संतरं ।*
*मधीं पाडती अंतर । सांवळी भावजई ॥*
*भाईराजस आपला । भावजय परायाची ।*
*वेणी घालिते गोफाची ॥*
*बहीणभावंडं । कांहीं लागना भेद ।*
*सीतामालन माझी । रानी मोहळशा मध ॥*
*बंधवापरीस । मालन चांगली ।*
*घडी रंगाची लागली । हजार दींडामंदी ॥*

अशा साधकबाधक विचारांच्या ऊनपावसांत सईचें मन अगदीं भारून जातें. वहिनीच्या प्रेमपाशांत गुंतलेला भाऊ आपल्याला नक्की विसरला ! छे, छे, शक्यच

नाहीं! मोहळ्यांतील मधाप्रमाणें गोड स्वभावाची वहिनी! ती नक्कीच भावाला आठवण करील! आणि म्हणूनच ही सई म्हणते बंधवापरीस मालन चांगली.... आणि एक दिवस तिची आशा पालवते, उत्कंठा पूर्ण होते आणि वाट पाहून-पाहून थकलेल्या तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू ओघळतात. एकीकडे भावाला पहातांच सई मनानें केव्हांच माहेरीं पोहोंचली आहे, तर दुसरीकडे भावाच्या आगमनाबरोबर त्याच्या पाहुणचाराची तयारी करण्यांत ती गुंतली आहे; आणि मनाच्या ह्या द्वंद्वांत सई अगदींच भांबावून गेली आहे. हा देखावा पहाण्याजोगा आहे :

*बहीणीचें घरीं । भाऊ गेले लई दीसां ।*
*गोफाचे कडदूरे । बहिण उकलीती फासा ॥*
*माझ्या घरीं ग सोयरा । आतांची डाळभाजी ।*
*बंधूच्या भोजनाला । पेढे करीतें मोलबाजी ॥*
*शेजारीनीबाई । उसने दे ग गहूं ।*
*बंधू आला घरीं । बाजाराला कव्हां जाऊं ॥*
*माझ्या घराला पावना । खांडापानाची तयारी ।*
*धमनी वाड्याच्या बाहेरीं ॥*
*घरीं पावने आले । शेजी मने बंधू बंधू ।*
*भाई ग राजाच्या । छतीला हिरवे राघू ॥*
*माझ्या घराला सोयरे । शेजी मने कोन कोन ।*
*वाड्यामधले भाचे दोन । मेण्यामंदीं पहा खूण ॥*
*घरा पावना आला । शेजी मनती कोठला ।*
*माझ्या मातेचा बाळ । मला उमराव भेटला ॥*
*माझ्या घराला सोयरे । पुरन घालतें पूरती ।*
*बंधवा माझ्या । करतें पोथीची आरती ॥*

आपल्याला माहेरीं घेऊन जाण्याकरितां भाऊ आला आहे ही घटनाच इतकी आल्हाददायक आहे कीं, त्यापुढें वाट पाहूनपाहून थकलेल्या सईचा थकवा पार कुठल्याकुठें पळून जातो. मग तर सईची धांदल विचारूंच नका. शेतकी जीवनांतील रोजचें खाणें म्हणजे भाजीभाकरी! गव्हाच्या पोळ्या किंवा तांदुळाचा भात शिजणार तो फक्त सणावारींच. पण भाऊ बहिणीच्या घरीं आला कीं तिला तोच दिवाळीदसरा! शेजीकडून उसनं मागून ती दिवाळीदसरा साजरा करणार! पण

भावाच्या आगमनाची अपूर्वाई वर्णन करीत असतां ही बहीण पोथीची आरती आटपते व पुरतें पुरण घालते! त्याचप्रमाणें भाऊ बहिणीला न्यायला आला तोसुद्धां किती वेगवेगळया वहानांतून! कोणी शिंगीवर बसून, कोणी मेण्यांत बसून, कोणी धमनींतून तर कोणी साय्कलवर स्वार होऊन! आणि ही चतुर बहीण भावाबरोबर त्याच्या वहानांची व वहानें हाकणाऱ्यांची पण दखल घेते आहे!

अनेक दिवसांपासून माहेरीं येण्याला उत्सुक असलेली ही सई माहेरीं येते! रस्त्यानें शिंगीबाईला वेगीं वेगीं चालण्याची ती किती घाई करते! माहेरींपण ह्या सईचें तितकेंच अपूर्वाईनें स्वागत होतें!

*माहेरा जाईल । बसले ढालजंत ।*
*रान्या माझ्या मालनी । आल्या कम्मानी लवत ॥*
*माहेराला गेलें । बसेंल तुळशीच्या वट्या ।*
*पाया पडूं आल्या । मालनी न्हानमोठया ॥*

असा हा माहेरीं येतांच पाया पडण्याचा समारंभ थाटामाटानें पार पडतो. कित्येक वर्षांनीं आलेली ही बहीण भावांना भेटते, भावजयींची चौकशी करते व आपल्या छोट्या भाच्यांना कडेवर उचलून घेते.

*पाया पडूं आली । पाया पडूं ग गहूं दे ।*
*सीता मालनी माझी । बाळ कडंचं घेऊं दे ॥*
*पाया पडूं आली । नथ ह्या मोरणीची ।*
*सीताबाई माझी । सून माझ्या हरणीची ॥*
*पाया पडूं आली । सीता मालन वाकत ।*
*पाया पड तूं लवून । माझ्या सख्याची ताकीत ॥*
*पाया पडूं आली । वसरी चढून माडीं गेलें ।*
*सीता मालनीचं माझ्या । रूप पाहून दंग झालें ॥*
*पाया पडूं आली । आशीर्वाद देतें खरा ।*
*जोड्यानं राज्य करा ॥*
*पाया पडूं आली । आशीर्वादाचं वचन ।*
*जन्मोजन्मीं सवाशीन ॥*
*पाया पडूं आली । माझ्या बंधवाची सीता ।*
*तिला आशीर्वाद देतां । दारीं राम उभा व्हता ॥*

अक्षरशः पायावर डोकें ठेवून लवून पाया पडणारी धाकटी भावजय पाहून नणंदेचें मन भारावून जातें. माहेरीं आलेली बहीण आपल्या भावांचें मोठेंपण पाहून हरखते. तिच्या दृष्टीनें पै पैशाला मोल नाहीं. भावाचे गुण, त्याचें रूप, त्याचें सभाचातुर्य, त्याचा साधाभोळा स्वभाव, ह्या सर्वांचें वर्णन बहिणीनें अपूर्वाईनें व तितक्याच जिव्हाळ्यानें केलें आहे.

*गोरा ग गोरा रंग । भीवया कम्मानी ।*
*चांगला चिंतामणी । भाईराजस ग माझा ।*
*भाईराजसाच्या । भीवया कांतीव ।*
*रूप सख्याचं ओतीव ॥*
*मोठे मोठे डोळे । भीवया रत्नरेघा ।*
*राजस बंधू माझा । वर कोन्या रानीजोगा ।*
*राजस बंधू माझा । काशीखंडीचा केवडा ।*
*सांवळे भावजई । भागीरथी तूझा जोडा ।*
*ढवळ्या घोडीचा । पीवळा चाबूक ।*
*वरता शीपाई नाजूक । भाई राजस ग माझा ॥*
*ढवळ्या घोडीचा । पीवळा जीन*
*माझ्या ग भावाची । बसणाराची कवळी शीण ॥*

*एकूलता एक । मानीना सारा येळ ।*
*राजस बंधवा । तुमां देवाचं पाठबळ ॥*
*दिवस काळ असा । नीघूनी जाईल ।*
*राजस बंधवाला । तेज मोत्याला येईल ॥*
*संपत सोयरा । मला भाजीच्या मोलाचा ।*
*सायरा बंधू माझा । हात्ती माझा अंबारीचा ॥*
*अंबारीचा हत्ती । हत्ती वाड्याला भीडला ।*
*मायबाईनं माझ्या । मला कीराना धाडीला ॥*
*संपत सोयरा । आहे ऊसाची पाचोट ।*
*सोयरा बंधू माझा । नाहीं करणीला हाटत ॥*

स्त्रीनें आपल्या अंतश्चक्षूंसमोर उभा केलेला असा व रूपगुणांनीं अपूर्व असा हा भाऊ आहे. भावाच्या सहवासांतच स्त्रियांनीं विविध व्यवसायांचें वर्णनहि तितकेंच अपूर्वाईनें व अगत्यानें केलें आहे.

सकाळीं उठूनी । दुधाची धार वाजं ।
गंगा गवळी नांव साजं । माझ्या बंधवाला ॥
गाईच्या गवतराची । अंगनीं झाली गंगा ॥
भाईराज माझा । गवळ्या पांडुरंगा ॥
गाईच्या गवतराचा । अंगणीं झाला सडा ।
माझ्या ग बंधवाचा । ऊंच गवळ्याचा वाडा ॥
गाईवासरानं । पानंद दाटली ।
बंधू तुझ्या दईवाची । मला मऊज वाटली ॥

शेत पीकलं पीकलं । म्हसोबाची पट्टी ।
हातीं शेदराची वाटी । ऊभा मदनाच्या काठीं (खळं)
शेत पीकलं पीकलं । माल येईना गाड्यानं ।
बंधवानं माझ्या । लमाण लावले भाड्यानं ॥
काळ्या आवारांत । काळ्या बैलाचं आऊत ।
बंधवाच्या घरीं । आली लक्षीमी धांवत
बैलांचीं ग नांवं । पवळया चिंतामणी ।
याच्या पाठीवर गोगी । वाडा चढं नंदीवाणी ॥
बैलामंदीं बैल । झाला पवळ्या चंचळ ।
झाली पेरणी पातळ । कणस पडले कंबळ ॥
तीफन्याताईनं । घेतीला उभा माळ ।
माझ्या ग बंधवाची । रासन्याची तारांबळ ॥
पाऊस पडतो । गर्जु गर्जु आध्या रातीं ।
सोयऱ्या बंधवाची । अर्जुनाची बैलशेती ॥
पाऊस पडतो । गर्जु गर्जु मेघा ।
सोयऱ्या बंधवाला । अर्जुनाला पेरुं लागा ॥
शेताआड शेत । कोन्या शेताला मी जाऊं ।
बंधवाचा माझा । हेलवा[1] देतो गहूं ॥
शेताआड शेत । ओळखूं येईना नंबर ।
सोयऱ्या बंधवा । लावा धुऱ्याला[2] ऊंबर ॥

---

१ हालतो, डुलतो, खुणावतो. २ जूं.

वाटेवरी हरभरा । आल्यागेल्याची ओटी ।
सांवळ्या बंधवाच्या । पेरीला शिगीसाठीं ।।
वाटेवरी हरभरा । आल्यागेल्याचा हुळा[1] ।
बंधव माझा । झाला दईवान भोळा ।।

भावाच्या वर्णनासाठीं अशा अनेक ओव्या रचल्या गेल्या आहेत. अशा गुणसंपन्न भावाचें वागणें पाहून बहिणीच्या मनांत त्याला दृष्ट तर होणार नाहीं ना, अशी अनेकदां शंका येते. आणि ती हरप्रयत्नानें दृष्टीचा उतार देते. कोवळ्या स्त्रीमनाचें शंकाकुल मन येथें प्रकट होतें :

शेजी विचारीती । तुला भाऊ कीती ।
नको सांगूं एकाएकी ।
एकामागें एक । येतील चौघे भाऊ ।
नको शेजी दृष्ट लावूं ।।
पावना माझा दादा । शेजी मनीती सुतार ।
देतें मीठाचा ऊतार ।।
पावना माझा दादा । शेजी मनीती रोहिल्ला ।
तूला होईन दृष्ट । वेगीं वाड्यांत वाहीला[2] ।
दृष्ट मी काढीतें । मीठ मोहऱ्या शींक्यावरी ।
राजस बंधूला । दृष्ट झाली नाक्यावरी ।
काय तरी सूकलासी । माझ्या गुलाबाच्या फूला ।
राजस बंधवा । माझी दृष्ट झाली तूला ।

भावाला दृष्ट होईल ह्या चिंतेनें व्यग्र झालेली बहीण जशी ह्या गीतांत दिसते तशीच भावाला जिवापाड जपणारी गांवांतील हेव्यादाव्याबद्दल जागरूक असलेली बहीण पण दिसते!

भावाची भाऊकी । ईल्याईतकी वांकडी ।
बंधवा माझ्या । शब्द बोलावा तांतडी ।

अशी भावाला जपणारी बहीण, आपल्या भावाच्या वर्णनांत काळ्या कळवातिणीचा पण उल्लेख करते. गांव तेथें महारवाडा ह्या म्हणीप्रमाणें समाज तेथें कळवातिणी

---

१ ओला हरभरा भाजणें, हरभऱ्याचा हुरडा. २ बाजूला.

असणारच! सारासार विचार करणाऱ्या सरळमार्गी बुद्धीला ह्यांची संगत बरी वाटत नाहीं. बहिणीनें पण भावाला 'नको ठेवूं कळवातीणी' असा इशारा दिलेला दिसेल. पण बहिणीनें केलेल्या ह्या वर्णनांत भावाच्या सौंदर्याला व मोठेपणालाच मुख्यत्वेंकरून स्थान दिलेलें आहे :

*वाटंन चालला । दादा माझा साळाभोळा ।*
*नार चंद्रावळ । घाली धोतराला पीळा ।*
*नाचनी नाचती । ताळ तोडीती भूईचा ।*
*भाऊचा माझ्या । रुमाल मागती डोईचा ।*
*नाचनी नाचती । खाले पाहून हांसती ।*
*भाऊची माझ्या । शीन कवळी दिसती ।*
*गांवा आल्या कळवातीणी । उतरल्या कोसामानी[1] ।*
*चालविलं शीदापानी । भोळ्या माझ्या बंधवांनीं ॥*
*गांवा आल्या कळवातीणी । उतरल्या ग बागांत ।*
*सीता मालन माझी । रानी जुल्हाळ[2] वाड्यांत ॥*
*रानीचं चांगुलपन । जसं मोतीयाचं पानी ।*
*सांगतें बंधवाला । नको ठेवूं कळवातीणी ॥*

अशी ही भावाच्या सुखदुःखाशीं समरस होणारी बहीण ओवीगीतांतून अपूर्व अशीच ठरली आहे. माहेरच्या सर्व नात्यागोत्यांत भावाच्या नात्याला अनन्यसाधारण स्थान मिळालेलें आहे! सर्वांत मोठा किंवा बरोबरीचा किंवा धाकटा अशा तिन्ही वयांतील आपल्या भावाच्यावरील प्रेमाचा अविष्कार भगिनींनीं इतक्या वैपुल्यानें आणि इतक्या आपुलकीनें व आत्मीयतेनें केला आहे कीं पाठोपाठ नुसत्या भावाबद्दलच्या ओव्या ऐकतांऐकतां अंतःश्चक्षूंसमोर बहीणभावाची एकरूप मूर्ति उभी रहाते. भावाला मुलगा झाल्यानंतर तर ह्या सईचा आनंद गगनांत मावत नाहीं. आपल्याला 'आत्या' म्हणणारा, हक्काचा, आतां आला ही भावना मग पुढें येते :

*नवस बोललें । माझ्या नवसाला पाव ।*
*बंधवाच्या घरीं । कडदोऱ्याचं बाळ दाव ॥*

---

१ एक कोस अंतरावर. २ सोज्वळ.

*बहीणीचं बाळ । कीती केलं लोकाचं ।*
*आत्या मनून हांक मारी । बाळ परानसख्याचं ॥*
*आळीच्या बायांनों । साखर घ्यावी ती आनीक ।*
*झाला बंधवाला मानीक ॥*
*भावाला ल्योक झाला । बंधूच्या रानीला ।*
*चीरे फोडीले न्हानीला । गवंडी लागले कामाला ।*
*बंधूला झाला ल्योक । आमां बयनीला भूषेन ।*
*साखर वाटीतें पशानं । मारवतीला नीशान ॥*
*बंधूला झाला पुत्र । आमां बयनी काय कळं ।*
*उंच माडी दीवा जळं । बापाजीचा नातू खेळं ॥*
*बंधूला झाला ल्योक । हास मनांत मायेना ।*
*जोड फिरक्याचा पाळना । तूला सूतारा येइना ॥*
*बंधूला झाला ल्योक । आमां बयनीला इच्छाव ।*
*असं त्याचं नांव ठेवा । भाचा दिल्लीचा बाच्छाव ॥*

असें हें भाच्याचें आगमन बहिणीच्या उत्साहांत भर टाकणारें आहे! लोकगीत्तांतून बहीणभावाच्या नात्यांत उदात्तता ओतली आहे त्याचप्रमाणें कांहीं छोटीमोठीं पथ्येंहि पाळलीं गेलीं आहेत. बहीण आपल्या भावाकरितां अगत्यानें ह्या व्रताचें पालन करते.

*सोमवारीं नाहूं नाहीं । मंगळवारीं वेणी !*
*पाठी बंधु सौभागिनी ॥*
*दीव्याच्या वलसावीं । नको बसूं तान्ह्याबाई ।*
*तूझा पाठींचा देसाई ॥*

भावाच्या बहिणीनें सोमवारीं न्हाऊं नाहीं, शुक्रवारीं शिवूं नाहीं, दिव्याच्या सावलींत खालीं बसूं नाहीं, असें म्हणतात. हीं सर्व पथ्यें बहीण भावाकरितां आवडीनें पाळते. एका ओवींत स्त्रीजीवनाशीं निगडित अशा तीन नात्यांचा कसा उदात्त आविष्कार झाला आहे पहा :

*आयुक्ष चिंतीतें । हातच्या कांकणाला ।*
*पाठींच्या रतनाला । पोटच्या राजसाला ॥*

सुभाषितवजा झालेल्या अशा कांहीं ओव्या अतिशय हृद्य आहेत. सई माहेरीं येऊन भावभाऊजयींच्या मेळाव्यांत मिसळून जाते पण—सईला खरी ओढ लागलेली असते

ती आपल्या आईची! भावाच्या माया किती म्हटलें तरी वेगळ्याच. लोकगीतांतून, अशा अनेक प्रतिभांतून, भावाच्या व आईच्या मायेंतून फरक दाखविला आहे. ही सईच काय म्हणते पाहा :

*भाई समींदर । आमी बयनी नर्मदा ।*
*आमी टाकूं उड्या । नका ऊचंबळूं दादा ॥*
*समींदर समींदर । मोठी नांवाची बढाई ।*
*पानी नाहीं गोड । तिथं तहान मोडावी ॥*
*समींदर सोकल्यानं । तहान नाहीं गेली ।*
*मायनाई मावलीची । गंगाची वळती केली ।*
*समींदर सोकल्यानं । जाईना माझी ताहान ॥*
*माय ग मावली । गंगा माझी आसमान ॥*
*सांवलींत सांवली । चींचबाईची गार ।*
*आंबा माझा डौलदार । भाईराजस ग माझा ॥*

अथांग सागरासारखें भावाचें मन मोठें आहे! पण....पोटांतील दुःख व्यक्त करावयाला व तृषा शांत करायला गंगेचें पाणीच पाहिजे! भावाच्या व आईच्या नात्यांतील हा फरक ह्या सईनें किती अभिजात रूपकांतून दाखविला आहे! काव्यरूपांतून आकारलेली ही कल्पना अनुभूतीच्या भट्टींतून निघालेली आहे! आई म्हणतांच डोळ्यासमोर बालपणाचें विश्व उभें रहातें. आईच्या दुधाची थोरवी, तिनें पुरविलेले विविध छंद, उपसलेले कष्ट, यांचा नुसता साक्षात्कार घडतो 'आई' म्हणतांच! आईजवळ पोटांतील व्यथा व्यक्त केल्याशिवाय सईला तरी मग कसें राहवेल?

*आपण मायलेकी । गूज बोलूं रातीं ।*
*शेजी नवल करती । तूला येवढाल्या लेकी ॥*
*मायलेकींचं ग गूज । सरेना रातीची ।*
*पूर्व्याला उगवली । चांदनी शुक्राची ॥*

असें हें मायलेकीचें गूज चाललेंय्. यांच्या गुजगोष्टी असतील 'आल्यालिंबाच्याच' पण....पण त्यांच्याच सईच्या मनांत कित्येक दिवसांच्या गांठी झाल्या आहेत. म्हणूनच सई म्हणते :

*मायेसारखी ग माया । येईना पूरुषाला ।*
*संपादत नाहीं । दूध साळीच्या भाताल ॥*

*मायेसारखी ग माया । येईना पूरषाला ।*
*झाडामंदीं वूरूक्षाला । फूल येईना शेराला ।*
*हजार माझं गोत । झाडीचा झाडपाला ।*
*माय बाईच्या माझ्या । मी त चींचच्या सांवलीला ।*
*मायेवांचून माहेर । कंथावांचूनी सासर ।*
*सांगतं सईबाई । बाळावांचूनी ग घर ॥*

अशा ह्या आईच्या मायेनें भारावलेली सई तिच्या मोठेपणाची थोरवी गाते आहे. अनेकदां तिला आपल्या आईनें आपला हट्ट कसा कसा पुरवला ह्याची आठवण होते आहे

*माऊलीची माया । सर्व्या बाळावरी ।*
*चिमणी खोपा करी । अवघड झाडावरी ॥*
*पांच रुपयांची चोळी । आठ आन्याचा ग दोरा ।*
*मायबाईनं माझ्या । छंद पूरवीला खरा ॥*
*सांगून धाडीतें । माझ्या सांगण्याचा लाड ।*
*तुझ्या घरीं फूलझाड । तशी मला चोळी धाड ॥*
*सांगून धाडीतें । राघूच्या पंखापरीं ।*
*हिरवी चोळी लाल नखीं ॥*
*हात भरला काखनानं । मागंपुढं बीलवर ।*
*छंद तुझ्या जीवावर ॥*
*मला ग वाटलं । मावलीला ग भेटावं ।*
*चंद्रसेनाला लुटावं ।*
*लांब लांब केस । सडक माझी वेणी ।*
*माय मालणीनं बाई । नीगा केली बालपणीं ॥*
*लांब लांब केस । चौरंगाहूनी भूईला ।*
*येवढा सायास मायेला । पाला गव्हाचा लावीला ॥*

सईच्या शरिराच्या आणि मनाच्या अणूरेणूंतून आईचा उपकार वहातो आहे. आईनें ठेविलेली आपल्या केसांची निगा, पुरविलेली बांगड्यांची व चोळीची हौस, ह्या सर्वांची उजळणी होते आहे. आणि ओघाओघानें शेजीचा विषय निघतो आहे. शेजारीण म्हणजे सासुरवासिणीला मायमावलीसारखीच ! पण....आईची सर थोडीच

येणार तिला! गांवोगांवीं अनेक ओहळ असतात. प्रत्येकाला आपण गंगा म्हणतों. पण भागीरथीची सर ह्या ओहोळांना येणें शक्य नाहीं. जिच्या दुधावर सईचा पिंड पोसला गेला आहे ती माता आगळीच! या संदर्भात प्रथम आईच्या दुधाचा आणि शेजीच्या वरवरच्या मायेचा उल्लेख लोकगीतांतून विशेष प्रामुख्यानें आढळतो तो असा :

*नव महीने वझं । वागवीलं मीरीआड ।*
*माझ्या मायबाईला । ओवी गातें देवा चढ ॥*
*नऊ महीने वझं । वागवीलं डाव्या कुशीं ।*
*मायबाईला माझ्या । फिरून बोलूं कशी ॥*
*नव्हती अशा केली । शेजीच्या शीदोरीची ।*
*सोडीतें गांठ । माझ्या मायेच्या पदराची ॥*
*शेजी नाहूं घाली । नाहीं भीजला ग धोंडा ।*
*मायबाई नाहूं घाली । येसी खालून गेला लोंढा ॥*
*शेजीचा सावणा । तळहातांत राहेना ।*
*माझ्या मायेच्या सावणा । भरल्या थाळ्या उचलंना ॥*
*शेजी जेऊं घाली । भरेना माझं पोट ।*
*माय जेऊं घाली । दूधासंगं साय लोटं ॥*
*शेजी जेऊं घाली । शीऱ्यावरी तूप ।*
*माझ्या जेवन्याची खूण । माझ्या आईला ठावूक ॥*

असे हे लाडक्या सईचे लाड माहेरीं पुरविले जात आहेत व त्याबरोबर तिला त्याची अपूर्वाई वाटत आहे. शेजीसंबंधींच्या ओवींत वर्णिलेली अतिशयोक्ति हृद्य आहे तर आपल्या लाडक्या मैनाला दुधाबरोबर भातावर साय लोटणारी आईची कृति स्वाभाविक पण तितकीच मुलीवरली माया दर्शविणारी आहे. आईच्या सुग्रणपणाचें पण ह्या सईनें किती वर्णन केलें आहे! विविध प्रकारचीं तोंडीलावणीं करणारी आई आणि हिमट्यासारखें येवढेंसें तेवढेंसें वाढणारी शेजीबाई! तोंडी–लावण्याला 'सावणा' हा विशिष्ट शब्द मराठवाड्यांत रूढ आहे. अशा ह्या लाडक्या मैनाचें, नेणंत्या प्राणसईचें 'माहेरपण' एक दिवस संपतें. सुखाचे दिवस चुटकीसरसे निघून जातात आणि सईला सासरचें बोलावणें येतें. बोळवणाची तयारी करण्यांत आईवडील, भाऊभावजया गुंतून जातात :

बाप करी बोळवण । माय करीते शीदोरी ।
चला बंधु तेथवरी । वाट तुम्हानं साजरी ॥
बाप करी बोळवण । माय करी नाडातोडा ।
बंधु शीनगारीतो घोडा । दावनींची गाय सोडा ।
लुगडं घेतलं । पदराला रामसीता ।
माझ्या बापाजीचा । चाटी वळखीचा व्हता ॥
बोळवन केली । मनाला नाहीं आली ।
भाईराजसानी । गाय दावणीची दीली ॥
बोळवन केली । जव मने थोडं थोडं ।
वडिल मागें धाकल्याला । दावणींची गाय सोड ॥
बोळवन केली । पदराला वेळूवन ।
बंधु तुझं भारीपन ॥
बोळवन केली । बहिणीसकट भाचीची ।
बंधवाला माझ्या जत्रा घडली काशीची ।
नांदेड गांवाच्या वाटनं । तांगा कोनाचा पळतो ।
पदर जरीचा लोळतो । भाऊ बहीण बोळवतो ॥
चोखाटसाडी[1] । आयाबाया तुमी मना ।
बंधु माझ्या सोयऱ्याचं । मला मन मोडवेना ॥

अशी ही आईच्या मैनेची बोळवण, भावाच्या बहिणीची बोळवण, रसाळ आणि तितकीच नाट्यपूर्ण वठली आहे. भावाचें मोठेंपण बहिणीनें पहा कसें सांगितलें आहे तें. भावाची थोरवी येवढ्या थाटामाटानें गायिलेली पाहिलीय का कोणी ? साडीचें न साडीच्या जरीच्या पदराचें वर्णनहि तसेंच वैशिष्ट्यपूर्ण आहे. आईवडिलांच्या व भावाच्या बोळवणीनें भारावलेली बहीण निघतांना नवी साडी नेसतां नेसतां काय विचार करते आहे पहा !

नवं ग नेसतें । जुनं ठेवीतें आडभींतीं ।
भाईराजसाचं माझ्या । भोळं राज्य लूटूं कीती ॥
नवं ग नेसतें । जुनं देतें धरमाला ।
भाईराजसाला । आयुक्ष देणाऱ्याला ॥

---

१ सुंदर

बहिणीच्या मनांत हे विचार येतात तसेंच भावाला पण वाटतें :

*बहिणीचा आसीर्वाद । भाऊ नांदतो बळी ।*
*गंगना गेल्या केळी । हात पूरना कंबळीं ॥*
*बहीणीचा आसीर्वाद । भावाला मानवला ।*
*वाडा कैलासी बांधला ॥*

अशी ही बोळवणाची अपूर्वाई आहे! एक प्रकारचें गंभीर वातावरण पसरलें आहे भोंवतीं. पुन्हां वर्षासाठींच कदाचित् भेटी होणार ह्या विचारानें प्रत्येकाचें मन उचंबळून येतें आहे. त्यामुळें भावनांना बांध घालणें अशक्यच होऊन गेलें आहे :

*लेक नांदाया चालली । गनगोताची हारन ।*
*हीच्या डोळ्यांच्या कोरानं । गंगा चालली वाहून ॥*

अशी ही सई सासरीं निघाली तिच्या मनांत डोकावून पहा. विचारांचा व भावनांचा केवढा कल्लोळ उटला आहे तिथें!

*माय आहे तंवर माहेर । बाप असा तसा भारी ।*
*बंधवाची धर्मपूरी । भाचीयाची लंका दूरी ।*
*अशी भावाची बहीन । बहिन कशानं दुबळी ।*
*एक्या धुन्याची चोळी । तिनं घातली चुंबळीं ।*
*मी मापल्या घरीं । नको करूं माझा घोर ।*
*मायबाई माझे । मला वाटतं माहेर ॥*
*मी मापल्या घरीं । नको करूं माझी चिंता ।*
*मला देलं भाग्यवंता ॥*

अशी ही सई! रस्त्यानें गाडी धांवते आहे व विचारांच्या ओघांत ह्या सईचा भावनांचा बांध कधींच फुटून वहातो आहे! स्वतःला कधीं भाग्यवंत म्हणणारी तर कधीं दुबळेपणानें हैराण होणारी सई आपल्या जीवनाशीं मात्र पक्की समरस झाली आहे.

# सासर-माहेर

## सौ. मालतीबाई दांडेकर

माहेरची माया स्त्री-मनाला कशी ओढ लावते याचें वर्णन आजवर अनेक काव्यकथांतून आलें आहे. स्त्रीमन चहूंकडे सारखेंच. त्यामुळें शिक्षित वर्गांत हें प्रकटीकरण जसें सुंदर, उपमालंकृत भाषेंत प्रकट झालेलें आहे तसें खेडूत स्त्रीच्या साध्यासुध्या शब्दांत व स्वयंस्फूर्त ओंव्यांतूनहि त्याचें आविष्करण झालेलें दृष्टीस पडतें. या ओंवी-गीतांतील रससौंदर्य वर्णनीय ठरेल एवढेंच नव्हे तर अधिकच उत्कट भावनांचें दर्शन त्यांतून घडूं शकेल. कारण खेडूत मुलींचीं लग्नें अजूनहि कुठेंकुठें बाराचौदाच्या बालसीमेवरच लागतात व माहेर फारच लवकर अंतरतें. त्यामुळें या नवोढा मुलींच्या मनांतलें माहेरचें विश्व मनोहर स्मृतिरूपानें सारखें दृक्‌सापेक्ष होऊं लागतें. या आठवणींना कोवळे शब्द फुटतात, अगदीं रोपाला अंकुर फुटावे तसे. सासरीं घरकाम असतेंच—फार असतें, हीं सारीं कामें करतांकरतां स्त्रीवृत्ति माहेराशीं तदाकार होते व नाजूक ओंव्या ओंठावर खेळूं लागतात. त्याचें विविध रूप कोणालाहि मोठें मनोज्ञ वाटेल. उदाहरणार्थ, पहांटे दळण घातलें आहे, त्या शांत एकांतांत जातें फिरूं लागतें, मनहि फिरफिरून माहेरीं जातें! सारें विश्व निद्रिस्त आहे पण आईवडिलांची आठवण जागी आहे, मनांतल्या कोमलतेला जागवीत आहे असें दिसतें. मग ओंव्यांचे चरण किती प्रीतीनें उमटतात पहा :

*पहिली माझी ओवी—धरीतरी मेघांला*
*जल्म दिलेल्या दोघांला !*

किती सुरेख उपमा! वडिलांना जीवनाधार मेघाची उपमा, तर आई सुजलाम् सुफलाम् अशा धरित्रीसारखी-आणि या सार्थसुंदर उपमा दिल्या आहेत एका साध्यासुध्या खेडुत गृहिणीनें, हें तर विशेषच कौतुकास्पद.

माहेर म्हणजेच मायघर. म्हणून सासरीं गेल्यावर आईच्या आठवणी सरसरून मनीं याव्यात यांत नवल नाहीं. मुलगी मनांत म्हणते, माझी आई कशी आहे? तर पावनगंगेसारखी! या गंगेचा उगमहि कोठें दूर नाहीं :

*तहान लागली अरण्यडोंगरांत*
*गंगा माझ्या हृदयांत माय माझी.*

साऱ्या माहेरच्या परिसरांत माउलीची आठवण प्रथम व ठळकपणें यावी यांत नवल कसलें? गाभाऱ्यांत प्रमुख देवमूर्तीच आधीं दिसते, नाहीं का? कांहीं चांगलेंसें जेवायला केलें कीं, आईची याद येते, मृदुभाव डोळ्याच्या पापणीशीं येऊन थबकतात. जसे! :

*बारीक पिठाची भाकरी चवदारू !*
*माझ्या माउलीची जेवतांना याद करूं !*

ही माउली किती गोड स्वभावाची आहे :

*माय म्हणुं माय, किती सांगूं आठवणी*
*आई मोहाच्या मधावाणी !*

आईच्या मायेची सर कोणाला येणार बरं?

अर्थात् या माहेरच्या गोतांत आईवडिलांच्याच आठवणींना जागा आहे असें नव्हे! माहेरचें गांवशिव, ज्या घरीं स्वतांचें शैशव अन् बाल्य हातांत हात घालून नाचत बागडत होतें तें घर, तेथला परिसर, माहेरचें वातावरण, सगळेंच जणुं सोनेरी पावलांनीं मनांत प्रवेशतें, तेथल्या साध्याच गोष्टींतून किती काव्यात्मकता भरून राहिल्यासारखी दिसते! मुलीला माहेरच्या दर गोष्टीची अपूर्वाई वाटते हें पुढील ओळींतून स्पष्ट झालें आहे :

*काय सांगूं बाई ! माहेरची बढाई*
*माझ्या पित्यानं लावली—येशीपासून आंबराई !*

*इथून दिसतं माहेरीचं हिरवं रान*
*केवढं केळीबन ! उतरीतो बागवान ! !*

अशा या समृद्ध माहेराची आठवण केवळ नव्हे तर तिकडे जाणरी वाट सुद्धां मुलीला महत्त्वाची वाटते. हादग्याच्या गाण्यांतून देखील, "सासरच्या वाटे कुचुकुचु कांटे–माहेरच्या वाटे हारीक दाटे !" अशीं वर्णनें छोट्या मुली करीत असतात ती काय उगीच ? ही सासुरवासिनी मुलगी या वाटेचें वर्णन :

*माझ्या माहेराची वाट टाक्या लावूनी घडली*
*गाडी बुक्क्याची सांडली !*

अशा नाजुक शब्दांत करतेय्. माहेरची वाट बुक्क्याच्या शिडकाव्यानं सुगंधित सुद्धां झाली आहे बरें ! तर मग या वाटेनं तुम्ही कोणी जर माहेरीं गेलांत तर किती प्रेमळ देखावे दिसतील याचेंहि थोडें वर्णन ऐकून ठेवा :

*उंच्या ओसरीला हंड्या लावल्या सवाई*
*भावाच्या बरोबरी मायबाईचे जांवाई !*
*एकामागें एक येत्याल मागेंपुढें*
*माझे ल्हाने बंधु माझ्या माऊलीचे झेंडे !*
*सांगवा कासाराला बैस मैदानी मैदानी*
*वहिनी आम्ही लईजणी संगं बंधवाची राणी !*
*जातां माघाराला ऊंच पाऊल पडे*
*बापजी बयाबाई गंगासागर येती पुढें !*

किती थोड्या शब्दांत संपूर्ण माहेरदर्शन घडवलें आहे या पोरीनें ! असें हें माहेर ! जिथें माया गुंतून राहते, पावलें खुंटून बसतात, डोळे नितळ प्रीति पाहून शीतळ होतात अन् सासरच्या धगींत शेकलेलें मन निवतें, सौम्य होतें, त्या माहेरचीं हीं लोकगीतें किती वर्णनीय !

या माहेरच्या पार्श्वभूमीवर एका कर्त्या मराठा तरुणाचें चित्र तर विशेषच खुलून दिसत असतें, तें म्हणजे सख्ख्या भावाचें. या भावाचा आधींच स्त्रीला किती अभिमान असतो, त्यांतून तो कर्तृत्ववान्हि असावा, मग तर काय ? सोन्याला सुगंध प्राप्त व्हावा तशी अपूर्वाई. उदाहरणार्थ भावानें शेती कशी केली आहे ? तर दृष्ट लागण्याजोगी :

*पिकलं पिकलं, ऐशीं खंडी झाली तुरी*
*बंधुजींची शेरी माप लाविलं दोहेरी !*

येवढा हा मातब्बर भाऊ म्हणजे बहिणीच्या जिवाचा एक विसांवा असतो. कधीं कधीं त्याचा उसाचाहि मळा असतो आणि गुऱ्हाळ लागल्याचीं गोड गोड स्वप्नेंहि बहीण जागेपणीं रंगवीत बसते. भाऊ मळेकरी असला तरी माहेरच्या आठवणीचें थोडेंबहुत विश्व बदलतें, त्यांत पिकांचे हिरवे रंग खुलूं लागतात, मळ्यांतल्या उसाचे निळसर तुरे नजरेसमोर लहरूं लागतात जणुं! अशा वेळीं तिच्या ओठांवर ओव्या नकळत प्रकट होतात :

*वाटेवरचा ऊंस या ऊंसाचा धनी कोण ?*
*ताईता बंधुजीला, गूळ रांधाया झालं ऊन !*
*माळीयाच्या मळ्यांत जाईशेवंती जावाजावा*
*माझा भाऊराया मधीं केवडा घेतो हवा !*

असा हा भाऊ कर्तृत्वाचा, संपन्न आणि दिलदार! बहिणीचें माहेरपण अगत्यानें करायला भाऊ कधीं विसरायचा नाहीं. माहेरची पाठवणी त्यानेंच करावी. किती हौसेनें लुगडीं घेतो हा भाऊ बहिणीला :

*काळी चंद्रकळा पोत किती मऊ*
*घेणार बंधुजी व्यापारी माझा भाऊ !*

आणि एखाद्या चांगल्याशा साडीवर चित्त गुंतलें तर दुसऱ्या कोणाजवळ हट्ट धरायचा बरं ?

*बाटियाच्या दुकानीं ऊंच मोलाची लालाई*
*एक्या बंधूवांचूनी भीड कुनाला घालावी !*

असें हें भावाबहिणींचें रेशमी नातें. माहेरच्या आठवणींत त्याचा आठव हटकून व्हायचाच. पण कधीं कधीं सासुरवास फार असतो. अजून खेड्यापाड्यांतून त्याहि करुण कहाण्या कानीं येतात. या सासुरवासांत मुलगी जणुं तापल्या तव्यावर उभी असते. भाऊ मोठा योग्यतेचा माणूस खरा पण तो बहिणीला माहेरीं न्यायला आला तर त्याला नीट वागणूक मिळत नाहीं. त्यालाहि सगळीं आपलीं बोलतात ! बहिणीचें मन एवढेसें होतें, कटी उद्गार अंतर्मनांतून झरूं लागतात :

*सासरीचे बोल निवडुंगाचे कांटे*
*बंधु तुझ्यासाठीं फाटे, मन माझें !*

तथापि भाऊ विचारशील असतो, बहिणीसाठीं मुक्या मनानें हा अपमान सोसून तो तिला विसाव्याला माहेरीं नेतो. बहीणभावंडांचें हें निर्मळ प्रेम, त्याच्या ओव्या बहिणीनें जिव्हाळ्यानें गाव्या यांत नवल नाहीं. सासरच्या सगळ्या तापांत ही मायघरची सावलीच तिला सुखवीत असते. ओठीं शब्द येतात ते असे :

*शीतळ सावलीला पाखरं झालीं गोळा !*
*ताईता बंधुजी, माझा इसरांतीचा पानमळा !*

आणि हा सासुरवास ही कांहीं नवलकथा नव्हे, अजूनहि खेड्यापाड्यांतून त्याचे नमुने पाहायला मिळतात. तिथें मर्यादेचे बंध किती ! कामासाठीं घराबाहेर पडायची देखील मुष्कील ! एक सासुरवाशीण म्हणते :

*मराठी माझं गांव पान्याला कशी जाऊं*
*सोप्यां बैसले दीर भाऊ*

शिवाय घरकाम तर स्त्रीला दर कुटुंबांत असतेंच. विशेषतः खेड्यांत त्याचें प्रमाण फारच ज्यास्त. पण कांहीं घरांतून सुनेच्या श्रमांना कांहीं मोजमापच नसतें. पहांटे शुक्र उगवल्यापासून जो कामधंदा सुरू होतो तो रात्रीं अंथरूण गांठीपर्यंत चालायचा ! बिचाऱ्या नवथर गृहिणीच्या मनांत अशा वेळीं माहेर उभें राहातें. त्या रम्य बाल्याची तुलना तिच्या मनांत कांटोकांठ दाटूं लागते :

*हंसतां खेळतां माहेरीं गेले दीस*
*दळतां कांडतां सासरीं निघे कीस !*

पुष्कळदां या घरकामाला, या उमाप कष्टांना सासूच्या दुष्टाव्याचीहि काळी झालर असते ती इतकी कीं, कोंवळी सून त्या धगींत कोमेजून जाते. खाण्यापिण्याचे हाल, घरकामाचा बोजा अन् उणीदुणीं बोलणीं या सर्वांच्या माऱ्यांत जीवनानंद किंवा प्रकृतीचें स्वास्थ्य रहावें कोठून ? माहेरून कधींमधीं आई मुलीकडे भेटायला येते. मुलीचें मन सुपाएवढें होतें. ती स्वतःशीं म्हणते :

*जीवाला माझ्या जडू जीवाला कोन होती ?*
*मध्यान् रात्रीं बया येती हातीं अमृताची वाटी !*

आईची अमृतमय नजर मुलीकडे जाते, जीव चरकतो. पोरीच्या प्रकृतीची अशी राळ झालेली पाहून आई सद्गदित कंठानें सासूला विचारते :

*सासुरवासामंदीं गेली कांकनं कोपराला*
*बाया इच्यारते काय जाचिलं लेकराला ?*

आणि असा जाचकाच करण्यासारखी माझी मुलगी नाहींच. तुमच्या मुलासाठीं ही आली आहे, एवढें तरी ध्यानांत घ्यावें :

*येवढा सासुरवास नका करूंसा सासुबाई !*
*चांदी आली या सोन्यापायी !*

आणि मुलगी आईला ही 'कहाणी' थोडक्या शब्दांत सांगते :

*सासूचा सासुरवास नंदाबाईची लावणी*
*कळ लाविते येऊनी दीड दिसाची पाव्हणी !*

दोन दिवस नणंद आली, तरी ती चुगल्या करते, मग काय विचारतां? छळाला भरतीच येते! म्हणच आहे ना कीं, 'उतरंडीला नसावी केळी अन् घरांत नणंद नसावी खेळी,' त्यांतली स्थिति होते!

पण असें हें कारुण्यमय प्रकरण दरेक स्त्रीच्या जीवनकथेंत रंगलेलें असतेंच असें मात्र नव्हे. कारण कैकयीची परंपरा चालवणाऱ्या दुष्ट सासवा कांहीं थोड्या असल्या तरी सगळ्यांचेंच तें व्रत नसतें! अनेक समंजस स्त्रिया सुनेला चांगलेंहि वागवतात. पुष्कळदां ही सून म्हणजे सख्ख्या भावाचीच मुलगी असते, अन् ती लाडकीहि असते. अशा सासूचे उद्गार पहा :

*ल्योक तो आपुला, सून लोकाची कशी म्हणूं ?*
*बंधुजीची कन्या, माझ्या नागाची पदमिणू !*

आणि अशा घरांतली सूनहि प्रसन्न दिसते. उण्यादुण्या बोलण्याचा कडू काढा तिला घोटावा लागत नाहीं. दीरानणंदांचें सारें गोकुळ या राधिकेवर खूष असतें व तीहि त्यांचें वर्णन किती जिव्हाळ्यानें करते हें पहाण्याजोगें आहे. सर्वांत धाकट्या दीराबद्दलची ही प्रेमळ तक्रार पहा :

*धाकला दीर माझा सासुबाईचा खेळगडी*
*लावी वांकडं घडुघडी*

या उलट वडील दीराजवळ ही धाकटी भावजय लाडका हट्ट घेते :

*चौसोपी वाडा पुरंना सैंपाकाला*
*दीरा भाऊजी किती सांगूं ढेलज उतरा बैठकीला*

या शब्दांतून सासरघरीं किती आपुलकीचें नातें निर्माण झालेलें दिसतें! कळ लावणाऱ्या नणदेप्रमाणेंच सुस्वभावी नणंदाहि असतातच. कित्येक ठिकाणीं नणंदेबद्दलहि हें प्रेम एखाद्या फुलबागेंतून येणाऱ्या सुवासाप्रमाणें दरवळलेलें असतें हें पुढील ओळींतून दिसेल :

*आऊख मागतें चुड्या मागल्या कंगनीला*
*चांदामागल्या चांदनीला, नंद कामिनीला*

पतिराजांसाठीं चुड्यांचें प्रतीक योजलें तर पाठच्या बहिणीला त्याच तऱ्हेची कंगनी पाटलीची अनुरूप उपमा योजावी ही कल्पकता किती अपरूपशी[1] आहे एकंदरींत जेथें प्रेमाची पखरण आहे तेथें सासरहि रम्यतर होतें ह्याची साक्ष नववधूचे पुढील उद्गार देतात :

*सासू नि सासरा, माझ्या देव्हारींचे देव !*
*पडावं त्यांच्या पायां, न्हाई मनीं दुजाभाव !*

आणि या सुस्वभावी सासूसासऱ्यांचें कृषिधनहि समृद्धतेनें शोभणारें असेल तर सुनेचें जीवन धन्यतेनें बहरून जातें. उदाहरणार्थ, भल्या पहांटे ताकाचा मोठा डेरा घुमवीत कामाला लागावें लागतें, पण त्याचा काय त्रास? तें तर भाग्यच म्हणायला हवें! येवढीं गाईगुरें आहेत कोणाकडे?

*पाहांटेच्या परामंदीं माझ्या हातांत रवीदोर*
*सासुसासऱ्यांनीं पुन्याई केली थोर*

आणि सासूबाईचे दुसरेहि उपकार आहेत कीं जन्मभर न फिटण्याजोगे! त्यांनीं मला जन्माची देणगी दिली आहे ती किती मोलाची?

*सासू मालनीचा किती सांगूं उपकार*
*दिलाय मला, पीर्तीचा चंद्रहार*

पतिप्रीतीची ही नाजुक सूचना ढगाआडून डोकावणाऱ्या चंद्रबिंबाप्रमाणें मनोहर भासत नाहीं काय? सासरघरीं पतीचें व्यक्तिमत्व हा या तरुण पत्नीच्या केवढ्या अभिमानाचा विषय असतो! आणि या व्यक्तिमत्वांत प्रीतीचेहि गुलाबी रंग मिसळलेले, तेथें प्रसन्नतेला उपमा कशाची? अनुपमता हेंच तिचें रूप न वर्णन!

१ अपूर्वाईची

शेतामळ्यांतूनहि ही प्रीत फुलूं लागते ती अगदीं नवांकुरासारखीच! मग साध्या वर्णनांतूनहि तिचे मधुर उन्मेष प्रकटूं लागतात. अशा वेळीं लाजत लाजत ही पत्नी मैत्रिणीला सांगते :

*शेताच्या बांधावरी केलं शेल्याचं बुजावणं*
*काय सांगूं सई, हौशा राजसानं केली खूण*

या प्रीतिखुणांनीं मन मोहरून जाईल नाहींतर काय! आणि त्याचें रूप तरी किती अपरूप :

*सावळी सुरत, सावळ्या वानाची*
*माझा ग राजस, कंठी गाळीव सोन्याची*

वा! ह्या छोट्या गृहिणीनें तर या एकाच उपमेनें पतीचें मोल न् चोखपण, दोन्हींची प्रचीति पटवून दिली एकदम! या प्रीतीला मोठमोठ्या जाडजूड वर्णनाची वा संस्कृत उपमांची लेणीं नाहींत, शब्दालंकारांची सजावट नाहीं पण जीवननिष्ठ उपमांनीं ती चैतन्यमय झालेली दिसते. उदाहरणार्थ, पतीचा चेहरा कोमेजलेला दिसला तर पत्नी बेचैन होते. आरशांतलें प्रतिबिंब नाहीं का समदर्शी असत! तशी ही एकरूपता! साध्या शब्दांत आणि एकांतांत पत्नी पतीला विचारते :

*तुझ्या जीवासाठीं जीव माझा हाराहुरा[1]*
*कशानं सुकलास, शेतांतील राजगिऱ्या?*

किती साधे शब्द! पण ही प्रणयव्याकुळता, ही अंतरीची ओढ मात्र साधीसुधी नव्हे!

या प्रेमळ सहचराचें कर्तृत्वहि पत्नीच्या मनांत अभिमानानें ध्रुवपद घेऊन बसलेलें असतें. तिचा पति उत्कृष्ट शेतकरी आहे. त्याचें वर्णन पहा :

*शेताला जाईन, नदर माझी चहूंकडे*
*माझं राज्यघरानं शिंपीले, शेतीं सोनियाचे सडे*

किती समर्पक अन् यथातथ्य शब्दचित्र आहे हें! सक्षात् लक्ष्मीहि या शेतकरी-जीवनाला लोभावून जणुं त्याच्या आसऱ्याला येते! या 'लक्ष्मी'लाहि गृहलक्ष्मी दिलासा देऊन आवाहन करते :

---

१ कासावीस, बेचैन.

*"लक्ष्मीबाई ! काय पाहसी कावरी बावरी*
*गार आंब्याची सावली, माझ्या राजसाच्या वावरीं*

तिथेंच तूं कायमची वस्तीला ये."

आणि हें आवातनें[1] लक्ष्मीलाहि मानवतें व तिच्या समृद्ध कृपेनें सासरचा संसार साजरा दिसूं लागतो.

अशा या धन्यतेनें धन्य झालेल्या सासरघरीं लवकरच बालपावलांची चाहूल लागते. सगळ्यांचीं मनें नव्या छोट्या पाहुण्यांचें स्वागत करण्यांत, तद्रूप आणि तन्मय होऊन जातात. जिथें मुलीला भलताच सासुरवास असेल तेथेंहि अंधारांत चंद्रतारे उगवावे तसा वातावरणावर प्रसन्न प्रकाशाचा शिडकावा होतो व सासरचीं कुलदैवतें चिमण्यारूपांनीं घरांत अवतीर्ण होतात! सासूचेंहि मन मवाळतें. ती नातवाला कडेवर घेऊन शेजारणींना म्हणते :

*शेरभर सोनं, काय पाहतांसा सोनियाला*
*बघा कडीच्या तान्हियाला*

आणि ही नात तर अशी रूपसुंदर आहे कीं काय सांगूं!

*आगाशीचा चांद थांबला दारापाशीं*
*तान्हुली माझी, चांदनी बघायासी*

आणि या नव्या स्थित्यंतरानें सासरीं स्नेहवेल पालवते, वत्सलरसाचे झरे वाहूं लागतात! सासुरवास असलाच तर तो हद्दपार होतो. स्वतः या गृहिणीचेंहि मातृत्व जागृत होतें, पतिप्रीतीचें नवें विकसित आणि अधिक मोहक रूप अपत्यस्नेहांत ती पाहूं लागते. आपल्या घरच्या हर्षित वातावरणांत पूर्ण रमलेलें कारभारणीचें हें नवें व्यक्तिमत्व तिच्या पतीच्याहि फार पसंतीस येतें. मनांत आनंदाच्या लाटा उठतात. आतां माहेरच्या आठवणीनें ही पत्नी उसासे टाकत नाहीं. उलट पतीनें माहेरची आठवण करून देऊन कांहीं विचारलें तरी ती उत्तर देते :

"आतां मी सुखांत आहे धनी!"
*देवाजीचं देनं, पुन्य सासऱ्याचं*
*कडीला बाळ तानं हातीं दावं वासराचं !"*

आणि या उद्गारांची सत्यता तिच्या घरचें नांदतें गोकुळ पटवून देऊं शकेल असें असतें!

---

१ निमंत्रण.

असें हें माहेर अन् असें हें सासर-जणुं सुखदुःखाचीच मिळवण, एका झऱ्याचेच दोन प्रवाह, पण त्यांनीं स्त्रीजीवन सार्थ होतें, संपन्न आणि सफल होतें. अनेक तऱ्हेचीं नातीं निर्माण होतात, त्यांची जोगवण करतांकरतां स्त्रीच्या आयुष्याची वाटचाल वेगानें व हर्षानें झरूं लागते. या संदर्भांत एका स्त्रीनें फारच समर्पक उपमा योजिली आहे या जोड-नात्याला. ती म्हणते :

*सरलं दळायाचं, सरलं म्हणूं कशी*
*सासर माहार भरल्या दोन्ही राशी*

अगदीं खरें! सासरमाहेरचें समानत्व आणखी त्यांची स्वतःच्या जीवानाशीं असणारी जवळीक व परंपरा याहून आणखी कोठल्या सुरेख शब्दांत व्यक्त होऊं शकेल?

 

# अस्सं सासर द्वाड बाई

## डॉ. विमल चोरघडे

मुलीच्या जन्माला आल्यानंतर विवाह केल्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं; तसेंच, मातृत्व प्राप्त झाल्याखेरीज या स्त्रीजन्माची पूर्तता होत नाही अशी सामाजिक धारणा आहे! या सासर-माहेराचें वर्णन मुलगी आणि सून अशा दोन भूमिका करीत असलेल्या एकाच स्त्रीच्या मुखांतून बाहेर पडलेलें, लोकगीतांत गुंफलेलें, दिसतें. माहेरचें सुख भोगल्यानंतर सासरीं जाऊन कष्ट उपसावयाचे. सासुरवास सहन करावयाचा हेंहि ओघानें मग आलेंच. ह्या सासुरवासाच्या दिव्यांतून पार पडल्याशिवाय गत्यंतर नाहीं. सासरच्या सासुरवासाची ओळख सुरवातीपासून असावी म्हणूनच कीं काय लहान मुलींच्या गीतांत सासुरवासाचें वर्णन भरपूर केलेलें दिसतें. नागपूरकडे लहान मुलींच्या भराडीगौरीच्या गाण्यांत सासरीं होणाऱ्या नणंदाजावांच्या भांडणाचें ओझरतें दर्शन होतें. त्यांपैकीं एक गाणें पुढीलप्रमाणें आहे :

*भिंतीवरचा नागोबा*
*पडला माझ्या पायावर*
*तुटले माझे वाकीजोड*
*घडव घडव सोनारा*

*किती करूं वेरझारा*
*माणिक मोत्याचा डोल्हारा*[1]
*डोल्हाऱ्याला खिडक्या*
*आम्ही पोरी लाडक्या*
*दारीं कुत्रे भुंकती*
*नणंदा जावा झगडती*
*सासासूना भांडती*

भुलाबाईच्या पुढील गाण्यांत नणंदा आणि जावा या नवीन सुनेचा हेवा-दावा करतात याचीहि कल्पना दिलेली आहे. इथें भुलाबाईला सासरीं जातांना न्हाऊं घालून, साजशृंगार करून, उत्तम भोजन देऊन, जांभळ्या रंगाच्या उडत्या घोड्यावर बसवून पाठविलें आहे. तिचें सासरचें वैभव डोळ्यांत भरण्यासारखें आहे. सोन्याचें कारलें झेलत न् शृंगारलेला बैल डुलतडुलत तिला सामोरा येत आहे. एवढ्या ऐश्वर्यानें मिरवत भुलाबाई सासरीं चालली आहे. तथापि तिची माहेराची ओढ कमी झालेली नाहीं. पाऊलवाटेच्या दिशेनें आपली नजर मागें दूरवर नेऊन ती नागपूर गांवीं असलेल्या माहेरापर्यंत पोहोंचविण्याचा प्रयत्न करीत आहे. दूरवर जाणाऱ्या माहेराला दृष्टीच्या टप्प्यांत आणून त्याचें अंधुक चित्र स्मृतिपटलावर दृढ करण्याचा प्रयत्न व माहेराचें आकर्षण अगदीं नैसर्गिक रीतीनें सुचवितो.

*आपे दूध तापे त्यावर पिवळी साय*
*लेकी भुलाबाई तोंडे लेवून जाय*
*कशी लेवूं दादा घरीं नणंदा जावा*
*करतील माझा हेवा हेवा परोपरी*
*नणंदा घरोघरीं*
*नणंदांचा बैल डुलत येईल*
*सोन्याचें कारलें झेलत येईल*
*एका टिपरीवर उभें राहूं*
*अस्मानीचा गड पाहूं*
*गडावर गड माहुर गड*
*तिथचा सोनार कारागीर*

---

१ एक प्रकारचा दागिना.

त्यांनीं आणला साखळ्यांचा जोड
घेतां घेतां लाजली
तळ्यांत घागर बुडाली
तळ्या तळ्या ठाकूरा
भुलाबाई जाते सासूरा
जाते तशी जाऊंद्या
तांब्याभर पाण्यानें न्हावूंद्या
बोटभर मेण लावूंद्या
बोटभर कुंकूं लावूंद्या
जांभळें लुगडें नेसूंद्या
जांभळी चोळी घालूंद्या
मूठभर भात खावूंद्या
जांभळ्या घोड्यावर बसूंद्या
जांभळ्या घोड्याचे उडते पाय
आऊल पाऊल नागपूर गांव
नागपूर गांवचे ठासे ठुसे
दुरून भुलाबाईचें माहेर दिसे

सासरीं गेल्यावर माहेरचें नांव काढायला नको अशी सुनेची अवस्था होते. लहान वय, परक्याघरीं वास न् त्यांत सासूरवास! शिवाय शारीरिक कष्ट न् मायेची पाखर तर दूरच. तेव्हां आईवडिलांची आठवण ही होणारच. आईकडे जावेसें वाटणारच पण माहेरीं पाठविण्यास सासरची मंडळी नाखूष. या सर्व प्रसंगांचें वर्णन भराडीगौरींच्या गाण्यांत सहजतेनें केलेलें आहे. बिचारी बालवयी सूनबाई. माहेरचें मूळ आलें म्हणून आनंदली. पण वडील माणसांची परवानगी असल्याशिवाय जायचें कसें! म्हणून ती सासूबाईंना जाऊं का म्हणून विचारते तर "कारलीचें बी पेर बागेंत, मग जा." असें उत्तर सासूबाई देतात. बी पेरल्यानंतर "कोंब फुटूं दे" "वेल वाढूं दे," "वेलाला कारलीं लागूं दे" "कारल्याची भाजी कर, मग जा बापडी" अशीं निरनिराळीं कामें सुनेला करायला सांगून तिचें माहेरीं जाणें लांबवितात. कारल्याची बी पेरल्यापासून भाजी करण्यापर्यंत ३-४ महिने सुनेचें सासरीं राहण्याचें कांहीं ना कांहीं निमित्त काढून जमवितात. मात्र हें सर्व झाल्यानंतर त्यांना दुसरें कारण सांपडत नाहीं तेव्हां "मला काय विचारतेस? बरीच आहेस कीं! मी कोण तुला परवानगी देणार?

आपल्या सासऱ्याला विचार" असें तिला ठणकावून सांगितलें जातें. बिचारी सूनबाई! मामंजींकडे मग जाते. मामंजी जाऊबाईकडे तिला पाठवतात. जाऊबाई वन्संकडे तिची रवानगी करतात. वन्संबाई पतीकडे बोट दाखवितात. नवरा हा शेवटचा आधार. सूनबाई पतीकडे जातात. पण हाय! नवरादेखील माहेरीं जाऊं द्यायला तयार नाहीं! तो रागानें काठी घेऊन "माहेरच्या गोष्टी विसरा" म्हणून तिच्या पाठीवर तिचा प्रसाद देतात!!

*"कारलीचें बीं पेर ग सूनबाई मग जा अपुल्या माहेरा"*
*"कारलीचें बीं पेरलें सासूबाई आतां तरी धाडा ना माहेरा"*
*"कारलीला कोंब फुटूं दे ग सुनबाई मग जा अपुल्या माहेरा"*
*"कारलीला कोंब फुटले हो सासूबाई आतां तरी धाडा ना माहेरा"*
*"कारलीचा वेल होऊं दे ग सूनबाई मग जा अपुल्या माहेरा"*
*"कारलीचा वेल झाला हो सासूबाई आतां तरी धाडा ना माहेरा"*
*"कारलीला कारलें लागूं दे ग सूनबाई मग जा अपुल्या माहेरा"*
*"कारलीला कारलें लागलें हो सासूबाई आतां तरी धाडा ना माहेरा"*
*"कारल्याची भाजी कर ग सूनबाई मग जा अपुल्या माहेरा"*
*"कारल्याची भाजी केली हो सासूबाई आतां तरी धाडा ना माहेरा"*
*"गुणाची गुंती मज काय पुसते पूस जा आपल्या सासऱ्याला"*
*"मामंजी मामंजी मला मूळ आलें माझे भाई आले,*
*आतां तरी धाडा ना माहेरा"*

*"गुणाची गुंती मज काय पुसते पूस जा अपुल्या जावेला*
*"जाऊबाई जाऊबाई मला मूळ आलें माझे भाई आले,*
*आतां तरी धाडा ना माहेरा"*

*"गुणाची गुंती मज काय पुसते पुस जा आपल्या नणंदेला"*
*सोन्याची सुपली मोत्यानं गुंफली खेळाया गुंतली वन्सबाई"*
*"वन्सं वन्सं मला मूळ आलें माझे भाई आले,*
*आतां तरी धाडा ना माहेरा"*

*"गुणाची गुंती मज काय पुसते पूस जा अपुल्या पतीला"*
*"सोन्याचा पाळणा मोत्याची दांडी तेथे माझे पति बसले होते*
*"अहो पतिराया मला मूळ आलें आतां तरी धाडा ना माहेरा"*
*उठले पति घेतली काठी लावली पाठीं*
*"विसर ग आतां माहेरच्या गोष्टी—"*

लहान मुलींच्या भुलाबाईच्या गाण्यांत देखील असेंच वातावरण आहे. सासू-सासरा, दीर, जाऊबाई आणि नणंद हीं सर्व सुनेला माहेरीं जाण्यासाठीं परवानगी देण्याची जबाबदारी पत्करीत नाहींत. शेवटीं पतिराज देखील त्यांच्यांतच सामील होतात.

या गीतांतील सासरचें वातावरण टळकपणें नजरेंत भरतें. श्रीमंती ओसंडून चालली आहे. सासूबाई चांदीच्या पोळपाटावर सोन्याच्या लाटण्यानें पोळ्या लाटतात. सासरे चांदीच्या घंगाळांतील पाणी सोन्याच्या तांब्यानें अंगावर घेतात. भाऊजी (नवऱ्याचे धाकटे भाऊ) चांदीच्या दांडूनें सोन्याची विटी उंच फेकतात. जाऊबाई (नवऱ्याच्या लहान भावाची बायको) चांदीच्या डेऱ्यांत सोन्याच्या रवीनें ताक घुसळतात. नणंद चांदीची चूल आणि सोन्याची बोळकीं घेऊन खेळ खेळते! पतिराज चांदीनं मढविलेल्या पलंगावर विश्रांति घेत आहेत! एवढें धनवान सासर पण बिचाऱ्या सुनेचा सासुरवास कांहीं चुकत नाहीं.

*चांदीचा पोळपाट सोन्याचें लाटणें*
*तिथें आमच्या सासूबाई पोळ्या करीत होत्या*
*"सासूबाई, सासूबाई, मला मूळ आलें"*
*"मला काय पुसते? बरीच दिसते?*
*पूस जा अपुल्या सासऱ्याला"*
*चांदीचें घंगाळ सोन्याचा तांब्या*
*तिथें आमचे मामंजी, आंघोळ करीत होते*
*"—मामंजी, मामंजी, मला मूळ आलें"*
*"मला काय पुसते? बरीच दिसते?*
*पूस जा अपुल्या दीराला"*
*चांदीचा दांडू सोन्याची विटी*
*तेथे आमचे भाऊजी खेळत होते*
*"भाऊजी, भाऊजी मला मूळ आलें"*
*"मला काय पुसते? बरीच दिसते?*
*पूस जा अपुल्या जावेला"*
*चांदीचा डेरा सोन्याची रवी*
*तिथें आमच्या जाऊबाई ताक करीत होत्या*
*"जाऊबाई जाऊबाई मला मूळ आलें"*

*"मला काय पुसते ? बरीच दिसते ?*
*पूस जा अपल्या नणंदेला"*
*चांदीची चूल सोन्याचा खेळ*
*तिथें आमच्या वन्सं खेळत होत्या*
*"वन्सं वन्सं मला मूळ आलें"*
*"मला काय पुसते ? बरीच दिसते ?*
*पूस जा अपुल्या नवऱ्याला"*
*चांदीचा पलंग जाळीची मच्छरदाणी*
*तिथें आमचे पति निजले होते*
*"पतिराज पतिराज मला मूळ आलें"*
*उठले पति घेतली काठी*
*"विसर ग सुने, माहेरच्या गोष्टी"*

सुनेचें पोरवय. सासरीं ऐश्वर्य आहे. पण माहेरीं जायला मिळत नाहीं. मग करायचें काय तें धन? सुनेला संताप येणें साहजिकच आहे. रुसून ती कोपऱ्यांत बसते. मग मात्र सासरचीं सर्व जणं तिची समजूत काढायला येतात. सासू अर्धें राज्य द्यायला म्हणजे घराचा कारभार सोंपवायला तयार होते. सासरा साखळ्यांचे जोड देण्याचें कबूल करतो. दीर आपला विटी दांडू द्यायचें म्हणतो. जाऊ खाऊ देते. पण ती कांहीं उठायला राजी नाहीं. शेवटीं येतात पतिराज. मंगळसूत्राची देणगी देतात. मग मात्र सूनबाई खूष होतात आणि माहेरीं जातात.

या गीतांत सासरचें खेळकर वातावरण दृष्टीस पडतें. या गाण्यांत पाठभेद आहेत. सासरचीं माणसें पुढीलप्रमाणें वस्तु देतात :

*सासू – किल्ल्यांचा झोक* (म्हणजे घराचा ताबा)
*सासरा – कुड्यांचा जोड*
*दीर – आंगठ्यांचा जोड*
*नणंद – बांगड्यांचा जोड*
*पति – ताकाचा डेरा*

अलंकारांचें विशेष आकर्षण असलेल्या स्त्रीच्या स्वभावाला धरूनच हें वर्णन आहे. भराडीगौरीचें गाणें या संदर्भांत असें आहे :

*सासुरवाशी सुन रुसोनी बसली कैसी*
*यादवराया राणी रुसोनी बसली कैसी*

सासू गेली समजावयाला
"चला चला सूनबाई अपुल्या घराला
अर्धे राज्य देतें तुम्हाला"
"अर्धें राज्य नको मला
मी नाहीं यायची तुमच्या घराला"। सासुरवाशी—

सासरा गेला समजावयाला
"चला चला सूनबाई अपुल्या घराला
साखळ्यांचा जोड देतों तुम्हाला"
"साखळ्यांचा जोड नको मला
मी नाहीं यायची तुमच्या घराला"। सासुरवाशी—

दीर गेला समजावयाला
"चला चला वहिनी अपुल्या घराला
विटीदांडू देतों तुम्हाला—"
"विटीदांडू नको मला
मी नाहीं यायची तुमच्या घराला"। सासुरवाशी—

जाऊ गेली समजावयाला
"चला चला बाई अपुल्या घराला
खाऊ आणून देतें तुम्हाला"
"खाऊ कांहीं नको मला
मी नाहीं यायची तुमच्या घराला"। सासुरवाशी—

नवरा गेला समजावयाला
"चला चला राणीसाहेब अपुल्या घराला
मंगळसूत्र देतों तुम्हांला"
"मंगळसूत्र पाहिजे मला
मी येतें तुमच्या घराला"
यादवराया राणी घरासी आली कैसी
सासुरवाशी सून घरासी आली कैसी

भुलाबाईच्या या गाण्यांत सासुरवाशिणीच्या रुसण्याचें कारण पुढीलप्रमाणें दिलें आहे :

*नणंदा भावजया खेळत होत्या*
*खेळतां खेळतां भांडण झालें*
*डाव आला भावजईवर*
*रुसून बसली गाईच्या गोठ्यांत*
*यादवराया राणी रूसोनी बसली कैसी*

या रुसलेल्या सूनबाईला मंडळी पुढीलप्रमाणें वस्त्र देण्याचें कबूल करतात. पति मात्र लाल चाबुक देतात. सूनबाई माराचे भीतीनें घाबरत घाबरत घरीं जातात. शेवटीं येतात पतिराज.

*पति गेले समजावयाला*
*"चला चला राणीसाहेब आपल्या घराला*
*लाल चाबूक देतों तुम्हाला"*
*उठली ग उठली सरसावून*
*पदर घेतला आवरून*
*कापत कापत घरासी आली*
*सासुरवासी सून घरासी आली कैसी*

माहेरीं न धाडणारें हें सासर सुनेला आवडत नाहीं. सासरच्या मंडळींना तीं नांवें ठेवते. "नदीच्या अलीकडे" या गीतांत एका सईच्या मधल्या बोटाला विंचू चावतो. तेव्हां वैद्य आणण्याविषयीं ठरतें. एक वैद्य सासरहून आणि दुसरा माहेराहून. या दोन्ही वैद्यांचें वर्णन ऐकून सासरच्या सर्वच गोष्टी मुलींना कशा नकोशा होतात त्याची कल्पना कशी आहे पहावी :

*नदीच्या अलिकडे राळा पेरला बाई राळा पेरला*
*एके दिवशीं काऊ आला बाई काऊ आला*
*एकच कणीस तोडून नेलं बाई तोडून नेलं*
*सईच्या आंगणांत टाकून दिलं बाई टाकून दिलं*
*सईनं उचलून घरांत नेलं बाई घरांत नेलं*
*कांडून कुटून राळा केला बाई राळा केला*
*राळा घेऊन विकायला गेली बाई विकायला गेली*
*पांच (त्याच) पैशाची घागर आणली बाई घागर आणली।*
*घागर घेऊन पाण्याला गेली बाई पाण्याला गेली*

*मधल्या बोटाला विंचू चावला बाई विंचू चावला*
*आला माझ्या सासरचा वैद्य*
*डोक्याला टोपी फाटकी तुटकी*
*कपाळाला टिकला शेणाचा*
*तोंडांत विडा काळाही काळा*
*कपाळाला गंध शेणाचें*
*अगांत सदरा चिंध्या बुंध्या*
*नेसायला धोतर फाटकें तुटकें*
*पायांत जोडा लचका[1] बुचका*
*हातांत काठी जळकें लांकूड*
*कसा ग दिसतो भिकाऱ्यावाणी बाई भिकाऱ्यावाणी ॥*
*आला माझ्या माहेरचा वैद्य*
*डोक्याला टोपी जरतारी*
*कपाळाला टिकला केशरी*
*तोंडांत विडा लालही लाल (कस्तुरीचा)*
*अंगात सदरा रेशमी (मलमली)*
*नेसायला धोतर जरीकांठी (रेशीमकांठी)*
*पायांत जोडा पुणेशाही*
*हातांत काठी पंचरंगी*
*कपाळाला गंध केशरी*
*कसा ग दिसतो राजावाणी बाई राजावाणी ॥*

माहेरचें हें आकर्षण पुढील गीतांत अधिक स्पष्टपणें व्यक्त झालें आहे. सुंदर चिक्कणमातीची जमीन आहे. या मातीच्या जमिनींत खळगा खणायला हवा. हा खळगा किती सुंदर? त्यांत जातें रोवायला हवें. हें जातें सुद्धां सुंदर आहे. तेव्हां त्यावर सपीट काढावें. वा! सपीट तरी किती पांढरें शुभ्र? त्याच्या करंज्या कराव्या. या करंज्याहि सुबक झाल्या आहेत. त्या तबकांत ठेवूं या. हें तबक तरी किती कलाकुसरीचें आहे? त्यावर रुमाल झांकूं या. हा रुमाल देखील झक आहे. हें रुमाल झांकलेलें तबक पालखींत ठेवूं या. आणि पालखी तरी किती छान? तिची वाजंत्री लावून मिरवणूक काढायला हवी. मग ती मिरवणूक कुठें न्यावी बरें?

---

१ फाटका-तुटका

माहेरींच न्याची. कां ? माहेरीं भरपूर खेळायला मिळतें म्हणून. नको तें सासर. तिथें कोंडून मार देतात. असें द्वाड आहे तें.

अक्कमाती चिक्कणमाती खळगा तो खणावा
असा खळगा सुरेख बाई जातं तें रोवावं
असं जातं सुरेख बाई सपीट दळावं
असं सपीट सुरेख बाई करंज्या कराव्या
अशा करंज्या सुरेख बाई तबकीं ठेवाव्या
असें तबक सुरेख बाई रुमाल झांकावा
असा रुमाल सुरेख बाई पालखींत ठेवावा
अशी पालखी सुरेख बाई वाजंत्री लावावी
अशी वाजंत्री सुरेख बाई मिरवण[1] काढावी
अशी मिरवण सुरेख बाई माहेरां धाडावी
असं माहेर सुरेख बाई खेळाया मिळतं
असं सासर द्वाड बाई कोंडुनी मारीतं

पण कालांतरानें हें वातावरण बदललेलें दिसतें. मुलीला डोहाळे लागतात. आपल्या घरांत येणाऱ्या बाळराजाची माता म्हणून या सुनेचें महत्त्व वाढतें. तिला होणारा पुत्र सुदृढ, सुंदर, बुद्धिमान व्हावा म्हणून तिच्या सर्व इच्छा पूर्ण करण्यासाठीं सासरच्या आणि माहेरच्या मंडळींमध्यें जणुं काय अहमहमिका सुरू होते. पहिलें बाळंतपण माहेरीं करावयाचें या सामाजिक रूढीचा उल्लेख या गीतांत आहे. बाळंतपणाची जबाबदारी माहेरची कर्तीसवरती स्त्री म्हणून तिच्या आईवर असते. म्हणून आईला "खोली सारवून तयार ठेव—" असें मुलगी सांगते. नागपूरकडे नवऱ्याच्या धाकट्या भावास दीर म्हणतात. तसेंच, थोरल्या जावेस 'बाई' आणि धाकट्या जावेस जाऊबाई म्हणून संबोधण्याची रीत आहे. ती या गाण्यांत दिसते.

जो जो रे जो जो नंदन हरी
हरीचा पाळणा यशोदे घरीं
पहिले मासीं सासू कीं पूसे
"सूनबाई, सूनबाई डोहाळे कैसे ?"

---

१ मिरवणूक.

"माझे की डोहाळे पुरवावे सासू
बाजारीं जाऊनी आणावा काजू" ॥ जो जो रे
दुसरे मासीं सासरा कीं पूसे
"सूनबाई सूनबाई डोहाळे कैसे ?"
"माझे की डोहाळे पुरवावे सासऱ्या
बाजारीं जाऊनी आणावा सारव्या" ॥
तिसरे मासीं दीर की पूसे
"वहिनी वहिनी हो डोहाळे कैसे ?"
"माझे की डोहाळे पुरवावे दीरा
दुकानीं जाऊनी आणावा हिरा" ॥
चवथे मासीं जाऊ की पुसे
"बाई बाई हो डोहाळे कैसे" ?
"माझे की डोहाळे पुरवावे जाऊ
बाजारीं जाऊनी आणावा खाऊ" ॥
पांचवे मासीं नणंद की पुसे
"वहिनी वहिनी हो डोहाळे कैसे ?"
"माझे की डोहाळे पुरवावे वन्सं
वाडींत जाऊनी आणावीं कणसं" ॥
सहावें मासीं बहीण की पुसे
"ताई ताई ग डोहाळे कैसे ?"
"माझे की डोहाळे पुरवावे बहिणी
बागेंत जाऊनी घालावी वेणी"
सातवे मासीं भाऊ की पूसे
"ताई ताई ग डोहाळे कैसे !"
"माझे की डोहाळे पुरवावे भावा
बाजारीं जाऊनी आणावा खवा" ॥
आठवे मासीं बाप कीं पुसे
"लेकी लेकी ग डोहाळे कैसे ?"
"माझे कीं डोहाळे पुरवावे बापा
सरी बिंदलें घडवायला टाका" ॥

*नववे मासीं माय की पुसे*
*"लेकी लेकी ग डोहाळे कैसे !"*
*"माझे की डोहाळे पुरवावे माय*
*खोली सारवून तयार ठेव" ॥*

मध्यमवर्गीयांच्या गीतांवरून श्रमिक वर्गांतील मुलींच्या सासर-माहेरविषयक गीतांवर दृष्टि टाकल्यास या गीतांत श्रमविभागाचें तत्त्व अधिक स्पष्टपणें गुंतलेलें दिसतें. कुटुंबांतील सर्वांत वडील मुलाचा किंवा मुलीचा वाढदिवस कोजागिरीच्या दिवशीं साजरा करण्याची प्रथा नागपूर विभागांत आहे. या दिवशीं शंकरपार्वतीच्या मूर्ति पाटावर ठेवून त्यांची पूजा करतात. मातीच्या ठोकळेवजा समया करून त्या पाटाभोंवतीं ठेवतात. चांदण्यारात्रीं हें सर्व अंगणांत आणून ठेवून मुली गाणीं म्हणतात. मातीच्या दिव्यांना माडी म्हणतात. म्हणून या वेळीं म्हणावयाचीं तीं माडीचीं गाणीं होत. चंद्राच्या प्रकाशांत वातींचा मंद प्रकाश फार आकर्षक दिसतो. या माडीच्या एका गाण्यांत पिता आपल्या मुलीला विचारतो, "मी तुझा विवाह कोणाबरोबर करून देऊं?" बाभळीच्या झाडाच्या कोवळ्या फांद्या हलत आहेत. त्यावर झगडा नांवाचा पक्षी डुलत आहे. अशा रम्य वातावरणांत पिता आपल्या कन्येला हा गोड प्रश्न विचारीत आहे.

या मुलीची कुठल्याहि पतीबरोबर साथ देण्याची तयारी आहे. "मला खात्याच्या घरीं दिलें तरी चालेल." इथें खाती म्हणजे लोखंडी काम करणारा.

"हो. पण खात्याच्या घरीं काय काम असतें हें तुला माहीत आहे काय?" वडील विचारतात.

"माहीत आहे. खात्याच्या तेरणीवर घण ठोकण्याची मला लाज वाटायची नाहीं." त्याला उत्तर मिळतें. याप्रमाणें पिता निरनिराळ्या व्यवसायांचीं नांवें घेतो. पण मुलीचा कोणतेंहि काम करण्याचा निर्धार कायम आहे. लांकूडकाम करणारा नवरा पाहून दिला तरी चालेल. मला झिलप्या भरण्याची लाज वाटणार नाहीं. ब्राह्मणाच्या घरीं दिलें तरी वाईट नाहीं. मी भांडीं घासण्यास संकोच करणार नाहीं. सोनाराच्या घरीं भाता फुंकण्यांत कसला आला आहे कमीपणा! ढिवराच्या[1] घरीं मासळी पकडणें, गोवाऱ्यांच्या स्त्रियांप्रमाणें मोठ्या नांवाचा अलंकार घालणें किंवा कुणब्याच्या घरीं शेणपाणी करणें हीं त्या त्या लोकांचीं नित्याचीं,

---

१ कोळी, भोई

जीवनोपयोगी कामें आहेत. तीं मी अवश्य करीन असें मुलगी आपल्या पित्यास सांगते. सासरच्या घरच्या व्यवसायाबद्दल आदर, आस्था व प्रेम दाखविणें हें प्रत्येक विवाहित स्त्रीचें कर्तव्य आहे हें या गीतामध्यें नमूद केलें आहे.

*कोंवळी बाभूळ लवते बाई*
*त्याच्यावर झगडा झुलतो बाई*
*तो काय झगडा नानापरी*
*"तुला का देऊं कोणा घरीं ?"*
*"मला का दे जो खात्याघरीं"*
*"खात्याघरचें काय काय काज ?"*
*"घण कां मारतां पडली लाज ?"*
*कोंवळी बाभूळ लवते बाई*
*त्याच्यावर झगडा झुलतो बाई*
*त्याची माय कनगई[1] नानापरी*
*"तुला का देऊं कोण्या घरीं ?"*
*"मला कां दे जो वाढ्याघरीं"*
*"वाढ्याघरचें काय काय काज ?"*
*"झिलप्या कां भरतां पडली लाज ?"*
*कोंवळी बाभुळ लवते बाई*
*त्याच्यावर झगडा झुलतो बाई*
*तो काय झगडा नानापरी*
*"तुला का देऊं कोणाघरीं ?"*
*"मला का दे जो ब्राह्मणाघरीं"*
*"ब्राह्मणा घरीं काय काय काज ?"*
*"भांडे कां उटतां पडली लाज ?"*
*कोंवळी बाभुळ लवते बाई*
*त्याच्यावर झगडा झुलतो बाई*
*त्याची माय कनगई नानापरी*
*"तुला का देऊं कोणा घरीं ?"*

---

१ कजाग, भांडकुदळ.

"मला का दे जो सोनाराघरीं"
"सोनाराघरचें काय काय काज?"
"भाता कां फुंकतां पडली लाज?"
कोंवळी बाभुळ लवते बाई
त्याच्यावर झगड झुलतो बाई
तो काय झगडा नानापरी
"तुला का देऊं कोणा घरीं?"
"मला का दे जो ढिवराघरीं"
"ढिवराघरचें काय काय काज?"
"मच्छी पकडतां कां पडली लाज?"
कोंवळी बाभुळ लवते बाई
त्याच्यावर झगडा झुलतो बाई
त्याची माय कनगई नानापरी
"तुला का देऊं कोणा घरीं?"
"मला का दे जो गोवाऱ्याघरीं"
"गोवाऱ्याघरचें काय काय काज?"
"माठया कां घालतां पडली लाज?"
कोंवळी बाभुळ लवते बाई
त्याच्यावर झगडा झुलतो बाई
त्याची माय कनगई नानापरी
तुला कां देऊं कोण्या घरीं?"
"मला कां दे जो कुणब्याघरीं"
"कुणब्याघरचें काय काय काज?"
"शेण कां फेकतां पडली लाज?"

माडीच्या दुसऱ्या एका गाण्यांत मुलीला माहेराहून सासरीं नेण्यासाठी तिच्या घरांतील माणसें येतात. सासरा मेट म्हणून चुनडी[1] आणतो. दीर शिलारी[2] देतो. भासरा (नवऱ्याचा थोरला बंधु) पैठणी आणतो. पण तरी देखील मुलगी सासरीं जायला तयार होत नाहीं! शेवटीं, पतिराज येतात. ते लुगडें आणतात.

---

१ चिरडी, लहान मुलीचें लुगडें. २ एक प्रकारचें लुगडें.

सारें पारडें एकदम बदलतें. लुगडें नेसून ती सासरीं जाण्यासाठीं चटकन् निघते. आपल्या प्रिय माणसाची गाडी. ती चंदनाची आहे, तिला नंदनवनांतील बैल जुंपलेले आहेत. गाडी हांकण्यासाठीं ब्राह्मण बसला आहे असें मुक्तकंठानें तिनें गाडीचें वर्णन केलें आहे.

*आंगणीं तोंडल्याचें झाड रायबाईजी*
*त्याला सूप सूप पान*
*"तुला न्यायला आले कोण?"*
*"आला राईचा सासरा*
*त्यानें आणलें काय काय?"*
*"त्यानें आणली चुनडी"*
*"त्याची चुनडी नेसत नाहीं*
*त्याच्या गाडींत बसत नाहीं*
*त्याच्यासंगें जात नाहीं*
*त्याची गाडी मय गाडी*
*त्याचे बैल चंदन*
*बसे धुरेवर बाह्मण" ॥*
*आंगणीं तोंडल्याचें झाड रायबाईजी*
*त्याचें सूप सूप पान*
*"तुला न्यायला आला कोण?"*
*"आला राईचा दीर"*
*"त्यानें आणलें काय काय?"*
*"त्यानें आणली शिलारी"*
*"त्याची शिलारी नेसत नाहीं*
*त्याच्या गाडींत बसत नाहीं*
*त्याच्या संगें जात नाहीं*
*त्याची गाडी मयगाडी*
*बसे धुरेवर कैकाडी" ॥*
*आंगणीं तोंडल्याचें झाड रायबाईजी*
*त्याला सूप सूप पान*
*"तुला न्यायला आला कोण?"*

"आला राईचा भासरा"
"त्यानें आणलें काय काय?"
"त्यानें आणली पैठणी"
"त्याची पैठणी नेसत नाहीं
त्याच्यासंगें जात नाहीं
त्याची गाडी मयगाडी
बसे धुरेवर कैकाडी" ॥
अंगणीं तोंडल्याचें झाड रायबाईजी
त्याला सूप सूप पान
"तुला न्यायला आले कोण?"
"आला राईचा पति"
"त्यानें आणलें काय काय?"
"त्यानें आणलें लुगडें"
"त्याचें लुगडें नेसते
त्याच्या गाडींत बसते
त्याची गाडी आहे चंदन
त्याचे बैल नंदन
बसे धुरेवर ब्राह्मण" ॥

पतीबरोबर मुलगी सासरीं जायला निघाली आहे खरी. पण तिची माहेरची ओढ कांहीं कमी झालेली नाहीं. घुंगराच्या शृंगारलेल्या गाडींत बसून सासरीं जात असलेली गौराई गाडीचा पडदा दूर सारून आपलें सासर दृष्टीच्या टप्प्यांत येत आहे किंवा नाहीं याचा अंदाज घेत आहे. माहेर कांहीं तिला दिसत नाहीं. जवळ बसलेल्या शंकरदेवाला ती विचारते. ते दुरून माहेर दाखवतात.

| | |
|---|---|
| खण खण कुदळी | मण मण माती |
| देऊळ खचलें | चांदण्यारातीं |
| चांदण्यारातचें | माणिक मोतीं |
| घाल घाल गौराई | आपल्या नाकीं |
| घालतां घालतां | मोडली दांडी |
| त्याची केली | उपर माडी |
| उपर माडीवर | उभी राधा |

*गौराई आपलं माहेर पाहा*
*मोहर कांहीं दिसेना दिसेना*
*शंकराला पुसेना पुसेना*
*शंकराला पुसलें पुसलें*
*गौराईचें माहेर दिसलें दिसलें*

लहान मुलींच्या अशा प्रकारच्या गीतांपेक्षां प्रौढ स्त्रियांच्या ओव्या अर्थाच्या आणि रचनेच्या बाबतींत अधिक प्रगल्भ आणि सरस आहेत असें दिसतें. सासू, सासरा, दीर, जाऊ, नणंद आणि पति हेच या गीतांचेहि वर्ण्यविषय आहेत. सासऱ्याचें वर्णन पाहा :

*सासऱ्याला सून आवडली मनांतून*
*तोड्याखालीं पैंजण हळू वापर जिन्यांतून ॥*
*सासऱ्याला सून आवडली मनांतून*
*शंभराचे तोडे पायीं हंड्यानें पाणी वाही ॥*
*पहांटे उठूनी हातीं दावें वांसराचें*
*दैव तुझ्या सासऱ्याचें ॥*
*सीता भावजई उचल भांड्यांचा पसारा*
*जेवून गेला बाई तुझा दैवाचा सासरा ॥*

वरील गीतांत वर्णन केलेलें कुटुंब सधन आहे. सासरा घरांतील वडील पुरुष म्हणून त्याच्यासमोर सर्वांनीं विनयानें वागावें अशी अपेक्षा आहे. घरांतील मानानें दुसरी मोठी व्यक्ति म्हणजे सासू. तिच्या मतानें सर्व मुलें, सुना यांनीं वागावें अशी शिस्त आहे.

*दळण दळीतां पीठ भरा लौकरी*
*सासू माझी सुंदरी ॥*
*माझ्या चुड्यावरी सासूबाईचें लक्ष्य फार*
*शाई बिजलीचे चितार ॥*
*दळण म्यां दळीलें पीठ म्यां भरीलें*
*सासूपुढें ठेविलें ॥*

मुलींचा माहेरचा अभिमान सासरीं आल्यानंतर तसाच कायम राहातो. सासरचें ऐश्वर्य असलें तरी मायेचा हात पाठीवरून फिरत नसल्यामुळें उलट माहेरच्या आठवणी अधिकाधिक व्याकूळ करीत जातात :

अडकित्ता घुंगराचा तुझ्या सासुरवाडीचा
रंगमहाल खिडक्यांचा ॥

पण,

गोदा[1] शेजेवरी नाहीं कोंडा फेकीन वाळीत
माझें माहेर झाडींत ॥
माझ्या माहेराला माहेर कोणाचें लागत नाहीं
आंब्याची आंबराई तिथें फुलांची बागशाही ॥
माहेराला जातें माहेरीं माझा सुई
जेऊं वाढायला माय ताट मांडायला भावजई ॥
दळण कांडणानें आले हाताला घोगले[2]
सुख माहेरीं भोगलें ॥
धान कांडूं कांडूं हाताला आले फोडे
माहेरचें सुख गोरी आठवून रडे ॥

आपल्या मुलीला होत असलेल्या सासुरवासाची कहाणी ऐकून मातेच्या अंतःकरणांत कालवाकालव होते. तिचे डोळे पाणावतात. ती मुलीला माहेरीं आणण्याविषयीं पतीला व मुलाला विनंती करते.

कसें आईच्या डोळ्यां पाणी बाप म्हणतो, "उगी तान्ही"
"अरे माझ्या तान्ह्या राघू जावें मैनेला आणायाला
अशी झाली तुला रात्र गाडी खिडक्यांची विणायाला"

बंधुराज बहिणीच्या सासरीं जायला निघतात. या व्याह्यांच्या घरीं त्यांचा उत्तम आदरसत्कार होतो. सासरचीं माणसें मुलीला संभाळून माहेरीं नेण्याविषयीं सांगत आहेत

सखी जाते माहेराला आलें आभाळ जांभाळूनी
सखी न्या जा सांभाळूनी ॥

पतिराज मात्र या गर्दींतून हळूच निसटून आपल्या प्रियेच्या माहेरीं जाण्याच्या वाटेवर आंब्याच्या झाडाखालीं उभे राहून तिला प्रेमानें निरोप देतात.

---

१ गोदा : पति. २ घट्टे.

*सखी जाते माहेराला उभा कंथ आंब्यातळीं*
*"कधीं येशील चंद्रावळी ॥"*

सखी माहेरीं आल्यावर मातापिता, बंधुभगिनी, वहिनी या सर्वांना आनंद होतो. जिव्हाळ्याच्या गोष्टी सुरू होतात. तिला सुख देण्यासाठीं घरांतील सर्वजण आटोकाट प्रयत्न करीत असतात. दिवस मजेंत जात असतात. पण माहेरीं किती दिवस राहायचें? तेव्हां मुलीला सासरीं पाठविण्यासंबंधीं बोलणीं निघतात. माहेरवाशीण हिरमुसली होते. सर्वजण तिची नानापरी समजूत घालतात. तिला एकटें वाटूं नये म्हणून तिला सासरीं जातांना सोबत करतात.

*मैना जाते सासराला तुला पोहोचवायला येते*
*असा तान्हा राघू माझा संगे मुराळ्या तुझ्या देतें ॥*
*अशी सासराला जाते माझी कौतुकाची उमा*
*पुढें बंधु मागें मामा ॥*

कालांतरानें हें बालपण संपतें. छोटे बाळराज घरांत पदार्पण करताहेत याची चाहूल लागते. सासरमाहेरचें वातावरण बदलूं लागतें. सुनेला आनंदी ठेवण्यांत सर्वजण गर्क होतात. या बाळराजाचें आगमन झाल्यानंतर सासर आणि माहेर हे शब्द केवळ शब्दच राहतात. या सुनेची सर्व माया, सर्व शक्ति आणि भावना आपल्या चिमुकल्याचें संगोपन करण्यांत, त्याचें कोडकौतुक करण्यांत केंद्रित होतात. माहेरची ओढ व सासरच्या सासुरवासाची कष्टप्रद जाणीव नष्ट होतात आणि त्याऐवजीं वात्सल्याच्या भावनेनें सर्व वातावरण धुंद झाल्यासारखें वाटतें :

*लेकुरवाळी झाली जंजाळीं[१] गुंतली*
*पोटच्या बाळापायीं माहेर विसरली ॥*



१ जंजाळ = व्याप

# घर माझें मोठें

श्री. वि. वा. जोशी

स्त्रीचें शैशव संपून लग्न झालें कीं, तिच्या माहेरचा संबंध दुरावत जाऊन ती सासरच्या संबंधांत समाविष्ट होते. या वेळीं तिच्या आयुष्यांत एक नवेंच जग निर्माण होतें. सासरच्या जगांत ती वावरत असली तरी तिची बराच काळ माहेरची ओढ ती विसरूं शकत नाहीं; आणि तशांतच जर तिला सासरीं जाच होऊं लागला, सासुरवास घडूं लागला; बोलणीं खावीं लागलीं; कष्ट सहन करावे लागले, इतकेंच नव्हे, तर प्रसंगीं मारझोडहि पत्करावी लागली; तर मात्र साहजिकच तिला माहेरची आठवण होणें अपरिहार्य आहे. अशा वेळीं तिचें जीवन तिला असह्य होतें. पांखराकरवीं ती आपल्या माहेराला निरोप धाडते :

*झुनझुन पांखरा । जा माझ्या माहेरा*
*माझ्या कां माहेरीं । चंदनाचं झाड*
*बैस त्याच्यावरी । सोडुनी शिदोरी*
*माझ्या कां मायेला । सांगशील काय*
*पोरीले सासुरवास । खाली तिनं हाय*
*भावाले पाठवून । मले घेऊन जाय*

आणि अशीं लोकगीतें पाहिलीं म्हणजे त्यावरून जुन्या काळीं ही सासुरवासाची प्रथा सर्वत्र व सर्रास असावी असें दिसतें. अपवाद म्हणून कांहीं सासूसास-यांविषयीं तसेंच नणंदादिरांविषयीं आदरयुक्त व ममतेनें ओथंबलेलीं कांहीं लोकगीतें प्रचारांत आहेत. त्यावरून कित्येक सुनांना सुदैवानें 'चांगलें घर' प्राप्त झालें असेलहि; पण अशीं उदाहरणें क्वचितच. एरवीं अशा सासुरवाशी सुनांचें भीषणरम्य जीवन आणि करुणरम्य कहाण्याच त्यांत विशेषत्वानें दिसून येतील; नाहींतर :

*मायबापाच्या घरीं । नाहीं वेंचली गोवरी*
*त्रास देई नानापरी । सासूबाई*

असें सुनेला म्हणण्याची पाळी आली नसती. ती कामकाजाला भीत होती अशांतला भाग नव्हता :

*मायबापाच्या पोटीं । एक जन्मली कारली*
*नाहीं धंद्याला हारली*

पण तिची सासू अत्यंत छळणूक करावयाची.

एका सुनेला सासरीं इतकी जाचणूक होती कीं, बिचारीला वेणीफणी करायला पुरेसें तेलसुद्धां मिळत नसे; आणि ही गोष्ट जेव्हां तिच्या आईवडिलांना कळली तेव्हां :

*सासुरवासाखालीं । डोईच्या वळल्या लटा*
*नवल करे पिता*
*सासुरवासाखालीं । डोईचं झालं रान*
*माय लोणी धाडी कावडीनं*

त्यांची अशी स्थिति झाली.

सासरीं सासूबरोबर नणंदादिरांचाहि कित्येक सुनांना त्रास होत असे आणि अशा प्रसंगीं ती सून केविलवाणी होऊन नणंदेला म्हणे :

*सासुरवाशीणीची गोष्ट । सांगावी धीरंधार*
*जशी आकाशीं फिरे घार । तिला कशाचा आधार*

आणि अशा लोकगीतांतून तत्कालीन सास्वांची विचारसरणी आणि सुनांचें एकंदर कौटुंबिक जीवन एका रूढ मार्गानें जात असलेलें दिसून येई. त्यांत तिच्या पतीला कांहींच प्राधान्य नसे; उलट कांहीं ठिकाणीं त्या मुलाला त्यानें आपल्या

पत्नीची कड घेऊन बोलल्यास "बाईलवेडा" "बाईलबुद्दया" असें म्हणून चूप करीत असल्याचेहि अनेक दाखले आहेत.

अशा सासूला एखादी 'भयंकर सून' हि मिळे; नाहीं असें नाहीं :

*सून सासुला शिव्या देती*
*कशी मरशिल माझे सवती*
*कारभार नाहीं माझे हातीं*

*जाऊन शेजारणीला पुसती*
*हिला मरण कशानं येती*
*आन बचुनागाची[१] कांडी राती*

पण अशीं उदाहरणें अपवादात्मकच! उलट कांहीं सुनांचें सासरींहि सुखसमृद्ध जीवन असे. त्याचे पडसाद अनेक लोकगीतांतून विखुरलेले दिसून येतात. त्यांच्या एकी "सासरमाहेर" सारखेंच असे. अशीच एक सुगृहिणी दळण दळावयास बसली असतांना म्हणते :

*दळण सरलं सरलं म्हणूं नये*
*उणं कुणाला बोलूं नये*
*दळण सरलं उरले पांच दाणे*
*कृष्णासारिखे माझे मामे*
*दळण सरलं सरलं सूप कोनी*
*गोविंदीं रत्नं दोन्ही*

अशा सौभाग्यशाली सुनेचें तिच्या शैशवापासून सासरीं येईपर्यंतचें 'माहेरपण'हि किती सुंदर शब्दांत या लोकगीतांतून रेखाटलेलें दिसून येतें.

*दांत डाळंबीचे दाणे । ओठ पोवळ्याचे लाल*
*मुख गुलाबाचं फूल । सईचं ग*
*साजरी सुंदर कशाला वेणीफणी*
*रूप बघा गेंदावाणी । माझ्या सईचं*
*साजरी सुंदर कशाला नटपट*
*शोभे कुंकवाचं बोट । सईला माझ्या*

---

१ बिषारी वनस्पति

सोनाराच्या घरीं कशाची ठोकठोक
बिंदूले घडवीत । सईला माझ्या
सुपली टोपली नाड्यानं गुंफली
लाडाची सईबाई खेळाया गुंतली
सईचा हा खेळ आतां कुणी ग मोडिला
वाटेनं नंदी गेला
खेळून माळून आली सई ग घरांत
हिरे चमके बिंदूलथांत
देवाच्या देवळांत फूल सांडिलं जाईचं
गोरं पाउल सईचं

आणि असें होतांहोतां सोन्याचा दिवस उगवला. गांवच्या अंबाबाईला वाजतगाजत तेलहळद नेण्यांत आली :

आधीं तेलहळद कुळीच्या अंबाबाई
मग हळद लावावी नवरीला
आधीं तेलहळद कुळीच्या दैवता
मग हळद लावितां नवरीला
आधीं तेलहळद नागोबा कुळीचा
मग मान नवरीचा माझ्या बाई

मग लग्नाची तयारी सुरू झाली आणि सईचा बाप 'कन्यादान' करूं लागला :

आकाशीचा ग मांडव । पृथ्वीचा जरी मेज
मुली कन्यादान तुझं

आणि पुढें :

वाजत गाजत शेजेचं बाळ आलं
सखे ऊठ घाल माळ सईबाई
गोरिया जांवयाला समयी नाहीं दिली
चंद्रज्योत उभी केली सईबाई
गोरिया जांवयानं दूरची वस्ती केली
कळपीची गाय नेली

पण या वेळीं बिचाऱ्या सईच्या आईची काय स्थिति झाली असेल हरि जाणे. पण ती मोठी धीरावी बाई हं! आपल्या मैत्रिणीला म्हणते कशी :

*आयुष्य चिंतितें परक्याच्या मुला*
*सई तुझ्या कुंकवाला*
*आयुष्य चिंतितें परक्याच्या पुत्रा*
*सई तुझ्या मंगळसुत्रा*

सईच्या सौभाग्यानें लाभलेली नणंद तरी किती प्रेमळ आणि मनमिळाऊ; तिनें सईचें कौतुक तरी कशा प्रकारें केलें पहावेंच :

*चांदीचं पंचपाळ वहिनीबाई तुझ्या हातीं*
*केलं खरेदी अमरावती*
*भाईराज तक्तपोशी सोनार अंगणां*
*सांग इच्छेचा दागिना*
*सई भावजय भांग कर तूं सरसा*
*सखा बिल्लोरी आरसा भाईराज*

सईची नणंद मोठी चतुर होती. अनुभवी होती. तिनें सईचें नुसतें कोडकौतुक केलें नाहीं तर खीजीवनाच्या कांहीं खूणगांठीहि तिला सांगून ठेवल्या :

*जाऊनी उभ्या वाटे न पाहे कोणीकडे*
*लौकीकाला पाणी चढे वहिनीबाई*
*जाऊन उभ्या बिदी न दिसो उजवी भूज*
*राखील कूळ तुझं भाईराज*

आणि अशा रीतीनें सईचा संसार आनंदानें खेळीमेळीनें चालू असतो आणि तिची प्रेमळ नणंद जागरुकतेनें सर्व कांहीं पाहात असते. इतक्यांत तिच्या दृष्टीस काय पडतें :

*गर्भार बाईला खावा वाटतो फणस*
*धाडा गांवाला माणूस*
*डोहाळजेवण करावं बगिच्यांत*
*सख्या आणा पालखींत*

स्त्रीजीवनाचें साफल्य म्हणजे अपत्यप्राप्ति. त्यांत सईच्या पोटीं पहिल्या-वहिल्यानें येणारें फळ; मग आनंद काय वर्णावा!

निव्वळ सासू म्हटली कीं, ती "खाष्ट"च आणि सुनेला अत्यंत जाच करणारी असा कांहीं जुना लोकभ्रम पूर्वी असे. पण कित्येक लोकगीतांतून त्याउलट प्रस्तुत झालेल्या कल्पना पाहतां कांहीं 'सुनांचे संसार' सोन्यासारखे सुंदर झाले होते याचीहि कल्पना येते.

तसेंच पूर्वी परंपरेनें किंवा रूढीनुसार सुनेला "माहेरचें मूळ" येई व तिला त्याकरितां सासूसासऱ्याची व नवऱ्याची जातांना परवानगी मागावी लागे. पण त्यावेळीं प्रत्येक जण कशी टाळाटाळ करी याचें मजेदार वर्णन पहा :

*चांदीचा पोळपाट सोन्याचं लाटणं*
*तेथें आमच्या सासूबाई*
*लाटीत होत्या पोळ्या*

**सून :** *सासुबाई सासुबाई मला मूळ आलं*
*पाठवितां कां माहेरा माहेरा*

**सासू :** *मला काय पुसतेस बरीच दिसतेस*
*पूस आपल्या सासऱ्याला सासऱ्याला*

**सून :** *चांदीचं ताम्हण सोन्याची पळी*
*तेथें आमचे मामंजी संध्या करीत होते*
*मामंजी मामंजी मला मूळ आलं*
*पाठवितां कां माहेरा माहेरा....*

आणि सासऱ्यानें मोठ्या मुलीकडे (नणंद); नणंदेनें जावेकडे; जावेनें धाकट्या दिराकडे असें करीत शेवटीं तिला तिच्या नवऱ्याकडे पिटाळावें; व तिला माहेराला जावयाची नवऱ्यानें परवानगी द्यायची असा थाट असे. आणि जर का तिला नवऱ्याचीहि सोबत मिळाली किंवा "तिकडच्यांनीं" मागाहून येणें केलें म्हणजे तिच्या आईच्या घरीं जांवईबापूंचें केवढें कौतुक व्हायचें :

*जांवईबापूनी 'रातून' येणं केलं*
*जसं पालखीचं सोनं*
*जांवयाचा मान लेकीकरितां केला*
*गंगासागराचा शेला बनातीला जोडीला*

*जांवई पाहून हरली तहान भूक*
*माझ्या ग मैनाचा जोड दिसे ठीक*

इतकेंच नाहीं तर मैनेची आई खोचक आणि खवचट शब्दांत जांवईबापूची कशी थट्टा करते ती पाहा :

*जांवयाची जात मोठी मनांत अघोरी*
*सोडून पाहिली ग माझ्या मैनाची शिदोरी*

यांतील हृदयंगम शृंगार आणि दुहेरी अर्थ (विशेषतः "शिदोरी" शब्दावरील श्लेष) किती बहारदार वठला आहे हें कुणाहि चोखंदळ वाचकाच्या नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं.

कजाग माता व सासवांचा काळ अजूनहि संपलेला नाहीं. जगराहाटीप्रमाणें तो सर्वकाळ चालतच राहाणार. फक्त त्याचें कालमानाप्रमाणें स्वरूप बदलेल इतकेंच. स्वतःला होणाऱ्या जाचांचीं रडगाणीं सदैव गात राहणाऱ्या सुनांचा एक वर्ग तत्कालीन लोकगीतांत वावरत असतांना सासरचा अभिमान बाळगणाऱ्या सुनाहि अनेक होत्या; आणि त्यांच्या तोंडून स्वतःच्या (सत्तेच्या) घराची आणि तेथील वडीलधाऱ्या माणसांची मोठ्या प्रांजलपणें व मार्मिकतेनें कबुली दिली जाई :

*माझें घर मोठें दिवे लावूं कोठें कोठें*
*चिरेबंदी वाडे मोठे ! मामंजींचे*

# वंजारी लोकगीतांतील

# 'सासर-माहेर'

## श्री. प्यारेलाल गोहल

वंजारी समाज प्रामुख्यानें मागासलेला असून परंपरागत 'मान्यता' हाच त्यांचा धर्म. मनुष्य जरी युगाच्या विकसित विचारप्रवाहाला अनुसरून जाण्याचा प्रयत्न करीत असला, तरी भूतकाळ आपल्या चोरपावलांनीं त्याचा पाठलाग करतांना आढळून येतो. भूतकालांतील हे परंपरागत चालत आलेले अवशेष त्या समाजाच्या लोकगीतांतून आढळून येतात. वंजारी समाज जरी आज बराच सुधारला असला तरी त्याच्या आजच्या अनेक पद्धतींत सोज्वळ प्राचीनत्व प्रामुख्यानें आढळून येतें.

वंजाऱ्यांचा मूळ धंदा बैलांचे तांडे बाळगून माला (धान्या) ची ने–आण करणें हा होता. या धंद्याच्या अनुषंगानें ते नेहमीं फिरस्तीवरच असत. आगगाड्या झाल्यापासून हा धंदा बसल्यामुळें हल्लीं जनावरांची अवलाद तयार करणें आणि मजुरी व शेती वगैरेंसारखी कामें ते करतात. त्यांच्या भटक्या प्रवृत्तीमुळें जेथें जेथें तांड्यांची परस्पराशीं भेट होत असे तेथें तेथें ते जातपात पाहून सोयरीक करून टाकीत. परंतु एकदां मुलगी दिल्यानंतर पुनः आपल्या मूळ (आईबापांच्या) तांड्याशीं तिची भेट होईलच असें सांगतां येत नसे! म्हणूनच वंजारी समाजाच्या लग्नपद्धतींत 'सासरीं' जाण्याचा प्रसंग अत्यंत करुण व हृदयस्पर्शी झालेला दिसून येतो.

पुनर्भेटीची शाश्वती नसल्यामुळें वंजारी समाजाच्या लग्नांत 'आनंदा' पेक्षां 'कारुण्य'च अधिक प्रमाणांत दिसून येतें. साखरपुडा झाल्यापासून तर प्रत्यक्ष लग्न मुहूर्तापर्यंत रडण्याचे अनेक प्रसंग आपणांस सांपडतील. त्यांपैकीं कांहीं प्रसंग पहा.

करार व गूळ खाण्याचा कार्यक्रम (साखरपुडा) झाल्यानंतर नवरा मुलगा नेहमींच्या पद्धतीप्रमाणें मुलीच्या बापाकडे येतो. तेथें मुलीच्या बापाच्या ऐपतीप्रमाणें तो महिना दोन महिने राहतो. त्या मुलाबरोबर त्याचा मामा वगैरेहि येतो. नवरा मुलगा आल्यानंतर 'टिळा लावण्या'चा एक विधि पार पडतो. या विधींत मुलीचा भाऊ नवऱ्यामुलास गंध (हळदकुंकू) लावतो. हा विधि मुलगी पाहते; व यानंतर येणाऱ्या आपल्या वियोगाची कल्पना तिला किती तीव्रतेनें चाटून जाते तें पाहा.

ती म्हणते :

*पराय मलकेरी*
*पराय जाते री*
*फिकी हळदी*
*न लगाओ रे मारो विरा*

(भाऊ, दुसऱ्या जातींतून व दुसऱ्या मुलखांतून आणलेली ही फिकट रंगाची हळद तूं त्यास (नवऱ्या मुलास) कां म्हणून लावतोस रे! अर्थात् इतरांना पक्क्या रंगाची भासणारी ही पिवळी हळद मला तिच्यामुळें होणाऱ्या वियोगाकारणानेंच फिकट वाटते. माझ्या जीवनांत नेहमींसाठीं वियोग निर्माण करणारी ही हळद तूं नको रे लावूंस.)

लग्नाची तयारी होत आहे. रुईच्या झाडाच्या फांद्या चारहि बाजूंस गाडून प्रत्येक फांदीशेजारीं प्रथम मोठें मडकें नंतर त्यापेक्षां लहान व शेवटीं वर सर्वांत लहान अशा प्रकारें मडकीं रचण्याचें काम कांहीं मुलें करीत आहेत. घरांतील मंडळी लगीनघाईंत आहेत. अशा वेळीं अर्थातच मुलीच्या हृदयांत संमिश्र भावनांचा कल्लोळ निर्माण होणें साहजिक आहे. आपण नेहमींसाठीं आईवडिलांना सोडून जाणार. आतांपर्यंत मिळालेल्या आईच्या प्रेमास आपण नेहमींसाठीं पारखे होणार हा विचार तिच्या मनांत घोळूं लागतो; तेव्हां अशा प्रकारच्या भावनांचा आविष्कार पहाण्यासारखा असतो.

लग्नकार्यांत गुंतलेल्या आपल्या गांवांतील माणसांना उद्देशून मुलगी म्हणते :

*अंतरी चपळाई, मत करो विरा।*
*एक घडी लागं तो सौ घडी लगाडो।*
*मत बांधो बाधा विवाह मारो।*

भाऊ, अरे तूं मडकीं रचण्याची इतकी घाई कां म्हणून करतोस रे? तुला तें (काम) करण्यास जर एक क्षण लागत असेल तर तूं शंभर क्षण लाव. कारण क्षणा-क्षणानें माझी माहेरून जाण्याची घटका जवळजवळ येत आहे. निदान तूं तरी या कामास उशीर कर, म्हणजे तितकेच क्षण मी येथील सुख अनुभवूं शकेन. भाऊ! नको रे माझें लग्न बांधूं!

याच अर्थाचें व याच जाणिवेनें युक्त असें एक दुसरें गीत पाहा. नवऱ्यामुलाचें स्नान आटोपलें. त्याला लग्नाचा साज चढविला. नवऱ्यामुलानंतर मुलीचें स्नान झालें. स्नानानंतर पाठीवर हळदकुंकवानें चौक भरला गेला. नंतर मुलीला साडी नेसण्यास देण्यांत आली. त्या साडीला उद्देशून मुलगी म्हणते :

*मत लावो साडी याडी*
*पराय जातेरी, पराय सीमेरी, पराय गोतेरी*
*फिकी साडी मत लावो विरा*

परक्या मुलखांतून व पर गोत्राकडून आणवलेली ही फिकट रंगाची साडी हे आई, तूं कां म्हणून मला नेसवतेस? अरे भाऊ, हे आई, तुम्ही कशाला रे हें सर्व करीत आहांत? 'आपलें' म्हणून यांत कांहीं आहे का रे? माझ्यासाठीं हें करूं नका.

माहेरची ओढ व सासरकडील जीवनसुखाविषयींची शंका यामुळें मुलीच्या हृदयाची कशी केविलवाणी स्थिति होत असेल याची कल्पना 'जावें त्याच्या जन्मा तेव्हां कळे' या न्यायानेंच कळणें शक्य आहे.' 'आपलें' म्हणून नसलेल्यास आपलें म्हणून मानून जीवन जगणें खरोखरच धैर्याचें काम आहे. या भावनेमुळेंच लग्न-घटका जसजशी जवळ येते तसतशी मुलीच्या हृदयांतील भावना तीव्र होत जातात व हा लग्नाचा सोहळा आपल्या दृष्टीनें आनंदाचा असला तरी तिच्या दृष्टीनें तो क्षणिक मानसिक तापच समजला पाहिजे. मुहूर्त घटकेला बसतांना मुलगी आपल्या आईस उद्देशून म्हणते :

*अतरा जुलुम कां किदी*
*मे याडी ओ! नामकण याडी*
*अतरा जुलुम कां किदी*

आई! तुम्ही माझें लग्न करून (या घरांतून या गांवांतून) घालवूं इच्छितां ना? तुम्ही हा एवढा जुलुम माझ्यावर कां म्हणून करतां? तुम्हांला यामुळें काय मिळणार आहे?

एकदांचें लग्न आटोपलें. मुलगी पतीसह सासरास जाणार. घरांत सर्वत्र गंभीर व दुःखाचें वातावरण पसरलें आहे. गांवांतील तिच्या मैत्रिणी आनंदा (सासरच्या) ची

कल्पना देण्याचा प्रयत्न करतात. परंतु वियोगअंधारामध्यें सासरचें सुख काजव्याच्या प्रकाशाप्रमाणें मिणमिणतें. अक्षरशः मुलगी गांवांतील परिचितांचीं नांवें घेत घेत अनेक आठवणींचा उल्लेख करीत प्रत्येकाच्या (भेटेल त्यांच्या) गळ्यांत हात घालून रडते. अशा प्रकारच्या रडण्यास ते 'हवेली' असें म्हणतात. पूर्वीच्या काळीं मुलीस बैलावर बसवून गांवांतून फिरवून आणत. जो कोणी भेटत असे त्याजवळ मुलगी आठवणींचा उल्लेख करून रडत असे. आपल्या गांवास व आपल्या आप्तजनांस सोडतांना व 'मागें परतोनि' पाहतांना त्यांचेसाठीं शुभेच्छा दर्शवीत ती म्हणते :

*मारी बापूरी नगरी*
*मारी नाईकेरी नगरी*
*हरी भरी रखाडेस*
*घुलर सु बदेस*
*लिमडा सु लेरा देस*
*मारी बापूरी नगरी हरीभरी रखाडेस....*

अर्थात् हे ईश्वरा! माझ्या आईबापांच्या व नाईकाच्या या नगरीला तूं नेहमीं 'सुजलाम् सुफलाम्' ठेव. येथील औदुंबराचीं व निंबाचीं झाडें हिरवीगार व फुलांफळांनीं बहरलेलीं असूं देत!

माहेर सोडतांना मुलीच्या हृदयांतील भावना व कारुण्य ज्या प्रसंगांत ओथंबलेलें आहे असे प्रसंग वर दिले आहेत. हा करुण प्रसंग जरी प्रत्येक समाजांत दिसून येत असला तरी विप्रलंभाची ही उत्कटता जितकी वंजारी समाजांत दिसून येते तितकी इतर ठिकाणीं नाहीं. प्रामुख्यानें सासरीं जाण्याचा प्रसंग सुखदुःखाच्या संमिश्र भावनांनीं युक्त असा असतो; परंतु वंजारी समाजाच्या प्राचीन सामाजिक पद्धतीमुळें त्यांत दुःखाचेच प्रसंग अधिक असल्यामुळें तो करुणरसानें ओथंबलेला आढळून येतो.

पुढें 'सासर'हून माहेरीं मुलगी आली. पेरणीचे दिवस. शेतांत राळा पेरतांना निर्माण होणारा मुलीच्या मनांतील 'सासर-माहेर विषयींचा स्वाभाविक विरोध पाहा. ती म्हणते :

*मुठी भर राळे नं कुकरं पेरूं*
*राळो युं पेरूं युं पेरूं जी।*
*मुठी भर राळे नं सासू भी मांगं*
*राळो हेगो ये, राळो हेगो ये जी।*

*मूठभर राळे नं याडी भी मांग*
*राळो युं देऊं युं देऊं जी।*

'मूठभर राळा कशा प्रकारें मी पेरूं? हं, मी हा मूठभर राळा असा पेरेन, असा पेरेन कीं, या मूठभर राळेला सासू पण मागत आहे. पण मी तिला सांगेन कीं सासूबाई, राळा संपला. आतां कोठून देऊं? पण जर आईनें मागितला तर मात्र सांगेन कीं हे आई, हा घे तूं. तुझ्यासाठीं राखून ठेवला आहे.

सासरीं जाण्याच्या गंभीर व करुण प्रसंगामुळें पाषाणहृदयाचा मनुष्य कसा द्रवित होतो, याविषयीं एक लोककथा देऊन हा लेख संपवितों.

वंजारी समाजांतील स्त्रियांच्या गीतांतून 'मारवाडी' जातीचा उल्लेख नेहमीं आढळतो. परजातीच्या या 'मारवाड्या'चें नांव कां घेतलें जातें? त्याचा व सासरीं जाण्याच्या प्रसंगाचा कसा संबंध आहे हे या लोक-कथेंतून स्पष्ट होईल.

"एक गरीब मनुष्य होता. त्यानें आपल्या कामधंद्यासाठीं गांवांतील एका मारवाड्याकडून दोन हजार रुपये कर्जाऊ घेतले. आपल्या अनेक अडचणींमुळें तो मारवाड्याचें कर्ज देऊं शकला नाहीं.

त्या ऋणकोच्या घरीं आपल्या वयांत आलेल्या मुलीचें लग्न ठरलें. गोरज मुहूर्तावर लग्न ठरलें. त्याच दिवशीं मारवाड्यास कळलें कीं त्याच्या ऋणकोच्या मुलीचें आज लग्न आहे. मारवाडयास राग आला. तो म्हणाला, 'माझे दोन हजार दोन वर्षांपासून देणें होत नाहीं अन् मुलीचें लग्न करतो? आतांच्या आतां वसुली करतों.' असें म्हणून मारवाडी वसुलीसाठीं त्याच्या घरीं सायंकाळीं निघाला. घरासमोर आल्यावर पाहिलें तर लग्न आटोपलें होतें व मुलगी गांवांतील आपल्या परिचित लोकांच्या गळ्यांत हात घालून रडत होती. मारवाडयास पाहिल्याबरोबर मुलीनें त्याच्या गळ्यांत हात घालून रडण्यास सुरुवात केली. तो अत्यंत हृदयद्रावक प्रसंग पाहिल्यानंतर व अनुभवल्यानंतर मारवाडयाच्या हृदयांतील 'बाप' जागा झाला व आपल्या डोळ्यांतील अश्रू टिपीत त्या मुलीस म्हणाला, 'पोरी' तूं जा. मी तुझ्या बापाकडून दोन हजार रुपये घेणार नाहीं. ते तुला आंदण म्हणून देऊन टाकतों. तूं जा व आपल्या घरीं सुखी रहा."

तेव्हांपासून परजातींतील मारवाडयाचा उल्लेख वंजारी समाजांतील लोक-गीतांत प्रामुख्यानें आढळून येतो.

# रेशीम गाठी

## डॉ. सरोजिनी बाबर

घे घे गडनी चल जाऊं न्हवणां
जिथं पाय पडल तिथं उगवल दवणा
दवणा न्हवं बाई दवण्याची काडी
राजानं बांधली तिथं उप्पर माडी
माडी बांधुनी शाबास केली
लंका लुटूनी शाबास दिली
त्या का लंकला गवर आली
चांप्यावरचं सोनं बोनं घे म्हटली
एक तोळा सोनं घ्या वो वैनी
बरम्या लेकी घ्यावो वैनी
एक तोळा सोनं मी घियाची न्हाई
बरम्या लेकी मी दियाची न्हाई
रघुरायाच्या वो पती सायाच्या
लेकी थोराच्या न्हाई वो दियाच्या
तुज्या पिंग्यानं मला बोलीवलं

*दिस घालीवलं ग दिस घालीवलं*
*अग पोरी पिंगा ग पोरी पिंगा ग...*

चवळीसारखं अंग जोरानं घुसळीत आणि गोड गळ्याचा ताल सावरीत ऐन रंगांत आलेलं आमचं हें खेळगाणं त्या दिवशीं सावित्रीकाकूनं एका फटक्यासरशीं मोडून टाकलं. अंगणांत खेळतेल्या आम्हां पोरींत ती मारक्या बैलाच्या झेपीनं घुसली आणि म्हटली कशी, "खेळ बास करा पोरी हो."

त्या कारणानं खेळतांना तोंडावर आलेल्या झिपऱ्या सावरीत आम्ही अवचितच थांबलों. आमचीं गीतं गातेलीं तोंडं गप्प झालीं. खेळ खेळतेलं अंग ताठ झालं. आणिक राजीखुशींत असलेलं मन गोरंमोरं झालं. म्हणून कांहीं कुणींच सावित्री-काकूला मधीं कां आलीस म्हटलं नाहीं कीं तिला कुणींहि मागं ढकलली नाहीं. म्हणतांना मग सावित्रीकाकूच पुन्हां बोलली, "चागलीं गाणीं गा. आमची वैनी लेकी घायला तयार हाये." तरी पण आम्ही गप्पच हं! म्हटलं उगीच नको आणिक आतां तियला खेळ मोडून शेजारच्या आळींतल्या भागीरथीकडे आम्ही जायला निघणार तर पुन्हां तीच कशी म्हणते, "येऽऽपोरी हो! जातां कुठं? गाणीं म्हणा."

म्हणून मग आम्ही कांहीं न बोलतांच तिथून पसार व्हायला लागलों. तशी तीच स्वतः गीत गातेली हं!

*माझी सासू कशी? सांग बाई पोरी*
*काय सांगूं मावशी?*
*माझी सासू, चुलीपुढं बसलेली*
*मांजरीनच जशी ग जूं....जूं....*
*माझा सासरा कसा? सांग बाई पोरी*
*काय सांगूं आत्यासाव?*
*माझा सासरा, हातभर दाढीचा*
*बोकूडच जसा ग जूं....जूं*
*अग, अग, थांव पोरी थांव!*
*आणिक मी ग कशी?*
*काय सांगूं वैन्स?*
*हातांत घाटी नू*
*मुरळीच जशी ग जूं...जूं*

त्या कारणानं आम्ही अशा हंसत सुटलों कीं ज्याचं नांव तें! पण सावित्री-काकूला आमचं हसणं परवडलं नाहीं. आमच्या घराच्या वळचणीखालचा एक लांकडाचा तुकडा उचलून भिरंदिशीं आमच्या अंगावर फेकीत ती खेकसली, "हंसायला ग काय झालं कार्ट्यांनू? गानं लई वंगाळ वाटलं काय?"

आतां ह्यावर काय बोलायची कुणाची मात्रा होती? तरी पण जिवाचा धडा करून मी बोललें बाई. म्हणालें, "काकू, आम्हाला खेळूं दे. तूं जा." पण त्यामुळं ती जास्तच चिडून बोलली, "लई जीभ वळवळतीया ग येऽऽऽभवानेऽऽ" आणि मग तिनं एकेक डोळा वटारीत पुन्हां म्हटलं कसं, "थांबा, एकेकीला एक खवट नणंद, तिखट सासू न् आखाड सासरा बघूनच नांदायला धाडतें. असा नवरा बघीन कीं, बसतांउठतां त्यानं तुमची हाड्डी नरम करावी ठोकून वल्या फोकानं!....बसा मग!"

आतां बरीक कोणच बोललं नाहीं. सावित्रीकाकू मुलखाची बडबडी न् चिडकी, तशांत तिनं हा भलताच डाव काढलेला! कोण ग बाई बोलणार या उप्पर? म्हणून आम्ही गप्पच राहिलों न् मुकाट्यानं आपापल्या घरीं निघालों. तशी आमची सोनी कशी म्हणते मला हळूच, "आक्कंऽऽहिच्या हाताखालीं नांदायचं न्हाई हं जीव गेला तरी! न कां होईना लगीन आपलं मग! काळ्यांद्रा ल्योक हिचा पण नखरा बघा....जा म्हणावं!"

पण मी आतांहि कांहीं बोललें नाहीं. सोनीला खेळायला घालवून आणि पोरींना उद्यां खेळायचं खुणवून आमच्या छपरांत आलें. आणि म्हटलं, येतात तीं गीतं तोंडपाठ म्हणून बघावींत. नणंदा भावजयांचं नाहीं तर सासर माहेराचं काय जमतंय का पाहावं. पण कुठलं आलंय? माझ्या पाठोपाठ सावित्रीकाकू आली न् गीतं बोलत सुटली.

*भावा भैनींला दिल्यानं* | *न्हाई तुजं होत कमी*
*झरा उपस येतं पानी* | *भाऊराया*
*भैनीचा आशीर्वाद* | *भाऊ झेलतो बळी*
*गंगनीं केल्या केळी* | *हात पुरना कंबळीं*
*नवखंड पिरतीमी* | *तिचा योकच चांदतारा*
| *भाऊ भैनीला वाटे प्यारा*

*देव कुठें? देव कुठें?* | *भरीरून[1] जो उरला*
*अरे उरीसन[2] माझ्या* | *माहेरांत सामावला*

---

१ भरून. २ उरांत, हृदयांत.

*अरे लागले डोहाळे सांगे शेतांतली माटी*
*गातें माहेराचं गानं लेक येईन बो पोटीं*

म्हणून मग मी तिला सरळच विचारलं, "आज तूं ग का हात धरून आमच्यामागं काकू ?" तशी मग तिनं खुलासा केला, "माझी लेक कवा ग यील पोरी आपल्या घरीं ? जीव पार उडून गेलाय. मुराळी जाऊन चार रोज झाले. अजून पत्ता न्हाई." आणि डोळ्याला पदर लावून म्हणाली, "सासर म्हायार. रेशीमगांठी बसलेल्या. जिवाभावानं गुंफलेल्या. पक्क्या. सुटतां म्हणून सुटत न्हाईत. पन खुळा जीव त्या सोडायला बगतो. फसून जातो. लई जाच लेकीला माझ्या. पोटजाळ लई वाईट. धरनी ठाव दीना. म्हणून आलें तुमी खेळतांना बगून. तेवढाच जीव थंड व्हावा वाटलं."

आतां कुठं मला अंदाज आला. सावित्रीकाकूच्या लेकीला, चंद्रीला, सासरीं भारी जाच म्हणून कळलं तें खरं होतं म्हणायचं मग ! बिचारी !! माझाहि जीव तिच्या एकीं कळवळला. म्हणून मीं सावित्रीकाकूला म्हटलं, "आतां आली चंद्री कीं पुन्हा पाठवूंच नको तूं. बसा म्हणावं सासरच्यांना खुशाल !"

त्यावर ती शांतपणानं बोलली, "तसं न्हाई जुळत. आपुन बोललं तरी लेकीनं ऐकायला नग ? आनिक नवरा सोडून जलम कसा जावा कवळ्या कावडीचा पोरी ?"

यांतलं मला कांहीं नीट उमगलं नाहीं. म्हणून मी बोललें, "म्हणणं काय त्यांचं ?"

"हरीला ठावं. म्हायारला जायाचं न्हाई. मग काय वाट्टेल तें चालेल."

"येऽऽआकंऽऽऽ त्यो बग रेडिओ काय बोलतूंया. पळ !...."

आम्ही दोघी बोलत बसलों तर तितक्यांत आमच्या सोनीनं मला पुढल्या माळींतून हाळी दिली. आणि ऐकतेंय तर खरंच रेडिओ गातेला :

*आवरा भात मना पेरून दे गो*
*मंग जा तुझ्या तूं माहेरा*
*भात पेरीले रे माझ्या भरतारा*
*आतां मी जातें माझे माहेरा*
*आवरा भात मना कापून दे गो*
*मंग जा तुझे तूं माहेरा*
*भात कापीले रे माझ्या भरतारा*
*आतां मी जातें माझे माहेरा*

*आवरे भात मना झोरून दे गो*
*मंग जा तुझे तूं माहेरा*
*भात झोरीले रे माझ्या भरतारा*
*आतां मी जातें माझे माहेरा*
*आवरे भात मना टिपून दे गो*
*मंग जा तुझे तूं माहेरा*
*भात टिपीले रे माझ्या भरतारा*
*आतां मी जातें माझे माहेरा*
*आवरे भात घरा आणून दे गो*
*मंग जा तुझे तूं माहेरा*

"हात मेल्याचा मुडदा पडूं दे। काय बाई तरी बोलनं हें! खा म्हणावं आतां हातानं रांधून भात. तर काय?"

रेडिओंतील गीत ऐकून सावित्रीवाकूनं आपले हात चोळले न् असल्या नवऱ्याला पाटीभर शिव्या मोजीत ती पुटपुटली, "लेक म्हणजे भाडयाचा बैल जसा काय. आमच्या जांवयाचं काय? होंच कीं!! पन मेल्याला बायकूची हाडं न् सारडं एक झाल्यात तरी काय व्हाईच! लईबी करूं नग म्हणावं. देव बघून घील कवा तरी. हेबी दिस जात्याली."

पण मग मी नाहीं बाई बोललें. चहा करायचं निमित्त काढून घरांत पळालें. आणिक खरंच चुलींत धुमसणाऱ्या विस्तवांत घाईघाईनं चार काटक्या कोंबून फुंकणीनं जाळ केला. तर माझी ती धांदल बघून आमची आई कशी म्हणती, "मजी घ्येत काय पोरी आज? पावना बिवना आलाय काय कोन कां दारात कावळा वराडला म्हन पावन्याची तयारी हाय?"

"चहा करतें. तुला न् मला." मीं खरं होतं तें उत्तर आईला दिलं.

तितक्यांत आमच्या दोघींच्या मध्यें घुसत सावित्रीवाकूनं तोंड घातलं, "आनीक योक कप कर मला पण चहा. मी आलीया."

आतां मात्र खरंच माझं धाबं दणाणलं बाई. ह्या बाईनं माझी पाठ कां धरलीय कुणाला टाऊक! मला जरा संशय आला. म्हणतांना झालेला चहा त्या दोघींच्या पुढ्यांत ठेवून मी धुणं धुवायच्या कारणानं जी घरांतून धूम पळत सुटलें ती थेट धुण्याची मोट डोईवर नीट सावरीत पार आमच्या खाऱ्या मळ्यांतील विहिरीवर मोट

चालली होती तिथं येऊन थांबलें. तिथं येऊन बघतेंय तर आमची सोनी हातवारे करीत मला सांगतेली :

*पंचमीच्या सणायाला*
*नणंद आणली म्हायाराला*
*कांहीं नाहीं घालायाल*
*ऐका वो साजणी बाई*
*सर्व दिलं घालायाला*
*ऐका वो, साजणी बाई*

*गोट आणि पाटयिल्या*
*लेण्यामंदीं दाटयिल्या*
*त्याबी दिल्या घालायाला*
*ऐका वो, साजणीबाई*

*आग्गरबाळ्या बग्गरबाळ्या*
*दिसायाला आगयिल्या*
*त्याबी दिल्या घालायाला*
*ऐका वो, साजणीबाई*

*कंबरचा कंबरपट्टा*
*गळ्यांतली चिंचपेटी*
*तीबी दिली घालायाल*
*ऐका वो, साजणीबाई*

*काळी ती वो चंद्रकळी*
*वर मोतियांची चोळी*
*तीबी दिली नेसायाला*
*ऐका वो, साजणीबाई*
*सर्व दिलं घालायाला*
*ऐका वो, साजणीबाई*

म्हणून मीं तिला विचारलं, "कुणाचं ग सोने?" तशी ती हंसून म्हणाली, "आपल्या आबा माळ्याच्या भागीचं. अग, लई भांडान केलं भावजईनं तिच्या संगं! मी तिच्या जागीं असतें, तर हातऱ्यागत तिचं काय पन नेऊलें नसतें, का

घातलं नसतं. हावरंच आहे मेलं. नणंदेच्या नवऱ्याची इथं टाप नाहीं म्हणावं! चोंबडी मेली...."

त्यामुळं मग आम्ही दोघींनीं घरच्या धुण्याची मोट पाटावरल्या पाण्यांत धुऊन मोकळी करीत अशा पुष्कळ गोष्टी केल्या.

तर तितक्यांत काय गंमत झाली कीं, भाराभर गवत डोईवर घेऊन ऊंस सोलीत घराकडे निघालेली पवाराची चिंगी मला ओरडून बोलली, "आपुन त्या वच्छीला भेटायला जाऊं या का? पडलीया म्हणल्यात तापानं! कसं?"

त्यावर धुणं धुतांना ओला झालेला चिरडीचा घोळ पिळून टाकीत मीं तिला विचारलं, "तुला कोणी बातमी दिली चिंगे?"

"तिच्या आईनं."

"काय म्हणाली?"

"हेंच कीं! वच्छी लई पडलीया."

"पण कुठं आहे ती?"

"दाल्ल्याच्या घरांत! कुठं म्हणजे?"

"मग तिच्या आईनं...."

"म्हायारचं कोन चालत न्हाई तिथं!"

"खरंच?"

"हं!...."

"तर मग आपण तरी कशाला जावं?"

"लांबून बघून येऊं. एक लवंग दोघींनीं खात जिवाभावाचा मैतरपणा आपण केला, इसरलीस?"

"जाऊं या."

"सकाळीं जाऊं न्यारी झाल्यावर."

"बराय."

चिंगी निघून गेली तशी सोनी धुणं बडवीत कांहींतरी गुणगुणली आणि माझ्या मनांत :

*धराचा घरधंदा मी करतें*
*पाण्याला एकली जातें*
*जिवूबाई करींदरा कामानी*
*जातें माहेराला॥*

*कधीं मी सोडिला का घराचा उंबरठा*
*कधीं हा भेटला का बाप माझा गोमटा ॥*

*कधीं मी सोडिली का दारींची पायरी*
*कधीं ही भेटली का आई माझी सोयरी ॥*

*कधीं मी सोडिला का दारींचा पिंपळ*
*कधीं हा भेटला का भाऊ माझा विठ्ठल ॥*

*कधीं मी सोडिली का नदीची साखळी*
*कधीं ही भेटली का भैन माझी धाकली ॥*

ह्या असल्या गीतानं थैमान घातलं. मी बेचैन झालें. वत्सलानं आम्हांला शिकवलेलं हें गीत तिच्याच नशिबीं खरं ठरलं, ह्या कल्पनेनंच मी भारावून गेलें. नाहीं नाहीं तें मनांत येऊन गेलं. तशी धुण्याचा फिरता हात थबकला. म्हणून सोनीनं मला विचारलं, "कां ग ? वच्छीला बरं नसल ?"

"कुणाला टाऊक. पण बिचारी बरी होऊं दे." बोलायचं म्हणून मी बोललें खरी. परंतु मग उगाचच जीव उडून गेला. वत्सला वाटेल तें करून जगूं दे अशी इच्छा मनांत बळावली. म्हणून मीच पुन्हा बोललें, "असल्या रेशीमगांठी चुलींत घाला म्हणावं ! माणुसकीच नाहीं तिथं कुठला संसार ? तुरुंगवास मेला हा न् नवरा कुण्या जन्माचा वैरी."

"ह्यापेक्षां लगीनच नको."

"कुणाचं ?"

"आपलं !"

माझ्या बोलण्यावर आमच्या सोनीनं ही भाषा केली तशी मी चमकलें. माझी जीभ एकदम ह्या गोष्टीला होकार भरायला वळेना. कारण माझ्यासाठीं आमच्या आजीनं हेरून ठेवलेला एक पाव्हणा मला आवडला होता. आणि म्हणूनच त्याचं माझं लगीन झालं कीं मी आमचं दोघांचं चित्र कसं आहे, याचं नवऱ्यापाशीं मांडायचं गणित मनाशीं असं केलं होतं :

*शिवकळा भिवकळा*
*नवरत्नांचा पुतळा बाई*
*सभेशीं दोघं*

*तुम्ही रांजण मी घागर*
*तुमापरास मी नागर बाई*
*समेशीं दोघं*
*तुमी दार मी चौकट*
*तुमापरास मी बळकट बाई*
*समेशीं दोघं*
*तुमी दवत मी लेखणी*
*तुमापरास मी देखणी बाई*
*समेशीं दोघं*
*तुमी चांद मी चांदणी*
*तुमी आगाशीं मी गंगनीं बाई*
*समेशीं दोघं*
*तुमी हंडा मी परात*
*तुमी दारांत मी घरांत बाई*
*समेशीं दोघं*

पण झिम्म्याचं हें गीत ह्या संदर्भांत मीं कुणाजवळ कधीं काढलं नव्हतं. म्हणतांना मग बाई गप्पच राहिलें.

त्यामुळं सोनी हंसून म्हणाली, "चांगला नवरा मिळाला तरच करावं लगीन! कसं?" आणि मी बाई लाजून खजिल झालें. बोलायला असं सुचेचना.

तेवढ्यांत आमच्या मळयाच्या वाटेकऱ्याची भिंगरी हातानं चुटक्या वाजवीत आणि नाचत उसाच्या फडांतून बाहेर आली. त्यासरशीं वाऱ्यानं तिचा बारीक साद आमच्या पुढ्यांत फेकला :

*खजूर गवळ्याची बानू*
*बानू खजूर वपी*
*घालावं नंदच्या कानीं*
*सका उतरीला रातीं.*
*लक्ष्मन वळत्याती म्हशी*
*दुधं भरीला वाडा*

धुरपाय करत्याती ताक
पदूर वाऱ्यानं गेला

आणि जित्राभात्राच्या सुंदर संसाराची गोष्ट आम्हांला ऐकवली. त्या कारणानं सोनी आपल्या झुबल्याचा पिळा आवळून पिळीत म्हणाली, "अस्सा नवरा पाइजे!" आणिक तिनं भिंगरीला हाळी दिली, "येऽऽभिंगरेऽहंऽऽऽऽ"

"आलोंऽऽआलोंऽऽऽ" भिंगरीनं उलट साद घातला आणि ती वाऱ्याच्या झेपीनं आमच्याकडे आली.

"आपुन खेळूं या का? सोनीनं तिला विचारलं.

"चला." भिंगरी हंसली.

"झिम्मा घालूं या?"

"हं! चला."

धुणं धुतांधुतां सोनी पळाली. ओल्या हातांनीं तिनं आपले केस सावरले. त्यांचा खेळ सुरू झाला. भिंगरी उड्या घेतघेत गीत बोलली :

दोन तीन बैलांच्या लागल्या दुशी बाई
लागल्या दूशी
त्यांत माजी करंगळी गुमावली कशी बाई
गुमावली कशी
धाकल्या दिराला गवसली कशी बाई
गवसली कशी
धाकल्या दिराचं काय मत झालं बाई
काय मत झालं
सासू सुश्रीगिला कळूं गेलं बाई
कळूं गेलं
सासू सुश्रीणिचं काय मत झालं बाई
काय मत झालं
दोन तीन चाबूक चमकाविले बाई
चमकावीले
दोन तीन चाबूक दुरच्या दुर बाई
दुरच्या दूर

माझं म्हायार पंढरपूर बाई
पंढरपूर
माझं आजूळ रत्नांगिरी बाई
रत्नांगिरी

आणि तिचं गाणं मागं सरलं, तर लगेच सोनीनं बारीक साद घालीत आपलं गीत काढलं :

*अग अग फुलाई माळणी*
*राजा ग तुला बोलावीतो*
*कशाला मेला बोलवीतो*
*येत न्हाई म्हणून सांग जा*
*अग सावळ्या तुला घडवितो*
*राजा ग तुला बोलवीतो*
*जळ्ळ्या ग मेल्याच्या सावळ्या*
*येत न्हाई म्हणून सांग जा*
*माझा माळी ग बरवा*
*दंडीं रुमाल हिरवा*

मग बरीक मलाहि राहावेना. म्हणून थोडं राहिलेलं धुणं तिथं तसंच पाटावर टाकून मी उभी राहिलें. पाटांतल्या पाण्यांतून बाहेर आलें आणि त्या दोघींना खेळायला सांगून मी पण एक गीत बोललें :

*ह्या बाई पांखराचं*
*अंजनी डोळ*
*ह्या बाई पांखराचं*
*गुंजनी डोळ*
*हें बाई पांखरूं*
*राजाशीं बोलं*
*राजाच्या पलंगाशीं*
*कोन बाई उभं*
*राजाच्या पलंगाशीं*
*लक्षुमन उभं*

त्यांनीं काय आंदील्या[1]
केळाच्या फन्या
त्या काय लावील्या
धुरपायच्या म्हालां
घाल ग धुरपे
अंजनी वारा
घाल ग धुरपे
गुंजनी[2] वारा
चतुर भरतारा
लागूं दे डोळा

त्यामुळं त्या दोघी हंसल्या. गीत छान आहे म्हणाऱ्या. आणि मग एकेकीनं एकीपेक्षां एक चढ गीत आपल्या आठवणींतून काढलं. सोनी बोलली :

चला ग सयांनु कवलाला
काळ्या कौलाची लई बडाई
शेजारीन बाई चंद्राबाई
तुमचे पती कुठं वो गेले
गेले असत्याल नांद्रुकी बनीं
नांद्रुकी बनींच्या कालूवा नाईका
रानी पाटावू मागती
पाटावू पडला हिरवा रंग
तिथं मांडीला दोघांनीं छंद
छंद न्हवं त्यो सोंगाड्या
केळी घालूनी गेला सोंगाड्या
त्यानं बाई मोर धरीला
त्या बाई मोरांनीं घागरी गुमावल्या
आमी बाई गवराय जागीवल्या

त्यासरशीं मग तिच्यापेक्षां चांगला 'गळा' काढून भिंगरीनं एक गीत सांगितलं

ढवळ पवळा जी नंदी
मोटा जुंपील्या दोनी

---

१ आणल्या, भेट दिल्या. २ पंख्याचा वारा.

सोडा सोडा वो पानी
वरल्या बागाच्या कोनीं
पिकल्या लिंबून्या दोनी
पिकलं लिंबू मी तोडीतें
हिरवं लिंबू मी टाकीतें
अश्शी माळीन नखऱ्याची
राणी शंकर शेल्याची
सहज बसली ग न्हायाला
हार बाई ठेवलाय खुंटीला
घारीनं मारली झडाप ग
हार बाई केलाय गडप ग
चला सयांनू जाऊं ग
आपुन धुणं ग धुयाला
धुणं धुतां जी धूतां
माजे हरवले मोतीं
तिकून आले शिरपती
कां ग जमुना पवती
काय सांगूं तुमा पती
माजे हरवले मोतीं
माज्या मोत्याची निळा
चांद सूर्व्याची कळा
पतीदेव मला पावले ग
हार बाई माजे घावले ग
हार बाई अंगणीं झाडीती
केस बाई कुरळे गुंफिती

म्हणून मग मलाहि जोर चढला. मोठ्या बायका बोलतात तशी मी गीत आठवीत स्वतःशींच पुटपुटलें :

"एकशेंची चंची, दोनशांचीं पानं
तीनशेंचा कात, जायफळ आठ
लवंगा साठ, नगरीच्या नारी

पग भिरीभिरी, हातामंदीं वजरी
पायामंदीं जोडा, डोईला पटका
बंधु माज्याला झाली ग दिष्ट
कौलारी वाडा, पदर घाला·—"

आणिक त्या दोघींनाहि यांतलं एक अक्षरदेखील कळायच्या आंत राधाकृष्णांचं एक गीत सांगून मोकळी झालें :

मी तर होईन चांदणी
अतीच उंच गगनीं
तिथं तूं कैसा येशिल रे
तुझी माझी भेट कैशी रे

तूं तर होशिल चांदणी
मी तर होईन पांखरूं
चंद्राला घिरट्या घालिन ग
आणि मग तुजला भेटिन ग

मी तर होईन आंबा
देईन साखरचुंबा
तिथें तूं कैसा येशिल रे
तुझी माझी भेट कैशी रे

मी तर होईन रावा
आंबा न् आंबा पाडिन ग
फांदी न् फांदी झोडिन ग
आणि मग तुजला भेटिन ग

मी तर होईन मासोळी
राहिन समुद्रातळीं
तिथं तूं कैसा येशिल रे
तुझी माझी भट कैशी रे

मी तर होईन भोया
आशा जाळं टाकिन ग

*त्यामधिं तुजला पकडिन ग*
*तळमळ तळमळ करशिल ग*
*आणि मग तुजला भेटिन ग*

तेवढयांत काय गंमत झाली कीं, आमच्या विहिरीवरचा मोटकरी आमचीं गीतं ऐकून गायला लागला! त्याचा साद ऐकून एकदमच आम्ही गप्प झालों न् 'आ' वासून कान दिला. बघतोंय तर खरंच मोठ्या रंगांत येऊन न् मोट बंद करून आमचा मोटकरी गातेला :

*गाडीच्या गाडीवाना*
*दोन बैल हौसेची*
*गळ्यां घुंगुरमाळा गोंडं रेशमाचीं*
*ह्येच्या बागेंत बंगला*
*हिरव्या रंगाचा*
*वर पिंजरा टांगला*
*राघूमैनांचा*
*नार घेती झुल्यावर*
*वारा मौजेचा*
*सुटलाय वारा लावलाय फरारा*
*ह्या वारू गेला कैलासी बंदरा*
*गेलाय कैलासी बंदरा*
*नारी लागे निदरा*
*तूं माझी जाई ग*
*मी तुझा मोगरा*

आणि तशांत "अजून कसं धुणं झालं न्हाई गऽऽ पोरीनूऽऽ" अशी हाळी देत आई गांवाकडून बिगीनं येतेली! म्हणून मग आम्ही धुतलं धुणं घेऊन आणि उरलं तसंच न पिळतां काखोटीला मारून ज्या पळत सुटलोंय कीं ज्याचं नांव तें! आई एकीकडून न् आम्ही दुसरीकडून!! कुणाची कुणाला गांठ नाहीं!!!

त्या धांदलींत मोटकऱ्यानं पुन्हां मोट सुरू केली आणि आम्ही सावित्रीकाकूला चुकवायचं ठरवीत घर गांठीत सुटलों....

पण वाटेंत भिंगरीनं मला हळूच विचारलं, "आकंऽऽ, ह्या गीताचा अर्थ काय ग?"

म्हणून मी बोललें, "कोणच्या?"

"ऐक :

*जीव माजा शिणला उसं तुमच्या मांडीवर*
*तांबड्या मंदिलाची छाया पडूं द्या तोंडावर*"

"कोण बोललं हें गीत?"

"आमची नवी वैनी—"

"मग तिलाच विचार जा."

"ती लाजतीया."

"मग सोडून दे."

भिंगरीला हंसून मी वाटेला लावली आणि झपाटयानं घरचा रस्ता धरला. कारण ह्या रेशीमगांठीची उकल कुणीं ग बाई करावी? ज्याचं त्याला लखलाभ. आम्ही कोण बोलणार? नाहीं का?

# माहेर तुटत नाही, सासर सुटत नाही

वामन चोरघडे

**आई :** माले, ऊठ की आता! दिवसभर का झोपच झोप चालल का तुही? असं तुज निज निज करतां कोणी जर का पाह्यलं तर तो म्हणेल, का या पोरीस सासरीं कांहीं आराम भेटत नाहीं. ऊठ आतां पटकन्! आळस झाडून टाक. दुपारसा जेवलीस अन् जो लोळून राह्यली! हें काय झोपणं व्हय रांडल्याकू! माझ्या शेराभराच्या शेराया वळून झाल्या.

**माला :** आगे पण आई! मी उठून तरी काय करूं? माझ्यावाचून अडलं आहे का? मी आली तेव्हांपासून असं रोजचंच चालू आहे. इकडची काडी तिकडे नाहीं करूं देत तूं मज! दोन्ही टाव[1] जेवावं अन् आढ्याकडे पाहात बसावं, नाहीतर माशा मारावं. माशाहि तर नाहीं रांडल्येकू!

**आई :** बोलगंच बहु तुज. चार दिवस आली अन् तुज काय काम सांगत बसूं? कामहि कोणतं आहे मोठं? तूं सासरीं होती तेव्हां येथचं काम तुह्यावाचून अडलं तर नव्हतं? पण मी म्हणतों, काम नाही म्हणून का असं झोपून राहावं का? आतापासून हें असं चालतं तर पुढे तशीच टेव[2] पडते, ठाऊक आहे? किती झालं तरी आपण सासुरवाशीण आहों एवढं वळखावं. सासरीं गेल्यावर—

---

१ वेळीं. २ सराव, चाल्रीत.

**माला :** सासरीं गेल्यावर काय ?

**आई :** *बाप विचारतो लेकी, तुज सासुरवास कसा ।*
*केळीच्या पानावर, जिरेसाळीचा भात जसा ॥*

**माला :** तिकडे सासुरवास नाहीं म्हणून तूं करून घेतेस वाटते ?

**आई :** हो, सासुरवास करतों ! कशी पिशी अस तर कोणास टाऊक बापा, तूं होणारवडी होती तेव्हांपासून पाहतों. तुहं पिसेपण अद्याप कांही गेलं नाहीं. आजकालच्या पोरी तुम्ही, चांगल्या न्हात्या-धुत्या झाल्यावर सासरीं जाता. येवढ्या मोठ्या पोरीस सासुरवास करन् तर कोन अन् कसा ? आमच्या वेळेस असं नव्हतं माय ! माझा लग्न झालं तेव्हां दाहावं वरीस होतं मज ! मोठ्या मायच्या पाया पडायास गेली तेव्हां तिनं सांगितलं होतं :

*सासूचा सासुरवास, सोसावा एकीनं*
*कुळवंताच्या लेकीनं, राजसबाळी सरू ॥*
*सासूचा सासुरवास, सोसल्यानं काय होतं ।*
*दोन्ही कुळा नांव येतं, राजसबाळी सरू ॥*
*सासूचा सासुरवास, सोसावा कटाकटी ।*
*मायबापाच्या नांवासाठीं, राजसबाळी सरू ॥*

**माला :** आई, अखीन काय सांगितलं होतं मोठ्या मायनं ? मी सासरीं गेली तेव्हां तूं तर कांहींच सांगितलं नाही मज ?

**आई :** तेवढंच राहलं होतं व ! लहानच होती का नाही सासरी गेली तेव्हां. रांगत रांगत गेली असशीन ? हाच तर पिसेपना[1] ! चांगली अटरा वर्साची घोडी होती. मी सांगतां भली अन् तूं ऐकतां भली अशी गति केली असती त्वां माही.

**माला :** आई, खरं सांग, म्यां ऐकलं नसतं तुहं ?

**आई :** कशी पागल असन् तर ! तूं कानई माले, लाडं लाडं वाया गेली आहे. बापानं कधी गालास बोट लावलं नाही तुह्या. मज काह्यची दबणार तूं ?

**माला :** आई, तूं मज कांहीं म्हण पण दादाजीस नको ओढूं याच्यांत. माझा वागणं दादाजीस आवडलं नसतं तर त्याहीनं मारायास कमी केलं नसतं.

---

१ वेडेपणा.

**आई :** सांगतों काय तर! मोठी गुणाचीच आहे ना तूं! आतां येवढं काय्यास पाहिजे? थांब जरा. आतां येतीलच ते. आयका म्हणा आपल्या लाडूबाईचं कवतिक!

**माला :** आगे पण आई....

**आई :** चाल जाऊं दे मज. इकडे तुह्याशीं बोलत बसतों अन् तिकडे चूल कोण फुकन? मज नाहीं रिकामपण.

**माला :** आई, बस की जरा. आजचा दिवस राह्यला. उद्या तर मी जाईन. मग करत बस काम. आज बोलून घेतों. आगे, आई ते आईच. सासू कितीहि चांगली असली तरीहि आईची सर येणार का? बस की जरा!

**आई :** हें असं चुरूचुरू बोलून साखर पेरणं शिकून घेतलं बापाजवळून तेवढं, बह्याडच[1] आहे! असं बोललं म्हणजे झालं काम.

*लाडकी लेक अशी, लाडकी होऊं नको।*
*जाशील परदेशा, माया उगी लावूं नको॥*

**माला :** आई, आज मी तुहं कांहीं आईकणार नाहीं. दुपारसा म्या म्हटलं, जरा बोलत बसीन तुह्याशीं, तर त्वां शेवया कहाडल्या....

**आई :** हो, तूं जें म्हणशीन् ते खरं. शेवाया कहाडल्या म्या अन् तोंडानं वळत बसली, नाहीं! हाताईस जीभ नाही, मग बोलल कोण? मनी नाही नांदणं—असंच झालं का नाही हें? खरं बोलली तर तुज का कोणी फाशी द्यायास बसलं का? स्वतःस खेळायची होती लोळण-फुगडी अन् मज म्हणे माय तूं लंगडी! निमित्त माझ्यावर! म्हणते कशी, 'आई, खूप बाह्यडलं त्वां. अन्न आंगांत आलं! अन् जो जाऊन झोपली तर आता दीड दुपारी अन् तेहि हाक मारली तेव्हां डोळे उघडले. बरं झालं माय, घर बरं भेटलं. नाहींतर माह्या या पिसाटाची काय गति झाली असती?

**माला :** कांही गति झाली नसती. चांगली सुखांत आहे तुही लेक.

**आई :** नसायास झालं काय? चांगलं पाहून पारखून स्थळ निवडलं. अर्ध्या वावराचा हुंडा देल्ला. तीन डाव बापानं पाह्यलं, दोन डाव लेकीनं पाह्यलं. आमच्या वेळीं—

**माला :** तुमच्या वेळीं काय होतं मज नाही ठाऊक. तुह्याबद्दल मात्र ठाऊक आहे.

---

१ गोडबोली.

दादाजी माहे किती चांगले आहेत. तुझ्याइतकं सुख दुसऱ्या कोणास कध्धी मिळालं नसल, अन् तुजही हें कबूल आहे. तुझ्याच तोंडून हज्जारदां म्या आइकलं....

**आई :** माझ्या तोंडून काय आइकलं बापा?

**माला :** *गोरीया जांवाई, विष्णूचं रूप साजे।*
*तुळस दिली पूजे, राजसबाळी सरू॥*
*चूडीयाच्या बळें, हात पुरवीन गंगना।*
*मेरू करीन ठेंगणा, राजस बाळी सरू॥*
*शेरभर सोनं, नाहीं माझ्या खातरींत।*
*ललाटीचं कुंकू, नीट पहातें भिंगांत॥*

हें झालं दादाजीचं. आतां राह्यली सासू. पण आजीबद्दलसुद्धां त्वां कित्येक डाव म्हटलं होतं :

**आई :** काय?

**माला :** *सासू कशी, माझी सासू कशी*
*निर्मळ गंगा काशी जशी*

आणखी सांगूं आई? रागो नको भरूं. तुज आठवते? आपण मामाकडे गोदीच्या लग्नास गेलों होतों अन् त्वां अन् मामी आह्मणे-उखाणे घेत घेत गागें म्हणत होत्या :

*ते कसे बाई ते कसे*
*देवघरांतले देव जसे*

**आई :** आतां मार खाशील माले तूं, तुझ्या जिभेस कांहीं हाडगीड! तुझ्या लेखीं मोठं काय अन् लहान काय? लाडाचं आलं पीक आन् बोलायचं कौतिक आत पिसे, आमच्या वेळेस साऱ्या गोष्टी नशिबाच्या होत्या. आमचं लग्न कसं झालं तें आम्हास टाऊक नाहीं. कोणी केलं, कोणाशीं केलं हें सुद्धां टाऊक नाहीं. सासरीं चाललं म्हणजे रडावं लागतं एवढंसुद्धां कळत नव्हतं आम्हास :

*सासरीं जातावेळीं, डोळ्यास नाहीं पाणी।*
*बाप म्हणे लेक गुणी, राजसबाळी सरू॥*

पण खरं सांगूं तुज माले ! माझ्या वेळेस आई रडली होती म्हणूनच मज रडूं आलं

*सासरीं जाते लेक, तिच्या डोळ्यास आली गंगा ।*
*माहिन्याची बोली सांगा, राजसबाळी सरू ॥*
*सासरीं जातांना, आजोळावरून वाट ।*
*मामा मावशीस भेट, राजसबाळे सरू ॥*

खरं म्हणजे सासरीं जातां मज तर खुशीच झाली होती. रस्त्यानं मामाचं घर लागन, मामा भेटल, मामी थालीपीठ खाऊ घालल. पण तेवढ्यांत कोण तरी म्हटलं :

*बापाजी बापाजी, धन्य धन्य तुमची छाती ।*
*काळजाचा धड, दिला परक्याच्या हातीं ॥*
*गोरीया जांवयानं डोंगरीं वस्ती केली ।*
*मैना कळपाची नेली, राजसबाळी सरू ॥*

असं म्हणतां म्हणतां कोणीतरी रडलं, तेव्हां कोठं मज वाटलं कीं कांहीं तरी वेगळं होऊन राह्यलं. आपण जातों तर खरं पण आपली आई कांहीं भेटणार नाहीं. मग माहा जीव घाबरला अन् जो रडूं आलं का सांगतां सोय नाहीं.

**माला :** आई, आज तूं कशा छान छान आठवणी सांगून राहिलीस. असं वाटतं की तुझ्या मांडीची करावी उशी अन् आयकावं बोलणं दिवसानिशी !

**आई :** दिवसानिशी तुह्याशीं बोलत बसूं अन् ते घरीं आले की मग चालल रुसूं रुसूं. चांगुलपणा तूं घेशील, वांगलं मज येईल. जाऊं दे मज. आज असं काहून वाटून राह्यलं कोणास टाऊक ! उद्यां तूं जाणार म्हणून मनाचा टाव सुटल्यासारखा झाला आहे. दुपारीं तूं झोपली होती. मी एकली होती....डोळ्यांत ढग येऊन बसले होते माह्या.

**माला :** ते गे कशासाठीं ? सासर माहा असं काय दिल्लीस आहे ? हांकेवरचं गांव, इथं बसीन तियं उतरीन; अन् आई, तुहं रडणं कसं बा ? माह्या लग्नाची तुजच लाग्नकी झाली होती अन् जांवाई पाहून तूंच तर हरखली होती. मारे म्हणत होती :

*गोरीया जांवयानं, तप केलं गंगेकाठीं ।*
*मालतीच्या रूपासाठीं, राजसबाळी माझी ॥*
*कासारादादा तूझी, बांगडी कांचाची ।*
*आहे नाजूक हाताची, मालनबाई माझी ॥*

(सई येते)

**सई :** अगो बया! मायलेकींचं बरं मेतकूट जमलं की! सारीं कवाडं सताड उघडीं. चोरानं येऊन घर धुवून नेलं असतं तरी पत्ता लागला नसता. मी म्हणतों मावशी, ही एवढी घोडमी,' अन् तिज तूं मांडीवर घेऊन थोपटून राह्यली. कांही नाहीं तर जनाची तरी खरी....!

**माला :** आई, कोण चोर घुसला हा? त्यास बाहेर काढाड आधी. चोर कायचा, भामटा आहे अन् खोटाड्या! बुहारीनं काल चांगलं कबूल केलं का सकाळपासून राह्यला येतों म्हणून अन् आता बोंबलीवर दिवा ठेवून दिवस बुडतां आली. कांहीं लाज नाहीं, शरम नाहीं. आई, तिच्याशीं बिलकुल बोलूं नको. जा म्हणा आल्या वाटेनं.

**सई :** आतां व माय! बापा बापा! जशी काय मी भेऊनच जाईन. सासूच लागून गेली जशी कांहीं! अन् मावशी, मी चोर असन नाहींतर भामटी असन. पण हें शिंगरू निमकहराम आहे. आतां तुज काय सांगूं? काल म्या चांगला पाट मांडला, आवणीवर ताट ठेवलं, रांगोळी कहाडली, चार उदबत्त्या लावल्या. चांगलं ताटभर खाऊं घातलं. माह्या घरचं पसाभर मीठ खाल्लं अन् आज माह्यावरच उलटली. बरं म्हणावं! मीहि पाहीन. एका एका मांडीवर दोन दोन बसूं दे मग पाहीन कसं घर सोडतें. मी तर दिवस बुडतां तरी आली, हिचं तर तोंडहि दिसणार नाहीं. येवढा गुमान कोणास दाखवते? टिकोबा टिकोबाईचा संसार. आली मनांत लहर का केलं जवळ माहेर! आई आठवली चालली माहेरा, दाह्या पाहिजे पळाली सासरा! डोळा दाखवायची ना नवऱ्यास उजागरी अन् बोट दाखवायची नाहीं सासूस शहाजोरी! तालेवार बापाची नवसाची लेक अन् मुठी मुठी भरून गुलाल फेक! बायकाइची जिंदगानी कशी असते तें कळायचं आहे अजून.

---

१ मोठी

**माला :** आई, सांग तिज का उगीच तोंड वाजवूं नको म्हणावं. खापराचं असतं तर फुटून गेलं असतं. अरबटाशीं[1] बोलगं अन् नाकानं कांदा सोलणं! एकदम उद्याच काढून नाहीं आली म्हणावं. नकटी तर नकटी, बोले छाकटी छाकटी.

**आई :** बाई सये, आज तवा चांगलाच गरम आहे बरं का! झोपेचं विसण पडलं तरी कांहीं निवला नाहीं. सांभाळ गे बये. तूंच बोल तिच्याशीं. लाडांत भिजव अन् खाटल्यावर निजव. मी चालली माझ्या कामास.

**सई :** थांब ग मावशी, मज का भेव[2] पडलं. मांजरीची गुरगुर ऐकून मी भेली असती तर लग्न करून वाघाच्या कठड्यांत हातच घातला नसता म्या. अन् रागावणार कोण? हें हुटुक? कौतुकाचं धिरडं करून खाऊं कोरडं! आत्तां आत्तांपर्यंत बजावतां बजावतां तोंड दुखत होतं साऱ्याइचं.

**माला :** विचार बरं आई, काय बजावत होती तें?

**आई :** पण मज काढून मधल्यामधे बळी देतां? तुम्ही दोघींस मी बरी सांपडली. हट रांडे, पट रांडे बस रांडे पालखींत, पालखीचा दांडा मोडला उतर रांडे खालती!

**माला :** सांग, सांग म्हणावं.

**सई :**
*किती मी सांगूं तुज, पदर घेई नीट।*
*गोरी नागीण लागे दीठ, मालनबाई माझी॥*

**माला :** (दरडावणीच्या सुरांत) सई!

**सई :**
*मोठे मोठे डोळे, जस आभाळाचे ढग।*
*दीठ लागेल खाली बघ, मालनबाई माझी॥*

**माला :** आई, पाहाव कशी खिजवते मज.

**सई :** आई, काढून आता? मीच पाह्यतों की!

*मैतर पुसती कारे गड्या तूं पिवळा।*
*घरीं राणीचा सोहळा, मालनबाई माझी॥*
*विडे करितां करितां चांद आला ग माथ्याशीं।*
*दिली कंथानं शाबाशी, मालनबाई माझी॥*

---

१ आडदांड २ भीति

*काळी चंद्रकला, काजळाचं बोट ।*
*घेणाऱ्याचं मन मोठं, मालनबाई माझी ॥*

मावशी, आतां पाहून घे कळी खुलली का पडली तें !

**आई :** मावशी चालली आतां चुलींत. तुम्ही जाणे, तुमचं काम जाणे, दोघी बहिणी मिळाल्या वाग घेऊन पळाल्या. (जाते.)

**सई :** *हेकोडी[1], तेकोडी, गोरीची आहे नीज ।*
*आडवी लावे भुज, कोण तो सांग बये ॥*

**माला :** माय माझे ! आतां तुझ्यापुढें नाक घासूं का लोटांगण घालूं ?

**सई :** लोटांगण नको घालूं, नाक घासशील तर शेंडा झिजल, नुसती भेट, कडकडून भेट. आतां राहूं दे या गोष्टी ! माले, तुझ्या गळ्याची आण घेऊन सांगतों, सकाळपासून निघूं निघूं करून राह्यली मी, पण एक ना एक निघतच होतं. हें करा अन् इथें मरा, तिकडे धावा, इकडे पळा, अन् त्यांतून भावजीची अन् वन्सची आजपासून परीक्षा सुरू, मी आली हेंच पुष्कळ झालं ! मग खरंच जाणार का तूं उद्यां ?

**माला :** खरं म्हणजे ? पंधरावडा झाला की येऊन ? तेवढ्यांत तीन पत्रं आले, आतांच्या पत्रांत सासूबाईचं पण नांव होतं. मग गेलं पाहिजे का नाहीं ?

**सई :** तेंहि खरंच म्हणा, सासुरवासणीचं जिणं आपलं, माही गती तर तुझ्याहून निपटारी[2]. जाणं तर भाग अन् जाऊशा तर वाटत नाहीं. देवानं आईबाप देल्ले अन् त्याहीच्या डोळ्यांत आपल्यासाठीं समुद्राचं पाणी देऊन ठेवलं. तें जेव्हां झरझरतं तेव्हां :

**माला :** सई, तेवढ्यासाठींच सकाळपासून तुही वाट पाहून राहिली मी. आज आईचं मन बिलकुल थाऱ्यावर नाहीं. जातां येतां सारखा डोळ्यास पदर लाऊन राह्यली. नाहीं नाहीं म्हणतां माहा भान सुटत आलं. सासरीं जायचं दुःख नाहीं ग, पण हा असा निरोप जेव्हां घ्यावा लागतो तेव्हां निरोप घेणाऱ्याची अन् निरोप देणाऱ्याची गती :

**सई :** खरं गे माय, इकडून गंगा अन् तिकडून यमुना. पूर येतो, ऊर भरतो. माले, सासर कितीहि सुखाचं असलं तरी मन कसं तगमग, तगमग :

---

१. वाकडीतिकडी. २. वाईट.

*मज ठाऊक असतें, लेकी जन्मा आलें नसतें।*
*सांबाच्या पिंडीवर, झाड बेलाचें झालें असतें॥*
*लेकीच्या जन्माला, नको घालूस देवराया।*
*मायबाईचा शीण, फुकट गेला वाया॥*

माहेर तुटत नाहीं अन् सासर सुटत नाहीं.

**माला** : म्हणूनच भेऊन राह्यली मी. उद्यां मी जाईयात्तर आई वेडीपिशी होऊन जाईल. अन् दादाजी बिचारे—

(दुरून आईची हाक)

**आई** : अग माले, एऽ सये. बाहेरून येगं झालं आहे. पाट मांडा बरं! अन् तुम्हीहि थोडंसं खाऊन घ्या. मग बसा तुमचे राग–लोभ, रुसवे–फुगवे काहाडत.

**सई** : आलों गे मावशी. चल बाई माले. जिवाचा होतो पिळा अन् तरी म्हणे गिळा. आईची अशी माया अन् उद्धरली काया. डोळां रडावं अन् ओठीं हंसावं. इथें तूट नाहीं, तिथें सूट नाहीं. चाल बये, चाल!

* *

*

# सासर-माहेर विषयक मराठी व अन्यप्रांतीय लोकगीतें

सौ. सविता जाजोदिया

सासर—माहेर! या दोन शब्दांत स्त्रीजीवनाची सारी बहुविधता सामावलेली आहे. एकच स्त्री पण सासरच्या व माहेरच्या अशा दोन्ही कुळांचें नांव तिला राखावें लागतें. पुरुषावर फक्त आपल्याच घराण्याचा नांवलौकिक राखण्याची जबाबदारी असते. पण स्त्रीवर ही जबाबदारी दुहेरी असते. आणि या दोन्ही जबाबदाऱ्या ती उत्कृष्टपणें पार पाडते म्हणूनच तिला खरी आदर्श गृहिणी म्हटलें जातें. त्यासाठीं स्त्रीला अनेक कष्टांमधून तावून सुलाखून बाहेर पडावें लागलें, तरी ती सारें कांहीं आनंदानें सहन करते :

*जातीसाठीं माती । खातें मी परोपरी ।*
*सासरीं माहेरीं । नांव करावं दुहेरी ॥*

एका भोजपुरी लोकगीतांतील, मर्यादेनें वागणाऱ्या सुनेची प्रशंसा करतांना तिची सासूदेखील हेंच म्हणते, "बड़े रे घरे के बिटिअवा दूनो कुलवा रखली हो राम।"—ती मोठ्या घराण्यांतील आहे, तिनें दोन्ही कुळांचा मान राखला आहे.

लोकगीतांच्या दृष्टीनें पाहिल्यास बाळराजाचें कौतुक करणाऱ्या जितक्या ओव्या, जितकीं गीतें आहेत तितकीं कन्येचें कौतुक करणारीं गीतें नाहींत. मराठींत लेकीचें कौतुक आहे; पण मुलाच्या कौतुकाच्या मानानें थोडें आहे. इतर प्रांतांमधून तर याहून कमी आढळतें. तेथें कन्येचें विवाहाच्या प्रसंगीं वधू म्हणून केलेलें कौतुक बरेंच आढळतें, पण तिच्या बाललीलांचें वर्णन फारसें आढळत नाहीं.

ऋग्वेदकालीं मुलांत व मुलींत फारसा उच्चनीच भाव मानला जात नव्हता. पण अथर्ववेदाच्या कालखंडांत मात्र 'मुलीला अन्यत्र दे आम्हांला पुत्र दे' अशी प्रार्थना करण्यांत येऊं लागली होती! 'व्याकरणकारांना एक मात्रालाघवानें पुत्र-जन्माइतका आनंद होतो' या म्हणीवरून देखील कन्येपेक्षां पुत्राचें महत्त्व अधिक वाटत होतें हेंच सिद्ध होत नाहीं का? हीच वृत्ति पुढें हळूहळू समाजांत बळावत गेली. राजस्थानांत व उत्तरेकडे या वृत्तीला ऐतिहासिक परिस्थितीची थोडीफार जोड मिळाली. मुसलमानी आक्रमणाच्या वावटळींच्या वेळीं मुलींना सुरक्षित राखणें जड जाऊं लागलें. सामाजिक परिस्थितीनेंहि ही वृत्ति जोपासण्यास हातभार लावला गेला. हुंड्याची प्रथा दिवसेंदिवस वृद्धिंगत होत गेली. आणि या सर्व गोष्टींचा परिपाक होऊन मुलींची उपेक्षा होऊं लागली. याचाच इतका अतिरेक झाला कीं, राजस्थानांत तर मुलींना मारून टाकण्यापर्यंत मजल गेली! दरिद्री राजपुताला मुलगी झाली कीं, लगेच तिला एका माठांत घालून तो माठ बंद करून जंगलांत नेऊन पुरून टाकीत असत!! तें अमानुष कार्य पुढें बंद पडलें तरी हुंड्याच्या प्रथेमुळें मुलींची अवहेलना होत राहिली. आणि मुली या गाईइतक्या दीनदुर्बल ठरल्या. त्यामुळें मुलींच्या बालपणाचें वर्णन, तिचें कौतुक; राजस्थान, गुजरात, उत्तर भारत, पंजाब, बिहार वगैरे प्रांतांतील लोकगीतांतून फारच थोडें आढळतें. मराठींत आईवडील मुलीचे जे लाड पुरवितात त्यांचें वर्णन करणाऱ्या कांहीं ओव्या आढळतात. उदा०—

*माते माते म्हणून मातेच्या पाठीं लागे*
*कुड्यांना मोतीं मागे उषाताई*
*बाप्पाजी हो बाप्पा लेकी फार म्हणूं नका*
*जसा चिमणुल्यांचा थापा उडुनी गेला*

लेकी म्हणजे चिमण्या! अगदीं हीच भावना राजस्थानी लोकगीतांतहि आढळते :

*मत दो म्हाँरी बाई नै गाळ*
*म्हाँरी बाई चिडोकली जी चिडोकली ॥*

*आ आज उड़ै परभात*
*तडकलै उड ज्यासी जी उड ज्यासी*
*सावणियै रा दिनडा च्यार*
*जँवाईडो ले ज्यासी जी ले ज्यासी ॥*

[आमच्या ताईबाईला कोणी रागावूं नका. ती काय चिमणी आहे. आज काय नि उद्यां काय, एके दिवशीं ती उडून जाणार आहे. चार दिवसांचा श्रावण आहे. खेळते आहे तोंवर खेळूं द्या. मग जांवई तिला घेऊन जाईल.]

पण लेक ही परक्याचें धन असली तरी रक्ताचें नातें केव्हांहि बलवत्तर असतेंच. सुख असो दुःख असो, लेकीसाठीं आईवडिलांचें हृदय तिळतिळ तुटतें, तसें कोणाचेंहि तुटत नाहीं. इतर सर्वांचे उपकार काडीकाडी करून फेडतां येतात पण नऊ महिने निरीआड ओझें वागविणाऱ्या मायबाईचे उपकार हाडोहाडीं खिळलेले असतात, ते कसे फेडणार? ही मायबाई तळहातांचा पाळणा व नेत्रांचा दिवा करून लालनपालन करते. तिच्याजवळ सारे हट्ट पुरे होतात, तिच्या छत्रछायेखालीं मनमोकळेपणानें नाचतां बागडतां येतें. श्रावण आला कीं, कामकाज सगळें फेकून देऊन मैत्रिणींबरोबर झोके घ्यायला मिळतात ते तिच्याच घरीं! एका राजस्थानी गीतांत याचें मोठें सुरेख वर्णन आलेलें आहे. एक सासुरवाशीण सासरच्या मैत्रिणीजवळ आपल्या माहेरच्या सुखाचें वर्णन करते :

*सहेल्यां, मनमें बैआ ऐ*
*मन मांय आवै, ऐ सहेल्या, मनमें आवे*
*कदेयक तो म्हे पीवारियामें नित उठ मौज उडाय*
*मायड़ म्हांन गले लगाती बाबो सा लाड लडाय*
*पोर चढ्यां दिन माय जगाती सूती गुदडाँ माय*
*आंख धोय म्हारो मुखड़ो धोती वै पल वित्या जाय*
*दही मांड्यो कर्यो ऐ कलेवो गुडियां लीनी काढ*
*सात सहेली खेलण आयी म्हारा आंगण मांय*
*छाक भयी माय करी रसोई दीनो थाल लगाय*
*जद बाबोसा जीमण लाग्या लीनो हेलो मार*
*सहेल्या वै दिन वीत्या ऐ, सहेल्या, म्हारे मनमें आवै ऐ*

[—मैत्रिणींनो, मला आपल्या बाबांचें घर आठवतें. माहेरीं मी किती आनंदानें राहात असें. आई मला उराशीं लावीत असे, बाबा कोडकौतुक करीत असत. मी

आरामांत बिछान्यावर झोपून रहात असें, दिवस उगवला म्हणजे मग आई मला उठवीत असे. त्यानंतर ती माझें तोंड धूत असे. ते दिवस गेले. दह्यादुधाची न्याहारी आई माझ्यासाठीं तयार ठेवीत असे. त्यानंतर लगेच मी बाहुली बाहेर काढीत असें. सात मैत्रिणी खेळायला येत आणि अंगणांत बसून आम्ही खूप खेळत असूं. आई स्वयंपाक करीत असे. स्वयंपाक तयार झाला म्हणजे ताटें वाढीत असे. वडील जेवायला बसले कीं, मलाहि हांक मारीत असे आणि मग मीदेखील त्यांच्याच बरोबर जेवायला बसत असें. सख्यांनो, ते दिवस मला सारखे आठवतात. गेले ते दिवस!]

माहेरीं हा असा आराम असतो, सुख असतें, म्हणूनच सासुरवाशीण बापडी म्हणते :

*देवबाप्पा नको देऊं धन तूं दौलत*
*द्यावं माहेर खेळाया मायबापाच्या सावलींत*

आईवडिलांच्या सांवलींत नाचणारी बागडणारी ही मैना देवाजवळ आणखी एक मागणें मागते. तें म्हणजे एक तरी भाऊ असावा. आईवडिलांच्या निरपेक्ष मायेंत ती न्हाऊन निघत असते. तरी पण पाठीशीं उभें रहायला, मनींचें गुज बोलायला, जिव्हाळ्याच्या गोष्टी करायला आणि कटु सत्याच्या जाणीवेनें म्हणायचें तर आईवडिलांच्या नंतर माहेरपणासाठीं भाऊ हा हवाच! ऋग्वेदांत भाऊ नसलेल्या बहिणीस कमी समजलेलें आहे. मनुस्मृतींत तर म्हटलेलें आहे कीं, जिला भाऊ नसेल तिच्याशीं लग्न करूं नये! मराठी मायबहिणींनींहि म्हटलेलें आहे :

*ये रे ये रे भाऊ किती झालें दडपण*
*कधीं हृदय उघडीन तुझ्यापुढें*

दळण दळतांना अशा वेळीं अश्रू वाहूं लागतात. या संदर्भात रुद्ध कंठानें 'व्रज'ची बहीण म्हणते :

*आले से जौं कौ री माँ मेरो पीसनौं*
*कोई रोय रोय पीसे चून*
*जनी ते कहियो री*
*मेरो विरन मोय ले जाय*
*जनी ते कहियो री*

[ओव्या जत्यांचें दळण मला दळावें लागतें. कुणी रडत रडत पीठ दळत आहे. भावाला सांगा तरी मला घेऊन जाईल.]

चंबा प्रदेशांतील एका लोकगीतांतहि बहीण, वैशाखांत येणारा 'वैशाखी' हा सण आला असतां माहेरीं निरोप धाडते कीं, मला घेऊन जाण्यासाठीं भावाला पाठवा :

*पंजे दा सत्ते अम्मा विशू आया,*
*हो विशू तिहारे भिंजो सद्दे हो ।*
*दाही ता होली मेरी अम्मड़ी जो,*
*हो भाऊए जो सहणा भेजे हो ।*
*पिन्दड़ी ता पिन्दड़ी सस्सु कम्पु खाई,*
*हो पिन्दड़ी रे पट्ठे भिंजो देत्ते हो !*

हजारीबाग जिल्ह्यांतील बहीणदेखील कास (विशिष्ट जातीचें गवत) उगवूं लागते तेव्हां वडिलांच्या व भावाच्या आगमनाची आतुरतेनें वाट पाहते :

*कँसिया जे अँरड़लै,*
*अब आशा लगलै*
*सजनि गे !*
*भैया-बाप ऐसें लेनिहार*

पण वडील आणि भाऊ कांहीं कारणास्तव येत नाहींत. तेव्हां निराश होऊन, ते आपल्याला विसरले म्हणून बहीण त्यांना 'बेइमान' म्हणते :

*कँसिया जे फूटलै*
*अब आशा टूटलै*
*सजनि गे !*
*भैया-बाप भेलै बेईमान !*

गुजराती बहीणदेखील भावाला निरोप सांगून त्याला आपल्या घरीं पाठविण्यासाठीं माहेरच्या गांवीं जाणाऱ्या एका प्रवाशाला विनविते :

*म्हारा महियरियाना पंथी*
*सन्देशो म्हारा वीर ने केजे*

*दूर बसे छे तारी व्हेनड़ी*
*संभारणूँ शूँ न रह्युं रहेजे*
*म्हारा महियरिना पंथी.*
*व्हाणला वीत्यां कैक मासनां*
*तो ये ना साँवरे शुँ व्हनी*
*कामन कीधां शुं भाभलड़ीए रानी*
*म्हारा महियारियाना पंथी.*
*के व्हाल सोयां बालुड़ानी संगे*
*विसारी मूकी शूं त्हारी व्हेनड़ी*
*बाट जोऊं न्यालं पन्थने हुं*
*आवे म्हारो वीरो हुं घेलड़ी*
*म्हारा महियरियाना पंथी.*
*आव्या रूड़ा पर्वणी ना दिन ने*
*ना, व्यां वीरा कई त्हारा संभारणां*
*संभारजे वीरा कदिक व्हेनी ने*
*ले ले व्हेनीनां मन भर वारणां*
*म्हारा महियरियाना पंथी.*

[माझ्या माहेरच्या प्रवाशा, माझ्या भावाला माझा निरोप सांग—तुझी बहीण दूरच्या गांवीं राहाते. तूं तिला विसरलास काय? कित्येक दिवस होऊन गेले, महिने होऊन गेले तरी तूं तिची विचारपूस केली नाहींस. वहिनीनें अशी कोणती जादू केली? का मुलाबाळांत रंगून तूं तुझ्या बहिणीला विसरलास? मी केव्हांची वाट पाहात आहें कीं, माझा वेडीचा भाऊराया कधीं येईल? सणाचा मंगल दिवस आला; पण तुझें कुशलमंगल कळलें नाहीं. भाऊराया, कधीं तरी बहिणीची विचारपूस करीत जा, तुझ्या बहिणीनें मनःपूर्वक दिलेले आशीर्वाद घेत जा. माझ्या माहेरच्या प्रवाशा, एवढा निरोप तूं माझ्या भावाला जरूर सांग.]

या गुजराती बहिणीच्या मनांत शंका आली कीं, भावजयीनें जादू केली म्हणूनच भाऊ विसरला का? भाऊ आला नाहीं कीं मराठी बहिणीलाहि असाच आपल्या वहिनीचा संशय येतो :

*तुला आळवीत बैसल्यें होत्यें दादा*
*काय वयनीच्या नादा गुंतलासी*

राजस्थानी कन्येलाहि असेंच वाटतें, "कै बडगोतण भावज बरजिया जे"—तुला मोठ्या घराण्यांतील भावजयीनें तर अडविलें नाहीं ना? बहिणीला असा संशय वाटण्याचें कारण म्हणजे भावजयांना नणंदा नकोशा वाटत असतात. अशा वेळीं इतरहि अनेक शंकाकुशंका मनांत येतात. पण तेवढ्यावरून कांहीं बहीण रागावून बसत नाहीं. ती वाऱ्याला निरोप सांगायला पाठविते. कावळ्यालाहि ती संदेशवाहक करून भावाकडे पाठविते. यक्षानें मेघाला दूत बनविलें, आमच्या मायबहिणींनीं वाऱ्याला, कावळ्याला, दूत बनविलें :

| | |
|---|---|
| *अरे अरे वाऱ्या* | *धांवशी लांबलांब* |
| *बहिणीचा निरोप सांग* | *भाईरायाला* |
| *कावळ्या कावळ्या* | *लांब जाई रे उडून* |
| *येई निरोप सांगून* | *भाईरायाला* |

ज्या सासुरवाशिणीला सासरीं छळ सोसावा लागतो, तिचें लक्ष माहेरीं लागलेलें असतेंच; पण जिला सासरीं सुख असतें, तिलाहि माहेराबद्दल नैसर्गिक ओढा वाटत असतो. पण नित्य उठून कांहीं पत्र लिहिणें शक्य होत नसतें व तें योग्यहि वाटत नसतें. तेव्हां मग मनांतल्या भावना काव्यमयतेनें पक्ष्यांना उद्देशून बाहेर पडतात. पांखरांना त्या विनंती करतात :

| | |
|---|---|
| *रुणूझुणू पांखरा* | *जा माझ्या माहेरा* |
| *कमानी दरवाजा* | *त्यावर बस जा* |
| *सांग माझ्या आईला* | *न्या मला माहेरा* |

राजस्थानी रमणीदेखील पक्ष्याला आपल्या माहेरचा पत्ता समजावून सांगते :

*उड़ रे कागा पीवर जाय*
*ऊँची सी मैड़ी लाल किंवाड़ी*
*अमवारो पेड झिलोला खाय, उड़ रे कागा....*
*चौक बुहारत भावज मिलसी,*
*आंगण बैठी मिलसी माय, उड़ रे कागा....*
*पणिया भरती बहुयड़ मिलसी,*
*वीरो मिलसी झोका मांय, उड़ रे कागा...*
*गाडी ल्यावन्ता बाबा मिलसी,*
*हुका पीवता दादो पोल्या, उड़ रे कागा...*

*खीचड़ी करती भूवा मिलसी,*
*मिलसी राम रसोस्यां माय, उड़ रे कागा....*
*अमवा पे बैठी बोल सुनाईये,*
*सांवण आयो धीवड़ बुलाय, उड रे कागा...*

[कावळ्या, उडून माझ्या माहेरीं जा. तेथें बघ उंच ओट्यावर लाल दरवाज़ा आहे, आंब्याचा वृक्ष डुलत असतो, तेथें तुला चौकांतील केर काढतांना भावजय दिसेल, आई अंगणांत बसलेली असेल, पाणी भरणाऱ्या सुना दिसतील, भाऊ बैठकींत असतील, गाडी आणणारे बाबा भेटतील, हुक्का ओढीत बसलेले आजोबा भेटतील, स्वयंपाकघरांत खिचडी करीत असलेली आत्या दिसेल. अशा घरीं तूं जा आणि आंब्याच्या झाडावर बसून निरोप सांग—श्रावण आला आहे, तेव्हां लेकीला माहेरीं बोलावून घ्या.]

मराठी व राजस्थानी लोकगीतांत हें निरोप पोहोंचविण्याचें महत्त्वाचें काम कावळ्याला मिळण्याचें मुख्य कारण म्हणजे फार पूर्वीपासून आपल्याकडे समज आहे की—'नराणां नापितो धूर्तः पक्षिणां चैव वायसः।' माणसांमध्यें न्हावी व पक्ष्यांमध्यें कावळा चतुर समजला गेला आहे. त्यामुळें बहीण त्याच्यावर माहेरीं निरोप सांगण्याचें काम सोंपविते.

उत्कल मधील बहीण मात्र कोकिळेच्या हातीं निरोप पाठविण्याची काव्यमयता दर्शविते :

*कोइलि लो*
*मोह पांइ उड़ि उड़ि यिबु*
*मो बहु ननांकु कहि*
*मान उद्धरिबुलो—कोइलि ॥ १ ॥*

*कोइलि लो*
*बोड येवे जन्म करिथान्ता*
*सते न देखिले मोरे*
*सपने देखन्ता लो—कोइलि ॥ २ ॥*

*कोइलि लो*
*सपनरे कहन्ता ननांकु*
*बिकल हे उछि मन*
*आणन्त झिअकु लो—कोइलि ॥ ३ ॥*

*कोइलि लो*
*नना येबे जन्म करिथान्ते*
*कान्धे छता हाते बाड़ि*
*संखोलि आसन्ते लो—कोइलि ॥ ४ ॥*

*कोइलि लो*
*भाईना मो राढ़ पज कला*
*छः मासक कण्ट करि*
*वरषे रहिला लो—कोइलि ॥ ५ ॥*

[हे कोकिळे, माझ्यासाठीं म्हणून तूं उडत उडत जा आणि माझ्या आईला व बाबांना सांग कीं, सासरीं माझा मान ठेवा.

कोकिळे, माझी आई जर खरंच माझी जन्मदात्री असती, तर मला प्रत्यक्ष न कां होईना, स्वप्नांत तरी तिनें पाहिलें असतें.

कोकिळे, माझे बाबा जर खऱ्या अर्थी माझे पिता असते, तर त्यांना स्वप्नांत कां होईना, सांगितलें असतें कीं, 'माझें मन व्याकुळ झालें आहे, लेकीला घेऊन जा.'

कोकिळे, पित्यानें जन्म दिला असता तर खांद्यावर छत्री ठेवून व हातांत काठी घेऊन ते मला घेऊन जाण्यासाठीं नक्कीच आले असते.

कोकिळे, भावालादेखील घमेंड झाली आहे. सहा महिन्यांनीं येईन असें सांगितलें होतें. पण वर्ष झालें तरी आला नाहीं.]

हे सर्व निरोप पोहोंचून म्हणा किंवा अंतरीची आर्त हांक भावापर्यंत पोहोंचून म्हणा, पण भाऊ बहिणीकडे येतो तेव्हां त्याच्यासाठीं काय करूं नि किती करूं असें तिला होऊन जातें. ती लगबगीनें त्याच्या जेवणाची तयारी करते :

| | |
|---|---|
| *सोनसळे गहूं* | *रवा येतो दाणेदार* |
| *फेण्यांचे जेवणार* | *भाईराज* |
| *माझ्या घरीं पाहुणा* | *सये भाजीभाकरीचा* |
| *जेवणार साखरेचा* | *भाईराज* |

सोनसळे गहूं घेऊन, त्याचा रवा काढून बहीण भावासाठीं फेण्यांचें जेवण तयार करते. **राजस्थानी** लोकगीतांतील बहीणदेखील भाऊ येतो, तेव्हां अगदीं आनंदानें त्याच्यासाठीं स्वयंपाक तयार करते :

*एके रँधावा, वीरा, लापसी*
*दूजे रे तळाँ रे कसार ॥*
*तीजे रँधावा, वीरो खीचड़ो*
*चोथे चँदेले रो साग ॥*

—बहीण भावासाठीं लापशी बनविते व 'कसार' तळून काढते. खिचडी व चवळीची भाजी करते.

एका **भोजपुरी** लोकगीतांत वर्णन आहे कीं, भावाला येतांना पाहून बहीण आपल्या सासूबाईंना विचारते कीं, "स्वयंपाक काय करूं?" सासूबाई कुचकटपणें उत्तरतात "कोठारांत 'कोदो' सडत आहे त्याचा भात बनव. आणि शेताच्या बांधावर जो भाजीपाला उगवला आहे त्याची भाजी कर." भावासाठीं असल्या नासक्या-कुसक्या जिन्नसांचें जेवण तयार करावयास सांगितलें म्हणून सुनेस राग येतो. चिडून ती म्हणते, "आग लागो तुमच्या कोदोला आणि वज्र पडो तुमच्या भाजीपाल्यावर!" ती मैदा चाळून त्याच्या पुऱ्या करते, पालकची भाजी करते, मुगाची आमटी करते आणि आंबेमोहोर तांदळाचा भात शिजविते. सोन्याच्या ताटांत जेवण वाढते आणि भातावर तुपाची भरपूर धार सोडते.

भाऊ आला कीं बहिणीची एकच गडबड उडते. त्याचा व्यवस्थितपणें पाहुणचार व्हावा, स्वागत व्हावें असें तिला मनापासून वाटतें. तिच्या दृष्टीनें तो साधासुधा पाहुणा नव्हे तर ज्याच्यामुळें तिच्या पित्याचा वंशवेल वाढत असतो, ज्याच्यामुळें माहेरीं जातां येतें व दोन घडी विसावा मिळतो आणि ज्याच्यावरून सारें कांहीं ओवाळून टाकावें असें वाटण्याइतका तो महत्त्वाचा पाहुणा असतो. पण सासरीं आपल्या मनासारखा भावाचा पाहुणचार करणें शक्य होतेंच असें नाहीं. कितीदां तर :

*शेवया वोटव्यांनीं भरती उतरंडी आगाशीं*
*भाऊ चालला उपाशी*
*घरीं वासाचे तांदूळ काय करतां असून*
*सासुरवाशी ग भैन*

अशी वेळ येते, पण, कधीकधीं रक्ताचें नातें बहिणीला यावेळीं गप्प बसूं देत नाहीं. आणि सासरच्या माणसांनीं पाहुणचार केला नाहीं तरी ती मात्र तिला शक्य तेवढें केल्याखेरीज रहात नाहीं. उदा०—हजारीबाग जिल्ह्यांतील एका

लोकगीतांत वर्णन आहे. बहिणीचा भाऊ आला असतां तिची सासू बसावयाची खाट लपवून ठेवते. पण बहीण मुळुमुळु रडत न बसतां धीटपणें म्हणते कीं, 'भावाला बसायला देण्याची खाट लपवून ठेवली म्हणून काय झालें? मी भावाला जमिनीवर थोडीच बसूं देणार आहें? त्याच्यासाठीं पदर आंथरीन व त्यावर त्याला बसवीन :

*नुकाव ऽ—नुकाव ऽ सासू !*
*आपन खटोलना रे ना,*
*सासू ! भैया क' हम ऽ*
*अँचरे बैठैबै रे ना ।*

पण सासू किंवा सासरची मंडळी एवढ्यावरच थांबत नाहींत. सुनेच्या माहेरच्या मंडळींचा, त्यांतल्या त्यांत म्हणजे भावाचा अपमान करतात आणि आपला तोरा दाखवितात. सुनेला सहजासहजीं कधींहि माहेरीं पाठवीत नाहींत, बरीच खळखळ करतात. मराठींत या वृत्तीचा सुंदर आविष्कार करणारें एक लोकगीत आढळलें, तें असें :

*चांदीचा कुळव सोन्याची पाभार*
*पाटील गेले पेरायाला, पेरायाला ।*
*"बंधुजी आले न्यायाला,"*
*"कुणाची वस्ती कुणाला पुसती,*
*पूस जा आपल्या सासूला सासूला !" ॥ १ ॥*

*सोन्याची कातवट चांदीचं उचाटणं ।*
*सासूबाई बसल्या भाकरीला ।*
*"बंधुजी आले न्यायाला, न्यायाला,"*
*"कुणाची वस्ती कुणाला पुसती,*
*पूस जा आपल्या जावेला" ॥ २ ॥*

*चांदीची घागर सोन्याची चुंबळ ।*
*जाऊबाई गेल्या पानवठ्यावर ।*
*"बंधुजी आले न्यायाला न्यायाला,"*
*"कुणाची वस्ती कुणाला पुसती,*
*पूस जा आपल्या दीराला" ॥ ३ ॥*

सोन्याची देऊत मोत्यांचा ग टाक ।
भाऊजी बसले लिहायला ।
"बंधुजी आले न्यायाला,"
"कुणाची वस्ती कुणाला पुसती,
पूस जा आपल्या नवऱ्याला" ॥ ४ ॥

सोन्याचा चौरंग चांदीची परात ।
घरधनी बसले जेवायला ।
"बंधुजी आले न्यायाला, न्यायाला,"
"केळीचा बाग लावीन, मग तुला माहेरा धाडीन
पेरूचा बाग लावीन, मग तुला माहेरा धाडीन." ॥ ५ ॥

सासरच्या प्रत्येक माणसानें केलेली ही टोलवाटोलवी एका **राजस्थानी** लोकगीतांतूनहि आढळते :

वीरो तो आयो सैयाँ अथइयाँ
व्याईजी नै लटक जुहार
मेलो तो मेलो व्याईजी बैन ने
आयी बाई रे पैले सावण री तीज ॥

म्हाँने तो ठीक नहीं भोळा व्याईजी
पूछो थाँ री व्यायणजीने बात ॥

वीरोजी तो आयो सैया रसोवडे
सगीजी सूँ लटक जुहार
मेलो तो मेलो सगीजी बैन ने
आयी बाई री पहली सावण री तीज ॥

म्हाँने तो ठीक नहीं भोळा व्याईजी
पूछो थाँ रा बैनोई ने बात ॥

ऊँचे तो मगरे बैनोई हळ खड़े
बहन करैं अडसूळ
मेलो तो मेलो बैनोईजी बैन ने
आयी बाई री पहले सावण री तीज ॥

*म्हारें तो मेळ्याँ साळाजी नहिं सैरे*
*घरे छै खेती रो काम*
*सोळै तो बळदाँ रो साळा नीरबो*
*आठ हाळ्याँ रो भात ॥*

[भाऊ बैठकींत आला आणि व्याह्यांना नमस्कार करून त्यानें विनंति केली, "ताईच्या लग्नानंतरच्या पहिल्या श्रावणाची तीज आली आहे तेव्हां तिला माहेरीं पाठवा." व्याह्यांनीं उत्तर दिलें, "मला बरें नाहीं. तेव्हां मला विचारण्यापेक्षां तुमच्या विहीणबाईंना विचारा." भावानें विहीणबाईंना विचारलें तेव्हां त्यांनींदेखील तेंच उत्तर दिलें, "मला बरें नाहीं. तुमच्या मेहुण्यालाच विचारा." भाऊ मेहुण्यांना विचारण्यासाठीं जातो. त्यावेळीं ते शेतांत नांगरणी करीत असतात. बहीणहि तेथें जवळच निंदणी करीत असते. मेहुणे भावाला सांगतात—"तुमच्या बहिणीला पाठवितां येणार नाहीं. कारण घरीं शेतीचीं कामें आहेत. सोळा बैलांना चारा घालण्याचें व आठ शेतकऱ्यांना भाकऱ्या वाढण्याचें काम आहे."]

अगदीं याच अर्थाचें एक लोकगीत आपल्याला **नेपाळी** भाषेंतहि आढळतें. तें संपूर्ण गीत असें आहे :

*वर्ष दिनका तीजमा भैया लिन आएका,*
*पठाउनुस् न राजै ! माइत बरिले ।*

**पति :** *त्यो कुराको हामीलाई मालुम छैन,*
*तिम्रा ससुरालाई विन्ति चढ़ाऊ ।*

**सून :** *खटियामा बसेका ससुरा हाम्रा,*
*हामीलाई माइत पठाउने कि नाहीं ?*

**सासरे :** *त्यो कुराको हामीलाई मालुम छैन,*
*तिम्री सासूलाई विन्ति चढ़ाऊ ।*

**सून :** *भान्सैमा बसेकी सासू बज्यै हाम्री,*
*हामीलाई माइत पठाउने कि नाहीं ?*

**सासू :** *त्यो कुराको हामीलाई मालुम छैन,*
*तिम्रा जेठाज्यूलाई विन्ति चढ़ाऊ ।*

**सून :** *पाठशालामा बसेका जेटाज्यू हाम्रा,*
*हामीलाई माइत पठाउने कि नाहीं ?*

**थोरले दीर :** *त्यो कुराको हामीलाई मालुम छैन,*
*तिम्री जेठानीलाई विन्ति चढ़ाऊ।*

**सून :** *खोपामा बसेकी जेठानी हाम्री,*
*हामीलाई माइत पठाउने कि नाहीं ?*

**थोरली जाऊ :** *त्यो कुराको हामीलाई मालुम छैन*
*तिम्रा देवरलाई विन्ति चढ़ाऊ*

**सून :** *गोठमा बसेका देवर हाम्रा,*
*हामीलाई माइत पठाउने कि नाहीं ?*

**धाकटा दीर :** *त्यो कुराको हामीलाई मालुम छैन,*
*तिम्री देवरानीलाई विन्ति चढ़ाऊ।*

**सून :** *ढिकीमा बसेकी देवरानी हाम्री,*
*हामीलाई माइत पठाउने कि नाहीं ?*

**धाकटी जाऊ :** *त्यो कुराको हामीलाई मालुम छैन,*
*तिम्रा स्वामीलाई विन्ति चढ़ाऊ*

**सून :** *खटियामा बसेका स्वामी राजै हाम्रा,*
*हामालाई मइत पठाउने कि नाहीं ?*

**पति :** *आज पनि माइत, भोलि पनि माइत,*
*त्याउन आमै मुँगरो फोर्छु तिगरी।*

**सून :** *यति खेर मेरा बावै कपड़ा कोठी खोल्दा हूँ।*
*कति रै छु अभागिनी बिचै मरै नी।*

**सासू :** *लाउन दिने ससुरा खान दिने मै छु,*
*न रोऊ न रोऊ मेरी वहू माईत संझेर।*

**सून :** *खटियामा सुतेको कोपरामा चुठेको,*
*कैले हुन्थ्यो मेरी बज्यै माइतघर जस्तो।*

या गीताचा थोडक्यांत अर्थ असा आहे—वर्षाची तीज आली आहे. भाऊ न्यावयास आला आहे. तेव्हां सून पतीस विचारते कीं, 'मला माहेरीं पाठवितां का?' पति उत्तरतो, 'तें मला कांहीं ठाऊक नाहीं. तुझ्या सासऱ्याला विनंती कर.' खाटेवर बसलेल्या सासऱ्यांना सून विचारते. ते उत्तरतात, "मला माहीत नाहीं, तुझ्या

सासूला विनंती कर." सून सासूला विचारते, ती थोरल्या दिराला विचारण्यास सांगते. थोरले दीर थोरल्या जावेस विचारण्यास सांगतात, थोरली जाऊ धाकट्या दिरास विचारण्यास सांगते, धाकटे दीर धाकट्या जावेस विचारण्यास सांगतात आणि धाकटी जाऊ सुनेस सांगते, 'तुझ्या पतीलाच विचार.' सून पतीस विचारते. तो म्हणतो—'तूं माहेरीं जायचें म्हणतेस. थांब, हातोडी घेऊन तुझें तंगडेंच मोडतों.' तेव्हां सुनेस अतिशय वाईट वाटतें. ती म्हणते, 'तुमचे कपडे, दागदागिने मला कांहींएक नको. माझं नवीबच फुटकं आहे.' त्यावेळीं सासू तिची समजूत घालते, "तुला दागदागिने देणारे तुझे सासरे आहेत, जेवण देणारी मी आहें! तूं रडूं नकोस. 'सासर'लाच माहेर समजून रहा." यावर सून उत्तरते—"सारीं सुखें असलीं, समृद्धता असली तरी सासर हें कधींहि माहेर होऊं शकणार नाहीं."

या सर्व लोकगीतांचें साम्य उल्लेखनीय आहे. मात्र यांतून सासरची मंडळी सुनेस पाठवीत नाहींत एवढेंच वर्णन आहे. पण एका **कुमाऊँनी** लोकगीतांत तर याच्याहि पुढचें वर्णन आहे. गीताचा सारांश असा आहे—सादो नांवाचा मुलगा असतो. त्याच्या बहिणीचें तो लहान असतांनाच लग्न झालेलें असतें. लग्नानंतर बहिणीला एकदांहि माहेरीं जाण्यास मिळालेलें नसतें. सादो मोठा झाल्यावर शोध करीत करीत बहिणीच्या सासरीं पोहोंचतो. बहीणभाऊ कित्येक वर्षांनीं पहिल्यांदांच भेटतात. अश्रूंचा पूर ओसरल्यावर भाऊ बहिणीस माहेरीं नेण्याची परवानगी मागतो. सासरची मंडळी सुनेस माहेरीं जाण्याची परवानगी तर देत नाहींतच पण बहीणभाऊ दोघांनाहि विष घालून मारून टाकतात.

सासरची मंडळी सुनेस माहेरीं पाठवीत नाहींत यास मुख्य कारण म्हणजे ती जर माहेरीं गेली तर ती करीत असलेलीं सारीं कामें खोळंबून राहतील. सून रात्रंदिवस मरमर कामें करीत असते. तेव्हां तिलाच जर माहेरीं जाऊं दिलें तर काम कोण करणार? मराठी ओवीनें अगदीं मोजक्या शब्दांत पण मोठ्या मार्मिकपणें या परिस्थितीची दखल घेतलेली आहे.

*सासुरवाशिणी तूं ग वाड्यांतला बैल*
*कधीं रिकामी होशील उषाताई*

रात्रंदिवस काम! काम!! काम!!! कांहीं हौस नाहीं, खेळायची मौज नाहीं. इतरांनीं मौज करावी पण सासुरवाशिणीला कांहीं करायला मिळूं नये :

***चौघे दिर माझे नांदती***
***कौलारि घर बांधती***

*सासु माझी ग सागर*
*नित घाली करकर*
*नणंदा माझ्या ग हाणकारणी*[1]
*उठून टोला*[2] *देती*
*धाकली जाऊ माझी सुखवासी*
*कामाला हात न्हाई लावत*

इतकेंच नव्हे तर :

*भूक लागे माझ्या पोटां परवंटा देत्यें गांठीं*
*तुमच्या नांवासाठीं बाप्पाजी हो*

काम करावें लागतें तें लागतेंच पण पोटभर जेवणदेखील मिळत नाहीं. हेंच वर्णन **राजस्थानी** लोकगीतांतूनहि आलेलें आहे :

*बीजोड़ी बीजोड़ी, ए मा, झूलण नै जाय*
*बाई नै दीनो सासू धानड़ सांवणो*
*सोयो, सोयो, मा, डाल दो डाल*
*अधमण सोयो बाजरो.*
*बीजोड़ी, ए, मा, मगरियै जाय*
*बाई नै दीनो सासू पीसणो*
*पीस्यो, पीस्यो, ए मा, डाल दो डाल*
*अधमण पीस्यो बाजरो.*
*बीजोड़ी, बीजोड़ी, ए मा, रमबा नै जाय*
*बाई ने दीनो सासू पोवणो*
*पोयी पोयी, ए मा, जेट दो जेट*
*पछलो पोयो बाळू रो बाटियो.*
*निमट्या निमट्या, ए मा, देवर जेठ*
*निमट्या नणंदाँ रा झूलरा*
*परस्या परस्या, ए मा, मोटोडा थाळ*
*परस्या नणंदाँ रा वाटका.*

---

१ नाश करणाऱ्या, हानि करणाऱ्या. २ टोमणा.

बीजोड़ा ने, ए मा, परस्याँ गवाँ रा रोट
बीई नै परस्यो बाजर बाटियो.
बीजाड़ाँने, ए मा, धोबाँ धोबाँ खाँड
बाई नै दीनी सासू चिमठी लूण री
बीजोड़ाँ ने, ए मा, चरी चरी धीव
बाई नै दीनो ए सासू डोरो तेल रो
ओरिये–ओरिये देवर नै जेठ
पड़वै नणदाँ रो झूलरो
वरसै वरसै, ए मा मोरी, मेह
भीजै भायां री बहनड़ी.
माँज्या माँज्या, ए मा, मोटोड़ा थाळ
माँज्या नणँदा रा वाटका
सोवतडी, ए मा, बाजर बाटियो
आण नै मिनड़ी लै गयी.
मरज्यो मरज्यो, ए मिनड़ी, थारोड़ा पूत
म्हारोड़ो बाटियो तूँ ले गयी
राताँ री निरणी वीराँ री बहनड़ी

[आई, सर्वजणी झोके घ्यायला जात आहेत. पण मला मात्र माझ्या सासूनें धान साफ करायला दिलें. एकदोन टोपल्या भरून धान मीं साफ केलें, आणि अर्धा मण बाजरी निवडली. इतर सर्वजणी जत्रेला जात आहेत पण मला मात्र सासूनें दळण दळायला दिलें. एकदोन टोपल्या भरून धान्य व अर्धा मण बाजरी मीं दळली. इतर सर्वजणी खेळायला जात आहेत. पण मला सासूनें पोळ्या करायल्या लावल्या. दोन ढीग होतील इतक्या पोळ्या व बाट्या मीं केल्या. (बाटी—गव्हाच्या पिठाचे वाटीच्या आकाराचे गोळे करून ते राखेंत भाजून काढतात. पोळ्यांऐवजीं कित्येकदां आमटी व या बाट्या खातात. दाल-बाटी—खास राजस्थानी पदार्थ.) सगळ्या दिरांचें जेवण झालें, नणंदांची पंगतहि जेवून उठली. सर्वांसाठीं मी मोठालीं ताटें लावलीं होतीं, व नणंदांसाठीं मोठाल्या कटोऱ्यांमध्यें वाढलें होतें. इतर सर्वांना गव्हाच्या पोळ्या वाढण्यांत आल्या पण मला मात्र बाजरीच्या भाकरीचा तुकडा मिळाला. इतरांना मुठी भरभरून साखर मिळाली पण मला मात्र सासूनें चिमुटभर मीठ फक्त दिलें. इतरांना पळ्या भरभरून तूप वाढलें

पण मला मात्र तेलाची थोडीशी धार घातली. दीर सगळे महालांत झोपले व नणंद पडवींत झोंपल्या. पाऊस पडूं लागतो आणि भावांची बहीण मी मात्र एकटी पावसांत भिजत राहातें. सर्वांचीं तीं मोठालीं ताटें, नणंदांच्या मोटाल्या वाट्या मी घासल्या. आणि एवढें सर्व करून झोपायच्या वेळीं जेव्हां मला मिळालेला तो भाकरीचा तुकडा घ्यायला गेलें तेव्हां तोदेखील मांजरीनें पळविलेला होता! मर मेले मांजरे, तुझीं पोरें मरोत. तूं माझा भाकरीचा तुकडा पळविलास आणि भावांची बहीण रात्रभर उपाशी राहिली!]

सासुरवासाचें असें करुण वर्णन करणारीं अनेक लोकगीतें आढळतात आणि बहुधा सर्व प्रांतांत तीं प्रचलित आहेत. **कुलू** प्रदेशांतील 'छींजा'च्या लोकगीतांमध्यें सासुरवासाचें वर्णन आलेलें आहे. आणि हिंदी व हिंदीच्या उपबोली बोलल्या जाणाऱ्या उत्तर भारतांतील सर्व प्रदेशांमध्यें श्रावणांतील तिजेच्या प्रसंगीं, चरख्यावर सूत कातताना, शेतांत निंदणी करताना, किंवा जात्यावर दळतांना (जँतसारी) जीं गाणीं गाईलीं जातात त्यांतून सासुरवासाचें वर्णन आलेलें आढळतें. उदा० एका **भोजपुरी** लोकगीतांतील बहीण आपल्या सासुरवासाचें कसें वर्णन करते पहा :

*सासू खाँची भर बसना मँजावे ली हो ना।*
*सासू पनिया पातालसे भरावे ली हो ना॥*
*सब के खिआवौं भैया सबके पिआवौं हों ना।*
*भैया बाँचि जाली पिछली टिकरिया हों ना॥*
*भैया ओहूमेंसे नँनद कलेउअ हो ना।*
*भैया ओहूमेंसे गोरू चरवहवा हो ना॥*
*भैया ओहूमेंसे कुकुरो बिलरिया हो ना।*
*भैया आहूमेंसे देवरा कलेउवा हो ना।*
*पहिरो में भइया मोरे सब कर उतरवा हो ना।*
*भैया सरी गली फटही लुगरिया हो ना।*
*भइया ओहूमेंसे ननदी ओढ़निया हो ना!*
*भैया ओहूमेंसे देवरा क भगवा हो ना॥*
*लोहवा जरे जइसे लोहरा दुकनिया हो ना!*
*तोरी बहिनी जरे ससुरिया हो ना॥*

[दादा, सासू मला हराभर भांडीं घासायला लावते आणि पाताळाइतक्या खोल विहिरींतून पाणी भरायला लावते. सर्वांचें खाणेंपिणें मलाच बघावें लागतें. आणि

शेवटीं माझ्यासाठीं जी एक भाकरी शिल्लक राहाते त्यांतूनहि नणंदेच्या व दिराच्या फराळासाठीं व गुराख्यांसाठीं मला राखून ठेवावी लागते. त्यांतूनच कुत्र्यामांजरांनाहि घालावी लागते. सर्वांनीं जुनीं झालीं म्हणून टाकून दिलेलीं वस्त्रें मला मिळतात. एक फाटकें जुनेरें तेवढें मला मिळतें. पण त्यांतूनहि नणंदेच्या ओढणीसाठीं व दिराच्या उपवस्त्रासाठीं म्हणून सासुबाई फाडून घेतात. लोहाराच्या दुकानीं लोखंड जळतें त्याप्रमाणें तुझी बहीण सासरीं करपत आहे.]

**काश्मिरी** लोकगीतांमध्येंहि सासुरवासाचें असेंच वर्णन आलेलें आहे पण तें थोडक्यांत आलेलें आहे. उदा० एका गीतांत म्हटलेलें आहे—"तिला (सासूला) अजिबात कसें वाटलें नाहीं कीं मलाहि जेवायला वाढावें? सणाच्या दिवशींहि तिनें मला मोठें टोपलेंभर धान्य दळावयास लावलें. ईदच्या (किंवा शिवरात्रीच्या) दिवशीं मला चरख्यावर कातावयास लावलें, साती खोल्यांचा केर काढावयास लावलें आणि इतकें करूनहि कुत्र्यांचें व मांजरांचें उष्टें मला खावयास दिलें. तिला कांहींच कसें वाटलें नाहीं?"

दुसऱ्या एका काश्मिरी लोकगीतांत वर्णिलेलें आहे—"माहेरानें मला ढकलून दिलें. कटु सासर मिळालें. सासूचा सासुरवास करण्याचा हक्क होता, नणंददेखील दुष्टपणें वागली....सारें सहन करावेंच लागलें. नशिबीं होतें तें हातीं आलें.... भोगावेंच लागलें. या रंगीत चरख्यावर मी 'पश्मीना' कातला होता. (पश्मीना—सुप्रसिद्ध काश्मिरी लोकर. ही लोकर इतकी बारीक, पातळ अशी असते कीं या लोकरीची तीन वार लांबीची व दीड वार रुंदीची शाल सहज अंगठीमधून निघते.) तो 'पश्मीना' गुंडाळत असतांना त्याचा गुंता झाला. तो विकावयास गेलें तर भाव कमी आला—सारें सहन करावेंच लागलें."

सासरीं सासुरवासामुळें काम करावें लागतें, पोटभर जेवण मिळत नाहीं, इतकेंच नव्हे तर :

*सासुचा सासुरवास किल्ली कुलूप लावून*
*चाले मारझोड रोज कोण पाहते येऊन*

—आणि नुसती मारझोड करूनहि समाधान होत नाहीं तेव्हां मग सुनेचा जीव घेण्यापर्यंत मजल जाते! मराठींतील 'शावू'च्या गाण्यांत अशीच घटना वर्णिलेली आहे. इतर प्रांतांमधूनहि सासूनें सुनेचा जीव घेतल्याचें वर्णन करणारीं लोकगीतें आढळतात. एक **गुजराथी** लोकगीत असें आहे :

माड़ी बार–बार बरसे आवियो
माड़ी नो दीठी पातली परमान्य रे जाड़ेजी मा
मोलूँ माँ दियो शग बले रे
दीकरा हेठो वेसीने हथियार छोड्य रे कलइया कुंवर ॥ ध्रु० ॥
पानी भरी हमणां आवशे रे
माड़ी कुवा ने वाव्यूं जोई ल्यो रे
माड़ी नो दीठी पातली परमान्य रे जाड़ेजी मा,
मोलूँ मा दियो शग बले रे
दीकरा हेठो वेसीने हथियार छोड्य रे कलइया कुंवर ॥ १ ॥
हलणां दली हमणां आवशे रे
माड़ी घंटियोंने रथड़ा जोई वल्यो रे
माड़ी नो दीठी....कलइया कुंवर ॥ २ ॥
धान खांडी ने हमणां आवशे रे
माड़ी खारणीया....खारणीया जोई वल्यो रे
माड़ी नो दीठी....कलइया कुंवर ॥ ३ ॥
धोणू धोई ने हमणां आवशे रे
माड़ी नदियो ने नेरां जोई बल्यो रे
माड़ी नो दीठी....कलइया कुंवर ॥ ४ ॥
एनां वचका मां कोरा वांधनी रे
एनी बांधनी देखी ने बावो धाउ रे गोंजारण मा
मोलूँ मां आम्बो मोड़ियो रे
एना बचका मां कोरी टीलड़ी रे
एनी टीलड़ी ताणी ने तरसूल ताणू रे गोजारण मा
मोलूँ मा आम्बो मोड़ियो रे

परदेशाहून आलेला पति आपल्या पत्नीबद्दल आईजवळ चौकशी करीत आहे— "आई, बारा वर्षांनीं घरीं आलों आहें मी! पण ती सडपातळ परमार कन्या, सुंदर रमणी मात्र दिसत नाहीं. महालांत दिवा तेवत आहे. पण 'ती' मात्र दिसत नाहीं." "बाळ, खालीं बैस. हत्यारें ठेवून दे. माझ्या शूर मुला! बैस. पाणी भरून ती इतक्यांत येतच असेल." "आई, मी सर्व विहिरी व डोह बघून आलों. पण ती कोठेंच दिसली नाहीं." बाळ, ती दळण घेऊन गेली होती. आतां

येईल." आई, मी लहान-मोठ्या सर्व जात्यांच्या ठिकाणीं शोधून आलों. पण ती मात्र कोठेंच दिसली नाहीं." "बाळ, धान कुटून ती थोडयाच वेळांत येईल. बैस.' "मी सर्व उखळी पाहून आलों. पण ती कांहीं दृष्टीस पडली नाहीं." "बाळ, कपडे धुवून ती येतच असेल." "आई, मी सर्व नद्यांनाल्यांवर जाऊन आलों पण ती कांहीं दिसली नाहीं. अरे, या बोचक्यांत तिची कोरी ओढणी ठेवलेली आहे. ही कोरी ओढणी बघून वाटतं कीं साधू होऊन निघून जावें. अग खुनी दुष्ट आई, तुला कांहींच कसें वाटलें नाहीं? महालांतील आंब्याचा वृक्ष तूं जाळून टाकलास. या बोचक्यांत तिची कोरी चिंदी ठेवलेली आहे. अग दुष्ट आई, ही चिंदी बघून वाटतं आत्महत्त्या करावी."]

याच अर्थाचें, सुनेचा पति घरीं नसतांना सासू तिचा जीव घेते ही घटना वर्णन करणारें एक लोकगीत **राजस्थानां**तहि आहे :

*माय काळी रे काळायण उमड़ी*
*माय, गुडळ सा बरसै मेह*
*पपइयो बोल्यो हरियाळे खेतमें ॥*
*माय, भर रे नाडा भर नाडिया*
*माय, भरियो रे भीम तळाव़ ॥ पपइयो....*
*माय, म्हे ही ने सिधावाँ चाकरी*
*माय, घर री रे तोय भळवाण ॥ पपइयो...*
*बेटा, किता रे वरसाँ री चाकरी*
*बेटा, किता रे वरसाँ रो कोल ॥ पपइयो....*
*माय, बारा रे बरसाँ री चाकरी*
*माय, तेरा, रे बरसाँ रो कोल ॥ पपइयो....*
*माय, खट रे कमाय घर आविया*
*गाय, किथी ये सैणाँ री धीवं ॥ पपइयो....*
*बेटा, इंधण-पाणी वहू गयी*
*बेटा, छोटोड़ो देव़रियो साथ ॥ पपइयो....*
*माय, जळ-थळ सब मैं ढूँढिया*
*माय, नहीं रे सैणाँ री धीव ॥ पपइयो...*
*बेटा, घटी रे पीसण वहू गयी*
*बेटा, छोटोड़ी नणदळ साथ ॥ पपइयो....*

*माय, घर-घर घट्टी मैं जोयी*
*माय, नहीं रे सैणाँ री घीव ।। पपइयो....*

["आई, आभाळांत मेघ भरून आले आहेत. रिमझिम वर्षा होत आहे. हिरव्यागार शेतांत 'पपीहा' पक्षी गात आहे. आई, तलाव भरले आहेत. 'भीम' तलाव ओसंडून वहात आहे. मी परदेशीं चाकरीसाठीं जाणार आहें. घर तुझ्या ताब्यांत राहील." "बाळ, किती वर्षें चाकरीसाठीं राहाणार आहेस? किती वर्षांचा मुक्काम करणार आहेस?" "आई, बारा वर्षांसाठीं चाकरीवर जाणार आहें. तेरा वर्षांचा माझा मुक्काम राहील." बारा वर्षांनीं मुलगा चाकरी करून घरीं आला आणि आईला पत्नी कोठें आहे म्हणून विचारूं लागला. आई अळंटळं करूं लागली— "बाळ, ती जळण व पाणी आणावयास गेली आहे. धाकटा दीर तिच्याबरोबर आहे." "आई, मी तिला जळींस्थळीं सर्वत्र शोधून आलों. ती कोठेंच दिसली नाहीं." आई पुन्हां खोटें बोलते, "बाळ, ती दळण दळावयास गेली आहे. धाकटी नणंद तिच्याबरोबर आहे." "आई, मी प्रत्येक घरीं जाऊन विचारपूस करून आलों. पण ती कोठेंच दिसली नाहीं." आणि दिसणार तरी कशी? तो घरीं नसतांना सासूनें सुनेचा जीव घेतलेला असतो.]

**अंबाला** जिल्ह्यांतहि अशाच अर्थाचें एक लोकगीत प्रचलित आहे. पति परदेशीं गेलेला असतो, आणि सून विचारी सासुरवास सहन करीत असते. पुढें पति माघारीं घरीं येत असल्याचें कळतें. त्यावेळीं सासू सुनेला विष घालून ठार मारते. हें गीत असें आहे :

*और दिनों तो सूखी सी टिकिया*
*आज क्यों दी सास खीरकी थाली री*
*पहले तो बहू तेरी कटी अकेले*
*आज घर आये तेरा बालम री.*
*और दिनों तो खट्टीसी लस्सी*
*आज क्यों दिया दूध कटोरा री*
*पहले तो थी बहू मेरी अयानी*
*अब होई तू किसी जोगी री.*
*और दिनों तो सी खटिया*
*आज दिया, सास, लाल पलंग री.*
*अम्माभी देखी बहनेंभी देखी*
*एक न देखी मैंने सजनोंकी धी री.*

*ऊँची अटारी लाल किवाड़ी*
*वहाँ चढ सोई सजनोंकी धी री*
*मैंने पुकारा बाँहभी हिलाई*
*फिरभी न बोली सजनोंकी धी री*

["सासूबाई, रोज तर मला भाकरीचा कोरडा तुकडा मिळत असे. आज ताट भरून खीर कां घातली?" "सूनबाई, इतके दिवस तूं विरहिणी होतीस. आज तुझा पति घरीं येणार आहे." "रोज तर मला आंबट ताक मिळत असे मग आजच हा दुधानें भरलेला पेला कशासाठीं दिला आहे?" "इतके दिवस तूं लहान वयाची होतीस. आतां तूं वयांत आली असून कोणास योग्य अशी झाली आहेस." "एरवीं मला मोडकी खाट मिळत असे. आज मात्र सासूबाई, तुम्हीं लाल पलंग दिला आहे." त्यानंतर पति घरीं येतो तेव्हां तो म्हणतो, "मी आईला पाहिलें. बहिणींनाहि पाहिलें. पण माझ्या सासुसासऱ्यांची लेक (त्याचीच पत्नी) दिसली नाहीं. उंच माडी आहे. तेथें लाल रंगाचीं दारें आहेत. "बाळ, तुझी पत्नी तेथें जाऊन झोपलेली आहे." "मीं तिला हांक मारली, तिचा हातहि हलविला. तरीहि माझ्या सासुसासऱ्यांची ती लेक बोलली नाहीं."]

या सर्व लोकगीतांमधून सासू छळ करते, काम करायला लावते, पोटभर जेवण देत नाहीं, मारझोड करते, फार काय, सुनेचा जीव घेते याचें वर्णन आलेलें आहे. पण त्यावरून सासू म्हणजे सासुरवास असें समीकरण कांहीं तयार करतां येणार नाहीं. सासुरवास करण्यांत मुख्य भाग तिचा असतो हें खरें. पण त्याला हातभार मिळतो तो दीर व नणंदा यांच्याकडून! क्वचित् पतीकडून देखील टेकू दिला जातो. दीर प्रत्यंक्षपणें कष्ट देत नाहीं. कारण घरांतील त्याचें स्थानहि तसें नसतें. त्याच्याकडून होणारा त्रास म्हणजे त्याची पापी नजर होय! **बिहार** प्रांतांतील एका लोकगीतांत त्याचें वर्णन आढळतें. गीताचा अर्थ असा आहे :

बारीक बारीक गहूं आहेत आणि वेताची टोपली आहे. नणंद व भावजय दोघी गहूं दळत आहेत.

भावजयीनें विचारलें, "भाऊजी, रोज तर तुम्हीं दोघेजण येतां. आज एकटेच कसे आलांत? तुमच्या वहाणा व कपडे कशानें ओले झाले आहेत?"

दिरानें उत्तर दिलें, "वहिनी, थंडीनें माझ्या वहाणा ओल्या झाल्या आहेत आणि हरिणाच्या शिकारीमुळें कपडे भिजले आहेत."

दिराबरोबर पतीला न आलेलें पाहून त्या चाणाक्ष सुनेनें खरा प्रकार

ओळखलेला असतो. ती प्रसंगावधान राखून म्हणते, "भाऊजी, मी तुम्हांला सोडून कोठेंहि जाणार नाहीं. पण माझ्या पतिदेवाला कोठें ठार मारलेंत, कोठें त्यांना टाकलें आणि आतां कोणत्या जागीं त्यांच्या प्रेतावर गिधाडें जमलीं आहेत तें तरी मला सांगा."

दिरानें उत्तर दिलें, "मीं उंच पर्वतावर त्याचा वध केला आणि खोल दरींत त्याला ढकलून दिलें. तेथेंच आकाशांत गिधाडें जमलीं आहेत."

भावजयीनें वनांत जाऊन चंदनाचीं लाकडें गोळा करून चिता रचली आणि दिराला म्हटलें, "भाऊजी, तुम्ही जा आणि अग्नि घेऊन या. मी माझ्या पतीचा अग्निसंस्कार करीन."

दीर अग्नि आणावयास निघून गेला. लगेच भावजय चितेवर जाऊन बसली आणि पतीचें शव मांडीवर घेऊन हात जोडून तिनें म्हटलें, "पतिदेवा, मी जर खरी पतिव्रता असेन तर माझ्या पदरांतून ज्वाळा निघूं देत."

पदरांतून ज्वाळा निघूं लागल्या. आणि ती सती पतीच्या शवाबरोबर भस्म झाली. दीर जेव्हां अग्नि घेऊन माघारीं आला तेव्हां त्याला फक्त राखेचा ढीग दिसला. हात चोळीत तो म्हणूं लागला, "वहिनी, तूं मला असें फसवशील हें जर ठाऊक असतें तर मीं कां म्हणून सख्ख्या भावाचा वध केला असता?"

दिरामुळें असा त्रास होतो. पण नणंद मात्र आगलावेपणा करून भावजयीचा छळ करविते. **मराठींत** याचे उल्लेख आले आहेत ते असे :

*सासुचा सासुरवास नंदबाईची लावणी*
*कळ लावते येवोनी दीड दिसाची पाहुणी*

या कळ लावण्यामुळें सुनेला अग्निदिव्य करावें लागतें व त्यांतून ती पतिव्रता सिद्ध होते. तेव्हां तिचे भाऊ तिला उजळ माथ्यानें आपल्या घरीं कायमची म्हणून घेऊन जातात आणि पति पश्चात्ताप करीत बसतो याचें वर्णन आपल्याला बिहारमधील लोकगीतांमधून आढळतें.

गुजराती लोकगीतांत तर याच्याहि पुढचें वर्णन आढळतें. नणंद चहाडी करते आणि रागावून पति आपल्या पत्नीचा वध करतो असें वर्णन त्या गीतांत आलेलें आहे, तें गीत असें आहे :

***गाम मां सासरूँ गाम मां पियरिऊँ रे लोल***
***दीकरी कर जो सुख दुख नी वात जो***
***कवलां सासरियां मां जीववूँ रे लोल***
***सुख ना वारा ते माड़ी वही गया रे लोल***

*दुख नां उग्यां छे झीड़ां झाड़ जो*
*कवलां सासरियां मां जीववूं रे लोल.*
*पछावड़े ऊभी नणदी सांभले रे लोल*
*बहु करेछे आपणा घरनी बात जो*
*बहुए बगोव्यां मोटां खोरड़ां रे लोल*
*नणदीए जई सासु ने सम्भलाव्यूं रे लोल*
*बहु करेछे आपणा घरनी बात जो*
*बहुए बगोव्यां मोटां खोरडां रे लोल.*

एकाच गांवांत सासर व माहेर आहे. मुलगी भेटते तेव्हां आई विचारते—"बाळ, तुझं सुख दुःख सांग तरी?"

मायेचा ओलावा मिळतांच दुःख शब्दरूप घेऊन व्यक्त होतं—"आई, सासरीं तर जगणें कठीण आहे. सुखाचे दिवस गेले आणि दुःखाची कांटेरी झुडुपें उगवलेलीं आहेत. कशी जगूं मी सासरीं?" पाठीमागें उभी राहून नणंद हें सर्व ऐकत होती. सून आपल्या सासरबद्दल बोलत आहे. एका मोठ्या घराण्यावर ती शिंतोडे उडवीत आहे. नणंदेनें लगेच आपल्या आईजवळ जाऊन चहाडी केली. "वहिनी आपल्या घराबद्दल बोलत आहे. आपल्या घराला कलंक लावीत आहे." सासूनें जाऊन सासऱ्याला सांगितलें, सासऱ्यानें आपल्या थोरल्या मुलाला—सुनेच्या थोरल्या दिराला सांगितलें, थोरल्या दिरानें सुनेच्या पतीला सांगितलें. पतीला राग आला. आणि :

*परण्ये जई तेजी घोड़ो छोड़यो रे लोल*
*जई उभाढ़यो गाँधीड़ा ने हाट जो—बहुए वगोव्यां...*
*अध शेर आहल्याँ तोलाव्यां रे लोल*
*पा शेर तोलाव्या सोमलखार जो—बहुए वगोव्या....*
*सोनला वाटकड़े अमल घोलियाँ रे लोल*
*पियो गोरी नकर हूँ पी जाऊँ जो—बहुए वगोव्यां...*
*गटक दईने गोराँदे पी गयाँ रे लोल*
*घरचोकाँ नी ठाँसी एणें सोड़ जो—बहुए वगोव्यां....*

घोड्यावर बसून तो बाजारांत गेला. वाण्याकडून त्यानें अर्धा शेर गुंगीचें सामान घेतलें व पावशेर विष घेतलें. घरीं येऊन सोन्याच्या वाटींत तें कालवलें. आणि मग तो

विषाचा पेला पत्नीपुढें करून म्हटलें, "हें तूं तरी पी नाहींतर मी तरी पितों." त्या साध्वी सुनेनें एका घोटांत पेला रिकामा केला. आणि मग पुढील जन्मीं देखील तोच पति मिळावा यासाठीं परिधान करण्यांत येणारीं विशिष्ट वस्त्रें धारण करून ती निजली. गीतांत पुढें वर्णिलें आहे—पति तिची उत्तरक्रिया करून घरीं येतो आणि आईला म्हणतो, "आतां कर या घरांत तुला वाटेल तें! दुसऱ्याच्या तोंडाकडे तर मला बघावें लागणार आहे. तुला काय त्याचें?"

हें झालें नणंदेनें चहाडी केली म्हणून! पण कित्येकदां पति रागीट स्वभावाचा असतो आणि त्यामुळेंहि सासुरवासांत भर पडते. जरा कांहीं त्याच्या मर्जीसारखें करण्यांत चुकलें तर तो वाटेल तशी मारझोड करतो. लोकगीतांमधून याचे अनेक उल्लेख आलेले आढळतात. **मराठी**मध्यें 'जइता' श्रावणांत नागपंचमीचें खेळायला जाते व तेथें तिला उशीर होतो म्हणून तिचा नवरा तिला घरांत घेत नाहीं, तर राजस्थानी रमणी श्रावणांतल्या तिजेला मैत्रिणींबरोबर खेळायला जाते व खेळण्याच्या नादांत तिला उशीर होतो म्हणून तिचा पति तिला हाकलून देतो. निमाडी घरधनीण धन्याची शिदोरी घेऊन शेतावर जाते पण तिला थोडा उशीर होतो म्हणून रागावलेला पति तिला चाबकानें मारतो, तर भोजपुरी लोकगीतांत नव्या सवतीच्या पायीं पहिल्या पत्नीला पतीकडून मार मिळाल्याचें वर्णन आलेलें आहे. तेव्हां पति जर गुणवान् व पत्नीवर प्रेम करणारा नसला तर बिचाऱ्या सुनेच्या सासुरवासांत भरच पडते.

पण तेंच पतीचें सुख असलें तर या सर्व सासुरवासावर पांघरूण पडतें. पति-सुखापुढें या सासुरवासाचेंहि स्त्रीला कांहीं वाटत नाहीं व ती सारें कांहीं आनंदानें सहन करते. मराठींत म्हटलें आहे :

*सासूचा सासुरवास नंदबाईच्या लावण्या*
*नांहीं घेत कानींमनीं करी कंथ संपादण्या ॥*
*सासु सासऱ्याचं दुःख भ्रताराचं थोडं सुख*
*नाहीं लेकी सारजेचं कधीं दुखत तें नख ॥*

एका भोजपुरी लोकगीतांतहि पतीनें पत्नीची बाजू घेतल्यामुळें तिला किती बरें वाटतें व सासुरवास करणाऱ्या मंडळींचा त्याला आलेला राग ती कसा शांत करते याचें मोठें मार्मिक वर्णन आलेलें आहे. तें गीत असें आहे :

*........तँहवई पइठ सुतेलनि दुलरू कवन दुलहा पावेले*
*कवन देइ रानि हो।*
*मोहि तो पुछीला ससुरजीके घेरिया हो काहे तोरे बदन मलीन हो ॥*

*माई तोंहार प्रभु मारे गरिआवे बहिनी बोलेली विरहो बोल हो।*
*लहुरा देवरा मारेला लाली छरिया वोही गुने बदन मलीन हो॥*
*माई के बेचबों धनी हाट बजरिया बहिनी बिदेसियाके हाथ हो।*
*भइयाके मारों धनी रतुली कमनियाँ हम तुहू बेलसब राज हो॥*
*भाई तोहार प्रभुजी हाथे पछेलवा हो बहिनी तोहार सिर पाग हो।*
*भइया तोहार साहेब दहिनी बहिया हम तरवा केरि धरि हो॥*

[पति विश्रांति घेत पहुडला आहे. पत्नीहि जवळच बसलेली आहे. पत्नीला उदास बघून पति विचारतो—तूं अशी कोमेजलेली कां दिसत आहेस?" पत्नी वस्तुस्थिति सांगते—"तुमची आई शिव्या देते व मारते. बहीण वाटेल तसें घालूनपाडून बोलते. धाकटा दीर लाल वेतानें मारतो. त्यामुळें उदास वाटतें." पतीला राग आला.—"मी आईला बाजारांत विकून टाकीन. बहिणीचें दूरदेशीं लग्न लावून देईन. भावाला लाल धनुष्यानें मारीन व तुझ्यासवें सुखानें राहीन." आधणाच्या पाण्यांत पत्नी विसावण मिसळते—"छे, छे, असं कधीं करायचं असतं का? आई तुमच्या हातांतील कंकण आहे. बहीण तुमच्या मस्तकावरील फेटा आहे. भाऊ तुमचा उजवा हात आहे आणि मी तुमच्या पायाची धूळ आहें." किती सुरेख कल्पना आहे! पतीच्या प्रेमापुढें पत्नी आपलें दुःख विसरली.]

पण ज्यावेळीं पति आपलें कर्तव्य योग्य तऱ्हेनें पार पाडीत नाहीं, स्वतः या सर्व कटकटींपासून नामानिराळा राहातो त्यावेळीं सून जर धीट असेल तर स्वतःच सासूचा व नणंदांचा समाचार घेते. तिला सासुरवास घडण्याऐवजीं तीच इतरांना सासुरवास करते. त्यांतहि सासूला छळण्याचें तिच्या हातांतील शस्त्र म्हणजे पतीला घेऊन वेगळें राहूं लागणें आणि सासूला पदोपदीं जाणीव करून देणें कीं तुझा मुलगा आतां माझा आहे. त्याच्यावर आतां तुझा कांहीं हक्क नाहीं, तो सारें कांहीं माझ्या मनासारखें करणार आहे. तेव्हां उगाच वटवट नको. याविषयीं एक राजस्थानी लोकगीत असें आहे :

*सासु दड़िया रमंता थारा*
*घोड़ला दौड़ाना म्हारा ए*
*नादान बनजी म्हारा.*
*सासु दूध पिवंता थारा*
*दुबारो पीवता म्हारा ए*
*नादान बनजी म्हारा.*

*सासु टोपीवाळो वनड़ो थारो*
*यो तो पेच झकातो म्हारो ए*
*नादान वनजी म्हारा.*
*सासू ऊली पेली बातां थां सू*
*चित्त मन री बातां म्हां सू ए*
*नादान वनजी म्हारा.*
*सासु कांई हलावै कूल्हा*
*म्हूं न्यारा करसूं चूल्हा*
*नादान वनजी म्हारा*

["सासूबाई, चेंडू खेळण्याच्या दिवसांत माझा पति तुमचा होता. आतां तारुण्यांत घोड्यावर स्वार होणारा पति माझा आहे. दूध पिणारा मुलगा तुमचा होता, मद्यपान करणारा पति माझा आहे. टोपी घालणारा मुलगा तुमचा होता, फेटा बांधणारा तरुण माझा आहे. सासूबाई, तुमच्याशीं तर ते इकडच्या तिकडच्या गप्पा मारतात, मनींचें गूज मात्र माझ्यापाशींच व्यक्त करतात. उगाच नितंब कां हलवितां? मी वेगळी चूल मांडणार आहें."]

मराठींतहि वेगळेपणाची लावणी आहे. 'माझ्या लेकाचं पुन, ताकाच्या थेंबाकरतां नाचवते सुन' असें गाणें आहे. पंजाबी सुनेनें तर धीट होऊन सासूला स्पष्टपणें सांगून टाकलें आहे कीं 'तूं आतां बाहेर नीघ. हें घर माझें आहे. आतांपर्यंत तूं खूप खाल्लेंस; आतां शिल्लक राहिलेलें सारें माझें आहे :

*काळी हेड पसेरा, निक्कल सस्साडिए घर मेरा*
*खाय ल्या बथेरा, हुण रैहंदा सूँदा मेरा ॥*

पण एकंदरींत सुनेनें सासूला छळल्याचें वर्णन करणारीं लोकगीतें थोडींच आहेत. त्या मानानें भावजयांना नणंदा कशा नकोशा वाटतात तें दर्शविणारीं अनेक लोकगीतें सर्वत्र आहेत. भावांना बहिणी आल्या कीं, अपार आनंद होतो. पण भावजयांना नणंदा कळ लावणाऱ्या वैऱ्यासारख्या, वाटेल तें मागून घेणाऱ्या घेणेकऱ्यासारख्या दिसत असतात. त्यामुळें त्या नणंदांचा मान ठेवीत नाहींत, नणंदेला आपला तोरा दाखविल्याशिवाय राहात नाहींत, आणि नणंदेला तिच्या घराची वाट धरायला सांगितल्याशिवाय सोडीत नाहींत :

*भाऊ ग म्हणती आल्या बहिणी भेटायाला*
*भावजया ग म्हणती आल्या नणंदा लुटायाला ॥*
*भाऊ ग म्हणती बहिणीला द्यावा पाट*
*भावजया ग म्हणती धरूं दे नणंदा आपली वाट ॥*

भावजयींची हीच वृत्ति राजस्थानी लोकगीतांतून व्यक्त झाली आहे. भाऊ बहिणीला ओवाळण्यास सांगतो व ओवाळणी माग म्हणून आग्रह धरतो. तेव्हां बहीण तिला हवें तें मागून घेते. त्यावर भावजय म्हणते :

*आ तो अतरा ए विना बाई माने नीं*
*पाछा सूं पीव बेन बुलावसी*
*थे तो सुण सुण ओ म्हारा सुगणा ओ सायब*
*नणद पाडोसेण मत राख जो ॥*
*आ तो जो ई देखै ई माँगै*
*ऊठ परभात करै झगड़ा...*

[नणंदबाई एवढें सारें घेतल्याखेरीज कांहीं ऐकायच्या नाहींत. तेव्हां आतां तर त्यांना जाऊं द्या. पुन्हां कधीं बोलावूं या. माझ्या गुणवान पतिदेवा, नणंदेला कधींहि शेजारीं राखूं नये. कारण ती काय जें बघतें तें सारें मागते. आणि दिवस उगवला कीं भांडायला सुरुवात करते.]

एका **भोजपुरी** लोकगीतांतील भावजयदेखील अशीच नणंदेला कांहींएक न देतां माघारीं पाठविते. गीताचा भावार्थ असा आहे कीं, भावानें बहिणीस येतांना पाहिलें—तेव्हां तिचा मान राखण्यासाठीं पत्नीला सांगितलें. भावजय नणंदेचें तोंडदेखलें स्वागत करते, आणि तिला मंगलगीत गाण्यास सांगते. नणंद म्हणते, "मंगलगीत मी गाईन. पण मग माझ्यासाठीं ओढणी, मुलासाठीं अलंकार व ह्यांच्यासाठीं घोडा इतकें तूं दिलें पाहिजेस." भावजय उत्तरते, "इतक्या वस्तू मी कोठून आणूं? त्यापेक्षां तुम्हीं मंगलगीत न गातां गेलांत तरी चालेल." नणंद अश्रु ढाळीत सासरीं जाऊं लागते. नणंदेचा पति मात्र 'चांगली जिरली म्हणून मनांतल्या मनांत खूष होऊन जाऊं लागतो. तो पत्नीला समजावतो कीं, "मी या सर्व वस्तू आणून देईन. तूं तुझें माहेर आतां विसर." पण नणंदेला हें मान्य नाहीं. कडवटपणें ती उद्गारते,—"आग लागो तुमच्या वस्तूंना. मी माझें माहेर कधींच विसरणार नाहीं!"

दुसऱ्या एका **बिहारी** गीतांत वर्णन आहे कीं, आपत्कालीं नणंद आपल्या यजमानांबरोबर माहेरीं येते. तिला येतांना पाहून भावजय दारें लावून घेते. तहानेली नणंद विनंति करते, "वहिनी, वहिनी, दार उघड. एक घोटभर पाणी तरी दे." भावजय आंतूनच उत्तरते, "वन्सं, माझी घागर फुटली आहे. पाणी कसें देऊं?" नणंद पुन्हा हांक मारते, "वहिनी, तुझें फाटकें लुगडें तरी नेसायला दे ग!" "वन्सं, फाटकें लुगडें पेटींत ठेवलेलें आहे. अंगण सारवून काढायला तें लागेल." त्यामुळें नणंद रडूं लागली. असल्या खाष्ट भावजयीसमोर काय करणार बिचारी?

इथवरहि ठीक आहे! पण कांहीं लोककथांमधून व लोकगीतांमधून याच्याहि पुढचें वर्णन आढळतें. भावजय हट्ट धरून बसते आणि मग पत्नीची आसुरी इच्छा पुरी करण्यासाठीं भावानें बहिणीला ठार मारल्याचें वर्णन करणाऱ्या सोनसांखळी-सारख्या सर्वत्र प्रचलित अशा लोककथा आहेत आणि लोकगीतेंहि आहेत. **मराठीं**-तील नागपंचमीच्या गाण्यांतहि याचें वर्णन आलेलें आहे. त्यांत आलेली कथा म्हणजे भाऊ बहिणीचा वध करतो. कां? तर—भावजयीच्या कासईला नणंदेच्या हातून हळदीकुंकवाचे डाग लागले म्हणून! रागावून भावजयीनें नणंदेच्या रक्तांत भिजविलेली कासई नेसण्याचा हट्ट धरला व तो हट्ट पुरा करण्यासाठीं भाऊ बहिणीचा वध करतो!! भावजयीला नणंदेस मारून टाकावेंसें वाटतें याचें वर्णन एका **राजस्थानी** लोकगीतांतहि आहे. पण तेथें भावजयीची आसुरी इच्छा मुळाशीं नसून सासूकरवीं नणंद भावजयीचा जो छळ करविते त्यानें त्रासून भावजय म्हणते :

*आवण दे थारे वीर ने, ऊँडी खुदाय दूँ खाड़*
*पहली राळूं नणदलने, पछै नणदलरी माय.*
*दोनूँ राळ्याँ नहिं सरै, राखो नणदलरी माय*
*नणदोई आया लेवा ने, कींकर देवूँ ए जावब*
*झीणो काढूँ घूँघटो, झबझब देवूँ ए जवाब.*
*नणदल बाई छै नानेरे, आसी सावणिये रे मास*
*नणदल गयी छी छाणा ने, खायग्यो काळो नाग.*
*ए लो बाईका आटी-डोरडा, ओ लो नणदल रोवेस.*

[अग नणंदे, येऊं दे बघ तुझ्या भावाला (माझ्या पतीला) मग बघ खोल खड्डा खणून घेईन. अगोदर तुला आणि मग तुझ्या आईला त्यांत ढकलून देईन. पण दोघींना ढकलून नाहीं चालायचें. सासूला ठेवून घेईन आणि नणंदेला ढकलून देईन. मग नणंदेचा नवरा तिला घेऊन जायला येईल. मी थोडा घुंगट

काढून त्याला जाऊन सांगेन कीं, वन्सं तर आजोळीं गेल्या आहेत. श्रावणांत त्या येतील. तेथें त्या गोंवऱ्या वेंचायला गेल्या तेव्हां काळा नाग त्यांना चावला आणि त्या वारल्या. तुम्हीं त्यांचें हें प्रसाधनसाधन व कपडे घेऊन जा.]

यावरून असें दिसतें कीं, भावजय नणंदेचा छळ करीत असली तरी त्याच्या मुळाशींहि सासुरवास हेंच कारण असतें. तिनें स्वतः दुःख भोगलेलें असतें. आणि त्याचाच वचपा ती पुढें संधि आली असतांना या रीतीनें काढते. पण याचें वर्णन करणारीं लोकगीतेंहि थोडीं आढळतात. लोकगीतांनीं सासुरवासाचीच दखल प्रामुख्यानें घेतली. या सासुरवासाचेंहि लोकगीतांमधून आणखी एक वैशिष्ट्य जें दिसून येतें तें म्हणजे सून आपल्या भावाला सांगते कीं, माझें सुखदुःख माहेरीं सांगूं नकोस. विशेषतः आईला आपलें दुःख कळल्यास तिला अनंत यातना होतील म्हणून ती म्हणते :

*माझं सुखदुःख । नका सांगूं हारनीला ।*
*अंग टाकी धरनीला । माय हारना माझी ॥*

**राजस्थानी** बहीण देखील भावाला असेंच समजावते :

*माता तो सुणतै, वीरा मत कह्ये*
*झुरसै बरसाळे री रात ॥*
*भावज तो सुणतै, वीरा मत कह्ये*
*करसे पीहरियेमें बात ॥*
*बापजी तो सुणतै वीरा, भल कह्ये*
*माँड रे करहे पलाण ॥*

[भाऊराया, माझें दुःख तूं आईला सांगूं नकोस. नाहीं तर ती पावसाळ्याच्या रात्रीप्रमाणें झुरेल. भावजयीलादेखील सांगूं नकोस. ती उगीच तिच्या माहेरीं बोभाटा करील. वडिलांना वाटल्यास सांग म्हणजे ते लगेच उंटावर जीन घालून मला घेऊन जाण्यास येतील.]

**भोजपुरी** लोकगीतांतहि हीच भावना व्यक्त झालेली आहे पण ती अधिक विस्तृतपणें व्यक्त झालेली आहे :

*ई दुख जनि कहो भइया भउजी क अगवाँ हो ना ।*
*भउजी दुइ चारि घरे कहो अइहें हो ना ॥*

*ई दुख जनि कहि भइया माईके अगवाँ हो ना ।*
*माई छतिया विहरि मरि जइहें हो ना ॥*
*ई दुखवा मति कहो चाचीके अगवाँ हो ना ।*
*चाची झगड़ा लड़ैया ठेना मारिहें हो ना ।*
*ई दुख भैया जनि कहो बाबाके अगवाँ हो ना ।*
*सभवां बइठि बाबा राइहें हो ना ॥*
*ई दुख जनि कहो भइया बहिनीके अगवाँ हो ना ।*
*बहिनी हाल सुनि ससुरा न जाई हो ना ॥*
*ई दुखवा कहहे भइया आगुआके अगवाँ हो ना ।*
*भइया जे मोरी कलइन अगुवइया हो ना ॥*
*ई दुख कहीह भइया बभनाके अगरा हो ना ।*
*भइया जे मोर लगन बिचरले हो ना ।*
*ई दुख तूं भइया मनहींमें गोइह हो ना ।*
*भइया करम लिखल तस भोगबि हो ना ॥*
*सब दुख बँधिह भइया अपनी मोटरिया हो ना ॥*
*भइया नदियामें दीह बहवाई हो ना ॥*

[बहीण भावाला म्हणते--"दादा, माझें हें दुःख तूं वहिनीला सांगूं नकोस. ती आणखी तीनचार ठिकाणीं याचा बभ्रा केल्याखेरीज राहणार नाहीं. आईला देखील सांगूं नकोस. तिचें हृदय विदीर्ण होऊन ती मरण पावेल. काकूला देखील सांगूं नकोस. भांडणाच्या वेळीं ती मग उपरोधिक बोलेल. वडिलांना सांगूं नकोस. नाहींतर ते बैठकींत सर्वांसमोर रडूं लागतील. दादा, धाकटया बहिणीसमोरहि सांगूं नकोस. नाहींतर ती सासरीं जाणार नाहीं.

पण दादा, ज्यांनीं माझें लग्न जुळविलें त्या पंचांना मात्र तूं माझें दुःख जरूर सांग. माझें लग्न लावून देणाऱ्या भटजींना देखील तूं माझें दुःख सांग.

दादा, माझें हें दुःख तूं मनांतल्या मनांत ठेव. नशिबीं असेल तसें मला भोगायलाच हवें. दादा, या सर्व दुःखद गोष्टींचें गांठोडें बांधून तूं नदींत सोडून दे. घरीं कांहीं नेऊं नकोस."

हा समजूतदार विचार आहे. सासरीं कितीहि कष्ट, दुःख असलें तरी माहेरीं वा गांवांत त्याचा बोभाटा न करतां निमूटपणें सारें कांहीं सासरींच सहन करीत राहाणें हें भारतीय स्त्रीचेंच वैशिष्टय नव्हे का? शतकानुशतकें भारतांत पितृसावर्ण्य

पद्धतीचें वर्चस्व राहिलें आहे. द्रविडांमध्यें अद्यापहि मातृसत्ताक पद्धतीचें वर्चस्व आहे. पण आर्य संस्कृतीचा वारसा उचलल्ेल्या भारतांतील बहुतेक प्रांतांमधून पितृसात्तर्ण्य पद्धतीचेंच वर्चस्व आढळतें. या वर्चस्वाखालीं दबलेल्या भारतीय स्त्रीला नेहमीं शिकवण मिळाली ती पातिव्रत्याची!

*नगरस्थो वनस्थो वा शुभो वा यदि वाशुभः ।*
*यासां स्त्रीणां प्रियो भर्ता तासां लोका महोदयाः ॥*
*दुःशीलः कामवृत्तो वा धनैर्वा परिवर्जितः ।*
*स्त्रीणामार्यस्वभावानां परमं दैवतं पतिः ॥*
(रामायण २·११७·२३–२४)

पति कसाहि असो त्याच्याखेरीज अन्य दैवत नाहीं, अन्य गति नाहीं. त्यामुळें त्याचें घर—आपलें सासर—सोडून घराबाहेर पडणें म्हणजे महत्पापच होय. आणि धर्मभीरू भारतीय स्त्री कधीं हें महत्पाप करणार होय? त्यापेक्षां जीव गेला तरी बेहत्तर. उगाच समाजांत छीः थू व्हायला नको आणि पापहि लागायला नको असें वाटून नशिबाला बोल लावीत ती सासुरवास सहन करीत राहाते. सासरचे हाल माहेरीं शक्य तों कळूं देत नाहीं. पण मनापासून मात्र तिला हेंच वाटत राहातें कीं,

*माहेरच्या वाटें मऊगार हरिक दाटे*
*सासरच्या वाटें टोंचती कुचकुच कांटे*

राजस्थानांतील सासुरवाशिणीला देखील सासरची वाट कठीण व माहेरची वाट सरळ वाटते :

*ऐ सासरिये रा धोरा*
*मने चढती ने लागै दोरा*
*ऐ पीवरिये रा धोरा*
*मने चढती ने लागै सोरा.*

**काश्मिरी** महिलेला देखील सासूसासरे प्रलयासारखे व बहीणभाऊ वरदानासारखे वाटतात. सासरीं राहिलें तरी सासुरवाशिणीचें लक्ष माहेराकडे लागलेलें असतें, मातृभूमीकडे लागलेले असतें. एक गुजराती लोकगीत आहे—"मला कोणी सतावूं नका. मी एक परदेशी चिमणी आहें. मला त्रास नका देऊं. माझ्या देशाच्या टेकड्या फार दूर आहेत. पर्वत खूप लांब आहे . तेथील निर्मल जल व सुपीक जमीन

सारें कांहीं दूर आहे. माझीं भावंडें गोड सागरासारखीं आहेत, आई अमृतासारखी गोड आहे. देवानें मला बहीणभाऊ दिले आहेत. ते सर्व तेथें सुखानें राहतात. मला कोणी त्रास देऊं नका. बाबांचा देश सोडून मी येथें दूरच्या गांवीं राहात आहें. मला रात्रंदिवस त्यांची आठवण येते. रडूनरडून माझें डोकें बिघडलें. मला नका सतावूं. माझें भाग्य मला येथें घेऊन आलें. देवा, मीं कोणाला दोष द्यावा? मी एकली चिमणी आहें. मी मनांत कसला राग धरावा? मला कोणी त्रास नका देऊं."

माहेरच्या आठवणीच्या अशा गीतांना **गढवाली** भाषेंत 'खुदेड़'चीं गाणीं म्हणतात. हीं गीतें अनेक आहेत. त्यांतून सासुरवासाचें वर्णन तर आलेलें आहेच पण मुख्य भर माहेरबद्दल वाटणाऱ्या आपलेपणावर आहे. उदा०—

*हे उचि डाँडियों, तुम नीसी जावा,*
*घणी कुलायों, तुम छाँटि होवा,*
*मैं कू लगीं च खुद मैतुड़ा की,*
*बाबाजीको देश देखण देवा।*

[उंच गिरिशिखरांनो, तुम्ही थोडे खालीं वांका, दाट देवदार वृक्षांनो, तुम्ही विरळ व्हा. मला माहेरची आठवण होत आहे. वडिलांचा गांव बघूं द्या.]

माहेरबद्दल वाटणारा आपलेपणा आणखी एका **मराठी** लोकगीतांतून प्रकर्षानें व्यक्त झालेला आहे :

*एवढंसं घरकुल बाई सारवुनी काढावं*
*उखळ त्यावरी रोखावं बाई, जातें जी मांडावं*
*अस्सं उखळ गोड बाई खपल्या कांडाव्या*
*अशा खपल्या गोड बाई गहूं ते ओलवावे*
*अस्से गहूं गोड बाई जातीं ते टाकावे*
*अस्से जातं गोड बाई सोजी ती काढावी*
*अश्शी सोजी गोड बाई गव्हले ते वळावे*
*अस्सं गव्हले गोड बाई दुरडीं भरावे*
*अश्शी दुरडी गोड बाई माहेरीं धाडावी*
*अस्सं माहेर गोड बाई खेळाया धाडीतं*
*अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं*

अगदीं हेंच गाणें **राजस्थानी** भाषेंतहि आहे :

*छोटी छोटी तुरकल्या नै छबड़्यो गूंथावूं जी*
*आछो म्हारो छबड़्यो पीळ्यो गोबर लाऊं जी*
*आछो म्हारो पीळ्यो गोबर आंगणियो लींपाऊं जी*
*आछो म्हारो आंगणियो घट्टी चूल्हा मांडूं जी*
*आछा म्हारा घट्टी चूल्हा मण मण मैदो पीसूं जी*
*आछो म्हारो मण मण मैदो लाड्डा संधाऊं जी*
*आछा म्हारा लड्ड़ा पीयरियो खंदाऊं जी*
*आछा म्हारो पीयरियो दौडा दे दे खेलूं जी*
*खोटो म्हारो सासरियो घूंघटियामें छीजूं जी.*

[लहान लहान काडया घेऊन त्याची टोपली विणीन. त्यांत मग मी शेणमाती आणीन. त्या शेणमातीनें अंगण सारवून काढीन. त्या अंगणांत मी चूल मांडीन व जातें रोवीन. त्या जात्यावर मणभर मैदा दळून काढीन. त्या मैद्याचे लाडू वळीन आणि ते गोड लाडू माझ्या माहेरीं पाठवीन. माझें माहेर किती चांगलें आहे. मन मानेल तसें धांवून खेळतां येतें. आणि सासर कसलें वाईट आहे–घुंगट काढून तेथें जीव घाबरा होतो.]

मराठी व राजस्थानी लोकगीतांतील हें साम्य विलक्षण आहे. आणि या साम्यावरून हेंच दिसून येतें कीं, माहेराबद्दल आपलेपणा वाटणें व सासर नकोसें वाटणें या स्त्रीच्या सहजजात भावना आहेत. डॉ. इरावतीबाई कर्वे यांनीं म्हटलें आहे, "बायकांची माहेरची ओढ, सासरीं जायला खळखळ, ह्या सर्व गोष्टी दाक्षिणात्यांच्या भावनांच्या निदर्शक आहेत." (मराठी लोकांची संस्कृति–डॉ. इरावती कर्वे. पृ. २०४–२०५) पण याच भावना इतर प्रांतांतील लोकगीतांमधूनहि आढळतात. तेव्हां त्यांना दाक्षिणात्यांच्या भावना म्हणण्यापेक्षां स्त्रीसुलभ भावना म्हणावयास हरकत नसावी असें आम्हांस वाटतें.

सासुरवासाचें वर्णन करणारीं अशीं अनेक गीतें सर्व प्रांतांतून आढळतात. पण आपल्या प्राचीन ग्रंथांतून कांहीं सासुरवासाचें वर्णन फारसें आढळत नाहीं. ऋग्वेदांत म्हटलेलें आहे :

*सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञीं श्वश्र्वां भव ।*
*ननान्दरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी आधि देवृषु ॥*

(१०.७.८५)

महाभारतांत सासू-सुनांचे संबंध खूप चांगले असल्याचें दिसतें. कुन्तीनें स्पष्टपणें कृष्णाजवळ बोलून दाखविलेलें आहे :

*सर्वैः पुत्रैः प्रियतरा द्रौपदी मे जनार्दन ।*
*कुलीना रूपसंपन्ना सर्वैः समुदिता गुणैः ॥*

(५.९०.४३)

इतकेंच नव्हे तर :

*न दुःखं राज्यहरणे न च द्यूते पराजयः ।*
*प्रजाजनं तु पुत्राणां न मे तद्दुःखकारणम् ॥*
*यत्तु सा बृहती श्यामा एकवस्त्रा सभां गता ।*
*अशृणोत्परुषा वाचः किं नु दुःखतरं ततः ॥*

(५.९०.८५,८६.)

कुन्तीप्रमाणेंच गांधारीचेंहि आपल्या सुनांवर अतिशय प्रेम आहे. महाभारताचें युद्ध संपलें तेव्हां आपले पुत्र मरण पावले यापेक्षांहि अधिक तिला सुनांचा शोक पाहून वाईट वाटतें. (११·१८·२).

रामायणांत कौसल्या व सीता यांच्यांतहि जिव्हाळ्याचें नातें आढळतें. पण कैकेयीमुळें अप्रत्यक्षपणें तिला सासुरवास घडला. लोकगीतांत याचा उल्लेख आला तो असा :

*एवढा सासुरवास झाला रामाचे सीतेला*
*तेथुन परिपाठ लागला दुनियेला*

याचा अर्थ रामायणापूर्वी सासुरवास होत नसावा असें मात्र नाहीं. पण काव्यांत वर्णिला जाण्याइतका तो कदाचित् तीव्र नसावा आणि असला तरी त्याचें वर्णन करावेंसें कोणाला वाटलें नसावें. काव्य नेहमीं समाजांतील वरच्या थराच्या लोकांबद्दल असतें. त्यामुळेंदेखील सासुरवासासारख्या सामान्य विषयाकडे लक्ष गेलें नसावें. मानवी भावना मूलतः होत्या तशाच आहेत. निरनिराळे शोध लावून ज्ञान वाढवून मानवानें आपली प्रगति करून घेतली असली व ज्ञानाच्या संस्कारामुळें तो आपल्या भावनांवर ताबा मिळवूं शकला तरी काम, क्रोध, लोभ, मद, मोह, मत्सर हे षड्रिपू त्याच्या मनांत दबा धरून बसलेले असतातच. सासूसुनांच्या झगड्याचें मुख्य कारण म्हणजे अधिकार-लालसा हें होय ! सासूला वाटतें, मीं मुलाला मोठें केलें आहे, त्याच्यावर माझा हक्क आहे आणि सुनेला वाटतें पतीची खरी सहधर्मचारिणी मी आहें, तेव्हां त्याच्यावर माझा

हक्क आहे. या ओढाताणींतून सासूसुनांचे झगडे होतात. ही अधिकारलालसा पूर्वींहि होती आणि आजहि आहे. त्यामुळें साहजिकच लोकगीतांमधून त्याचें बरेंच वर्णन आलेलें आहे. मात्र, गुजरात, राजस्थान, पंजाब, उत्तरप्रदेश, गढवाल, नेपाळ, बिहार, मध्यभारत इत्यादि सर्व प्रांतांतील लोकगीतें सासुरवासाचें वर्णन करून थांबतात, क्वचित् समजूतदार सासू व नणंदा यांचेंहि चित्र रेखाटतात. पण मराठींत भाचीला सून करून घेतल्यामुळें जो बरावाईटपणा निर्माण होतो त्याचेंहि मराठी लोकगीतांमधून वर्णन आढळतें. तें त्या प्रांतांतील लोकगीतांमधून नाहीं. कारण हें नातेंच तेथें नाहीं.

स्त्रीहृदयाची सासुरवासाच्या निमित्तानें दिसून येणारी काळी बाजू इतकी पाहिल्यानंतर स्त्रीहृदयाचा उज्ज्वल भागहि पाहावयास हवा! स्त्रीहृदय जितकें दुष्ट होऊं शकतें तितकेंच चांगलें देखील होऊं शकतें. इतकेंच नव्हे तर तें मायमाउलीचें हृदय असल्यामुळें कित्येकदां वाइटावर चांगल्याचा विजय झालेला दिसतो. आणि यामुळेंच लोकगीतांतून सुखी कुटुंबाचीं चित्रेंदेखील रंगविलेलीं आढळतात. सूनमुख पाहून धन्य होणारी सासूदेखील मराठी लोकगीतांत पाहायला सांपडते.

*कडु पिकलं कारलं महादेवाला वाहिलं*
*सूनमूख म्यां पाहिलं*
*कडु कारल्याचा वेल फुलांनीं गहिरेबाज*
*सासूचा आशिर्वाद*
*लेक बोलका पंडित सून लाडकी मालन*
*रोज दोघांचं कौतुक डोळा भरून पाहीन*

अशीच आनंदानें गाणारी मायमाउली सासू आपल्याला एका राजस्थानी लोकगीतांतहि आढळते. सुखानें, तृप्त मनानें, समाधानानें ती गाते—"माझ्या अंगणांत आंब्याचा वृक्ष आहे, मागील परसदारीं मरवा आहे. हें घर किती छान, प्रसन्न आहे. हे लक्ष्मीदेवी, जेथें सदैव आनंदमांगल्य असतें, जेथें मोठ्यांना नांवलौकिक मिळतो, लेकीबाळींना मान मिळतो, कुलवधूंचा आदर केला जातो आणि सासू–नणंदा त्यांच्या गुणांची प्रशंसा करतात अशा घरीं चल. माझ्या गोठ्यांत गाईम्हशी आहेत आणि खांबाला रवी टेकून ठेवलेली आहे. घुसळण्याचा घुर्र....घुर्र....आवाज होत आहे आणि अंगणांत कुलवधूंचे अलंकार निनादत आहेत. संसाराचें खरें सुख मीं आज पाहिलें—माझा मुलगा विवाह करून आला आहे. मुलामुळें ही सून माझी लाडकी आहे. आणि मुलगा तर काय—कुलदीपक आहे."

अशा सुखी घरांतील मराठी सुनेलाहि मग साहजिकच आपल्या घरचीं देवतुल्य माणसें बघून वाटतें :

| | |
|---|---|
| काय मीं पुण्य केलें | भावासारखा हो दीर |
| कमळीं रघुवीर | पूजीयेला |
| काय मी पुण्य केलें | बहिणीसारखी नणंद |
| कमळीं गोविंद | पूजीयेला |
| काय मीं पुण्य केलें | बापासारखा सासरा |
| कमळीं हरिहरा | पूजीयेलें |
| काय मीं पुण्य केलें | आईपरी सासूबाई |
| कमळीं अंबाई | पूजीयेली |

राजस्थानी सूनदेखील आपल्या सासरच्या सर्व लोकांची प्रशंसा करते :

*मधुवन रो आंबो मोरियो*
*ओ तो पसर्‍यो अे सारी मारवाड़ ।*
*सहेल्याँ अे आंबो मोरियो.*
*बहू रिमझिम महलाँ सूँ ऊतरी*
*आ तो कर सोळा सिणगार । सहेल्याँ ए........*
*सासूजी पूछयो ए बहू, थारो*
*गहणो म्हाँने पहर दिखाव । सहल्याँ ए...*
*सासू, गहणे ने काँई पूछो*
*गहणो ओ म्हारो सौ परवार । सहेल्याँ ए...*
*म्हारा सुसरोजी गढ़रा राजवी*
*सासूजी म्हारा रतन भँडार । सहेल्याँ ए...*
*म्हारा जेठजी वाजूबँद बाँकडा*
*जेठाणी म्हारी बाजूबँदरी लूँब । सेहल्याँ ए....*
*म्हारो देवर चुड़लो दाँत रो*
*देराणी म्हारी चुड़लेरी मजीठ । सहेल्याँ ए....*
*म्हा रो कँवर घर रो चानणो*
*कुलबहू ए दिवले री जोत । सहेल्याँ ए....*
*म्हारी धीय ज हाथ री मूँदडी*
*जँवाई म्हा रे चँपेली रो फूल । सहेल्याँ ए....*

*म्हारी नणद कसूमल काँचळी*
*नणदोई म्हा रे गजमोत्याँ रो हार । सहेल्याँ ए....*
*म्हाँ रो सायब सिर रा सेवरो*
*सायबाणी म्हे तो सेजाँ रो सिणगार । सहेल्याँ ओ...*
*म्हे तो वान्या, ए बहूजी, थाँरा बोलने*
*लड़ायो म्हा रो सौ परवार । सहेल्याँ ए...*
*म्हे तो वान्याजी, सासूजी, थाँ री कोख ने*
*थे तो जाया अरजण–भीम । सहल्यँ ए....*

[मधुवनाच्या आंब्याला मोहोर आलेला आहे आणि तो सर्व राजस्थानांत पसरला आहे. सखे, बघ तर खरी आम्रवृक्ष कसा फुलला आहे. (बहरलेला आम्रवृक्ष हा कुटुंबजीवनाचें प्रतीक आहे. कौटुंबिक सुख सर्व राजस्थानांत व्यापलेलें आहे असा सूचक अर्थ आहे.) सून छुमछुम् करीत महालांतून खालीं आली तेव्हां सासूनें तिला म्हटलें, "सूनबाई, तुझे सर्व दागिने तर घालून दाखव." यावर आपल्या सुखी संसारांत रममाण झालेली ती समाधानी सून चातुर्यानें सांगते—"सासूबाई, दागिन्यांचें काय विचारतां? माझें हें कुटुंबच माझें आभूषण आहे. माझे मामंजी घरचे राजे आहेत. आपण रत्नांची खाण आहांत. थोरले दीर बाजूबंद आहेत, तर थोरल्या जाऊबाई बाजुबंदाच्या घुंघरूसारख्या आहेत. धाकटे दीर हस्तिदंती चुडे आहेत आणि धाकटी जाऊ त्या चुड्यावरील लाल नक्षी आहे.

माझा मुलगा कुलाचा दीपक आहे, आणि सून त्या दिव्याची ज्योत आहे. माझी कन्या बोटांतील अंगठी आहे व जांवई चाफ्याचें फूल आहे.

नणंद कुसुंबी रंगाची चोळी आहे तर नणंदेचें यजमान मोत्यांचा हार आहेत. माझे पतिदेव माझ्या मस्तकावरील मुकुट आहेत आणि मी त्यांच्या शेजेचा शृंगार आहे.

हें सर्व ऐकून सासूबाई आनंदल्या व त्यांच्या मुखांतून हर्षोद्गार बाहेर पडले—'धन्य आहेस सूनबाई तूं! तूं तर माझ्या अवघ्या कुटुंबाची प्रशंसा केली आहेस.' पण या शाबासकीनें फुगून न जातां मराठी सुनेप्रमाणें ही सूनबाईदेखील आपल्या सासूच्या 'कुसव्याची' वाखाणणी करते—"सासूबाई, आपण खरोखरी धन्य आहांत. आपण भीम–अर्जुन यांसारख्या पुत्रांना जन्म दिला."]

***गुजरातींतहि*** आपल्याला अगदीं असेंच 'चांदलियो' नांवाचें गीत आढळतें :

*आसी मासे शरद पुननी रात जो*
*चाँदलियो ऊग्यो रे सखि म्हारा चौक माँ*
*ससरो म्हारो देरा माँ नो देव जो*
*सासूड़ी दरासरकी रे पुतली*
*जेठ म्हारो आषाढ़ी नो मेघ जो*
*जेठाणी झबूके बादल बीजली*
*दीयर म्हारो चाँपलियानो छोड़ जो*
*देराणी चाँपलिया केरी पाँखड़ी*
*नणद म्हारी बाड़ी माँ नो बेल जो*
*नणदोई म्हारा बाड़ी माँ नो बाँदरो*
*गोरी नो परणियो चतुर सुजान जो*
*परणियो वाहण कमावा जाय जो*
*वाहण कमाई ने लावे खारेक टोपरा*
*खारेक खाऊँ तो गोरी ने ऊँचावले*

[आश्विन महिन्यांतील कोजागिरी पौर्णिमा आहे. माझ्या अंगणांत चंद्र उगवला आहे. माझे सासरे देवालयांतील देव आहेत, सासूबाई मंदिरांतील मूर्ति आहेत. माझे थोरले दीर आषाढांतील मेघ आहेत, थोरली जाऊ मेघांमध्यें चमकणारी वीज आहे. माझा धाकटा दीर चांफ्याचा वृक्ष आहे, धाकटी जाऊ चांफ्याची पाकळी आहे. माझी नणंद बागेंतील वेल आहे आणि नणंदेचा पति त्या बागेंतील वानर आहे. माझे पति चतुर व हुशार आहेत. ते सागरी मार्गानें पैसे मिळविण्यासाठीं जातात. पैसे मिळवून ते खारका व खोबरें आणतात. खारका मला आवडतात.]

हें सर्व झालें सुनेला आपल्या सासरच्या मंडळींबद्दल वाटणाऱ्या आदराचें वर्णन! याशिवाय इतर कांहीं लोकगीतांमधून नणंदेचा समजूतदारपणा, दिराचा चांगुलपणा, भावजयीबद्दल त्यांना वाटणारी आपुलकी, आत्मीयता ही देखील व्यक्त झालेली आहे. एका मगही लोकगीतांतील दीर रागावून निघून गेलेल्या भावाची मनधरणी करून त्याला घरीं माघारीं घेऊन येतो आणि भावाचें व वहिनीचें मीलन घडवून आणतो. ह्या गीताचा अर्थ असा आहे—लहानसें तुळसीचें रोप आहे, लांबट अशीं त्याचीं पानें आहेत आणि मंजिऱ्या आल्यामुळें तें किती खुलून दिसत आहे. खालीं वांकून मी अंगणांतील केर काढीत होतें व दीर माझ्याकडे पाहात होता. दिरानें विचारलें, "वहिनी, तुझे ओठ कां सुकलेले आहेत आणि कोणाच्या विरहामुळें तुझ्या

डोळ्यांतून अश्रु वाहात आहेत?" वहिनीनें उत्तर दिलें, "भाऊजी, विडा न खाल्ल्या-मुळें माझे ओठ सुकलेले आहेत. (विरहिणी विडा खात नसतात ही कल्पना याच्या मुळाशीं आहे.) आणि तुमच्या भावाच्या विरहामुळें डोळ्यांतून अश्रु वहात आहेत." दीर म्हणाला, "वहिनी, तूं मला सातू तयार करून दे. मी भावाला घेऊन येतों."

दीर एका वनांत गेला, दुसऱ्या वनांत गेला, अखेर तिसऱ्या वनांत त्याला त्याचा भाऊ साधूप्रमाणें बसलेला दिसला.

दिरानें म्हटलें, "दादा, राग आवर. वहिनी घरीं सारखी रडत आहे. घरीं चल."

भावानें उत्तर दिलें, "मी कसा माझा राग आवरूं? तुझी वहिनी वाटेल तसें बोलते." पण दीर भावाची समजूत घालतो आणि त्याला घेऊन घरीं येतो. झरोक्यांतून वहिनी बघते; दीर भावाला घेऊन येत आहे. आनंदानें व कृतज्ञतेनें ती म्हणते, "अइसन देवरजीके पाँव धोइके पिअबों, गइल सेंनुर बहुरावेलें रेखो॥" अशा दिराचें तर चरणोदक घ्यायला हवें, त्यांच्यामुळें मला माझें सौभाग्य मिळालें.

सासरच्या लोकांबद्दल स्त्रीला जन्मजात कांहीं प्रेम वाटत नसतें. कितीहि झालें तरी ती परक्या घरून आलेली असते. तें प्रेम व तो आदर तिला नंतर निर्माण करावा लागतो. आणि वरील गीतांत वर्णिलेल्या घटनांसारख्या घटना घडतात तेव्हां साह-जिकच तिला सासरची मंडळी देखील आपली वाटूं लागतात. दीर चांगुलपणानें वागतो तेव्हां तो तिला भावासारखा वाटतो आणि नणंद समजुतदारपणें वागते तेव्हां ती त्याला बहिणीसारखी वाटते. लोकगीतांतून आगलाव्या, चहाडखोर नणंदेचें वर्णन आढळतें तद्वत् वहिनीची बाजू घेऊन भावाचा राग घालविणारी व भावाचें नि वहिनीचें मीलन घडवून आणणारी नणंदहि दिसते. 'व्रज' भाषेतील 'विजयराणी'च्या गीतामध्यें अशीच समजूतदार नणंद दिसते :

*चार बुर्ज चारों ओर बीच अटरिया*
*ए बिजैरानी ईंट की जी*
*हात दिबल सिर सौर धमकि अटरिया*
*ए बिजैरानी चढ़ गई जी.*
*खोलो राजा बजर केवार भीजे*
*ए राजा त्यारी गोरड़ी जी*
*नाएं खोलूं बजर केवार पराए पुरख ते*
*ए डावर नैनी चौं हँसी जी.*
*आई धन तन मन मार मरख कैं बैठी*
*ए बिजैरानी देहरी जी*

*लौहरी ननद बूझै बात आज अनमनी*
*ए विजैरानी चौंभई जी*
*त्यारौ भइया असल गँवार कदर न जानी*
*ए बिजैरानीके जिअकी जी*
*करौ भावी सोलेहुँ सिंगार पटिया तो पारौ*
*चोखे मोम की जी*
*हाथ दिवल सिर सौर धमकि अटरिया*
*ए बिजैरानी चढ़ गई जी*
*खोलो भइया बजर केवार बाहर भीजै*
*ए बिरन क त्यारी गोरड़ी जी*
*भीजै भीजन चौं न देउ पराए पुरख ते*
*ए विजैरानी चौं हँसी जी*
*जाकौ भइया हँसनै सुभाव हँसिबौ तो जायगो*
*ए बिजैरानी ढक लईजी*
*रोई धन हीअरां हिलोर आँसू तो पौंछे*
*ए भँवर सूए पेचते जी*
*जीअै लाली त्यारो वीर भँवर मिलायो*
*ए ननद रांनी तैं कियो जी*
*दउँगी लाली दक्खनौ चीर गिरी ए छुहारो*
*ए ननद त्यारे मुख भरूँ जी*

या गीताचा थोडक्यांत अर्थ असा आहे कीं विजयराणीला परपुरुषाशीं हंसून बोलतांना पाहून तिच्या नवऱ्याला संशय येतो आणि तो खोलीचें दार उघडून तिला आंत घेत नाहीं. त्यामुळें विजयराणीला अतिशय वाईट वाटतें. त्यावेळीं तिला उदास पाहून तिची नणंद उदासीनतेचें कारण विचारते. आणि मग भावाला समजावते कीं, तुझा संशय व्यर्थ आहे, हंसून सर्वांशीं बोलणें हा विजयराणीचा स्वभावच आहे. संशय दूर होतो व पति विजयराणीचे अश्रु पुसतो.

ह्याच अर्थाचें लोकगीत **अवधी** व **भोजपुरी** या भाषांमध्येंहि आढळतें.

अशा तऱ्हेनें सासरचें दुःख, छळ, कष्ट वर्णन करणारीं, तेथील लोकांचा बरावाईटपणा सांगणारीं लोकगीतें आहेत तद्वत् तेथील सुख व्यक्त करणारीं, तेथील लोकांच्या आत्मीयतेचा आविष्कार करणारीं लोकगीतेंहि आहेत. माहेरविषयक

लोकगीतांमधूनहि अशा दोन्ही बाजू दिसून येतात. माहेरचें सुख सांगणारीं गीतें आहेत तशींच भांडणें सांगणारीं लोकगीतेंहि तुरळक कां होईना, हातीं लागतात. माहेरच्या मंडळींमध्यें आईवडिलांच्या खालोखाल भावाचें स्थान असतें. बहीणभावांचें निर्मळ प्रेम जगविख्यात आहे पण बहीणभावांचीं भांडणेंहि होतात हें देखील एक कटु सत्य आहे. मात्र एकमेकांना एकमेकांचा राग आला तर फार तर तीं आयुष्यभर तोंड बघणार नाहींत, बोलणार नाहींत. किंवा बहिणीच्या हातून कांहीं अक्षम्य चूक झाली तर भाऊ तिला देहांताची शिक्षा करील. पण भावाच्या हातून कांहींहि घडलें तरी बहीण कधींच भावाचा वध करणार नाहीं. कारण त्याच्यामुळें तिच्या वडिलांचा वंशवेल वाढत असतो. असें असलें तरी पैशाच्या लोभापायीं अविवेकानें भावाचा खून करणारी बहीण आपल्याला एका **मराठी** तसेंच एका **पंजाबी** लोकगीतांत दिसते. बहीण भावाचा वध करते या अपवादात्मक घटनेचा इतक्या लांब असलेल्या प्रांतांतील लोकगीतांतून समान उल्लेख आढळतो हें तौलनिक अभ्यासाच्या दृष्टीनें मोठें मनोरंजक व उपयुक्त वाटतें म्हणून मुद्दाम हीं दोन्ही लोकगीतें येथें देत आहें. **मराठी** लोकगीत असें आहे :

*भावाची वंज बहीण पाहिली*
*पाय धुण्याला पाणी ऽ देल्ली*
*लोहाळ्या गंगाळा पाणी ऽ सारिली*
*करवती धोतर नेसाया देल्ली*
*गंध उगाळून समोर ठेविली*
*गंध कपाळाला पहा चंदनाची कळा*
*भाजी भाकर बंधू वांग्याची शाक*
*पुरणाच्या पोळीले लावा हो हात*
*वदरून जोखिली साखर*
*बंधुराया जेवा पोटभर*
*जेवून खाऊन तिरपस झाला*
*पांचा पानांचा विडा वरीला*
*जाऊन पलंगावरि आरंभ केला*
*निद्रा गेलीया लागून*
*पुढं होती व्यर्थ हान*
*हांका मारे भ्रताराला*

वधा या माज्या बंधूजीला
कां गे वधतेस तुज्या बंधूला
सहा महिन्यान साडि घेईल तुला
आठवा इमानाचा पुरा
हेडली खुंटीचा खंजीर
गेली चालून भावाजवळ
दिला ऽ खंजीर खुपसून
घेतलान् भावाचा ग प्राण
तीन घंटे प्राण नाहीं गेला
गाईवानी होमर होमरून मेला
घरांत करित होति दळण कांडण
तिथें ऽ ऽ ऽ देला त्याला गाडून
धन्य देवा बहिणीची छाती
भावाला देली मूठमाती
चवथ्या दिशीं मायेच्या स्वप्नासि गेला
बायको डोईच्या तोडी केसाला
माय गडबडसां लोळे

पंजाबी लोकगीत असें आहे :

इक्को माई दा पुत्त क सोई परदेस गया, क सोई परदेस गया
गया दख्खन दी बाही मामाँ ओहदा लग्ग वी गया
क नामाँ ओहदा लग्ग वी गया
खट्ट के आया भैण दे कोल क भैण भेद लै वी लिया!
की कुज्झ वीर पल्ले ते की कुज्झ डेरे रिहा,
पंज सौ भैणां पल्ले क पंज सौ डेरे रिहा,
भज्जी भज्जी गई साई दे कोल साइयाँ अरज मन्नें.
वीर मेरे तूं मार माया घर बे रवे,
बठ कुत्ती कमजात साला मेरा कौन बने.
भज्जी भज्जी गइ पुत्र दे कोल पुत्रा अरज मन्नें,
वीर मेरे नूं मार माया घर बे रवे,
बैठ कुत्ती कमजात मामा मेरा कौन बने,

*भज्जी भज्जी गई दियोरा दे कोल दियोर अरज मन्नें,*
*वीर मेरे नूँ मार माया घर बे रवे,*
*उठ्ठिया शेर इलाही कीते आ डक्के चार,*
*गहीरे बिच्च लिप्प बे दित्ता,*
*छुट्टी पुरे दी वा गहीरा ढे वी पिया,*
*उड्डिया भौर नमागाँ माँ जी दे पास गया,*
*उठ्ठ दस्स माए सुत्तिए क पुत्त तेरा किद्धर गया,*
*क भैण नें मार सुट्टिया*
*भज्जी भज्जी आई ए धी दे कोल धीए दौलत लेंदीखोल*
*क वार काहनूँ मारिया सी.*

[आईचा एकुलता एक मुलगा होता. तो परदेशीं गेला. दक्षिणेकडे गेला आणि कोठें तरी नोकरी करूं लागला. पैसे मिळवून परत येतांना त्यानें बहिणीकडे मुक्काम केला. बहिणीनें सारें कांहीं विचारून घेतलें. गुपित काढून घेतलें—"भाऊराया, तुझ्याजवळ किती रुपये आहेत? आणि मुक्कामीं तूं किती रुपये ठेवले आहेस?" पांचशें रुपये माझ्याजवळ आहेत आणि पांचशें मुक्कामीं ठेवलेले आहेत. बहीण लगबगीनें पतीकडे गेली, "पतिदेवा, माझें ऐका. माझ्या भावाला मारून टाका. त्याचे पैसे आम्हांला मिळतील." "दूर हो नीच कुत्रे! त्याला मारून टाकलें तर मग माझा मेहुणा कोण होईल?" बहीण धांवत मुलाकडे गेली व म्हणाली, "बाळ, माझें ऐक. माझ्या भावाला मारून टाक म्हणजे त्याचें धन आपल्या घरांत राहील." "दूर हो नीच कुत्रे! मग माझा मामा कोण होईल?" बहीण धांवत दिराकडे गेली. "भावोजी, माझें ऐका. माझ्या भावाला मारून टाका म्हणजे त्याचें धन आपल्या घरांत राहील." दीर उठला. त्यानें चार तुकडे करून टाकले. गोवऱ्यांच्या ढिगांत लपवून वरून सारवून टाकलें. पूर्वेकडचा वारा वाहूं लागला. गोवऱ्या ढांसळून पडल्या. भावाचा आत्मा उडत उडत आईकडे गेला. "आई, आई, ऊठ. तुझा मुलगा कोठें आहे सांग बघूं. बहिणीनें भावाचा वध करविला." आई धांवत धांवत मुलीकडे आली व म्हणाली, "बाळे, पैसे हवे तर घ्यायचे होतेस. भावाला कां मारलेंस?"

हें झालें पैशापायीं भावाचा खून करणाऱ्या बहिणीचें चित्रण! पण आपत्कालीं माहेरीं थारा मिळत नाहीं, जिला सासरीं मान नाहीं तिचा माहेरींदेखील अपमान होतो, एरवीं माया करणारी प्रेमळ मंडळीदेखील तोंड फिरवून घेतात याचें वर्णनहि एका **भोजपुरी** लोकगीतांत आढळतें, तें असें :

*सभवा बइठल तुहूँ बाबा ! त बितावि बिपरिया हउवेए राम*
*टुटलि मड़इया हम के दी ती त बिपती गँवइतीं नु हो ॥*
*टुटही मँडइया बेटि टुटि गइलि जाहु न मयरिया आगे ए राम ।*
*आसा ! फटही लुगरिया हमके देहू त बिपति गँवइति नु हो ॥*
*फटहीं लुगरिया बेटी फाटि गइली जाहु न भईया आगे ए राम ॥*
*भइया ! बीता एक जगहिया हमके देत न बिपती गँवइती नु हो ॥*
*बीता एक जगहिया जोताइ गइली जाहु बहिनी भउजी आगे ए राम ।*
*भउजी ! पछिली टिकरिया हमके देतू त बिपती गँवइती नु हो ॥*
*जवन टिकरिया ननदी तुहें देबों से हो मोर लइका खइहें ए राम ।*
*जवने डगरिया तुहूँ अइलु तवने धरि चलि जाहु नु हो ॥*

नवरा रागावून निघून गेला तेव्हां सासरच्या मंडळींनीं सुनेची जबाबदारी घेण्यास नकार दिला. नाइलाजानें सून आपल्या माहेरीं आली. बैठकींत वडील बसलेले होते. तिनें वडिलांना म्हटलें, "बाबा, संकटांत सांपडलेली मी तुमची लेक आहें. ती तोडकीमोडकी झोपडी मला दिली तर तीमध्यें राहून मी माझे हे संकट-कालीन दिवस घालवीन." वडिलांनीं उत्तर दिलें, "मुली, माझी ती मोडकी झोपडी साफ मोडून गेली. तूं तुझ्या आईकडे जा." मुलगी आईकडे गेली. "आई, तुझीं फाटकीं जुनेरीं मला नेसायला दिलींस तर माझे हे वाईट दिवस मी कसेबसे घालवीन." "बाळे, माझें फाटकें जुनेरें पार फाटून गेलें. तूं तुझ्या भावाजवळ जा बयूं." "दादा, मला थोडीशी जमीन दिलीस तर माझे हेहि दिवस जातील." "ताई, तुला जी जमीन हवी आहे तीमध्यें मी शेती करणार आहें. तूं तुझ्या वहिनीला विचार." "वहिनी, शेवटीं उरलेला भाकरीचा तुकडा मला दिलास तर माझा हा आपत्काल निघून जाईल." "वन्सं, तुम्हांला द्यायच्या ऐवजीं तो भाकरीचा तुकडा मी माझ्या मुलांना देईन. तुम्ही आल्या वाटेनं चालत्या व्हा बयूं."

निराश होऊन ती मुलगी निघून जाते. पुढें पतीचा राग शांत होऊन तो तिच्यासाठीं वस्त्राभूषणें घेऊन येतो. त्यानें आणलेलीं वस्त्रें ती नेसते, दागिने घालते आणि त्यावेळीं टचकन् तिच्या डोळ्यांत अश्रु येतात. पतीला वाटतें कीं, हिला माहेरची आठवण होत आहे. म्हणून तो म्हणतो कीं, चल, तुझ्या माहेरच्या मंडळींना भेटून येऊं. तेव्हां ती म्हणते,

*आगि लगे पियवा हो ओहि नइहरवा बिपति*
*केहु ना सहाइ ए राम ।*

"आग लागो माझ्या माहेराला ! आपत्कालीं कोणी कोणाचें नाहीं"

—आणि हीच खरी वस्तुस्थिति आहे ! माहेर आपलें खरें. पण सासरीं सुखांत असलेली लेक जेव्हां माहेरीं दोनचार दिवसांच्या माहेरपणासाठीं येते तेव्हां माहेरीं तिला जितकें प्रेम व जितका आदर, मानसन्मान मिळतो तितका सासरीं थारा नसलेल्या मुलीला ती कायमची म्हणून जर माहेरीं आली तर मिळत नाहीं. माहेरीं देखील मग तिची उपेक्षाच होते. हें एक कटु सत्य आहे. पण आमची समाजरचनाच पितृसावर्ण्य पद्धतीच्या वर्चस्वामुळें अशी झालेली आहे कीं, विवाहित स्त्रीचा घरांतील वा घराबाहेरील मानसन्मान सारा पतीवर अवलंबून असतो. पतीकडून उपेक्षिल्या गेलेल्या स्त्रीला घरांतील मंडळी वाटेल तसें बोलतात, मोलकरणीइतकाहि मान तिला घरांत मिळत नाहीं, आणि ती जर घराबाहेर पडली तर बाहेरहि शिकार टिपून घ्यायला शिकारी बसलेले असतात, समाज छीः थू करायला तयार असतो. त्यामुळें विवाहित स्त्रीला इकडे आड व तिकडे विहीर असें होऊन जातें. या वस्तुस्थितीचें लोकगीतांतून व्हावयास हवें तसें चित्रण मात्र आलेलें नाहीं. एखाददुसरें अपवादात्मक लोकगीत मिळतें एवढेंच ! आणि यास मुख्य कारण हेंच असावें कीं, माहेरच्या व्यक्तींशीं स्त्रीचें रक्ताचें नातें असतें. त्यामुळें त्यांनीं कांहींहि केलें तरी तें स्त्री पचवून टाकते. तिचें रम्य बालपण तेथें गेलेलें असतें. त्याच्या रम्य स्मृतीच तिच्या मनांत प्रायः रेंगाळत असतात. शिवाय माहेरीं उपेक्षा मिळाली तरी त्याच्याच जोडीला आपुलकीहि मिळते, आईनें प्रसंगीं मारलें तरी ती प्रेमानें जेवायलाहि घालते, मायेनें कुशींतहि घेते, बहीण-भाऊ भांडले तरी एकमेकांशिवाय चैनहि पडत नाहीं. त्यामुळें माहेरचा वाईट भागहि सहज खपून जातो. पण सासरीं याउलट परिस्थिति असते. मिळालें तर चांगलें स्थान घरांत मिळतें नाहीं तर मग इतकी अवहेलना होते कीं, जगणें कठीण व्हावें. राग तरी मिळतो नाहीं तर प्रेम तरी मिळतें. नशिबीं असेल तसें व कांहीं अंशीं आपण राहूं तसें; यांपैकीं एक कांहीं तरी मिळतें.

सर्वसाधारणपणें अशा वेळीं प्रेमापेक्षां राग अधिक पदरीं पडतो. कारण दोन पिढयांचा संघर्ष चालू होतो. जुनी पिढी आपला हक्क सोडायला बहुधा तयार होत नाहीं व नवी पिढी नव्या जोमांत असल्यामुळें जुळवून घेण्याचें टाळते. त्यांतून मग ठिणगी पेटते व जीवन उध्वस्त होण्यापर्यंत मजल जाते. ज्या ठिकाणीं दोन्ही पिढया जुळवून घेतात त्या ठिकाणीं मग संसार सुखाचा होतो. सुनेचें सासरच्या मंडळींशीं रक्ताचें नातें कांहीं नसतें. त्यामुळें त्या मंडळींबद्दल तिला नैसर्गिक ओढ वाटण्याचें कारण नसतें. हें उमजून ज्या वेळीं सासरची मंडळी तिला आपल्याबद्दल आपुलकी वाटेल अशा तऱ्हेनें तिच्याशीं वागतात त्या वेळीं मांगल्याची, प्रसन्नतेची

पखरण होते. आपल्याकडे दोन्ही पाहायला मिळतें. संसार उध्वस्त झाल्याचेंहि दिसून येतें आणि देवतांनाहि रहावेंसें वाटण्यासारखा स्वर्गहि घरांतच निर्माण झालेला दृष्टीस पडतो.

(प्रस्तुत लेख लिहिण्यासाठीं विविध भाषांमधील अनेक लोकगीतसंग्रहांचें साहाय्य घेतलेलें आहे.)



# जीवनगाथा

मंडळी, तुमच्या-आमच्यासारख्या माणसांचें जीवन ही एक प्रकारची गाथा आहे. या गाथेचीं पानें सुखदु:खांनीं माखलेलीं आहेत. भावभावनांनीं फुललेलीं आहेत. अंतरीच्या उमाळ्यानें मुडपलीं आहेत. रसास्वादानें गुंफलीं आहेत. कल्पनेच्या हिंदोळ्यावर बागडून टवटवलीं आहेत.

त्यामुळें या गाथेच्या लेखनाला अंत नाहीं आणि पठणालाहि विराम नाहीं. हें लेखन आणि पठण आदिमानवापासून जें चालू झालें आहे तें या पृथ्वीतलावर माणूस असेपर्यंत चालू रहाणार आहे. म्हणून कालावर स्वार होऊन सदैव अजिंक्य रहाणाऱ्या या भावगीताची गोडी अवीट आहे. मानवी मनाला भूल पाडणारी आहे. काळजाची भाषा बोलणारी आहे. हृदयाचा कढ सांगणारी आहे. इंद्रियांना जिव्हा फोडणारी आहे. अमृतालाहि जिंकूं पहाणारी आहे. तर तिच्याबद्दल माझ्यासारखीनें काय बोलावें? कोणत्या शब्दांची गवसणी मी त्यासाठीं तयार करावी? आणि एवढें करूनहि मीं हें भाष्य करावें कुठें? कुणापुढें?

सुखदु:खांनीं आणि जिव्हाळ्याच्या उमाळ्यांनीं माखलेला भावभावनांचा अमृतकुंभ या पायीं जेव्हां रिता होतो तेव्हां याचें उत्तर गवसतें. आणि मग लक्षांत येतें कीं, त्यासाठीं म्हणून वेगळें अगर खास असें कांहींएक करण्याची गरज नाहीं.

ह्या जीवनगाथेला सजविणारें भावगीतच मुळीं एवढें प्रभावी असतें कीं, तें ऐकतांक्षणींच माणूस देहभान विसरून जातो! आणि तें सांगणारा, गाणारा अगर स्मरणसाखळींत ओवणारा हा त्यापूर्वींच जीवनांतील ही अवस्था अनुभवून मोकळा झालेला असतो.

या विभागांतील लोकगीतें—ओव्या—वाचणारांना माझ्या या म्हणण्याची खात्रीनें प्रचीति येईल. कारण जीवनगाथेंतील हीं पानें लिपिबद्ध होण्यापूर्वीं मी स्वतः हा अनुभव अनेकदां घेतलेला आहे.

सासर-माहेरसंबंधींच्या कल्पना सांगणाऱ्या या ओव्या आहेत. सर्वसामान्य लोकांनीं पिढ्या न् पिढ्या जतन करून त्या ओव्यांना नवनवोन्मेषशालिनीच्या वैभवांत आपल्यासमोर ठेवल्या आहेत. जिवाभावानें केलेली ही भाषा आहे. अक्षर वाङ्मयाचें वैशिष्ट्य प्रकट करणारा हा निरपेक्ष मनोभाव आहे. खेडोपाडींच्या चालीरीतींनीं सजलेल्या लोकसंस्कृतीचा हा एक प्रभावी आविष्कार आहे.

त्यामुळें ह्या ओव्या वाचतांना मनाला आल्हाद वाटतो. काव्यानंदांत मन रमून जातें. एवढेंच नाहीं तर सामुदायिक जीवनाचें भाष्य करणारें हें काव्य कर्तेपणाचा वासहि न लागतां केवढें वैभवशाली आहे याची जाणीव झाल्यामुळें मति गुंगून जाते. अगदीं स्वाभाविक रीतीनें काळजांतून बाहेर पडणारा हा सहजोद्गार मराठी मायच्या अंगावर किती सुंदर साडीचोळी घालूं शकतो हें बघून विचारवंताच्याहि मनाला चालना मिळते.

म्हणून माझें म्हणणें इतकेंच कीं, उभ्या महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतून गोळा झालेल्या ह्या ओव्या सर्वांनीं आवर्जून वाचाव्यात. पाठ करून ठेवाव्यात. गाऊन दाखवाव्यात. माझी खात्री आहे कीं, सासर—माहेरविषयींच्या या कल्पना सांगून आमच्या सामान्य स्त्रियांनीं किती असामान्य जग उभें केलें आहे याचा वानवळा आपण बघूं शकाल. हीच गोष्ट या ओव्यांचेनंतर इथें देण्यांत आलेल्या गाण्यांचेबद्दलहि सांगतां येईल.

उत्तम प्रकारच्या काव्यासाठीं आवश्यक असणारे सारे गुण या भावगीतांसाठीं हात जोडून सामोरे आले आहेत. आपण रत्नपारखी आहांत म्हणून मी अधिक सांगत नाहीं. आपली मर्यादा ओळखून आपण या जीवनगाथेचीं पानें उलटावींत एवढीच नम्र विनंति.

## अनुक्रम

१८. सौ. काशीबाई सगरे
१९. श्री. बा. दे. पाटील
२०. प्रा. गजमल माळी
२१. श्री. रावसाहेब जगताप
२२. श्री. अनिल दिनकर फडके
२३. श्री. हरिहर मातेकर
२४. श्री. सुखराज हिवराळे
२५. डॉ. सरोजिनी बाबर
२६. श्री. ग. ह. पाटील
२७. सौ. मालतीबाई शिरोळे
२८. श्री. ल. मा. गायकवाड
२९. सौ. निर्मला धारप
३०. सौ. गंगुबाई बाबर
३१. सौ. नलिनीबाई शिंदे
३२. कु. चांदबीबी शेख
३३. सौ. सावित्रीबाई रेखी
३४. सौ. कमलाबाई काळे
३५. श्रीमती पार्वतीबाई जोशी
३६. कु. विमल तपस्वी
३७. सौ. चारुशीला गुप्ते
३८. सौ. शशिकला देशपांडे
३९. सौ. इंदिराबाई भाटवडेकर
४०. सौ. उषाताई डोंगरे
४१. श्रीमती गिरजाबाई केळकर
४२. श्रीमती मथुरा ढवळे
४३. प्रा. आनंद यादव
४४. श्रीमती शांतादेवी तडवी
४५. सौ. कमलाबाई काटदरे
४६. श्रीमती इंदुमती भजने
४७. श्रीमती अनसुयाई देशमुख



संग्राहिका
**सौ. कुमुदिनी पवार**
चितळी (सातारा)

एवढ्या उन्हाच्या रकामंदीं ऊन लागीतं रकारका
ताईता बंधु माझा आला विल्लास पाठीराखा

सांगली शहरामंदीं नवं इंजान जोनपाट
वाजतो खटाखटा त्यांत बंधूचा निम्मा वाटा

पंढरीच्या वाटं तुळशी आल्यात हुरड्याला
सोन्याच्या गोफणीनं विठु हाणीतो भोरण्याला

पंढरपूरामधीं उंच दुकान अत्तराचं
राज्य अखंड भ्रताराचं

पिताजी पितांबर बया गौळण वाहती गंगा
ताईता बंधु माज्या चल तीर्थाला पांडुरंगा

पंढरीला जातों भैन भावंडं आम्ही दोघं
बंधु माज्याला किती सांगूं तीर्थ घडेल मनाजोगं

पालख पाळयिना तूं कां हालीव तुळसीबाई
पोटींचीं माजीं बाळं राघू नव्हं ती मैना हाई

सावित्री भावजयी खालीं बसूनी कुंकूं लाव
सत्यवान बंधुजी ग साता नवसाचा माझा भाऊ

सावित्री भावजयी तूं ग भाग्याची साजणी
सत्यवान बंधूसाठीं करी देवाची विनवणी

समोवीरच्या सोप्यां सासूबाईचीं पावईलं
तुमच्या पोटीचं रत्नदेव रत्न चुकून धावईलं

थोरलं माझं घर पुढं पायरी मोरायाची
करणी हावशा दिरायाची

धाकले दीर बाई मला पाठच्या भावावानी
कंत दिरायाची जोडी रामलक्षुमनावानी

पंढवीरीचं कुंकूं मला महिन्याला लागे शेर
जावा ननंदाचं माझं घर

पांढरी माझी चोळी दशी बळीच्या पक्कावानी
धुंडीली पेट उनाच्या रकामंदीं हावशा भ्रतारांनी

तोडला चंदन वाचा जाईना कुटका कुटका[1]
हावशा चुडराज[2] तुमच्या गुणाचा मला चटका

सासरवाशिणीला तीला बोलती सारासारी
कंत कैवाळू हुता दारीं

सासर येवढा वस नका करूं सासूबाई
तुम्हा सारखी माझी आई

सासू नी सासईरा जाई मोगवीऱ्याचं आळं
त्यांच्या त्या सावलीला परवीजाचं मी कंवाळ

सासू नी सासईरा दोन्ही काशीचीं देवईळं
चुड माझ ते राजईस वर निशाण पिवळं

जिवाला भारी जड माझा सांगावा जातां जातां
परसदारीं माझी माता तांब्या ठेवीला तोंड धुता

---

१ तुकडा. २ पति.

मध आळींत माझा पिता चिलीम ठेवीली वदता वदता
देव खोलींत बंधू हुता सान सारीली गंध लेता

पढ्याल सोप्यां भावज उभी घागरी ठेवल्या पाण्या जातां
चुलता पंडीत बोलईतो कंदील जाऊं आतां

जिवाला भारी जड, मी कां उंबऱ्य दिलं उसं
बया मालनी खालीं बस जिमनीं लोळती माझं केंस

जिवाला माझ्या जड नव्हं कुणाच्या जावा भावा
बया माजीला आणा जावा मग हुईल माझी सेवा

राहती हंसून खेळून जन म्हणती सुखाची
पित्याच्या नांवापाई ध्याई जाळती लाखाची

आपल्या घरां आली सून घराची मालकीन
सासू मालन बोलईती सून नव्हं ती लेक भैन

सावित्री भावजयी तुझं बोलणं हंकाराचं[1]
सत्यवान बंधुजीचं गोड बोलणं शंकराचं

सावित्री भावजयी तूं बोलली रागांत
सत्यवान बंधुजी झेंडू सुकला बागांत

सावित्री भावजयी भांगामधीं तूं घाल बोट
सत्यवान बंधुजीची माझ्या चंद्राची कोर नीट

डागा यामधीं डाग[2] डोरवील्याचा साज
माझ्या त्या कंतायाचं शिरीमंताचं हाई राज

लेण्याबीमंदीं लेणं अहेव नारीला हिरवा चुडा
कंताच्या जिवावरी आल्यागेल्यांनीं भरला वाडा

माहेरच्या वाटं सुरूचीं झाडं लावूं
चतुर माझा बंधु गूज बोलत दोघं जाऊं

फुलला शेतमळा उभं शिवार डोलतं
भरल्या संसारांत लक्ष्मी बोलत

---

१ अहंकाराचं. २ दागिना.

इमाना परमानं झालं बंधुच्या अंगणांत
हातांत दिला हात लाख माणसं मांडवांत

बंधुचं लगीन मला कळलं बाजारांत
मोत्यांच्या मंडवळ्या मी ग बांधतें पदरांत

गाडी ग घुंगुराची घेऊन बंधु आला
आगळ्या मायेनं जीव बहिणीचा वेडा झाला

संग्राहक
**श्री. अप्पासाहेब कुदळे**
दुधगांव (सांगली)

बंधुजी पावना माझ्या घरीं जिन[1] खोगीर दिसे दारीं
हावऱ्या बंधु माझा झाली घाई माझ्या घरीं

जोडवीं झिनकार[2] कोणा नारीचीं वाजल्यात
माझ्या बाळ्याची बैल खिल्लारी भुजल्यात

शिवेच्या शेताईला कोणीं पेरीला शाळू गहूं
नटव्या माझा भाऊ जोडी बैलांची भाऊ भाऊ

पिकलं माझं शेत जन बोलीती दिवाणांत
लावलं बुचाड लवणांत

पिकलं माझं शेत जन बोलीती दिवाणांत
नदी वाहिली मैदानांत[3]

---

१ घोड्यावर खोगिराच्या खालीं घालावयाची लोकरी बैठक. २ झंकारणारी.
३ मैदान–खळ्यांत मळलेल्या धान्याची ठेवलेली रास.

लक्ष्मी आई आली बैलाच्या आडूयीन
माझ्या तूं बाळाई धर कासरा वडूयीन

लक्ष्मी आई आली सोप्यां येईना लाजवंती
माझ्या बैलाचे गळ्यांत घुंगूर वाजल्याती

दुधणी गांवामधीं म्हणूं दुधोबाचीं गाणीं
लक्ष्मी आई आली बाळासंगट पावयीनी

लक्ष्मी आई आली राहिली सोप्याच्या कड्यावरी
तिची नदर गोठयावरी

लक्ष्मी आई आली माझ्या शेताच्या बांधावरी
हात देऊन येत घरीं

लक्ष्मी आई आली माझ्या शेताचा बांधा चढं
माझ्या तूं बाळराजा टाक गोफण पाया पड



सौ. शरदिनी मोहिते
सांगली

जात्या ईसवरा तिळा तांदळाचा घास
माझ्या चंपाक्काच्या नवरा मोतियाचा घोस

मांडवाच्या दारीं हळ्दीबाईचा पाट गेला
माझ्या चंपाक्काचा नवऱ्या मुलीचा बाप व्हाला

जात्या ईसवरा जड जाशील दाटूयीनीं[1]
तूझ्या शिनयीची आनूं सौंगड[2] कुटूयीनी

१ मुद्दाम. २ मैत्रीण.

मोटयाचा नवयीरा काळ्या वावरीं थोपयीला
नवऱ्याचं लई गोत सांगा नवरीच्या बापायीला

मोठयाचा नवयीरा परण्या[1] निघाला दुपारा
बाळावरनं माझ्या लिंबू नारळ उतरा

मोठयाचा नवयीरा परण्या निघाला झाडींतूनी
बाळ माझ्या शिवाजीला सया बघती माडींतूनी

नवरीचा बाप बोल तुमचं वराड कां वो थोडं
नवऱ्याचा बाप बोल मामा मंडाळ[2] गेलं पुढं

मांडवाच्या दारीं नवरी कापली दंडाभुजा
माझी तूं सुशीला तुझ्या पाठीशीं मामा उभा

मांडवाच्या दारीं बामन बोलतो मंगायाळ[3]
आई बाप बोल लेकी जलम वंगायाळ[4]

मांडवाच्या दारीं बामन बोलतो सावधान
मांमा मामींनीं केलं भाचीला कन्यादान

जांवयाला दिलीं पांच भांडीं जेवायाला
माझी ती मंजुळा साव्वी समई लावायाला

मामाच्या पंगतीं भाचीबाईचं सवयीळं[5]
मामी वाढीती जेवायला मामा बसतो जवयीळ

लेकाच्या लगनांत हळदी कुंकवाचं बोट
बंधूच्या लगनांत चोळी पातळाची अट

अहेराचं धनी तुमी बसाना खालीं वरी
बंदुचं पातायाळ मी झेलीतें वरच्या वरी

जोंधळ्याचा पाय नको लावूं तूं गरतीबाई
देव गेल्याले आले नाहीं

भैनाला मागयीनं आम्ही कोणाची कोण द्यावी
भैना माझ्या राधिकाच्या चुलत्याची पूस घ्यावी

---

१ ल्माला. २ मंडळी. ३ मंगलाष्टकें. ४ वंगाळ, वाईट. ५ सोवळें.

भैनाला मागयीनं आम्ही कोनाची देणायार
माझ्या ग राधिकाची चुलती किलुयाची येणार

माडीचा जानवस कोण पुसती हावयीशी
बाळ माझ्याची नवऱ्या मुलाची मावशी

माडीचा जानवस कोन पुसती येयीना
भैना माझ्याच्या नवऱ्या मुलीची बहियीना

माडीचा जानवस कोन पुसती घाई घाई
माझ्या ग सोनुलीची नवऱ्या मुलीची आई

मांडवाच्या दारीं हंडा शिजतो रंगायाचा
चुड्यांना माझ्या व्याही मिळाला ढंगायाचा

मांडवाच्या दारीं चरवी सांडली तेलायाची
नवरीच्या बापांनीं तूळ मांडली मालायाची

नवरीचा बाप मांडव घालीतो मोडीयीत
नवऱ्याचा भाऊ आला चौघडा झोडीयीत

पहिल्या पंगतीला व्याही पंगत मानायाची
लाडूच्या परायीती भजी येउंद्या लोण्यायाचीं

दुसऱ्या पंगतीला व्याही गुंजाळ जेऊयीन
पराती साखरीच्या चरव्या तुपाच्या घेऊयीन

सूनमुख पहातां कसं मांडवीं आलं ऊन
सांगती चुडीयांना तुमी शेल्यांनीं झाका सून

व्याही मी करूं गेलें मंडईचा दलाल
भांग मी भरीयीला संगमनेरीचा गुलाल

व्याही मी करूं गेलें जावा नंदाच्या मेळ्यामंदीं
सोन्याची मोहनमाळ सून राधाच्या गळ्यामंदीं

व्याही मी करूं गेलें जात जमात पाहूयींनीं
आम्ही मोहित्यांच्या सुना आल्या हिलाळ लावूयींनीं

आम्ही मोहित्यांच्या सुना एका रंगाच्या साड्या नेसूं
सासर पाटलांच्या शिलेदाराच्या सुना दिसूं

सासू सासरे दोघे देव्हाऱ्याचे देवू
बसलों पूजेला आम्ही जोड्यांनीं फूल वाहूं

सासू सासरे आहेत घराला राखयान
सोन्याच्या उतरंडी चांदीचीं झाकायानं

आईला म्हनूं आई चुलतीला म्हनूं काकू
मैना माझी इंदिरा माझ्या शब्दाचा मान राखूं

गहूं दळतें पोळीला डाळ दळतें भजायाला
बाळ ग माझ्यायाला भोजन वाढतें राजायाला

वैराळ दादा नको भरूं तूं कालाकीता[1]
जोवर माझा पिता राजवर्खीची काय कथा

वैराळ दादा इथं कशाला दिलं पाल
चुड्याची लेनारीन मैना सासरीं गेली काल

सरलं दळण सरली आरती कापूराची
कपाळींच्या कुंकवासाठीं सेवा करीतें शंकराची



संग्राहिका
**श्रीमती गंगाबाई खाडिलकर**
माधवनगर (सांगली)

सासरीं जाती लेक तिच्या डोळ्यांत आलं पाणी
बाप म्हणतो माझी तान्ही

सासरीं जाती लेक तिच्या डोळ्यांत आल्या गंगा
एक महिन्याची बोली सांगा

१ हलक्या प्रतीच्या बांगड्या

सांगून पाठवितें लखोट्यां पोटीं चिठ्ठी
कंथासहित यावें भेटी

सांगून धाडीयीतें माझ्या सांगाव्यासरशीं यावं
भेट देऊनी मला जावं

साखरेचा लाडू मुंग्यांनीं वेढीयला
तुझ्या मामानं धाडीयेला

सासरीं जातांना पाय टाकावा जपून
मान सासूचा राखून

जोडव्याचा पाय हळूं टाकावा वैनीबाई
पांची पांडव माझे भाई ओटीवरी

नारीचं हांसणं कोण्या ग प्रकाराचं
पाणी जाईल भ्रताराचं वैनीबाई

रागीट ग लेक भूक म्हणूनी नीजली
नाहीं साखर भिजली दूधामध्यें

सासरीं जाती लेक शिकेकाईला आला कढ
नको रडूंस वेणी सोड उषाताई

भ्रताराचा राग जसा इस्त्याचा इंगूळ
त्यांची मर्जी सांभाळ, सोनुताई

येसुबंदाच्या एक काड्या कोटाच्या पाकीटांत
बंधुजीला दृष्ट झाली पुण्याच्या नाटकांत

अंतरींचं गुज सांगूं नकोस कोणापाशीं
यील वाकडं एक दिवशीं सोनुताई

संग्राहिका
**सौ. प्रमिला जोशी**
औदुंबर (सांगली)

सासरीं जाते लेक पाणी लागलं डगरीला[1]
देती निरोप गडणीला[2]

सासरीं जाते लेक घोडं बांधलं लिंबूणीला
ऊन लागलं चांदणीला

सासरीं जाते लेक, लेक बघती मागंपुढं
जीव गुंतला आईकडं

सासरीं जाते लेक घोडं लागलं माळावरी
लिंबू फुटलं गालावरी

सासरीं जाते लेक, लेकी लाडकी होऊं नको
हिरवीं डाळिंबं तोडूं नको

सासरीं जाते लेक, कुणाची अनीवार
हातीं सोन्याचे बिलवर

पहिल्यांदां गरभीण कंथ पुशितो आड भिंती
तुला महिने झाले किती

पहिल्यांदां गरभीण तुझे डोहाळे कशाचे
चिन्ह दिसलें लेकाचें

पहिल्यांदां गरभीण डोहाळे लागले जिन्नसाचे
झाड डोंगरी फणसाचें

---

१ चढण, टेकाड. २ मैत्रीण, सखी.

पहिल्यांदां गरभीण तुझ्या न्हारील। झाली रात
तिला आणा ग मिरवीत

पहिल्यांदां गरभीण लिंब नारळी तुझं पोट
हिरव्या चोळीला जरीकांठ

पहिल्यांदां गरभीण तुझे डोहाळे अवघड
चल माझ्या तूं गांवाकडं

हिरव्या चोळीयिला मी ग रुपाया सारियेला
चोळी गर्भीण नारीयीला

पहिल्यांदां गरभीण करती केळाच्या केळवड्या
जाती गर्भीणीच्या वाड्यां

सोनं बी झालं स्वस्त सव्वा रुपया झालं तोळा
माझी ग बाळाबाई हौशा कंथाला दावी गळा

आला जांवाई पाव्हणा शेजी बघती सान्यावाटं[1]
माझ्या बाळीचा भरतार कृष्ण वाकडा नाहीं कुठं

आला जांवई पाव्हणा कोण सांगत आली रंभा
माझ्या साठ्याला गूळआंबा

आला जांवई पाव्हणा शेजी म्हणती आतां कसं
हैती साठ्याला अनारसं

साखरेचे लाडू परात भरूनी
आली सासर करूनी उषाताई

शिव शिंप्या चोळी आखूड बाह्याची
लेक सासरीं जायाची

शिव शिंप्या चोळी मोतीं देतें मी पसापसा
चोळी जायाची दूरदेशा

शिव शिंप्या चोळी काढ कशीदा कोथिंबिरी
उषाताई ती किती गोरी

१ झरोक्यांतून.



संग्राहिका
श्रीमती कमलाबाई सावंत
बागणी (सांगली)

सावळ्या सुरतीवर मोड्या बायांचा ताटवा
सावळा भाऊराया भरजानीचा नटवा

लावणीचा आंबा कुणी तोडीला पत्ता लावा
मामाच्या लेकीसाठीं भाच्या बाळांनीं केला दावा

सोनसळी गहूं बाई मी घंगाळी वलवीतें
धाकल्या सावळ्याला भाऊबीजेला बोलवीतें

साती सुगरीनी भट्टी बिगाडली लाडवाची
नंद काभिनी सुगरण आतां येऊं दे मालकीची

उजेड पडला ग वाटीपरास ताटीचा
कंत जेवीतो भाचीचा

दिव्याला भरायानं घाली समई जोडवात
गुज बोलाया गेली रात

पोटीच्या परास ग मला पुतण्याची गोडी
परान माजा गेला काशीला पिंडं सोडी

दिवाळीच्या दिशीं दिवा करीतें कनकीचा
बया माज्या गौळणीचा ल्योक ववाळी जानकीचा

सोनसळी गहूं सोजी काढीतें नकुल्याला
भाऊबीज करीतें मी माझ्या ग धाकल्याला

मावळणीच्या[१] घरीं भाचा केळीनं[२] पाणी आणी
सखी मेव्हनी केली राणी

१ आत्या, बापाची बहीण. २ मातीची लहानशी घागर.

बारीक सदऱ्याचा पंख उडीतो भराभरा
बसला सायकलीवरी वसंत माजा हिरा

दिष्ट नि झाली म्हनूं माज्या टाळूचा गजऱ्याला
चांदीचीं बटणं तुज्या रेशमी सदऱ्याला

लुगड्याची घडी माज्या तळातांत झाकली
भैन भावांत एकली

कुंकवा परायास मेणाची ग बंदोबस्ती
नंद कामिनीच्या घरीं चुड्यानं केली वस्ती

समोरल्या सोप्यां जान पासूडी कुणायाची
सासू निजली सुनायांची

लेण्यामंदीं लेणं, मणी डोरलं कानीं फुलं
लेकी बाळीचा भरतार आगारीं चंद्र डुलं

मायलेकींचं भांडान जसी दुधाची उकळी
बया मनाची मोकळी

जुंदळ्या परायास काय अंबाडी लांब फोक
मायलेकींची शीन एक

फाटला पालव[1] बाई निऱ्यांत झाकावा
आब कंताचा राकावा

दुबळ्या भरताराची सेवा करीती आदरानं
पाय पुसूनी पदरानं

पाठीवैली वेणी जन म्हनीती काळा साप
माजे तूं भैनाबाई माजे वानीनी रूप झाक

माळ्याच्या मळ्यामंदीं केळी नारळी भैनीभैनी
लाडका बाळराज मंदीं केवडा अवगुनी

गांवाला गेला बाळ एक महिना तीनवार
माजा बाळराज माजा जोडीचा बिलवार[2]

१ पदर. २ कंकण.

उगवला नारायण उगावत्तांना लाली लाल
मावली मातूसरी राधा बाळाला पाणी घाल

सकाळच्या पारीं आर्दी शेणाच्या पाया पड
सावळ्या भाऊराया मग गुरांची पेंडी फोड[१]

काळ्या इठ्ठलाला गोरी रुक्मीन कशी दिली
वीस पुतळ्याची माळ चंद्रहाराच्या खालीं गेली

भरल्या बाजारांत मायलेकींची पडली गांठ
चाटीदादा दावीतो ग रंग गुलाबी चोळी दाट

पहांटीच्या दळपाला[२] न्हाई मी कुनाला हार गेली
बया माज्या गौळणीचं दूध वाघिणीचं पेली

बग्गाहाळच्या तलाव्यानं माळरानाचं झालं मळं
सांगतें तुला भैना सासू सुनांचं पिवळं गळं

पिकलं पिकलं जन बोलतो येशीयींत
माझा बंधुजीचा तीवडा[३] बुडला राशींयींत[४]

पिकलं पिकलं जन बोलती चावडीला
माझ्या बंधूजीची रास लागली वावडीला



संग्राहिका
**सौ. लीलावती पवार**
कराड (सातारा)

बाळ सासऱ्याला जाती, घोडं धरिलं ज्याचं त्यांनीं
माझ्या त्या ग तान्हीयीचं पाय झाकिलं बंधवांनीं

---

१ सोड. २ दळण. ३ खळ्यांत रोवलेला खांब. ४ रास, धान्याचा ढीग (खळ्यांतील)

बाळ सासऱ्याला जाती, घोडं लागलं वाळवंटीं
माता गुजरी बोल, बया गळ्याची सोड मीठी

बाळ सासऱ्याला जाती घोडं बुत्तीचं गेलं पुढं
बहिणा माझ्या त्या गुजरीचा जीव लागला बयाकडं

माझ्या ग माहेरीं मळ्यांत लावला भुंडा[1] ऊंस
पिता माझा तो दौलत आल्या गेल्याला पाजी रस

माझ्या माहेरीं ऊंसाची ऊंससरी पानमळ्याची पायरी
पित्या माझ्याच्या जिवावरी दुनिया दिसती दुहेरी

माहेरीं ग गेली मळ्यांत आंबाडी लुकलूकं
माय लेकींची शीण एक

माय माहेरीं विचारी डोळ कशाच्या जिनसाचं
झाड डोंगरी फणसाचं

माहेरीं ग गेली, डोळं लागलं असं कसं
माय मोजूनी धरी मास

माझ्या ग माहेरीं, पुढच्या सोप्याला हुती दाटी
माझ्या बंधूजीच्या तालेवार येती भेटी

माहेरीं ग गेलें म्हणूं माझं लक्ष कुणीकडं
ताईता बंधूजीच्या हिरीकडं, चांफा चंदन दुईकडं

माझ्या ग माहेराचं, छत्री खाईन कोन येतो
बयाचं माझ्या बाळ, हिरा माणिक ढाळ देतो

माहेरीं गेली बंधूजी घेतो चोळी, भावज गुजर विनी दोरा
बंधूच्या जिवावरी काय चांदनी तुझा तोरा

माहेर करतां, ऊंच दुकानीं जाऊं नका, चोळी उगराक[2] घेऊं नका
नंदा दिल्यातया थोर लेका

माहेर करतां, पिता शिंप्याच्या दुकानीं भोळा राजा
ऊंच घडीला हात माझा

---

१ तुरा नसणारा, पुंड्या. २ भडक.

माहेर केलं, सया विचारिती चोळी लुगडं भराचं
माझ्या ग बंधूजीचं नांव हाय हंबीराचं

सासऱ्याला जाती, गाडी भरली किराण्यानं
माझी तूं लाडीबाई बंधू लुटीला इल्लासानं[1]

सासऱ्याला जाती, घोडं लागलं चढणीला
हांक मारिती गडणीला, चोळी राहिली वळणीला

माझ्या ग माहेरीं पाताळ वाळतं परसदारीं
पिता माझ्या त्या दौलताला नांव शोभतं कारभारी

माहेर केलं म्हणूं पातळाची घडी तळहाताएवढी
पिता माझ्या त्या दौलताची हावस मनाची केवढी

वैराळ भरी चुडा तुला मोलाची काय चिंता
ताईता बंधू माझा धनी जामीन दिला होता

सासरीं जाती कन्या, माता विच्यारी कां ग लेकी आवघड
शेजी त्या बोलत्याती बया तुझं मन किती भावडं

माहेर गांवाच्या पारावरी, सभा कशाला जमली
हावशा बंधूजींनीं हिरव्या शालूसाठीं बनारसीं तार केली

माहेरपणाची हौस पिता केल्याविना राहिना
राम अवतारी डोरल्याचा साज खिशांत मावना

सासू सासऱ्याची सेवा करावी आदरानं
माझी तूं बाळाबाई पाय पुसावं पदरानं

सासू नी सासयिरा माझ्या सोन्याच्या आडभिंतं
सयाला सांगूं किती त्यांचा आधार मला अती

सासू नी सासरा दोन्ही देवाच्या मूरती
दीर दाजीबा गणपति जाऊ गुजरी पारबती
नंद कामिनी भागिरथी रामचंदर माझा पती

---

१ विलासानें, खर्चात टाकून.

बुंदी परायास मला बेसन लागं ग्वाड
सासऱ्या परायास मला माहेराचं भारी याड

बाळ सासऱ्याला जाती तिच्या वटीला पिवळीं पानं
हवशा बंधुजीसंगं मुरळी पैलवान

ज्या गांवांत आईबाप, त्या गांवाचं मला याड
सयांनू किती सांगूं तिथं गारव्याचं झाड

लगीनचिठ्ठी लिवा, माझ्या त्या माहेराला
बया मालनीची मुंगी पैठण आहेराला

लगीनचिठ्ठी लिवा सासूबाई कागदांत
बया मालन बोलयीती लेक जांवई मांडवांत

जीवाला भारी जड कोऱ्या कागदावरी लिवा
बया माझ्या मालनीला आधीं जेऊंद्या मग दावा

जीवाला भारी जड बया मालनी कसं कळं
दारीं लिंबूनी रस गळं

माहेराचं ग्वात ईसरली सया
पोटींच्या पुतराला म्हणीती बाबा बया

जोडव्याची चांदी झिजली झरा झरा
दीर दाजीबा किती सांगूं अंगणीं भुई करा

माहेरचीं पिकं शेतसरी जन बोलता राहीना
माझ्या त्या बंधूजीचा गूळ वाफ्यांत माईना

जुंधळ्याची रास, रास तिवड्या बसविली
सासर मामंजींनीं तिला पासुडी[१] नेसविली

जुंधळ्याचा गाडा, गाडा येशींत दाटला
दीर दाजीबा कंतांनीं दंडा भुजांनीं रेटीला

काळ्या ग वावरांत मेंढ्याबायांची दावन
सासर मामंजींची नव्या उंसाची लावण

१ जाड खादीचें पांघरूण.

बंधु सासऱ्याला गेल मेहुणी म्हणती ऱ्हावा ऱ्हावा
बंधूजी बोलत्याती जातो बहिण्याच्या गांवा

ऊंच ऊंच चोळ्या माझ्या वलनीं[1] झाल्या जुन्या
बयाच्या माझ्या बाळा दोन दिवाळ्या गेल्या सुन्या

डाळी डोरंल मधीं सरी मला हावस सरायाची
मामंजीची सून मीच हायी ग तालीवाराची

अंगणांत उभी कोण जरीच्या पातळाची
पित्या माझ्या दौलताची सून लाडकी सासऱ्याची

जासूदाच्या मुला तुला सांगीती खाणाखुणा
पित्या माझ्या त्या दौलताचा नवा बुरूज[2] वाडा जुना

काळी ग चंद्रकळा, काळी कसाई तिचं नांव
पित्या माझ्या दौलतांनीं सारीं धुडीलीं गांवं

जिवाला भारी जड माझ्या उशाला येलदोडं
पित्या माझ्या दौलताची हिरवी मोटार वाड्यापुढं

बंधुजी पावणा शेजी सांगत आली रंभा
बंधू माझाच्या भोजनाला घड केळीचा पिवळा आंबा

पोटीचं पुत्र फळ देवाजी देतां झाला
मेव्हणा राजसांनीं ओटा शालूचा पसरीला

उन्हाच्या रखामधीं चिमण्या कोठयाला[3] येतीजाती
सयांनू किती सांगूं मला बयाची याद हुती

शेजारीणबाई वस म्हनाई व्हवं तुला
माझ्या बयाची सवं मला

भरील्या बाजारांत काय करावं किराण्याला
सयांनू किती सांगूं बया असावी पराऱ्याला

आईबापांनीं दिली लेक आंबा ऊंबर तिच्या शेतीं
लाडकी एवढी लेक आईबापांला दुवा देती

---

१ कपडे ठेवण्यासाठीं बांधलेली दोरी. २ वाड्याभोंवतालचा तट. ३ कोटे, घरटें.

आईबापानं दिली लेक, लेक देऊनी मागं आला
तिच्या ग नशीबाचा धनी जामीन नाहीं झाला

अंबारीचा हत्ती भरल्या पेठंत गेला रिता
लेकीच्या बापाला धाडा म्हणाया न्हाई सत्ता

बाळ सासऱ्यां निघाली भावज गुजरी धुती पाय
बंधु बघत उभा हाय

बाळ सासऱ्याला जाती मागं फिरून बघीना
माझा तो बंधुराया संगं झडपाचा[1] दागीना

काळी ग चंद्रकळा त्याचा पदर राम सीता
नेस म्हणती माझी माता घडी उघडीतो माझा पिता

सासू नी सासयिरा मला दिले गोविंदानं
जातें सासरीं आनंदानं

सासू नी सासरा दोन्ही सोन्याचं पांखरं
त्यांच्या हाताखालीं आम्ही लोकांचीं लेकरं

आई परायास सासूबाईचा उपकार
सासूबाई मालनीनं दिला प्रेमाचा चंद्रहार

आईबापांच्या पुण्याईनं गांव नाशिक पाहिलं
नारळाचं फळ कुशावर्ताला वाहिलं

अंगणीं माझ्या फुले गुलाब पानोपानीं
सासऱ्याला गेली माझी जिवाची फुलराणी

अंगणीं माझ्या आला, आला मोगरा बहरा
सुकल्या फुलमाळा सई येईना माहेरा

अंगणीं माझ्या काढीलें मीं चैत्रांगण
कलाकुसरीची बाळ तिच्याविना सारं सुनं

---

१ झडप, संरक्षण करणारा.

बहिणा सासऱ्याला जाती नको रडूंस माळावरी
घाल पदर बाळावरी

सासूरवासिनीला तिला आधार कुणायाचा
तिचा ग भ्रतार देव अवतारी गुणायाचा

सासूरवासिनीचं तिचं वंगाळ लई जिणं
तिला बोलीती सारींजणं

सहा माहिन्यांचं सासर तिला वरीस गेलं सज
बया मालन बोलती कशी लागली तुला नीज

अंगणीं मला दिसं क्षणोक्षणीं माझी बाळ
सासरीं सुखावली माहेर सुनं झालं

माहेराला जाती, माझं बसणं जोत्याकांठीं
पाया पडाया भावजयांची झाली दाटी

माहेरीं जायायाला जीव माझा रंगयीला
भावज गुजरीला नाहीं नंदपणा दावीला

अंगणीं माझ्या आला, आला केळीचा लोंगर[१]
सासऱ्याला गेली बाई सोनकेळ्याची खाणार

बाळ सासऱ्याला जाती तीका साऱ्यांची आवडीची
तिला ग घालवाया सभा उठली चावडीची

टिप्पूर चांदणं तें का पूनवी बाईयीचं
सुख माहेरीं आईयीचं

राणी निघाली माहेरां उभा भ्रतार आंब्यातळीं
कशी येशी चंद्रावळी

उजळलं माझं घर दीप लावितां समोर
हंबरली गोठीयांत गाई आणिक वासरं

सासरीं जातांना डोळ्याला आल्या गंगा
तिला माहिन्याची बोली सांगा

१ घड.

सासरीं जातांना लेक बघी मागं पुढं
तिच्या आजीची झोपमोड

सासरीं जातांना लेक डोंगराच्या आड
मला तिथून पत्र धाड

सांगून मी ग धाडी मायबाई फार फार
तिनं लहानाची केली थोर

सांगून मी ग धाडी आल्या गेल्याला गाठून
झालं वरीस भेटून

सांगून मी ग परदेशींच्या कासाराला
ऊंच बांगडी मखराला

आई तंवर माहेर बाप तंवर माझी सत्ता
नको बोलूंस आत्तां भाऊराया

आई तंवर माहेर बाप तंवर जाऊं येऊं
मग आणतील माझे भाऊ

सासऱ्याचे बोल जसे मीरचीचे घोस
जातीवंताचे लेकी सोस

सासऱ्याचे बोल नको सांगूंस आईपाशीं
तिचं मन दुखवीशी

सासऱ्याचे बोल जसा विषाचा तो पेला
तुझ्यासाठीं मीं गोड केला मायबाई

माझं घर थोर केर लोटतां लोटना
सभा बसली ऊठेना सासूबाईंची

दुरून दिसते मला वाटते माझी आई
चुलती काकूबाई येत आहे

माहेरीं जातांना वहिनी पायांनीं पाट सारी
तुझ्या राणीला गर्व भारी भाऊराय

माहेरीं जातांना वहिनी गुजरी डोळे मोडी
तुझ्या चोळीची काय गोडी भाऊराया

दे रे देवा मला बापासारखा सासरा
कंठयाखालीं तो दुसरा चंद्रहार

द े देवा मला आईसारखी सासूबाई
कमळीं अंबाबाई पुजीयीली

दे रे देवा मला बहिणीसारखी नणंद
कमळीं गोविंद पुजीयीला

दे रे देवा भावासारखा तो दीर
कमळीं रघुवीर पुजीयीला

आईबापांच्या राज्यामधीं आम्ही दुधावरच्या साई
भावाच्या राज्यामधीं शिळ्या ताकाला सत्ता नाहीं

नेसी पिवळा पितांबर हातीं सोन्याचा बिलवर
मैना निघाली सासरीं लेक बाबांची तालीवार

राजहंस पांखरू पानमळ्याच्या बसतींत
सासूचा स सुरवास सोसील्यानं काय होतं

आईबापांच्या जिवावरी दुनिया भरली दिसती
कुळा तुझ्या नांवं येतीं सईबाई

वाजत गाजत चाले रस्त्यानं वरात
जन बोलती निघाली सून सत्तेच्या घरांत

जिवाला वाटतं तुपासंगं खावी घारी
सासू माझे मालनी मला पाठवा माहेरीं

संग्राहक
**श्री. राजाराम माने**
कार्वे (सातारा)

बाळ सासऱ्याला जाते तिच्या ओटीला कोवळीं पानं
संगं मुराळी पैलवान

बाळ सासऱ्याला जाते, आडवा लागतो बाजार
हौशा तिचा बंधु संगं खजिन्या गुजर[1]

बाळ सासऱ्याला जाते तुझं सासर लांब पल्ला
फिर माघारी भेट मला

बहिण सासऱ्याला जाते बंधु बसला वाटेवरी
आल्या गेल्याला विच्यारितो बहिणा गेलीया कुठंवरी

बाळ सासऱ्याला जाते, दोघे बंधुजी दोहीकडे
मध्यें चांदणी तुझं घोडें

बाळ सासऱ्याल जाते रुसला मुराळी वाटेंत
शिंगी[2] सोडून बसला, लाडू ओटीचा वाटीत

आषाढ श्रावण दोन्ही महिने खडावाचे[3]
पिता दौलत बया बाई दोन्ही दागिने जडावाचे

बंधुजी पाव्हणा यावा आंब्याच्या सुगींत
तूप वाढीन रसांत

बंधुजी पाव्हणा माझ्या तुळशीला देतो तक्क्या
गुज बोलूंया माझ्या सख्या

फाटली माझी चोळी देते ठिगाळ जायबंदी[4]
शिंपी बयाच्या गांवामंदीं

१ सावकार, श्रीमंत. २ शिंगरू, तट्टू. ३ व्रताचे. ४ एक प्रकारचें ठिगाळ.

मोकळा माझा हात, हात बंधूजी पाहिला
वैराळाचा नंदी त्यानं वाड्याला आणिला

सासुरवास ज्यानं करूं नये त्यानं केला
माझी गुजर मायाभैन नाहीं शालूचा रंग गेला

सासरक्सामधीं नणंद कामिनी धाक भारी
कांता कारणं सोसणारी

सासूचा सासूरवास, नंदा बायांनो उगी बसा
जीव रमेल माझा कसा

माय बापाच्या जीवावर लेकी खावावं साखरखोबरं
आपला मायबाप धनी कोटीचा जबर

माझ्या त्या एवढ्या बहिणी कशा गेल्यात देशोदेशीं
त्यांची माझी भेट झाली गौरीच्या ग सणादिशीं

जोवरी मायबाप लेकी येऊं द्या जाऊं द्या
आंब्यांची आंबराई एवढी बाळीला घेऊं द्या

जोवरी मायबाप लेकी माहेराची हवा
भाऊ भावजयांचं राज्य मग अम्मल आला नवा



संग्राहिका
**जानकीबाई पाटील**
बागणी (सांगली)

म्हायार मला केलं म्हायार ईरसर
लुगडं थोरल्या बंदुजीचं दुसऱ्या बंधूचा गळीसर
तिसऱ्या बंदूजीनं केला पैठणीवर खण
पिता दौलत माजा म्हनी झालं म्हायार मनहर

बया मालन माजी म्हनी जेव बाळाई पोटभर
चुलती मालन माजी म्हनं भेट बाळाई आमावर

भावजा गुजरी म्हनयीती मोत्या पवळ्यानं ओटी भरा
भैना मालन म्हनयीती राकडी केवडा भांग भरा

चुलता पंडित म्हनयीती बाळ आवर लवकर
सावल्या आल्यात जोत्यावर

भाचबाळं म्हनयीती बस लौकरी घोड्यावर
आडवं आल्याती भरतार रथ सुटला शिवेवर

सासू सासरा बाई म्हने पडे उजेड वाड्यावर
सासू मालन म्हनीयीती जान जमकाना माडीवर

जिवाला माज्या जड कोन माज्या कळकळीचं
बयाची माज्या बाळं वाघ सुटलं साकळीचं

जिवाला माझ्या जड कसं कळालं हरनीला
बया माज्या मालनीचा पाय ठरना धरनीला

जिवाला माझ्या जड जावा बगूनी गेल्या शेतां
पिता माझा दवलत आला सुक्कीर उगवता

जिवाला माज्या जड माजी दुकतीं नकंबोटं
बया माजी मालन माजी वैदीन[1] गेली कुठं

जिवाला माझ्या जड माज्या जिवाचं धनी कोण
नटव्या माजा बंदु शान्या शाईरा मनीं जाण

जिवाला माज्या जड कसं कळालं गांवांत
हावशा माज्या कांत कडू लागलं पानांत

जिवाला माझ्या जड गरड लिंबूला[2] घाली मिठी
हौशा ते माजे कांत इष्ट मैतर झाले कष्टी

दुंडावा माजा हात हौशा कांताच्या नजरेंत
हिरेजडीत बिलवर केली खरेदी मुंबईंत

---

१ वैद्यबाई, औषधोपचार करणारी. २ लिंबाचा वृक्ष.

वाट मी किती पाहूं गांवा गेलेल्या रंगेलाची
पानं सुकली रतीबाचीं

वाट मी किती पाहूं गांव गेलेल्या वकिलाची
चित्रं कोमेलीं बंगल्याचीं

वाट मी किती पाहूं गांवा गेलेल्या सजनाची
येळ झालीया भोजनाची

गांवाला गेले म्हनूं एक महिना तीन वार
माजं बाळराज माज्या गळींचा चंद्रहार

पांची प्रकारचं ताट वर केळाची केळफणी
माज्या ग बयावानी हांक मारीली मला कुणी

पांची प्रकाराचं ताट भाजी मेथीची इसरली
माज्या बंदुराया ऊठ सरदारा चुकी झाली

पांची प्रकाराचं ताट खडीसाखर निवायाला[1]
उठा बंदुजी जेवायाला

पांची प्रकाराचं तट दुधातुपाचे गेले पाट
धाकट्या बंदुराया किती बगूं मी तुझी वाट

पांची प्रकाराचं ताट दुधातुपानं भरल्या वाट्या
माजी बंदुजीसंगं ग नीत जेवाया तलाठ्या

पांची प्रकारचं ताट वर साकरची शाई
माज्या ग बंदुजीला जेव म्हनाया आई न्हाई

पांची प्रकाराचं ताट मी का वाडीतें ऊन ऊन
माज्या त्या बाळराजा न्हाई पाठीची सक्की भैन

पहिल्यांदां गरभार कांत विचारी आडभींती
रानी म्हईने झाले किती ?

पैल्यांदां गरभार कांत विचारी गोट्यायांत
हौशा माजा कांत घाली अंजीर वट्यायांत

१ शांत होणें, उष्णता नष्ट होणें.

हिरव्या चोळीला ग बंदा रुपाया[1] सारीयीला
माज्या त्या भैनाईला चोळी गर्भार नारीयीला

पैलांदां गर्भार तिला गर्भाची येती घेरी
चांफाचंदन माज्या दारीं बसूं सावली त्येच्या नारी

गर्भार नारीयीला तिला अन्नाची येती घान
हौशा भरतार देतो बघा सुपारी कातरून

पैलांदां गर्भार डोळे लागले ताकायाचे
माजी ती सूनबाळ हाये लक्षण ुत्रायाचें

पैलांदां गर्भार डोळे लागले कारल्याचे
माजा ग बाळराज मळे धुंडीतो मैतराचे

पलांदां गरबार डोळे लागती जिन्नसाचे
आणीतो बाळराज आंबे शेंदरी पाडायाचे

गर्भीण तूं ग नारी नको करूंस देवा देवा
देव मारुती ब्रह्मचारी नाडबंदी तो गेला गांवा

सणामंदीं सण आली पंचीम खेळायाची
माजी ती भैनाबाई वाट बगती मुराळ्याची[2]

सांगून धाडयीती आल्या गेल्यात्या मानसाला
बया माजीला म्हनावं येतो म्हनली गणपतीला

शिलंगनाला गेला हरी तिथं शिलंगनाची झाली दाटी
माज्या बंदुजीनं बाई सोनं घातीलं माज्या ताटीं

दिवाळासनादिशीं बंधू अजून आला न्हाई
बंदु माजा म्हनी जोड ठुशाचा झाला न्हाई

दिवाळसनादिशीं मी का ओवाळी गाईघाटा
माज्या त्या बंदुजीच्या हिश्शांत माजा वांटा

भाऊबीजेची काचोळी[3] ही शीव शिंप्या तूं परसदारीं
माज्या तूं बंदुराया येती दिवाळी कोनवारी

१ सोळा आणे, पूर्ण एक रुपाया. २ सासुरवासिनीस आणावयास जाणारा माणूस. ३ चोळी.

दिवाळसनादिशीं भाऊबीजेचं लुगडं
दार पित्याचं उघडं

बंदुजी पावना शेजी म्हनंती कोन राजा
राजा नव्हं त्यो बंदु माजा

तांबडा मंदील ग बंदु गुंडीतो कवाकवा
येतो झुकत माज्या गांवा

आला नि बला घेती हात पुरना मांदिलाला
ताईता बंदुजीला वाड लागली चंदनाला

माळ्याच्या मळ्यामंदीं येसबंदाची काकयिरी
ताईता बंदुजीची टोपी लालाची झ्याक मारी

उचकी लागयिली कां ग उचकी तुझी घाई
आत्ती माजी तूं मावळणी सई काडली कशापाई

जिवाला जड भारी कोन्या कागदीं जल्दी लिवा
आत्ती माजी ती मावळन दुरल्या देशाची यील कवा

हिरव्या चोळीवरी कुनी काडिली गवळण
सया नारीला सांगूं किती हाई हौसंची मावळन

मावळनी आत्याबाई एका म्हायारीं दोगी जावूं
माजे बापाजी तुमचे भाऊ

मावळन आक्काबाई तुमच्या बुगड्याखालीं काप
तुमचा कुंडलिक आमुचा बाप

मावळण आक्काबाई तुमच्या बुगड्याखालीं काई
तुमची भावज आमची आई

तुळशी घाली पाणी प्याबी तुळशीखालीं झरा
बया माज्या मालनीचा पतीव्रतीचा नेम खरा

जिवाला माझ्या जड कसं कळालं माज्या बापा
अंगनीं होता चांफा कळ्या पडती झपाझपा

जिवाला माज्या जड कसं कळालं माज्या आई
अंगनीं हुती जाई कळ्या पडती घाईघाई

पंढरीला मी जातें संगं न्यावं मावशीला
सोन्याच्या कळशींत पानी घालितें तुळशीला

अंबारीचा हत्ती साजासकट उबा केला
वडील बोलत्याती बाळ अंदान दिला तुला

पावन्या परकारू करतो शोजीचा मलीदा
वडील म्हेवयीनी आली जिवाचा कलीदा

दिव्याला भरयानं घाला दिव्याला जोडवात
वडील म्हेवयीनी गुज बोलूं या सारी रात

देऊनी घेऊयीनी न्हाई पुरत डोंगर
वडील भयीयीनी तुज्या बोलाचा आदार

पाटानं जातं पाणी ऊंस पिवूनी खपलीला
आज्जी मालन हांक मारी लेकीसंगट नातीयीला

सासुरवासनीला तिला कोंबडा वयीयीरी
पाटच्या पान्यामंदीं भांग देतूंया[1] दुयीयीरी

लेन्याबींमंदीं लेनं मनी डोरलं कानीं फुलं
कपाळीचं ग माजं कुंकू जसं आकाशीं चंद्र डुलं

मावळ्याच्या घरीं भाची पावनी चंद्रावळी
केली चिंचची पत्रावळी

लावनीचा आंबा त्येला मुरबाची[2] भर
शामा नटव्या चंदुजीला मी कां न्याळीती खालीवर

लेण्यामंदीं लेणं जोडवीं चांदी चोख
ह्या सर्वां ग मंदीं बाई कुंकू माजं मारी झाक

थोरलं माजं घर हंडीगल्लास लोंबत्याती
माजं ती बाळराज धनी वाड्याला सोबत्याती

पंढरीची ग कुंकूं मला महिन्याला लागी धडा[3]
बया माजीला किती सांगूं लेकी सुनांनीं भरला वाडा

---

१ देत आहे. २ मुरूम, पुटकळ्या. ३ वजनी माप.

पंढरीची बाई कुंकूं मी ग एकटी कशी लेवूं
यक्षदेवी पद्मावती आधीं तिलाच मान देवूं

पंढरींचं कुंकूं मला महिन्याला लागी शेर
जावा नंदांचं माजं घर

सरलं दळयानू माज्या सुपांत येडी गंगा
द्रुपती वऱ्या गाती तुला पिरतीच्या पांडुरंगा

चवघी आम्ही जावा पांचवी माझी सासू
नंद कामीनी मर्दी बस माज्या चुड्याला शोभा दिस

माझ्या ग अंगणांत कुनी सांडीला दहीभात
माजा तो बाळराज बाळ जेवीला रघुनाथ

सदरी सोन्यामंदीं नारुशंकर[1] तांब्या लोळे
सावळा बाळराज नातू जावळीचा खेळे

शेजी तूं आईबाई तुजा संभाळ सोनचांफा
माजा अवकाळ बाळराज बाई मोडील त्येचा चांफा

बाळ चालतं रांगयीतं बाळ धरीतं धोतराला
माज्या त्या बंधुजीला कन्या सोबती चातुराला

लुगड्याची घडी बाई यीना ग माझ्या मना
पित्या माज्या दवलता बापा नेसं दे तुज्या सुना

लुगड्याची ग घडी दोनी पदर रामसीता
घडी घालतो माझा पिता नेस म्हनीती माझी माता

लुगड्याची ग घडी म्यां टाकीली बाकावरी
माजा रूसवा बापावरी

काळी ती चंद्रकळा दोनी पदर रेशमाचे
माज्या ग बाळकाचे चाटी[2] मैतर निपाणीचे

काळी ती चंद्रकळा दोनी पदर सारयीक
हौशा कांताची पारयीक

---

१ तांबडा तांब्या, गडवा. २ व्यापारी.

भरील्या बाजारांत बंदु ओळखी पैल्या तोंडी
हातीं छतरी पिवळी दांडी

भरल्या बाजारांत चोळी फुटानं[1] मला दीती
बयाच्या माज्या बाळा तुला गोटानं दावूं किती

बारिक बांगडी बारा आन्यानं लेती जोडी
बंदु हंसत चंची सोडी

बारीक बांगडी मला भरूसी वाटली
हौवशा भ्रतारानं तार पुन्याला पाटवली

बारिक बांगडी गोऱ्या हातांत चमक्या मारी
माजा तो बाळराज केस कुरळ मागं सारी

माळ्याच्या मळयामंदीं माळी मळ्यांत येऊं दीना
माळ तो बाळराज फुलं जाईला राहूं दीना

सोन्याची अंगठी ग अंगठी कशानं झिजयिली
पित्या माझ्या गुजरानं रास गव्हाची मोजीयीली

गाडीचीं ग बैलं मागं फिरूनी बगत्याती
ताईता बंदु माज्या धन्या विसावा मागत्याती

गाडीच्या बैलाला ग रातीची पडली चाल
गाडीवानाचं डोळं लाल

जडाभाराचं[2] पितांबर म्हेवना राजस वाचईना
माज्या त्या भईनीला धर राधाला पोचईना

लुगडं घेतयीलं त्यांत रेशमी काय न्हाई
ताईता बंदु बोले भैना एवढ्यानं झालं न्हाई

भावज गुजयिरी पाया पडावं चांगयिलं
हळदकुंकवानं माजं जोडवं रंगयिलं

सासू नि सासरा दोन्ही तुळशीचीं रोपं
त्येंच्या बी सावलीला गार लागती माजी झोप

१ एक प्रकारचा चोळीचा खण. २ बहुमोलाचे.

प्रीतीची एवडा कांत नको प्रीतीवर जाऊं
पानांतल्याबी नावं न्हाई लागत अनुभाऊ

उभ्या मी गल्लीं जातें दंड भुजवा[1] झाकुनी
पानी पित्याचं राकुनी

जिवाला भारी जड कुनी येऊनी काय केलं
बयाच्या बाळायांनीं दूध वाघाचं पैदा केलं

बापांनीं केल्या सुना लेका परास देकयीन्या[2]
हातीं दवत लेकयीन्या

माझ्याबी अंगनांत बाळ कुनाचं गजबार[3]
सुशी सावळी बाळ माजी तिची मावशी हौसदार

जातीसाठीं माती माती खातांना लागं वाळू
पित्या माज्या दवलता ढान्यावागा[4] मी तुझी बाळू

पावना आला म्हनूं सासू मालनीचा भाऊ
करंज्या तळती माजी जावू नंद-कामिनी दिवा लावू

सांगावा सांगियीती सांगली गांवच्या सराफाला
सोन्याची साकळी बघू माज्याच्या घड्याळाला

गुज ग बोलायाला दार माळींचं ढकलावं
माजी तूं भैनाबाई मग हुरदं उकलावं

चांदीच्या खंदीलाला त्येला सोन्याची जोडवात
बंधु माज्याला रात झाली सातार्‍या तालुक्यांत

जिवाला खावी वाटे सत्यनारायणाची पोळी
भैनाची माज्या बाळ, माज्या पूजेला चांफेकळी

आठ दिसाच्या सोमवारीं नको पापिनी गहूं दळूं
साता नवसाचा माजा भाऊ

गांवाशेजारी गावंदर शिवेशेजारी हाई मळा
पित्या माज्या गुजराची सदा कुणब्याची तारंबळा

---

१ भुजा, हात. २ देखण्या, सुंदर. ३ गोंडस, बाळसेदार. ४ ढाण्या वाघ, कर्तबगार.

जिवाला भारी जड बाई म्यां हुंबऱ्या दिलं ऊसं
गौळणी माजी बया तुला कळालं न्हाई कसं

जिवाला भारी जड पाय ठरना जमिनीला
बया माझ्या त्या मालनीला कसं कळालं हरनीला

थोरल्या जात्याचं ग नांव ठेवीलं हत्तीरथी
बया माझ्या मालनीच्या सुना दळील्या भागीरथी[1]

बया बी म्हनूं बया, बया तोंडाला येती ग्वाड
बया मनूबीक्याचं झाड

पारवं घुमत्याती पित्या माज्याच्या माडीचं
पाटचं दळानं ग भावज गुजर लाडीचं

पान्याला जाती नार, नार हिकडं कुनीकडं
चल बंदूच्या हिरीकडं चांफा चंदन दुहीकडं

पान्याला जाती नार कावरी बावयीरी
बंदु ऊंसाच्या वावयीरीं

पानंबी खातावऱ्या तुझ्या रंगीला दांतदाडा
ताईता बंदु माज्या तुज्या सुरतीचा यीना तोडा

बंदुजी पावयीना शेजी म्हणती आला आला
ताईता बंदु माजा चंद्र वाड्यांत उगवला

साकवीरीचा लाडू बाई मी भुईला कशी फोडूं
बारा वर्षाची गडयीन एका शब्दाला कशी तोडूं

गाईचा गाईराखा गवळ्या[2] येशींत झाली दाटी
ताईता बंदु माज्या तोड चंदन सोप्यासाठीं

सरगीच्या देवा तुजं एवड काय केलं
चुलता माजा पंडीयीत झाड गुजाचं माजं नेलं

सासऱ्या जाती भैना वाट लागली कुसळ्याची
माजी त्या भैनाचीं ग बोटं नाजूक मासूळ्याचीं

१ भाग्यवान. २ गवळीं.

पायाची पडूं आली पड हितंच अंगनांत
ताईता बंदु माजा हिरा झळकीतो बिल्वरांत

मारक्या बैलाला ग सारं भेतंया माजं गांव
ताईता बंदु माज्या धन्या लाडक्या दावं लाव

वळवाच्या पावसांत ईज झालीया कावयीरी
बंदु माझ्याच्या शेतांत ग कुरी झालीया न्हवयीरी

थोरल्या जात्याची ग म्यां ग केलीया भिंगरीटी[1]
बयाचं पेली दूध माज्या खेळतं मनगटीं

वाट ग वरली हीर चाक करीतं भिरीभिरी
नटवा बंदु माजा मनमोहन मोटेवरी

नेनंता मुराळी ग येतो वाटेनं खेळयीत
राघु मैना बोलती जरीपटका लोळवीत

हावस मला भारी बंदुसंगट जेवायाची
आजी माजी ती गवळण दुरडी येळीती शेवायाची

मावळण भाच्यायाचा गेला झगडा गंगवरी[2]
तानं माझं बाळराज चेंडू फेकितो मामावरी

सोनसळी ग गहूं घंगाळीं वलवीलं
माज ते बंदुराज भाऊबीजेला बोलवील

सोनसळी ग गहूं शेजी काढीती नकुल्याला
बंदु माज्या त्या राजसाला भाऊबीज ग धाकल्याला

तांबड्या मंदिल्याची वस्तु[3] पडली सान्यावाटं
ताईता बंधू माझा चांद म्हवरीला[4] कुठं

न्हवऱ्या परायास माजी नवरी लई गोरी
माजी तूं भैनाबाई तिला हळद लाव थोडी

वळवाचा पाऊस ग फळी धरून उठयीला
ताईता बंदु माजा बाळ कुनब्याचा नटयीला

---

१ भिंगरी, मोठें जड जातें सहजासहजी ओढते. २ गंगेवर, चव्हाट्यावर.
३ उजेड. ४ उगवला.

सदरी सोप्यामंदीं हंडे बिल्वर आराईस
माज्या त्या नातवाचं आज हाई ग बारईसं

हावस मला मोठी हौससारखं माझं झालं
सावळं बाळराज माज्या अंगर्न पानी न्हालं

हावस मला मोठी हिरवं लुगडं भरजरी
राजस बाळ माज्या नातू घेतला कडेवरी



संग्राहिका
सौ. शांतादेवी बाबर
बागणी (सांगली)

सासर येवढा वस माझ्या जलमी ठावं नाहीं
सासू नव्हती बयाबाई

सासर येवढा वस जिन्या मिन्याला आलं घस
जातीवंताचे लेकी सोस

सासर येवढा वस करूनी तीनं केला
नाहीं बेगडी रंग गेला मैनाबाई

सासरवासिनीला नाहीं आधार कुणाचा
मैनाबाई कंत देवाच्या गुणाचा

सासरवासिनीला पंढरी आठवली
देवा माझ्या विठ्ठलानीं पत्रं दोन पाठीवलीं

बाळ सासऱ्याला जाती येशींत झाली दाटी
चुलता पंडीत पानं वाटी

बाळ सासऱ्याला जाती डोळ्याला यीना पानी
ती का अंतरींची शानी

सासरवासिनी बस माझ्या तूं ओसरी
तुझ्या शिनंची माझी बाळ नांदती सासरीं

सासऱ्याला जाती लेक कुणाची अनिवार
हातीं सोन्याचं बिलवार बाळाबाई

सासऱ्याला जाती संगं सिदूरी राजूऱ्याची[1]
लेक मराठी गुजराची[2]

सासऱ्याला जाती ती का करिती फुंदूं फदूं
संगं मुराळी दोघं बंदू

डोरल्याचा साज वर सराला नाहीं जागा
कंत हावशा मना जोगा

डोरल्याचा साज वर सराला जागा नाहीं
कंताच्या जिवावर वाट पाण्याची ठावं नाहीं

म्हायारची वाट मला दिसली सपाट
बयाचा माझ्या बाळ मला दिसतो पोपट

दुरून दिसतं माझं माहेर सुंदर
दरवज्याच्या तोंडीं रामसीताचं मंदीर

दुरून दिसतं माझं माहेर नेटकं[3]
दरवाज्याच्या तोंडीं रामसीताची बठक

साखळ्याचा पाय पडला चिखलांत
माझ्या ग बापाजींनीं मला दिली गोकूळांत[4]

साकळ्याचा पाय पडला सावलींत
माझ्या ग बापाजींनीं मला दिली म्हाउलींत

साकळ्याचा पाय हळूं टाकावा मालनी
कंत वळखितो चालनीं

---

१ तेलांत तळून तयार केलेल्या पोळ्या. २ श्रीमंताची. ३ जबरदस्त.
४ गाईगुरांनीं व मुलांबाळांनीं भरलेल्या घरांत.

बंदूजी पावना मला आल्याला कसं कळं
दारीं लिंबाचा रस गळं

शेजी तूं आईबाई दे ग उसनं वेलदोडं
बंदूजीची माज्या बाई उभी मोटार वाड्यापुढं

शेजी तूं आईबाई दे ग उसन्या मला कळ्या
बंदूसंगं मैतवीराच्या होळ्या[1]

शेजी तूं आई बाई दे ग उसनी मला सोजी
बया पावनी आली माजी

पावना आला म्हणूं बया मालनीचा भाऊ
मामा उपाशी नका जाऊं देतें तांदळा एक घावूं

बसाई बसकर सोप्यां टाकिती चांदवा
बस बयाच्या बंदवा

समोरल्या सोप्यां ज्यान टाकिती आकड्याचं
बंदूजीचं येनं अवाचित फाकड्याचं

बसाई बसकर जेन टाकिती बारा तेरा
बंदूराया माजा लाल गादीचा धनी न्यारा

बंधूजी पावईना जाऊ गुजरी तुझा माझा
बंधू हौशाच्या भोजनाला भात पुलावा करूं ताजा

बंधूजी पावईना काय करूं मी चवीदार
बंधू हौशाच्या जेवनाला करती जिलबी सुकमार

बंधूजी पावईना काई करूं मी जुंदळ्याचं
बंधू हौशाच्या भोजनाला ताट भरती आंबुळ्याचं

ज्याला ग न्हाई भैन त्याचं जेवण हिरीवरी
बंधू माझ्या त्या हावशाला तूप वाढीती खिरीवरी

---

१ झुंड, समुदाय, टोळी.

ज्याला नाहीं भैन  त्याच्या पदरीं चाराचुरा[1]
बंधू माझ्या हावशाला  करतें जेवन तालीवारा

बंदूजी पावईना  खुंटी सोप्याची नटईली
बंदू माज्याला देखितांना  मला हुषारी वाटईली

बसाया बसकर  पाट टाकिती ज्येला तेला
बंधु माझ्या त्या हावशाला  खुर्ची बसाय वकिलाला

बसाई बसकर  ज्यान जमकाना टाकिईती
हावशा माझ्या बंधू  बंदु यीवाई दोन्ही नातीं

बसाया बसकर  टाकी ज्येनाबीवर गादी
हावशा माझ्या बंधू  खास यीवाया बस मंदीं

बंधूजी पावईना  म्यां का देकीला अंगणांत
झारी बुडवीली रांजनांत  दिली बंदूच्या तळातांत

जिरसाळीचा करती भात  येळ लौंगाची करतें शाक
वनगाईचं वर तूप  ज्यान जमकाना ढेलजंत

बंदूजी पावईना  गेला मातला सांगईत
भैन असावी नशिबांत  केली बहिनीनं चालरीत

उन्हाच्या रखामंदीं  बाईशिकल कुणायाची
बंदू माझ्या त्या हावशानं  दिली दवड[2] उनायाची

उन्हाच्या रखामंदीं  टांगा कुणाचा धांवा घेतो
भैनी कारणं भाऊ  येतो बंदूराया

बंदूजी पावईना  आला आंब्याच्या दिसामंदीं
बंधु माझ्या त्या हावशाला  तूप वाढितें रसामंदीं

चुलत भावा नको  येऊंसा येगईळं
सरदार माझा बंदू  एका राशीचं जुंदईळं

चुलत भावाईडं  मला चुलत वाटईना
हिरी शेजारी पानमळा  त्येचा गारवा तुटईना

---

१ सामान्य वस्तू  २ दौड, येणें केलं.

बंदूजी घेतो चोळी   भावज गुजरी खुशालींत
भावज गुजईरी   तुझ्या माहेरीं चालरीत

गार साऊली बघूईनी   म्यां का उतवीरीलं वज्जं
भावज गुजरी किती सांगू   मला ईसाव्या घर तुझं

थोरलं माझं घर   हंड्या झुंबरं लोंबत्यातीं
सासूबाईचं बाळराज   धनी वाड्याला शोभत्याती

थोरलं माझं घर   चिरेबंदीया त्येला जोतं
ऊंच पायरी तोंड धूती   पाणी अंजीबीराला जातं

धाकलं माझं घर   माझं आंगण फेराचं
बाळ खेळतं थोराचं

धाकलं माझं घर   हंड्याभांड्याचा पसायीरा
धनी हावशाला किती सांगू   वाडा बांदावा दुसईरा

वाटबीवैला वाडा   वाडा कुणाचा टोलेजंग
कांत माझ्या ग हावशाचा   पुढं गिलावा मागं रंग

वाटबीवैला वाडा   वाडा कुणा या वाण्यायाचा
कांता माझ्या त्या हावशाचा   दारीं हावद पाण्यायाचा

जाऊ गुजरीचं बाळ   माझ्या बाळाच्या बरोबरी
मी कां सायास उतरीतीं   एक लिंबू दोघांवरी

साखबीरचं लाडू   दुधा तुपाच्या संगतीचं
माझं ते बाळराज हैती राजाच्या पंगतीचं

साखबीरचं लाडू   देती बांदून थोडं थोडं
बाळा माझ्याला किती सांगू   भूक लागल तीतं सोड

किती मी हांका मारूं   गावंदरीच्या नांगऱ्याला
बंदू माझ्या त्या हावशाला   माझ्या संभाळ आगल्याला[1]

१ नांगराच्या शेवटच्या दोन बैलजोड्या हांकणारा माणूस.

माझ्या अंगणांत कुणी सांडीला चुना कात
माझ्या बंधुजीचं गेलं मैतर पान खात

कुस्तीच्या फडावरी भल्या भल्यांच्या खालीं माना
तुला बंधुजी सांगूं किती विडा उचल पैलवाना

देवाच्या देवळांत तिथं कशाची गर्दी झाली
माझीया बंधुजींनीं गुंड[1] छातीच्या वर नेली

लाडक्या लेकीचं नांव ठेवीलं हिरा तारा
तिला सोसना ऊनवारा

लाडकी म्हणूं लेक दिली साताऱ्या धरतीला[2]
हत्ती राधाच्या वरातीला

लाडकी म्हणूं लेक बिजवराला ग देवूं नका
पैसा लेकीचा घेवूं नका धनी दोशाला होवूं नका

माया वहिणीला मागणं सारं दागीनं जडावाचं
बंधुनी केली बोली गांवजेवाण लाडवाचं

लोकाच्या लगनांत माझं धुरानं भरलं डोळं
बंधुच्या लगनांत जरी पाताळ पायघोळ

माहेरींच्या मळ्यांत ग पुंड्या उंसानं केली मात
माझीया बंधुजीच्या आली दौलत हातांत

ईनाम म्हणूं गांव नाहीं येवढ्या जवाराला[3]
आडव्या पाटाचं पाणी माझ्या माहेरच्या शिवाराला

सांगूनी धाडती बंधु माझ्या ग थोरल्याला
साज मागीती डोरल्याला

बंधु व्याही करूं गेली नको भिऊंस करणीला
वीस पुतळ्या अन् सरी तुझ्या घालीन हरणीला

पांच दुरड्या रूकवत सहावी तुपाची केळी दिली
बहिण भावाची विहीण झाली

---

१ गोल गुळगुळीत दगड. २ बाजू, पद्धत, प्रदेशीं. ३ प्रदेश, देश.

सरलं दळान माझी उरली वंजळ
माहेरच्या दारीं सोन्याची तुळस नू मोत्यांची माळ

सरीलं दळण सरलं म्हणाया लाज वाटं
बंधुच्या वाड्यांत कणगी[1] बळात[2] सोप्यां दाटं

दिवस उगवला जसा आगीचा भडका
तेचीया उजेडानं दिसती माहेरच्या सडका

सत्य नारायण देवा तुझं सत्त्व सोडूं नको
माझीया बंधुजीला गळ कशांत पाडूं नको

पाण्याला जाती नार तिचं पाण्यावर नाहीं चित्त
माझा बंधुजी हिरा झळकतो बारवांत

सकाळीं उठुनी रांजन धुतें मी घाईघाई
माजा ग बंधुजी खांद्या घागर उभा राही

जिवाला वाटतं गांवा कुणाच्या जाऊं नाहीं
बया मालनी शिवाय भेट कुणाला देवूं नाहीं

संग्राहिका
सौ. जुबेदाबी शेख
गोंदवलें बु।। (सातारा)

भरल्या बाजारांत ऊंच दुकान अत्ताराचं
लाडके मैनाबाई राज्य अखंड भ्रताराचं

सासूचा सासुरवास शीलवंताचे मुली सोस
माझी तूं बाळाबाई हे ग जातील दोन दिस

---

१ धान्य सांठविण्यासाठीं निरगुडीच्या फोकाची अगर कामटीची विणून तयार केलेली कणींग-मोठी टोपली. २ जाड पत्र्याने तयार केलेली मोठी कणींग.

सुनेला सासुरवास सासू कैकयीनं केला
रामासारखा भ्रतार नाहीं सितेला भोगू दिला

सासू सासरा आधीं देवाला मागावं
कुमुताई भैनाबाई मग माहेर भोगावं

सासू सासरा आहे दैवाच्या जांवायाला
बंधु माझा राजस जातो दिवाळी जेवायाला

नार ही लेनं लेती ईस पुतळ्या कवा कवा
कपाबीळीचं कुंकू नित दागिना माझा नवा

शेजी नेसती ईसाचं माझं तीसाचं दांडीवर
काळी ती चंद्रकळा हौशा कंतांच्या मांडीवर

माहेराला जातें तुझ्या माहेरीं काई काई
देवानं मला दिले भावापरास भाचे लई

मावशी म्हणुनी हांक मारिली मला कुणी
सतीश राजसानं माझ्या बहिणीच्या बाळायानी

माडीचा जानवस कोण मागतें हावशी
आक्का ती भैनाबाई नवऱ्या बाळाची मावशी

जोडीच्या मायाबहिणी मी का जोडील्या देशोदेशीं
मोहिनी माझ्या गांवापाशीं

जोडीली मायाभैन, मैना ती ग परजातीची
हातीं पेढ्याचा ग पुडा आली मध्यानरातीची

जोडीली मायबहिण घर तुझं वरल्या आळीं
पाव गुजाला[1] संध्याकाळीं

तुझा माझा भाऊपणा जन आणील डोळ्यांत
गुजाचा करूं झाडा चल माझ्या तूं मळ्यांत

तुझा माझा भाऊपणा जात मैनेची वाईली[2]
एका ताटांत जेवण्याची हौस मनांत राहिली

---

१ हितगुज. २ निराळी.

सासरवासिनींची ती का मजला येती मया
देवानं मला दिली तुझ्यासारखी अनूसया

सासऱ्याला जाती तुजा बामनी[1] अवतार
घोडं धरलेला भ्रतार

सासऱ्याला जाती तुझा बामणी सजावजा
जेण पासोडी संगं ने जा

सासऱ्याला जाते पुढें बंधुजी मागं दीर
मधीं सुकली कोथिंबीर

सासऱ्याला जाते पुढं बंधुजी मागे पिता
आहे भाग्याची माझी सीता

समोरल्या सोप्यां तिला हलकडी[2] प्रकाराची
माझी ती भैनाबाई राणी लाडकी भ्रताराची

बारीक बांगडी गोऱ्या हाताला चमक्या देती
शरदिनी भैनाबाई हौशा कंताची राणी लेती

थोरल्या घरची सून वाड्याबाहेर कशी जाऊं
चुड्या माझ्या राजसाचं इष्ट मैतर सारं गांवू

सरज्याची नथ, नथ अखूड दांड्यामधीं
बंधु सोनार वाड्यामधीं

सरज्याची नथ, नथ आखूड तिचा दांडा
भावज गुजरीच्या माझ्या नथ शोभती गोऱ्या तोंडा

पांची पक्वान्नाचं ताट बटाट्याची मी करतें भाजी
माझ्या बंधूच्या भोजनाला शिरापुरी मी करतें ताजी

शेजारणीबाई उसनं द्यावं लाडू
माझ्या बंधूच्या भोजनाला अतां कवाशा कळ्या पाडूं

माझा ग भाऊराया वाटे सर्वांना हवा हवा
आहे मथुरेचा खवा

---

१ ब्राह्मणासारखा. २ नथीचा घोस, चौपाळा अडकविण्यासाठी तयार केलेला लोखंडी फासा.

माझा भाऊराया मनीं मी आठवीन
पोटांत साठवीन रात्रंदीन

हितगूज बोलत चंद्र ढगाच्या आड गेला
पित्या माझ्या दौलताचा नाहीं गुजाचा झाडा झाला

बाराही वर्षं झालीं बहिण भावाच्या माहेराला
सावळ्या बंधूराया तुझं माहेर तुझं तुला

मला घेतलं लुगडं साडेवीसाचं हिरवंगार
बंधु माझ्या त्या चतुरानी केलं माहेर डौलदार

लुगड्याची घडी, घडी पहातें मी दिव्याज्योती
हौशा बंधूला विचारती आंत जरीच्या काड्या किती

बंधूजी घेतो चोळी दंड भरूनी रेशमाची
शेजी विचारती भैन कुण्या या वकिलाची

जतन करी देवा डोंगराची झाडी
माझ्या पित्याची वस्ती वाडी

नेनंत्या मुराळ्याची नको करूं तूं हार हेट[१]
बाळ माझ्या राजसाचा कंताशेजारी मांड पाट

पाहूणे आले म्हणू नंद कामिनीचे पती
सासूबाईंना विचारती सोप्यां समया लाऊ किती

जिरेसाळीच्या तांदळाची फुलं आधणीं तीं झालीं
चुड्या माझ्यांच्या पंगतीला नंद कामिनी ती आली

बंधु यीवाई करूं गेली नको भीऊ तूं करणीला
राम अवतारी डोरलं घालीन तुमच्या हरणीला

थोरलं माझं जातं नांव त्याचं हत्तीरथी
पित्या माझ्या दौलतांच्या सूना दळीती भागिरथी

सरलं दळान सूप झाडूनी एकीकडं
सासरीं माहेरीं राज्य मागती दुईकडं

---

१ हेटाळणी, उपहास.

धाकटे माझे दीर सासूबाईचं शेंडफळ
चुड्या माझ्याचं पाठबळ

शेवग्याच्या शेंगा ह्या का वाड्याच्या गेल्या ऊंच
सासू माझ्या त्या मालनीचा पतिव्रतचा वाडा ह्योच

माझ्या त्या दारामधीं हाळदीकुंकवाचा सडा
पतिव्रतेचा हाच वाडा

आयुष्य मी मागीयीतें सासूबाईच्या ग नीरी
जन्मभरी जावी माझ्या कुंकवाची चिरी

पोटाच्या परास ती का पाठीची मला गोडी
आक्का माझी ती बहिणाबाई बाळपणाची माझ्या जोडी

माहेराला जाती सर्वासहित झोळण्यांत[1]
पुत्र बंधूचा पाळण्यांत

किती मी हांका मारूं मी कां मारिल्या परसदरिं
माझी ती बहिणाबाई राधा हंसते सुंदरी

हात्तीच्या सोंडेवरी कुणी लावील्या ऊदकाड्या
बंधु माझ्या त्या राजसांची स्वारी जातीया राजवाड्या

सकाळच्या पारीं तांब्या येतो आमरुताचा
पित्या माझ्या त्या राजसांचा वाडा पुसितो समृताचा[2]

---

१ घोळका. २ समर्थ, कर्तृत्ववान.

संग्राहिका
सौ. सत्यवतीबाई तावडे
कोल्हापूर

महादेवाच्या पिंडीवर तीळ तांदूळ सगईळं
पारू माझ्या त्या गवळणीचा जोडा पिरतीमी आगळं[1]

महादेवाच्या पिंडीवर तिळ तांदूळ निवडीत
माजी ती बहिणाबाई जोडी पुत्राची मागत

महादेवाच्या पिंडीं बेल वाहिली जातां जातां
चुलता पंडित संगं होता

महादेवाच्या पिंडीं फूल वाहिलं वडाचं
हात्तीच्या चुड्याचं सोनं दिडाच्या पाड्याचं

महादेवाच्या पिंडीं बेल वाहिला तिकटीचा
वयाच्या जिवावरी न्हाई कुनाची परवचा[2]

सोमवार दिशीं बाई आई लेकाची गहू दळी
नको निवदाला तुझी पोळी

सोमवार दिशीं बाई आई लेकाची पाणी न्हाली
सदाशिवाला वर्दी गेली पूजा बेलाची ढासळली

महादेवाची पिंड कशानं ओली झाली
पुत्रासाठीं मी सेवा केली

महादेवाच्या पिंडीं बेल वाहिला असा कोणी
नटवा माझा बंधु पहिला पुत्र झाला त्यांनीं

माझा तो बंधुराया वटी केली रूमालाची
पेट्टी पेरीतो इनामाची

---

१ विशेष, वेगळा. २ किंम्मत, पर्वा.

पाटाचं पाणी सरळ सापावाणी
माझा तो बंदुराजा ईमानी बापावाणी

नवस मी करीतें बंधुला पुत्र व्हावा
भाचा मुराळी मला यावा

माझा तो भाऊराया नवरा मोतीयाचा घड
काय मागण्या तुमच्या चढ

काढीले सोनसळी गहूं दादा उपाशी नको जाऊ
जावेचा आला भाऊ

नणंद आत्याबाई बाळ धरतो निरीयीला
मोतीं मागतो चुरीयाला[1]



संग्राहिका
**सौ. सावित्री सावंत**
बागणी (सांगली)

वऱ्हाड उतरीलं पानमळ्याच्या टिपरीखालीं[2]
नवरा सोन्याच्या छतरीखालीं

बहिणीला बघूं आले पुणें सातारा तालुक्यांत
बहिणा भिंगाच्य दरवज्यांत[3]

बहिंणीला बघूं आले वीस मोटार तीस टांगा
बहिण आजोळां गेली सांगा

सकाळच्या पारीं बाई मी लोटीतें घरदार
पायीं जोडवीं भरदार

---

१ चुरणें, फोडणें. २ आसरा. ३ भिंगें लावलेला दरवाजा.

पाण्याला जाते नार तुझ्या घागरीं लाल काई
नटवा बंदु माजा वरून टाकतो फुलजाई

लेकाच्या आईयीला तिला कशाची लाज लज्जा
उभा राहिली दरवाजा हांक मारती बाळराजा

बहिणीला बघूं आले तट्ट्याच्या गाडींतून
दावा हंजीर[1] शेल्यांतून

पिकलं म्हणू बाई जन बोलती दिवानांत
घाला बुचाड लवणांत

रूसला भरतार कोंच्या रीतीनं समजावा
बहिणीला सांगयीती त्याच्या आडवा गोपा द्यावा

रूसला भ्रतार जसा भिलीनीवरला नाग
बया गौळण सांगती त्येच्या परमानं तूवी वाग

रूसला भरतार उशाला तरवार
बाई म्यां हांसूनी केला गार

सकाबीळच्या पाऱ्यां शेणापाण्यांत माझा हात
सर्गी गेलेल्या सासऱ्याचं हाईती बैल गोठ्यायांत

माळीण सादाविती घ्या ग पुण्याची पिवळी माती
भावज गुजर सारविती रंगमहालाच्या आडभिंती

## बहीण

आमी ग चौघी भैनी चारी गांवच्या खारका[2]
मना ग माझी सरू मधीं नांदती द्वारका

आमी ग चौघी भैनी चारी गांवांचे कळस
मैना ग माझी सरू मधीं नांदती तुळस

निरोप मी कां धाडी माझा निरोप जाऊं राहू
मना ग माझे सरू आडवळणी तुजं गांवू

---

१ अंजीरी रंगाचा. २ खारकेसारख्या गोड.

काळी ग चंद्रकाळा एका धुण्यानं झाली बोळा[1]
माझ्या ग बंदवानं रूपये दिले साडे सोळा

## सासू

सासू आत्याबाई हात जोडीतें तुम्हांला
दिवाळीचं मूळ नका परतवूं रामाला
सासू आत्याबाई हात जोडीतें बसूनी
दिवाळीचं मूळ राम चालले रुसूनी
सासू आत्याबाई सोनीयाच्या तुमच्या मिऱ्या
जलमाला जावो आमच्या कुंकवाच्या चिऱ्या
सासू आत्याबाई सोनीयाचे तुमचे गोट
जलमाला जावो आमचें कुंकवाचें बोट

## नवरा

गांवाला गेल्या कुण्या असं कसं येणं जाणं
सुकूनी एवढे गेले माझ्या रतीबाचें पान
गांवाला गेल्या कुण्या किती सांगूं मी धीट
दारामधीं बाई उभी अवाचित झाली भेट
झाल्या ग तिन्हीसांजा दिवे लाव ओसरीला
भ्रतार माझ्या राया सोडा वासरू गाईला
झाल्या तिन्हीसांजा दिवे लावूं मी कुठं कुठं
माझ्या ग भ्रताराचे चिरेबंदी बाई गोठं
कचेरीच्या ग पुढं हिरवा कंदील जळतो
भ्रतार माझा राया एवढा वकील बोलतो
जाऊ ग माझे बाई पलंग काढ ग झाडूनी
भ्रतार माझा राया उभा मंदील[2] काढूनी
भावजये ग बाई तुझा पलंग पारूसा[3]
भ्रतार माझा उभा हातीं रूमाल आरसा

---

१ खराब, पोतेरा. २ पागोटें, फेटा. ३ अस्वच्छ, न धुतलेला.

## नागपंचमी नैवेद्य (नाग-भाऊ)

नागपंचमीच्या ग दिवशीं मी ग नेसलें हिरवी साडी
नागा भाऊराया मला पाठवीतो ग गाडी

नागपंचमीच्या दिवशीं मी ग भरीला हिरवा चुडा
नागा रे भाऊराया तुला नैवेद्य ताजा पेढा

तूंच रे रक्षण करी माझ्या आईच्या गोताचा
नागा भाऊराया तुला नैवेद्य कढीचा

नागा भाऊराया तुला वाहिल्या मी लाह्या
तुज्या दर्शनाला आल्या शेजारच्या आया बाया

नागा भाऊराया तुला नैवेद्य गुळाचा
आतां रक्षण करी माझ्या बंधूच्या कुळाचा

## देवी (कुलदैवत)

आई आंबाबाई पाव माझ्या ग नवसाला
सोनीयाचं लिंबू वाहिन तुझ्या मी कळसाला

आई आंबाबाई गडावरचे रतन
शोभा एवढी देती अठरा भुजाला कांकणं

आई आंबाबाई गडावरची पुतळी
शोभा एवढी देती अठरा भुजाला कांचोळी

आई आंबाबाई पाव माझ्या ग नवसाला
सर्पाचे कासरे वाघ जुंपीन गाड्याला

आई आंबाबाई पाव माझ्या ग नवसाला
पानांनीं फुलांनीं घट[1] तुझा सावरीला

आई आंबाबाई तूं ग तळ्याच्या पाण्यां न्हाली
केस वाळवाया नारळी बनां गेली

---

१ मडकें, देवीपुढें बसवितात तो मातीचा घट.



संग्राहक
**श्री. रा. श्री. कदम**
सातारा

*समोरच्या सोप्यां उभे कांचेचे गलास*
*चतुर माझा बंधु पाणी पिणार विलास*

*सरीलं दळण माझ्या गीताच्या छंदाखालीं*
*चतुर माझा बंधु लेतो अबीर गंदाखालीं*

*तेल्या बुत्याची[1] कावड मुंगी घाटांत झाली छाया*
*चतुर बंधुजींनीं पहिलवानांनीं दिल्या बाह्या*

*तांबोळ्याची मैना पानं मोजिती चौदाचौदा*
*चतुर माझा बंधु पान खाणार पोरसवदा*

*एकामागं एक गाड्या चालल्यात नऊ*
*चतुर माझा बंधु व्यापारी भारी गहूं*

*झडा झडा चालं तुझ्या चालीनं चालवना*
*चतुर माझा बंधु तहान लागली बोलवेना*

*गोंडाळ हातायाला झाला बांगडी लागे थोडी*
*चतुर माझा बंधु राजवर्खीची लावा जोडी*

*लोकाच्या बंधुवाणी माझा बंधुजी नव्हे नारी*
*किती गडनी तुला सांगूं शहामृगाला माया भारी*

*मावळता दीस झाडाझुडांत दंग झाला*
*चतुर बंधुजीच्या खंड नांगरा पडला*

---

१ भुते या नांवाची एक जमात; देवीचा भक्त.

दिवस मावळला दिवसापाशीं माझं काय
चतुर बंधुजीची दिवा लावून वाट हाय

माहेराच्या देवा तुला नाहीं मी विसरत
चतुर बंधुजीचा येल जाऊं दे पसरत

हात मी जोडीतें तुला सांगतें श्रीहरी
चतुर माझा बंधु आहे जहाजाची दोरी[1]

सरलं दळण सरलं म्हणाया लाज वाटं
चतुर बंधुजीच्या कणगी भरल्यात तीनशेंसाठ

सरलं दळण एवढं उरलं कुठं ठेऊं
बंधु बळताला शिड्या लावूं

गांवोगांवचे पाटील कोरेगांवच्या बाजारीं
चतुर बंधुजीची खुर्ची मनसुबाशेजारीं

सुखाला भरतार दुःखाला बाबाआई
सयाला किती सांगूं बंधु वैद्याच्या गांवीं जाई

बहिणीच्या गांवा जाया भाऊ सांगतो बारा गडी
सासरवाडी जाया सोडी नांगर जुंपी गाडी

सासरवाडी गेला तुला पेहरावा काय केला
हावशा बंधु माझा पाय तोड्याचा दावी मला

सासरवाडी जातो मला म्हणतो जतरेला
बुंदीच्या लाडवाची खूण नकीच्या धोतराला

उन्हाळ्याचं ऊन नकी[2] तापली धोतराची
ताईता बंधवाची सुरत कोमेली चातुराची

हावशा माझा बंधु उद्यां जायाचा जतरला
परटीण धुणं धुती साबण लावी धोतराला

लावणीचा ऊंस उभा निरगुडी फोकांत
ताईत माझा बंधु उभा कॉंग्रेस लोकांत

---

१ प्रपंचातील प्रमुख व्यक्ति. २ नक्षीदार कांठाचें धोतर.

हिरवीगार चोळी कुण्या हौशानं घेतली
चतुर बंधुजींनीं वर मुंबई लिहिली

समोरच्या सोप्यां मी ग टाकितें जान झ्याक
बंधुच्या संगतीनं इथं येतात राजेलोक

काम करितें घरामधीं जीव माझा रानामधीं
माझ्या ग बंधवाच्या जोडी खिल्लारी हातामधीं

उन्हाळ्याचं ऊन चैतापरास वैशाखाचं
माझ्या ग बंधुजीचं गोरेपण सायासाचं[1]

गांवाला गेला कुण्या माझ्या झुव्याची तोडेकडी
चतुर माझा बंधु नजर पडेना झालें वेडी

गांवाला गेला कुण्या एक महिना तीन वार
चतुर माझा बंधु सखा दृष्टीनं झाला जार[2]

गांवाला गेला कुण्या खरं वाटना कामिनीला
तान्ही ग मैना माझी शेला बघती वलनीला

गांवाला गेला कुण्या मला वाटतं येड्यावाणी
चतुर माझा बंधु गांव दिसतं खुळ्यावाणी

गांवाला गेला कुण्या जीव लागला माझा सारा
पुढं पाऊस मागं वारा

काळी ग गरसोळी माझ्या कंठीं लहऱ्या मारी
चतुर माझा बंधु तुझ्या सोन्याला मागं सारी

चुड्याचं ग सोनं पिवळं हाडूळ
हावशा बंधवानी केली पारख वाडूळ

मोटईचं पाणी, पाणी वाजतं पुरावाणी
चतुर माझा बंधु नाचे मोरक्या मोरावाणी

कळवातणीबाई सांग नदीचा उतार
माझ्या बंधुजीचं भिजं जानवं धोतर

---

१ कष्टाचें. २ अतिशय थकून जाणें, गळून जाणें.

कळवातणीबाई तुझ्या दारींचं पिवळं पाणी
माझ्या बंधुची कवळी ज्यानी

सावळी सुरत लई नसावी पुरुषाला
बंधुच्या संगतीनं नारी निघाल्या उरसाला

शेताला गेली कुरी उभी बांधाच्या आसऱ्याला
चतुर माझा बंधु मोतीं दुयिरी कासऱ्याला

माझ्या ग भाऊराया इतका कसा विसरला
उद्यांच्या पाडव्याला चार वर्षाचा भाचा झाला

वाट मी किति पाहूं दोन्ही दरवाजे धरून
बंधूला देखूनी ग आली नेतरं भरून

दुबळ्या बहिणीला भाऊ पुरवितो चंदी[1]
त्याचा उत्सव काशीमंदीं

भावाची कन्या केली तिला काम सांगायाची चोरी
परघरची राधा बरी

तडावळं गांव, गांव दिसतं बामणीवजा
बंधुला किती सांगूं बहिणी दिल्यात लेकी द्या जा

जासूदाच्या मुला सांग सांगावा एवढा
बया मालनीच्या दारीं तुळस केवडा

गोरे भावजई तुझा मला राग आला
जेवता बंधु माझा उठूनी पाणी प्याला

भावज गुजरीचं तिचं बोलणं हंकाराचं
चतुर बंधुजीचं गोड बोलणं शंकराचं

पंचविसाची नोट माझ्या तबकीं टाकीली
भावज गुजरी ती ग लई रागानं उठली

धाकटे माझे दीर सासूबाईचं शेंडफळ
माझ्या चुड्याचं पाठबळ

---

१ दाणागोटा.

काळ्या ग घोंगडीला तिला रेवड[1] चवधारी
दीर माझ्या कीं चंदनाला नांव सोबतं कारभारी

हौस मला मोठी दिरा भावांत नांदायाची
माडी कौलारी बांधायाची

चंदन मैलगिरी नांव माझ्या बापाईचं
बया माझ्या माऊलीचं गोड दुध नारळीचं

भूक लागली पोटाला भूक बाई दम धर
पाण्याच्या वाटेवर माझ्या माऊलीचं घर

पाऊस पाणी नाहीं गंगा[2] कोणीकडूनी आली
माझ्या ग माऊलीची अवचीत भेट झाली

भरतार नव्हे बाई ती ग आंब्याची सावली
नाहीं आठवूं दिली परदेशाला माऊली

देवाला मागतें पांच पुत्रांची पंगत
जन्माला जावी माझ्या चुड्या हौशाची संगत

अहेव मेली नार कंतानं झाडली घोंगडी
बोलतो भाऊराया बाळं पडलीं उघडीं

देवानं दिलं आगल्या नांगऱ्या दोघ ल्याक
तान्ही तूं मैना माझी न्याहारी न्यायला रंभा एक

भरल्या बाजारांत चोळ्या फुलांच्या[3] वलनीं
सयाला किती सांगूं बया घेतीया मालनी

बंधु यीवाई करूं गेली दीर दाजीबा बोलेनात
सोयरे आम्हांला तोलेनात[4]

बंधुजी पाहुणा शेजी सांगत आली पुढं
चतुर माझा बंधु सरजा हांसत जोतं चढं

१ घोंगडीच्या टोकांना रेशमी अगर सुती दोऱ्यानें विणणें. २ गंगेसारखी पवित्र माता.
२ फुलांच्या नक्षीचे खण. ३ न पेलणें, बरोबरी करतां न येणारें.

बंधुजी पाहुणा शेजी पुसती खचोटीनं[1]
आधीं येऊं द्या बंधवाला मंग सांगेन निचिंतीनं

बंधुजी पाहुणा माझ्या दाराला होती कडी
चतुर बंधुजीची शिंगी सोप्याला टांचा झाडी

शिंगीला खाना दाणा[2] डाळ देतें मी वाटाण्याची
चतुर बंधुजीची शिंगी माझ्या ग पठाणाची[3]

बंधुजी पाहुणा दुरडी वेळीतें शेवायाची
नड सांगतें जांवायाची

पांची पक्वान्नाचं ताट करतें गुलाबी हलवा
बंधुच्या पंगतीला दीर राजस बोलवा

पांची पक्वान्नाचं ताट एक विसरलं वांगं
ताईता माझ्या बंधु चुकी झालेली मला सांग



संग्राहिका
विद्या देसाई
भिलवडी (सांगली)

नवरी पाहूं आले आले पुण्याचे पुणेकर
बिन्दी पट्टा अलंकार घालूं केले

नवरी पाहूं आले बसूं घालावें अंगणीं
नवरी नक्षत्र चांदणी

नवरी पाहूं आले सोपा चढूनी माडी गेले
नवरी पाहुनी दंग झाले

---

१ खंवचपटपणानें. २ तोबरा. ३ बहाद्दर.

नवरा पाहूं आले काय पाहतां घरदार
नवरा आहे वतनदार

नवरा पाहूं आले काय पाहतां वाडाझाडा
नवरा आहे चिमखडा

हौस मला मोठी वहिनीबाईला मुलगी व्हावी
खणचोळी कुंची न्यावी बारशाला

हौस मला मोठी बिंदल्याला सोनं घ्यावं
हौसेला बाळ व्हावं वहिनीला

हौस मला मोठी मोत्यांच्या भोकराची
मुंज तुमच्या तान्हीयाची

सासरचे बोल जशा रेशमाच्या गांठी
मी ग सोशीतें तुझ्यासाठीं मायबाई

सासरीं जातां बाई डोळ्यां माझ्या आलं पाणी
भल्या घरची लेक शाणी

भरल्या बाजारांत मायलेकींची गंमत
माय बोलते शिंप्याला सांग चोळीची किंमत

माझ्या ग अंगणांत शेजी नारीची सईना
कशी वळखूं यीना तोळबंदाची माझी मैना

झाडाची सावली यावी झाडाच्या पुरती
बयाची माझ्या सर काय करील चुलती

उन्हाळ्याचं ऊन सये लागतं शेल्यांतून
लाडक्या बाळराजा शिंगी काढ पागेंतून

सावळ्या सुरतीकडे नार बघती कवाची
तान्हा राघू माझा रास दिसती गव्हाची

एकुलता एक नका म्हणूं पांडवाला
कारल्याचा येल सारा मांडव झाकला

पाऊस पाण्याची झळ लागली वाऱ्याची
माय माऊलीची माझी पासोडी निवाऱ्याची

तरवड फुलला सोन्यापरास सवाई
लेकाची सर काय करील जांवाई

जोडवीं झिनकार तुझ्या विरूदीवर मोर
सावळी मैना माझी लेक खेळती तालीवार

दीरभावजयांचं राज्य जशी काच्यांची पांजणी
चुड्याचं माज्या राज्य जहागिरी लाखाची साजणी

काळी ती चंद्रकळा धुवूधुवूनी नेसावी
आपल्या जन्माला असावी मायबाई

काळी ग चंद्रकळा नको नेसूं अंगणांत
पति तुजा बंगल्यांत मैनाबाई

काळी ग चंद्रकळा पदरीं रामसीता
नेसली पतिव्रता मायबाई

काळी ग चंद्रकळा खडीनं भरली
संसारीं रंगली वैनीबाई

भरील्या बाजारांत काय किरान्या तुजी दाटी
बंधु हिंडतो बहिणीसाठीं

लुगडं ग घेतीईलं त्याला रेशमी काडी काडी
नाहीं नेसत घाला घडी

लुगडं घेतीईलं त्याला रेशमी नाहीं कांहीं
माऊली ग बया बोल लेकी येवढ्यानं झालं नाहीं

लुगडं घेतीईलं त्याचा पदर दीडइयाचा
ताईता ग बंदूजीचा त्यांचा मैतर बडोद्याचा

सकाबीळच्या पारीं वासुदेवाची आली फेरी
बया चांगुना दान करी

लुगडीड्याच्या आदीं कसा पदर फाटला
पिता माज्याच्या जिवावरी नाहीं गुमान[1] वाटल।

---

१ फिकीर, काळजी.

बंधुजी पावना पडे उजेड वाड्यावरी
हातीं कंदील घोड्यावरी

माह्यार माझं केलं एका बिग्याचा वसूल
सया बोलत्यात्या बंदू सम्रत असल

माळ्याच्या मळ्यामंदीं काय गुलाबा तुझी सत्ता
वास घेणारा यील आतां

भरील्या बाजारांत खडी चोळीचं नांव गांव
बंधुजी बोलत्यात खडा टाकूनी मला दाव

लेन्या लुगड्याची नार दिसती देखनी
पोटीं बाळाची घोकनी[1]

भावज गुजरी तुझ्या वाड्याला चौथी फेरी
बया माझी ती गवळण अंत:करणाची नव्हती घरीं

मोठ नि मोठ डोळ वरल्या देवाची करणी
माझ्या बंदूला देखूनी नार लागली झुरनी

येवडा माजा जीव गोड खायला सोकला
पीता माझा दवलत अंजीर बागत पिकला

भाचीच्या लगनांत माजा हक्काचा मावळचीर[2]
बंदूनी करनी केली दोनी पदरांना जर

शेवग्याच्या शेंगा आंतराळी लोंबत्यात्या
उंच या चोळ्या माज्या दंडाला शोभत्यात्या

भरिला बाजार बाई ग भरूनी वसरला
आतांच्या राज्यामंदीं भाऊ बहिणीला विसरला

गुज ना बोलायाला मला कशाला व्हवी लोक
बाळ माझी गीताबाई गुजाजोगीया माझी लेक

गांवाला गेला म्हणूं एक महिना तीन वार
सुरत बंदुची गुलझार[3] कुठं गुमला[4] चंद्रहार

---

१ उत्कंठा. २ लग्नांत मावळणीला द्यावयाचें लुगडें. ३ स्वरूपवान. ४ गुंतला.

तरवड फुलला सोन्यापरास सवाई
लेकाची सर काय करील जांवाई

जोडवीं झिनकार तुझ्या विरूदीवर मोर
सावळी मैना माझी लेक खेळती तालीवार

दीरभावजयांचं राज्य जशी काठ्यांची पांजणी
चुड्याचं माज्या राज्य जहागिरी लाखाची साजणी

काळी ती चंद्रकळा धुवूधुवूनी नेसावी
आपल्या जन्माला असावी मायबाई

काळी ग चंद्रकळा नको नेसूं अंगणांत
पति तुजा बंगल्यांत भैनाबाई

काळी ग चंद्रकळा पदरीं रामसीता
नेसली पतिव्रता मायबाई

काळी ग चंद्रकळा खडीनं भरली
संसारीं रंगली वैनीबाई

भरील्या बाजारांत काय किरान्या तुजी दाटी
बंधु हिंडतो बहिणीसाठीं

लुगडं ग घेतीईलं त्याला रेशमी काडी काडी
नाहीं नेसत घाला घडी

लुगडं घेतीईलं त्याला रेशमी नाहीं कांहीं
माऊली ग बया बोल लेकी येवड्यानं झालं नाहीं

लुगडं घेतीईलं त्याचा पदर दीडश्याचा
ताईता ग बंदूजीचा त्यांचा मैतर बडोद्याचा

सकाबीळच्या पारीं वासुदेवाची आली फेरी
बया चांगुना दान करी

लुगबीड्याच्या आदीं कसा पदर फाटला
पिता माज्याच्या जिवावरी नाहीं गुमान[1] वाटला।

---

१ फिकीर, काळजी.

बंधुजी पावना पडे उजेड वाड्यावरी
हातीं कंदील घोड्यावरी

माघार माझं केलं एका बिग्याचा वसूल
सया बोलत्यात्या बंदू सम्रत असल

माळ्याच्या मळ्यामंदीं काय गुलाबा तुझी सत्ता
वास घेणारा यील आतां

भरील्या बाजारांत खडी चोळीचं नांव गांव
बंधुजी बोलत्यात खडा टाकूनी मला दाव

लेन्या लुगड्याची नार दिसती देखनी
पोटीं बाळाची घोकनी[1]

भावज गुजरी तुझ्या वाड्याला चौथी फेरी
बया माझी ती गवळण अंतःकरणाची नव्हती घरीं

मोठ नि मोठ डोळ वरल्या देवाची करणी
माझ्या बंदूला देखूनी नार लागली झुरनी

येवडा माजा जीव गोड खायला सोकला
पीता माझा दवलत अंजीर बागत पिकला

भाचीच्या लगनांत माजा हक्काचा मावळचीर[2]
बंदूनी करनी केली दोनी पदरांना जर

शेवग्याच्या शेंगा आंतराळी लोंबत्यात्या
उंच या चोळ्या माज्या दंडाला शोभत्यात्या

भरिला बाजार बाई ग भरूनी वसरला
आतांच्या राज्यामंदीं भाऊ बहिणीला विसरला

गुज ना बोलायाला मला कशाला व्हवी लोक
बाळ माझी गीताबाई गुजाजोगीया माझी लेक

गांवाला गेला म्हणूं एक महिना तीन वार
सुरत बंदुची गुलझार[3] कुठं गुमला[4] चंद्रहार

---

१ उत्कंठा. २ लग्नांत मावळणीला घ्यावयाचें लुगडें. ३ स्वरूपवान. ४ गुंतला.

गांवाला गेला म्हणूं जीव माझा ग तगाद्यांत
हावशा बंदुजीची गाडी खंड्याळ बोगद्यांत

गांवाला गेला म्हणूं जीव लागला वाटेकडं
हावशा बंदुजीची गाडी खंड्याळा घाट चडं

बेंदरापासुनी ग पंचीम उरली वीस रोज
बंधु माझ्या ताईताची वाट पातीया नितरोज

गांवाला गेला बंधु त्याला मागली नाहीं सूद
नासून येवढं गेलं त्येच्या रतीबाचं दूध

गांवाला गेला म्हणूं मला वाटतं भना भना
चुड्या माज्या हावशाचा बैठकीचा जागा सूना

लाल पिंजवीरीचं कुंकूं नको आत्तारा लावूं जूकी[1]
आम्ही लीयाचू मायलेकी

चऊवीसोपी वाडा टोलेजंग आर्दी मर्दी
मामा माज्या गुजऱ्याला टाका पलंगावरी गादी

सरीलं ग दळायानं मला आणिक घेणं झालं
भाच्या माझ्या यशवंतानं बाप लेकांनीं येणं केलं

भावज गुजरीचं तिचं बोलनं ठसक्याचं
फूल सुकलं सबज्याचं

जातीसाठीं माती खावावी लवनाची[2]
पिता माझ्या दौलताची ऊंच कुळी रावणाची

ननंद आक्काबाई पाया पडून माजं घ्यावं
हळदी कुंकवाचं एक वचन मला द्यावं

मायबाप म्हणीतो लेक वंशाला नसावी
पार्वतीबाई बोल दुनिया कशानं वसावी

माझ्या घरला पावईना जन्म दिलेला माझा पिता
तांब्या तुपाचा केला रीता

---

१ जोखणें. २ जमिनीचा खोलगट भाग.

लाडकी येवढी लेक गांवामंदीं तिला दिली
बारा सणांची बोली केली

तुजा माजा भाऊपणा तेला वर्षं झालीं बारा
बया माझी गवळण तुजा सबुद आला न्यारा
मला सुटला उभा वारा

तुझा माझा भाऊपणा एका तिळांत माझा वांटा
माझी तूं सोनूबाई जन वाऱ्याच्या बांधी मोटा

तांबड्या मंदीलाचा रुमाल सोप्याच्या खुंटीला
माझा तो बंदुराया आला उमराव भेटीला

आंबारीचा हात्ती माझ्या वाड्याला थटला
बाई माझ्या त्या गवळणीनं काय जिन्नस पाठविला

बया माजीनं पाठविल्या गुळाच्या गूळपोळ्या
आंत उघबीडूनी पहाती खुतनीच्या नव्या चोळ्या

भावज गुजरीचं तिचं बोलनं राळा रूकी
माझा तो बंदूराया चांफा सुकला एकाएकी

उन्हाळा पावसाळा केळीबाईला गारईवा
कंताच्या जिवावरी नाहीं कुणाची परईवा

माझे तूं मायभैनी गिरणीवरून दोघी जाऊं
आपला बंदुराया गिरणीवरला हिरा पाहूं

बहिण भावांचा मेळा बसला बसईरीं
तान्ह्या माझ्या तूं लाव समई लौकरी

लाडक्या लेकीचं नांव ठेवीलं अनूसया
संगं परटीन धुणं धूया

लेकीच्या पैक्यानं कोन झालंया शिरीमंत
कसाबा दिली गाय कशी निघाली हंबरत

बाहिणभावंडाचा मेळा बसला पाखरांचा
ताईता बंधू माझा पुडा सोडीतो साखरेचा

दिवस उगवला येऊं दे वाड्याच्या ग आंत
बंधु माझ्याला किती सांगूं त्याला जोडावं दोन्ही हात

दिवस उगवला येऊं दे वाड्याच्या वरयीता
माझ्या त्या बंधुजीला औक्ष मागती पुरईता

दिवस उगवला उगवतांना पाहीईला
ताईता बंधुजींनी बेल वटीचा वाहीईला

माझ्या मनींची हौस मी ग सांगतें दम धर
राम अवतारी डोरलं वर जाळीचा मणी करा

आयेव येवढं लेणं डाळी डोरल्यामधीं पेटी
लेतें कंथाच्या राजवटीं[1]

डाळींच्या डोरल्यामधीं काळी दुल्लड[2] झोकं खाई
भ्रतार म्हणती द्या ग डोरल्याचं नांव काई

लाल पिंजरीचं कुंकू पैशाला पैसाभार
लेणं कंथाचं अनिवार[3]

कंथा हावशा माझ्याच्या डाव्या डोळ्याची तराटणी[4]
मी कां अंतरीची शहाणी देतें हांसत पिया पाणी

पिकल्या पानायाचा विडा सुकूनी वाया गेला
माझे तूं बहिणाबाई कंथ रूसला पड पाया

सासुरवासिनीचं तिचं गरिबावानी जिणं
चुकल्या कामासाठीं तिला बोलावं जेनं तेनं

सासुरवासिनीची तिची मजला येती माया
तिच्या सिनेची माझी सया

थोरल्या घरची सून काय नशीब तुझं थ्वार
वैनी म्हणत्याती दीर

कृष्णाबाईच्या पाण्यानं पाय कशानं झालं वलं
दीर बाळीचं माझ्या आलं

थोराच्या घरीं गडीमाणूस राबत्याती
सासर पाटील धनी राज्याला शोभत्याती

१ कारकिर्दीत, अंमल. २ मंगलसूत्रांमधील डुलणाऱ्या दोन पानाड्या.
३ मौल्यवान. ४ डोळे वटारणें.

गाडीच्या बैलाला चाल पडली मैलाची
दीर माझ्या या राजसाची दृष्ट काढतें धन्यासंगं बैलांची

बारव[1] हिरीवरी घडी चापितो धोतराची
दीर हावशा माझ्याला दृष्ट झालीया पांखराची

मोठं नी मोठं डोळं वाटंनी जात्याला माणसांचं
दीर माझा बाई बार भरतो बंदुकीचं

गांवाला गेला म्हणूं सांगूनी मला जावा
फोटो काढून घरीं लावा

गांवाला गेला म्हणूं सांगूनी नाहीं गेला
सांजा न्याहारीचा वाया गेला

लाल पैठण म्हणती आणा आणा ग आयाराला
बाळ आलीया माहेराला

कृष्णदेव वैराळ, भरे बांगड्या तारंच्या
वहिणी मनसुबादारांच्या[2]

माहेर येवढं केलं नारळ पदरावरी सई
माझ्या त्या बंधुजीला सई माझी लई

माहेर येवढं केलं दोन्ही पदर राजा-राणी
माझ्या त्या बंधुजींनीं केलं माहेर समृतांनीं

हिरवी हिरकण शिंपी म्हणतो सव्वादोन
माझ्या बंधुजीच्या तालीवाराची मी भैन

माहेर येवढं केलं पांच आगळं शंभराचं
हौसच्या बंधूजीचं नांव लागलं गणीसाचं

चाट्याच्या दुकानांत गंगासागर लुगडीं
बंधु माझ्याला देखीतांना चाटी दुकान उघडी

चाट्याच्या दुकानांत मांडी घालून बैसला
माझा बंधुजी बघीतो रंगारंगाचा मासला

---

१ व्यवस्थित बांधून काढलेली एक प्रकारची विहीर. २ मुनसफ, अंमलदार (भाऊ)

चाव्याच्या दुकानांत बंधू बसलं दोघं-तिघं
काढा पातळ बहिणाजोगं

माहेर येवढं केलं त्याचं पदर वाणीवजा
माझी तूं बाळाबाई बंधु घेणार आहे तुझा

सासऱ्याला जाती लेक बघीती मागंपुढं
जीव गुंतला आईकडं

सासऱ्याला जाती लेक कृष्णाकडंच्या निवाऱ्यानं
शालू भिजला दैवारानं[1]

सासऱ्याला जाती लेक वाट लागली लवनाची
चांदी झिजली जोडव्याची

सासऱ्याला जाती लेक वाट लागली माळाची
बैल अनकाळ चाळांची

सासऱ्याला जाती घोडं धरीलं ज्यांनीं त्यांनीं
पाय झाकलं बंधुजींनीं

लेकीच्या आईचं डोळ कशानं झालं लाल
बाळ सासऱ्याला गेली काल

सासऱ्याला जाती बघीती खालीवर
लहानाची केली थोर सत्ता चालना काडीभर

सासू नी सासरा दैवाचे नारी तुला
जातें माहेर भोगायाला

शिपाई शिलेदार हातीं बंदूक आयन्याची[2]
सावळा बंधु राजा रजा मागतो महिन्याची

वाटवरल्या मळ्यामंदीं आल्या गेल्याची उस्तवारी[3]
बंधु धाकटा कारभारी

बारीक गळा एवढा नको गाऊंस मोटेवरी
तांब्याच्या घागरी उभ्या गौळणी वाटेवरी

---

१ दहिंवर. २ ऐन वृक्षाच्या लाकडापासून तयार केलेली बंदूक. ३ व्यवस्था, उपसाभर.

बंधुजी सासूरवाडी जातो हायी इथून बारा कोस
त्याला नटाई लागं दीस

पांची प्रकाराचं ताट वाटी तुपाची कुठं ठेवूं
माझ्या तूं बंधुराजा चल प्रीतीच्या दोघं जेवूं

मध्यान पालटली मला उचकी लागली
माझ्या त्या बंधुजींनीं कुरी तासाला उभी केली

माहेराला जातें आडवं येत्याती भाऊभाचं
माझं माहेर दैवाचं

सोपा माळी बांधुनी जोतं आलंया आकाराला
शेला रूमाल सुताराला

बंधुजी बांधी माळी भावा पडला विचार
लावा गवंडी सुतार

बंधुजी बांधी माळी मोठी ढेलज नाहीं जागा
परसदारानं तुम्ही वागा

सांगूनी मी धाडी बाळी माझीच्या सासूईला
संभाळ कर बाई तिच्या डोईच्या केसाईला

नदीच्या पलीकडं लेक देवूनी झाली वेडी
आंब्या[1] दादाला हात जोडी

लेकीचा जन्म बाई जसा गारवीचा सोपा
आईबापानं केली जोपा

नांदाई गेली बाळ वाट लागली मुरमाची
माझी तूं बाळाबाई बोटं सिनलीं इरूद्याचीं

सासरीं जाती बाळ बाप म्हणे जा ग बाई
जन्म दिलेली माझी आई मागं हंबरीती गाई

सासरीं जाती बाळ पुढं बंधूजी मागं पती
माझी तूं बाळाबाई मधीं चांदणी शोभा देती

१ होडी चालविणारा माणूस.

नांदाई जाती बाळ बाप बघतो खालीवर
माझी तूं बाळाबाई सत्ता चालेना तूजवर

नांदाई जाती बाळ घोडं लागलं चढणीला
माझी ती बाळाबाई हात करी गडणीला

पाण्याच्या जाळीमंदीं मगर माशाचा बंगला
लेकीच्या जन्माला धनी असावा चांगला

नांदाई जाती बाळ मामाच्या त्या वाड्यावरनं
माझी तूं बाळाबाई पाणी मागती घोड्यावरनं

नांदाई जाती बाळ ईळाचा गेला ईळू
माझी तूं बाळाबाई लांब पल्याला गेली साळू

बापानं दिली लेक वाटेच्या गोसाव्याला
बाळीच्या नशीबानं मिळे पालखी बसायला

पांचींनीं उतरंडी तरतरेची झांकईनी
सासरीं गेली बाळ जावा नणंदांत देखयीनी

सासू नी सासरा जाई मोगऱ्यांचं आळं
त्या ग आळ्याच्या सावलीला परघरचीं आम्ही बाळं



संग्राहक
**श्री. गो. ल. जमदाडे**
दुधोंडी (सांगली)

हिरव्या चोळीचा ग पांच रुपये तिचा दर
ताईता बंधु माझा घेणार छातीखोर

आला बंधुजी पावईना शेजी नारीला विचारीती
बंधूच्या भोजनाला घड केळीचा उतरती

शेवग्याच्या शेंगा शिजविल्या मऊमऊ
हावशा माझ्या बंधु सोड बारस दोघ जेऊं

वाटवरला झरा पाणी येईल तसं प्यावं
बंधूच्या जिवावरी सोनं मिळल तसं घ्यावं

मैना सासरला जाती तुला मुराळी काय तोटा
तिलाबी आनायाला एका संगट चौघं नटा

जिवाला माझ्या जड डोकं दुखतं राहूईनी
ताईता बंधुजीला आणा वैदाला बोलावूनी

सासऱ्या आली लेक डोळे भरले पाण्यायानं
सांगतें सखे तुला गाय बांधली दाव्यायानं

आईबापानं दिली लेक नाहीं पाहिली चालरीत
जाई अडकली चिलारींत[1]

लेकीचा जलम जसा कांचेचा बंगला
लेकीच्या जलमाला औल्या[2] असावा चांगला

पायां बी पडूं आली म्यां का धरली वरच्यावर
तिच्या डोरल्याचा भार लोळे माझ्या पायावर

कंत बोलताती कां ग राणी तूं गोरी मोरी
माहेरीचं सुख माझ्या वीसर जीवावरी

रानी नी भर्ताराचा असला उबा दावा
लक्ष्मीबाई बोल इथं उगीच आल्यें देवा

लोकाचं भरतार माझ्या अंगणींचा केर
आपला भरतार सिरीकिस्नाचा अवतार

शेजीचा भरतार दारांतल्या केरावानी
आपला भरतार चांफा फुलला शेजवरी

माझ्या माहेरीं ग किस्नदेवाची द्वारका
माझ्या त्या भावजया मेळा गौळणीसारखा

---

१ क्षुद्र ठिकाणीं. काटेरी वेलीत. २ वल्हविणारा.

सासरीं जाते लेक हातीं भरलाया चुडा
जांवई बापू माझा खडीसाखरचा खडा

लेकीच्या आईला नका म्हणूं नाचारीण[1]
मोत्यापवळ्यांची जवारीण[2]

शेजी ती घाली पानी नाहीं भिजली माझी वेणी
बया ती घाली पानी न्हाणी वाजती वड्यावाणी

काशी म्हणूं काशी, काशी कुण्या खंडामंदीं
बया अखंड तोंडामंदीं

जोवर आईबाप लेकी तंवर तुझी उडी
झाली पुनव पाठमोरी[3] मग चांदाला[4] लागं घडी

संग्राहिका
सौ. काशीबाई सगरे
कवठे-महांकाळ (सांगली)

पांची पक्वान्नांचं ताट आंत सोजिचीं पाखरं
यीन यीवाई झाली ऐका मातेचं लेकरं

उन्हाळ्याचं ऊन, ऊन लागतं माझ्या जिवा
माझ्या वाणिच्या बाळा छत्री उघड सदाशिवा

उन्हाळ्याचं ऊन भाजी मिळेना घोलण्याला[5]
माझ्या बंधूच्या मळ्यामंदीं आला हरभरा सोलाण्याला

आला बंधूजी पावणा दुरडी येळतें शेवायाची
माझ्या बंधुजीला वड माघारी जायाची

---

१ गरीब. २ जवाहिऱ्याची पत्नी. रत्नपारखी. ३ उलटून गेली. ४ चंद्राला
५ घोळण्यासाठीं, (टंचाई भासणें)

माऊलीची माया जसं तकलाचं[1] पाणी
घरी मंडळ[2] घारीवाणी

माऊली परास पिता मोठा उपकारी
दुनिया दावली त्यांनीं सारी

बंधुजी पावणा न्हाई वरण भाकरीचा
करीतें पुलाव साखरेचा

संग्राहक
**श्री. बा. दे. पाटील**
बागणी (सांगली)

सांगली पेठेमधीं कोण बोलत किनी किनी[3]
माझ्या हावशा बंधूजींनीं दिली कचेरी हलवूनी

गांवाला गेले म्हणूं माझ्या गळ्याचा गळमणी
हावशा भ्रतार बाई माज्या कुंकवाचा धनी

सासर कसं बाई ग नको सांगूस दारोदारीं
कपाळीचं कुंकू नाहीं मिळत वारोवारी

माहेराच्या वाटं कशाची कुजबूज
माझ्या ग मनामधीं बंधुरायाचं हितगुज

माझा ग बंधुराया नाहीं पुसून गेला गांवा
हुरहुर वाटे मना चैन पडेना माझ्या जिवा

पहाटेच्या पाऱ्यामंदीं वारं सुटलं थंडगार
बंधूच्या आठवणी मनीं वाटते हुरहूर

१ कथील. २ घिरट्या लागणें. ३ कुजबूज.

बंधुजी घेतो चोळी भावज करीते पुढं पुढं
दोघांच्या विचारानं माझ्या चोळीला रंग चढं

आईबापांच्या माघारी लेक माहेराला गेली
भावज गुजरीनं तिला धर्मशाळा दाखविली



संग्राहक
प्रा. गजमल माळी
औरंगाबाद

माहेरचं डोंगर मले दिसे निया निया[1]
डोंगरांतून नदी बाई वाहे खय खया[2]

नदी कांठावर आंबराई तुझं बन
आंबराईमंधीं बाई माहे माहेरधन्

माह्या माहेराची वाट खारीक खोबऱ्याची वाटी
मह्या बापानं आंदन गाई देल्या मह्यासाठीं[3]

जाईन माहेरां माहेराचा डौल कसा
भावाआधीं बोले भाचा आत्याबाई खालीं बसा

जाईन माहेरां मले बसाया घोंगडी
पाया पडायाले भावजया चढाओढी

जाईन माहेरां माहेर भोगायाले
सर्जेरावाच्या कामिनी हाताखाले राबायाले

जाईन माहेरां बसीन पित्यापाशीं
गोट ऐकीन हिताची इसवा देते काशी

---

१ निळे निळे २ खळाखळा. ३ माझ्यासाठीं

जाईन माहेरां माहेरीं मायबाई
डोईची घागर इसवा भावजय देई

जाईन माहेरां मले इसवा कशाचा
दारीं पाळणा भाच्याचा झोका देईन सायासाचा

जन जाते जतराले मीत जातें माहेराले
दोन्ही माजे आईबाप काशी तिरथ पाह्याले

गादली[1] मही डोकी केसाच्या झाल्या लटा
डोई इचरे मही माता पानी टाके मह्या पिता

माय तुझ्या घरीं राज केलं लेकावानी
चरूभर पानी तिनं केलं लोकावानी

बापाजीच्या घरीं राज केलं रावणाचं
नाहीं उचललं पुढलं ताट जेवणाचं

मायची ग मया शेजी करायाले गेली
लटकी साखर जोंधळ्या पाना आली

भूक लागली पोटाले तोंड घालूं कोन्या जाळीं
आईची माया माज्या करवंद झाली काळी

भूक लागली पोटाले धुंडूं कोणता डोंगर
आई माजी यशवदा आहे पिकलं उंबर

माझ्या मायच्या मयांत निघाला निया नाग
नका मारूं भाऊ राखीन केयी[2] बाग

माहेराले जातें सांगतें तेलनीले[3]
तेल पुरवजा रामाच्या समयीले

माय करूं माय माय मोहाळाचं मध
अंतरीं करा सोध ताकाचं होईना दूध

माय म्हटल्यानं ओठाशीं ओठ भिडे
मावशी म्हटल्यानं अंतर किती पडे

---

१ घाण झाली. २ केळी. ३ तेलणीला.

माय करूं माय माय काशी गोदावरी
तियेच्या दूधावरी मले दिसली दुनिया दारीं

माय करूं माय माय सोन्याची परात
मायच्या मिचुक[1] नाहीं गमत घरांत

माय करूं माय माय सोन्याची ईट
समींदराच्या कांठीं पानी पेजो दोन घोट

माय बापाची मया तुले नाहीं भाऊराया
एवढा चेटला[2] डोंगर पानी नाहीं इझवाया

भाऊ ग आपला भावजय परायाची
दादा तुझी रानी यीहिन करायाची

नको घेऊं साडी चोळी नको येऊं नेयाले
सुखी राह्य दादा मला धीरज[3] देयाले

हातांत बटवा वानी हिंडतो कहीचा[4]
आई न बापाचा सौदा मिळेना दोहींचा

बापराज महा काशखिंडाचा पिंपळ
माजी माय बाई झाड तुळशीचं झपाळ

बापराज महा काशीमंधी पिंपळ हाले
माजी माय बाई पान्यामंधीं नाव चाले

बापाजीनं मह्या लय बरं केलं
गांव मांडण्याच्या भोळ्या शंकराले देलं

आळंदी करून जन देहू गेलं पायी
पिता माझा बाप राया रामेश्वर घरीं हायी

शेजी घाली जेवूं महे वर वर बोट
आई घाली जेवूं बुडालें मनगट

लंबाले महे बाल सरळ मही येनी
जलाल[5] आत्याबाई मह्या माहेराचं पानी

---

१ शिवाय, वांचून. २ पेटला. ३ धीर. ४ केव्हापासून. ५ जहाल.

दिरानी मही शाहु तूं माहेराल नको जाऊं
मोठं आपलं घर मी एकली कशी राहूं

गेला माहा जीव जवळ नाहीं कोनी
पांचा पदराची येनी उकलतो माजा धनी

गेला माहा जीव कवळी पडली केसाची
माहेर बोरगांवच्या वाटे रेज[1] लागली गोताची

गेला माहा जीव मले भिंतीशी खुटवा[2]
सोन्याचं पिंपळ पान मह्या माहेरीं पाठवा

गेला माहा जीव लेका तुले घरदार
लेकी मैनाले देईन मह्या गळ्यांतला हार

गेला माहा जीव लेका तुझे विहीर मळा
लेकी मैनाले देईन दंडांतल्या येळ्या

गेला माहा जीव लेका तुले शेतपीत
लेकी मैनाले देईन माह्या नाकांतली नथ

गेला माहा जीव दहन जळतं जाईचं
बोलले महे दादा बर झालं या बाईचं

भरल्या बाजारांत इनती करते यीहिनीची
धाड एक रात लेक मह्या बहिनीची

यीहीन सवंदर[3] पाया पडे पटापटा
लेकी मैनासाठीं हलका उचलला वांटा

आई बापा घरीं लेक लयंदी नसावी
गौळण बाई सवंदर कामांत असावी

माह्या माहेराचा बहिरोजी भेटला
सोन्याचा चुडा मह्या मनगटीं दाटला

लाडाची लेक लाडाकोडाचा जांवई
आंदन[4] देली बाई चंदनवेलाची तींवई

---

१ रीघ, ओळ. २ बसवा. ३ सज्जन, सखी. ४ बक्षीस देणें.

यिठून दिसती चिंचोलीची इंद्रगढी
जाऊचं माहेर देराची सासुरवाडी

काम करूं करूं दुखती हातपाय
माहेरीं न्यावं राया सुख देईल भावजय

सासू हे सासरे नव जन देर[1]
भाग्याची सवंदर लयंदी भोगते माहेर

लाडाची लेक राती उपाशी निजली
लाडाच्या बाईची साखर दुधांत भिजली

लाडाच्या लेकीले हांक मारते जानका
तोडा पैंजणाचा साऱ्या गल्लीले झणका[2]

लाडाच्या लेकीले हिले चौघेजण मामा
नागीन झुलते लेक मही सत्यभामा

लाडाची लेक मही पाटावर उभी राहे
कनयादानासाठीं वाट चुलत्याची पाहे

लाडाच्या लेकीचं जवळ सासर
तान्हालु गायचं हात चाटतं वासर

अशीलाची[3] लेक कमशील पाइतो कसुनी
सागाच्या लांकडाची ढलपी निघाली तासुनी

सासरवास आला भल्याच्या लेकराले
कसा नाहीं घम सागाच्या लांकडाले

सासूचा सासुरवास नंदाचा जयजयकार
तढी मी नांदती बाई तलवारीची धार

सासू ग सासरे तुले चौघेजण देर
गवळण पारबता मही भाग्याची गऊर

सासू शिकावते सुनाले शानपन
लानाले देर तुहे लागते वागवन

१ दीर. २ झंकार, पैंजणाचा निनाद. ३ खानदानीची.

सून सावित्रा उचल पंक्तीचे डवणें[1]
जेऊन उठले तुहे नंदोई शहाणे

सून सावित्रा उचल पंक्तीच्या पत्रावळ्या
जेऊन उठल्या नंदा तुझ्या लेकुरवाळ्या

सून सावित्रा उचल पत्रावळाच्या पंगती
जेऊन उठले तुह्या चुड्याचे सांगाती

सासुसासऱ्याचा आशीर्वाद घेन सुने
त्याहीच्या आशीर्वादानं फयाची[2] नाहीं उने

सासऱ्याले गेली माजी मयना गुनाची
मले सय होती तिच्या आडानपनाची

सासऱ्याले गेली गेली हांसत खेळत
बाई माज्या मयनाले नाहीं अजून कळत

मह्या दारामंधीं सांडलं कुंकू पानी
नव्यानं मैना माजी सासऱ्याले गेली तान्ही

सासऱ्या चालली मैना लाडाचा ग फोड
नवाळी[3] माजी मैना चुलते मागं पुढं

सासऱ्या चालली मैना माजी ग लाडाची
लेका अर्जुनाची बरी सावली ताडाची

सासरीं जाते येळीं सयाले पुसा ना
नवाळी माजी बाई हरण गळ्याची सुटा ना

शिंपीन शिव चोळी शिव आखूड बाह्याची
नवाळी माजी बाई मैना सासरीं जायाची

सासरीं जाते येळीं बाप म्हने जाय बया
आईची येडी माया लांब येती समजाया

सासरीं जाते येळीं माय धरती पोटाशीं
मयना माजे बाई कदी हरणे भेटशी

---

१ द्रोण. २ फल प्राप्ती. ३ नवोढा.

सासऱ्याले जाते पुडला पाय मागें घेते
नादान[१] माजी बाई मांगे मुऱ्हायी मांगते

दिवाळी दसरा माज्या जिवाले आसरा
आत्याबाई माजे मूळ पाठवा उशीरा

सासू आत्याबाई पाया पडूं द्या वांग्यांत
दिवाळीचं मूळ मले जाऊंद्या टांग्यांत

सासू आत्याबाई पाया पडूं द्या पायरी
दादा आले मुये मले जायाचे माहेरीं

सासू आत्याबाई पाया पडतें बागांत
दिवाळीचं मूळ बंधु चालले रागांत

सासू आत्याबाई मी माहेराले जातें
तुमच्या पोटींचा चंद्रहार संगं नेतें

सासू सासऱ्याची पायाची पायरजी[२]
सांगतें भाऊ तुले गंभीरा[३] बहिन तुजी

सासुरवासिनी मर मर तूं पापिनी
आईबापाचे जलम तुन लावले घोकनी

बहिनींचा सासुरवास भावाच्या कानीं गेला
उपसला झिरा तर्ढी पानी नाहीं पेला

याहिनी याहिनी बसून खाऊं पान
बाईले सासरवास धाडाले नाहीं मन

याहिनी सवंदरा एका ताटीं खाऊं भात
मैनाले सासरवास म्यां आखडला हात

अशील महा पिता अशील खानोटा
जावाले देते जाब जंगलच्या रानोटा[४]

याही साधाबाधा याहीन मही राधा
कुठी पैदा करूं हिच्या इज्याला सादा

---

१ खुळी. २ पायधूळ. ३ भारदस्त. ४ रानवट, जंगली.

सकाळीं उठोनी दहीदुधाची न्याहारी
लेक महाजनाची भाग्यवंताची वहारी

सकाळीं उठोनी माज्या हातीं रही दोर
सासू सासऱ्यानं कामायी केली फार

सकाळीं उठोनी सडा टाकूं कापूराचा
गवयी बायाचा रंगमहाल चातुराचा

सकाळीं उठोनी माजं बसनं दारांत
सून सायतरी धंदा निवारे घरांत

सून मूक पाहूं सासू नंदाच्या मिठ्यांत
हार पुतयाचा सून मालनच्या गयांत

सून मूक पाहूं माज्या वटींत खारका
सूनीचा मुखोटा लेका दसरता सारखा

शेर भर सोनं सुनाच्या पायाले
भरल्या बाजारांत माज्या लवली[1] पायाले

हळू हळू पाय टाक सून भागेरथी
तोड्या पैंजणाचे पाय दारीं चिरे दणाणती

पायांतले बेले[2] वाजती रूमझुम
मंदिरीं गेली सून जागी व्हय आरजून

सून भागेरथा टाक पलंग खाटेले
बाळानं ग माज्या मंदिल लावले खुटीले

सून भागेरथा टाक पलंग झाडुनी
बाळ परबत माजा उभा मंदिल काढूनी

वाकीच्या वाटनं कोण दिसतं एकलं
नाहीं धाडले मैनाले तोंड राघूचं सुकलं

सासरा पाटील सासू सुखाची चांदणी
याहीच्या पोटचा चांद डोलतो आंगनीं

१ पाया पडणें. २ पायांतील बोटांत घालावयाचा दागिना.

सासू पारबती सासरा थोया राजा
याहीच्या पोटचा गिन्यानी[1] चुडा माजा

सासू आत्याबाई तुमचा पदर भिंगाचा
तुमच्या पदराखालीं जोडा बाहिंगी रंगाचा

सासू आत्याबाई तुमचा पदर सोन्याचा
तुमच्या पोटचा जोडा रतनगीरीचा

सासू आत्याबाई तुमची सोनियाची मिरी
तुमच्या मिरीखालीं जलमले क्रिष्ण हरी

सासू आत्याबाई तुम्ही तुळशीचं पान
तुमच्या हाताखालीं सून नांदतें मी न्हान

सासू आत्याबाई तुमच्या पदराले गांठीं
पंढरीचं कुंकू पैदा केलं मह्यासाठीं

सासू आत्याबाई तुमचं नेसनं फुलाचं
तुमच्या मांडीवरी राघू मैनाले वंशाचं

सासू आत्याबाई पाया पडणं चांगलं
कपाळीचं कुंकू तुमचं पाउल रंगलं

सासू आत्याबाई तुम्ही बाजेवर बसा
मी भरतें चुडा दाम वैराळाले पुसा

सासू आत्याबाई तुमचे सोनियाचे घोळ[2]
तुमच्या घोळाखालीं आमी परायाचं बाळं

सासु आत्याबाई नका बोलूं सणासुदी
शेतामंधीं गेली मही सोनियाची मुदी[3]

सासू आत्याबाई सारा संसार तुमचा
कपाळीचं कुंकू एवढा दागिना आमचा

---

१ ज्ञानी. २ निरी, आसरा. ३ कानांतील अगर नाकांतील दागिना.



संग्राहक
श्री. रावसाहेब जगताप
औरंगाबाद

लगीन पतरीका धाडितें लिहून
भाऊ भाचे माझे आले कळवातीन घेऊन

बाशिंगाला तुरा कोन खविती हावशी
माझ्या आनवाळ हरीची नवरदेवाची मावशी

बाशिंगाला तुरा कोन खविती गवळण
माझ्या आनवाळ हरीची नवऱ्या राघूची मावळण

नवऱ्याच्या बापा काय पहातू करनीला
सोन्याची मोहनमाळ घालूं तुझ्या हरनीला

यीव्हाई ग्रहस्ता हुंडा मोजावा रोकड
बाळाच्या नवरीला घालूं पैठणी कापड

यीव्हाई ग्रहस्ता हुंडा मोजिता चुकला
बाळराजसाचं माझ्या रूप पाहून दंग झाला

अस्तुरीचा हात पुरषाच्या हातांत
वचन दिलं बाई हिरव्या मांडवांत

२

साळू सासऱ्याला जाती आन म्यां बांधिलें गोडधोड
भूक लागल तिथं सोड

साळू जाती सासऱ्याला आयाबायाची लामन
संग सवळ्याचा बामन

साळू जाती सासऱ्याला तिच्या वटीला कवळदान[1]
संगं मुराळी गाडीवान

साळू जाती सासऱ्याला ढेळजाला उभ्या राहूं
सया बोलल्याता तुझ्या मैनाला वाटं लावूं

३

सासरीं जातांना सयाला पुसना
नेनंती बाई माजी हरन गळ्याची सुटना

सासरीं चालली सखे बाई ग लाडाची
व-हे सावली ताडाची तिच्या ग बंदयाची

४

उंच वसरीला कोन निजला सावळा
माझ्या नेनंत्याचा हात उशाला पिवळा

गोठ पाटल्याचा हात कंथाच्या उशाखालीं
नेनंत्या बाईला पिरतीची झोप आली

भरताराचं राज्य कांचाचा बंगला
सुखाचा वाटतो कुंखाच्या ग धन्याला

राज्यामंदीं राज भोळ राज भरताचं
हळदी कुंखाचं उघडं पाल अत्ताराचं

भरताराचं सुख सांगतें देवा घरीं
कुंरवाच्या करंड्याला खिडक्या नानापरी

५

सासूचा सासरवास नंद तुम्ही हळू बोला
नेनंत्या बाईचा कंथ बाहेरून आला

---

१ ओटी घालण्याचे विविध पदार्थ.

येवढा सासूरवास नको करूं मायमाता
आपला राम व्हता आली परायाची सीता

सासूचा सासरवास कोनापाशीं सांगूं देवा
भाचा माझा नेनंता मनधरनीचा यावा

६

उन्हाळ्याचं ऊन माझ्या सख्याला सोसना
कुठं सावली दिसना

चांफ्या चंदनाची सख्याची नांगरटी
पिकलं पिकलं एका औताला बैल किती

पाऊस पडतो रायाच्या शिवारांत
गल्ला मावना अंबारींत पानी झालंया शेतांत

तिपनी[1] बाईनं तीनं मणाचा पेरा केला
माझा रासन्या[2] कोमेजला

गांवाला बाई गेला महिना झाला आज
सोनं येवढं गेलं माझं

७

जांवयाची जात अन् बाई भोंदून खायाची
बोली सरावन बाळाची कावड काशीला न्यायाची

जांवई सोयरा जसा चिंचचा आंकडा
सदा बोलतो वाकडा

जांवयाची जात मोठी ग बेईमान
मैना आपली देऊनीया शिवी देतो माईहून

जांवयाची जात कडू लिंबाचा पाला
लेकीबाई मैनारानी तुझ्यासाठींच गोड केला

पावन्याला पाहुनचार जांवयाला दुधभात
लक्ष केलं दान शिवी देतो गोतांत

१ तिफण, पेरणीचें औत. २ फळी फिरविणारा, कुळव चालवणारा.

८

पिरतीचा भाव कान्त टाकीतो चूळ
सई माझ्या हारनीचं माझं भिजलं निऱ्या घोळ

पिरतीचा भाव कांतानं दिलं पान
सई माझ्या हरणीचं हिचं रंगलं दांत छान

९

हिरवीं काकनं हातांत लेलें व्हतें
बाई माझ्या माहेराला रामेसराला गेलें व्हतें

माझ्या माहेरचं कसं नांदनं सोईचं
आई मारोतीचं व्हतं दरसन दोईचं

माहेरा ग घरीं राज्य केलं मोंगलाई
मायबाईला माझ्या भरला तांब्या दिला नाहीं

माईचं माहेर भावाची धर्मपुरी
सांगते वहिनीबाई आशाची लंका दूरी

देवबाप्पा नको देऊं तूं धनदौलत
घ्यावं माहेर खेळाया मायबापांच्या सावलींत

१०

हिरव्या चोळीला रूपाया देनं आलं
माझ्या हरनीला राजसाला नहान आलं

सुबाई संतुबाई कर ईच्यार मनाला
सख्या बाईईच्या झालं लईदी नहानाला

गरभिन बाईला उन्हाळा छगमग[1]
हौशा कान्तानं लाविली दारीं केवड्याची बाग

गरभिन नारीला कान्त पुसतो चोरून
दिले नारळ कोरून मधीं साखर भरून

---

१ तळमळी करणारा.

११

नवतीची नारी तुझी नवती आवर
तुझ्या बोलन्यानं पडला सख्याला बावर[1]

घरांतली अस्तुरी तलवारीचं पान
परनारीसाठीं नको घेऊ आडरान

घरांतली अस्तुरी बुगडीचं बोंड
परनारीसाठीं कां सुकलीं तुमचीं तोंडं

परपंचाचा गाडा लोटतां लोटना
हात लावा नारायना हरी सावळ्या मोहना

माझ्या रे परपंचाचा घोर म्यां नाहीं केला
हवाला[2] केला तुला सावळ्या पांडुरंगा

गाईवरी गोदया[3] लादील्या ग लमानान
सवतीवरी लेक कोनी दिली बेईमानानं

माझ्या मी ग घरीं नको करूं माझा घोर
मायबाई माझे मला वाटतं माहेर

सुख सांगतांना दुःखाचा आला लोंडा
बहीन माझी बाई हात लाविती माझ्या तोंडा

१२

भाईराजा परीस ग भावज मालन चांगली
राया देसायाला घडी रंगाची लागली

माझ्या बंदू परीस माझी मालन देखनी
अशी वसरीला उभी जसी दऊत लेखनी

आईक भाऊराया नको म्हनूं बहिनी फार
जसा चिमनीचा हार भुर्र उडून जाईल

---

१ काळजी. २ भरंवसा. ३ सामानाचीं जड पोतीं.

मांडवाच्या दारीं आयाराचीं सोळा ताट
जाऊ मालनबाई माझ्या मानाची आधीं ऊठ

अंतरीचं गुज सांगतें माझ्या सख्या
नेनंत्या माझ्या बंदू चल झाडाखालीं एक्या

थोरल्या वाड्यांत कशी जाऊं मी एकांती
भाऊ भाच्याच्या माझ्या बाप लेकांच्या पंगतीं

माझ्या बहिनीचा बाळ मला म्हनीतो मावशी
देवदास हरी माझा फूल जाईचं सुवासी

थोरल्या घरची सून हांड्या भांड्यांत राबती
बहिन माझे बाई तळखड्या[1] रंग देती

गांवाला गेला बाई माझ्या गळ्यांतली सरी
माझ्या राजबंधवानं कशी कटीली मुसाफरी[2]

## १३

तुझ्या जिवासाठीं जीव माझा विकीन
नेनंत्या बंदु तुला ताजवा जोखीन

माळ्याच्या मळ्यामंदीं असा बाइ ग कावळा
द्रिस्ट ग लागली माझ्या हरीच्या जावळा

चवद[3] भवनांत आंथरली शाल
पोटीं जन्मला लाल मन झालं खुशाल

सावळ्या सुरतीची नार बघती खालींवर
मांझ्य वार्नीनीच्या बाळाला घोळ[4] माझा डौलदार

## १४

भरताराचं राज जसा पान्याचा हाऊद
लाडके माझे बाई कर मनाची मऊज

---

१ खांबाखालीं ठेवण्याचा चौकोनी दगड. २ मुशाफरी, प्रवास. ३ चौदा. ४ पदराचा घोळ.

लेकीचा जलम नको घालूं देवराया
केले कष्ट गेले वाया मायबाईचे माझ्या

चिकूकून सुपारी रूपयाची पसाभर
सावळ्या भरतारा रानीचा छंद फार

चिकूकून सुपारी अडकित्यानं कुटना
सावळ्या भरताराला भीड रानीची तुटना

सावळ्या सुरतीची नारीला पडली भूल
रस्त्यानं नाग डूल भाईराजा

सावळ्या सुरतीची नार रडं घळघळा
जलदी वलांडा पानमळा

माईचं माहर भावाची धर्मपुरी
सांगते बहिनाबाई भाच्याची लंका दूरी

लेकीचा जलम जसा गाजाराचा वाफा
माय हरने माझे माया लावूनी काय नफा

हिरवा कारला वैंराळाचे बैलावरी
बंदु हाय पारावरी छंद घेतें मी नानापरी

वैराळा तूं रे दादा भर बीलवरामंदीं छंदु
मोल द्यायाचा माझा बंधु

जेवनाची पाटी नेता मानेला झालं ओझं
हौशा राजसा शिवेला पानमळ तुझं

माहेराला जातें माझ्या जीवाला ईसावा
बापाजी बयाजी सारा संबंध असावा

बापाजी बयाजी दोन अमृताचीं कुंडं
त्यांत जलमाला आला माझा पिंड

ससू नि सासरा दोन सोनियाच्या तारा
त्येंच्या सावलीला मला लागला उनवारा

सासूरवास एवढा नका करूं सासूबाई
चांदी आली सोन्यापाई

सुनेला सासुरवास सासू तूं ग बाई केला
लेक देशलि परायाला अनुभव येईल तुला

लेकुरवाळीची ग निंदा करूं नये भलत्यांनीं
आडवा बाळ तान्हा गेला पदर वाऱ्यानी

सख्या गड्यायाला पोटीं नाहीं फळ येक
पुतण्या केला लेक दिवा जळतो अंदुक

लेकीचा रे जलम कसा घातिला येड्यानं
परायाच्या घरीं गाय रावते भाड्यानं

हात मी जोडतें तला येतें काकूळती
अस्तुरीचा जन्म नको घालूं रघुपती

जातीसाठीं माती खातें मी परोपरी
सासरीं माहेरीं नांव करावं दुहेरी

जातीसाठीं माती खडे खातें मी चावून
माझ्या घराण्याच्या नांवाला भिऊन

जातीसाठीं माती खातें मी केसायाची
माझ्या घराण्याच्या बट्टा कुळीला नसायाची

उभ्या गल्लींतून जातें, पदर कपाळ भरून
नाकासमोरची वाट जाते वाडाच्या म्होरून

उभ्या रस्त्यानं जातें, पदर घेतें पुडी
सासर माहेरचा नांवलौकीक दुहीकडी

वाटच्या वाटसरा तुला वाढीतें मी जेवूं
माज्या पित्यायाचं नांव घेशील गांवोगांवूं

बारीक गळा बाई वाऱ्यानं ऐकूं गेला
वाटच्या वाटसरानं घोडा मैदानीं उभा केला

वाटचा वाटसर मला बघून झाला दूर
शेतांत हाईती वाघासारखे माझे दीर

सरलं दळन उरले पांच गहूं
औक्षवंत व्हावें एका जोडीचे सहा भाऊ

सरलं दळन सुपं झाडूनी उभीं केलीं
माझ्या रामराया चित्तं तुझ्या गांवा गेलीं

दळण सरलं हात खुंट्याचे सुटले ग
जाऊबाईसंगं ववी गाऊन उठलें ग

शंभर माझं गोत गोताची परवा थोडी
भाऊराया माझ्या तुम्हासाठीं झाली येडी

गोरीचं गोरपन हळदीला मागं सारी
बाई माझ्या नेनंतीला द्रिस्ट लावून गेल्या नारी

हौस मला मोठी तुझ्या गव्हारिपणाची
घालीन मी तुला चोळी अंजीरी खणाची

हौस मला मोठी दानं मुठीनं नासावं
घराच्या अंगणीं बाळ खेळतं असावं

हौस मला मोठी बन्धुच्या बाळाची
घालान बाळाला कुंची निऱ्याच्या घोळाची

लाल पिंजरीचं कुंकू पैशाला धडा धडा
लेकी सुनांनीं माझ्या भरला चौकोनी वाडा

लाल पिंजरीचं कुंकू मी एकली कशी लेऊं
आणा बोलावूनी सोप्यां बसली माझी जाऊ

साळू सासऱ्याला जाती कवतिकाची सीता
सासरीं घालविती पुढं बंधू मागं पिता

दुबळ्यापनाचं नार सांगती गाऱ्हानं
पुनवेच्या दिवशीं चंद्रा लागलं गिऱ्हान

दुबळ्यापनायाची लाज वाटती मला
नारी जलमाच्या काय करावं नशीबाला

दिवस मावळला माळाच्या खालीं ऊन
भाऊराया माझा करडी घोडी पिवळा जीन

साळीच्या भातावरी साखर किती वाढूं
लिंबाजी बाळ माझ्या नको भाताची आळ काढूं

माळ्याच्या मळ्यामंदीं चाक वाजतं किरी किरी
बघत्या थराला केळ्या झाल्या बाळांतिनी

सांगून धाडितें आल्या गेल्याच्या ग हातीं
बाई नेनंती माझी उभी वसरीला व्हती

लावनीचा आंबा याला पारंबी फुटली
भाई रायाला पाहुनी जीवा संतोषी वाटली

गांवा आल्या कळवातिनी जागा पुसती राहायाला
माझ्या भाऊरायाची रानी बसली नाचायाला

माझ्या घरीं दूध शेजीनं दिलं ताक
सख्याच्यापरिस मला मालन अधिक

मालन कुंकूं लावी बारीक गव्हावानी
भाई राजसा माझ्या रूप तुझं देवावानी

बहिनीच्या गांवा भाऊ चालले तरत[१]
असे जरीचे पटके बांधू लागले वाटत

रस्त्यावरी वाडा बारीक बांधनीचा
मधीं उजेड चांदनीचा बहिनाबाईचा

सासूचा सासूरवास कडू लिंबाचा पाला
भरताराच्या जीवासाठीं अमृत मानून गोड केला

लेकीची ग जात भिंतीवरला ग चुना
गांवा गेली करमना बाई नेनंती माझी मैना

मी माझ्या घरीं भाग्याची नांदतें
भाई राजाची माझ्या भूषणानं चोळी लेतें

१ तरातरा, लगबगीनें.



संग्राहक
**अनिल दिनकर फडके**
औरंगाबाद

*किती वाट पाहूं माझ्या बंधूच्या गाडीची*
*सावली कलली[1] माझ्या कांचाच्या माडीची*

*बहिण भावंडांचं भांडण कांहीं नाहीं*
*एका ताटांत जेवूं घाला तुम्ही मायबाई*

*बहिण भावंडांचं भांडण रानींवनीं*
*भाऊ निकरट[2] बहिणीच्या डोयां पाणी*

*भाऊही बोलला बहीणीले घेतो धटी[3]*
*बोलली भावजय शिवा चोई लावा वाटी*

*भावुला बोलला बहीणीले नान्हा धुना*
*बोलली भावजय पाण्याची[4] खेप आणा*

*दिवाळीच्या दिशीं माझ्या ताटामधीं मोतीं*
*ओवायाले जातें राण्या भावजयांचे पती*

*दिवायीच्या दिशीं माया ताटामधीं सोनं*
*ओवायाले जातें भाऊ माहे कारकून*

*दिवायीच्या दिशीं माझ्या ताटामधीं मोर*
*ओवायाले जातें राण्या भावजयाचे देर*

*राजे भावजयी राग करूं नको माझा*
*कळीवर[5] घेऊन पति वागवला तुझा*

---

१ ढळली. २ तिरसट. ३ वस्त्र. ४ पाण्याची घागर भरून आणणें. ५ कडेवरी.

माहा बोलणीचा भावजयले राग आला
नेनंता तुझा पति खांदी करीं वागवला

दुरून वयखीन गाडी बैयलाची चाल
नंदावाची माया शालु धुरकऱ्याची लाल

बहिणीच्या घरीं भाऊ गेलें समयानं[1]
गर्दी केली उन्हायानं शेले भिजले घामानं

बहिणीच्या गांवा जात भाऊ मुराई थाटला
दगडाची वाट जोडा रेशमी फाटला

बहिणीच्या गांवा जातां आहे येशीमंधीं वाघ
पाटचा भाऊ माझ्या बहिणीसाठीं जानं भाग

बहिणी सार केल्या भाऊ पाठमोरा झाल
तोंडाले ल्याये शेला सखा गव्हीवरी दाटला

बहिणीच्या भावा, जात कोण्या गांवा
संबोरच्या हयावा[2] अनुटाव[3] माझ्या गांवा

बहिणीच्या भावा कंबर बांधली
जीभ नाहीं पानी तीथं शेवळी खंदली

वाट पाहु दोन डोये झाले कुंकावानी
एवढी तुमची माया काहुन झाली लोकावानी

सभींतुन[4] जाईन माझा आळवा[5] पदर
बन्दवाची माया, माझ्या वाघाची नजर

---

१ वेळानें. २ घ्यावी. ३ विश्रांती. ४ जमावांतून. ५ सावरलेला.



संग्राहक
**हरिहर मातेकर**
औरंगाबाद

## माहेर :

उठुन दिसती — मह्या माहेरचे लिंब
लिंबाला साखळदंड — माडीला हिरवा रंग

उठुन दिसती — मह्या माहेरचे पत्तर
रुपये लागले सत्तर — खिडक्यां वाळतीं धोतरं

उठून दिसती — मह्या माहेरच्या भिंती
तांब्याच्या पराती — बंधू माहे पाय धूती

दुरून दिसती — दिवे हे ग देवळाचे
भाई राजस ग माझे — कळस माझ्या माहेराचे

हें ग लोहगांव — तिन्ही झाडांनीं झाकलं
भाई राजसानं तसं — बाई माहेर झाकलं

बोलतील सय्या — तुला माहेरचं येड
पाठीचे दवलत — मव्हा[1] उस भारी गोड

बय्या बय्या म्हणूं — बय्या मही साकर सोजी
माहेरीं जायाला — मन मव्हं झालं राजी

बाई माहेराला आलें — मला ईसावा नसावा
भाई राजस ग माझा — सखा भाग्याचा असावा

हें ग दळण दळीतें — माझ्या मुठीमंधीं बळ
माय हरणीनं देलं — घुटीमंधीं जायफळ

१ माझा.

सेजी जेऊं घाली – भरेना माझं पोट
माते तुझीं पांचीं बोटं – हयती माझ्या हुरदांत[1]

सेजी जेऊं घाली – अर्थ करूनी नवला[2]
माता घाली जेऊं – कळूं देईना कोणाला

सेजी घाली जेऊं – करी आवड निवड
माता घाली जेऊं – पांचा पोळ्यांची चवड

मायबाईच्या ग मह्या – फार गोठी गुळावाणी
मावळाया गेला – शाळू दिवस वाऱ्यावाणी

रामासारखे ग ल्योक – सीतेसारख्या ग सुना
आतां मह्या बापाजीला – राजा दशरथ म्हणा

इंगोलीच्या मोंढ्यामंधीं – गाडीला गाडी भिडे
वडील देसायाचा – जरीचा शेला उडे

इंगोलीच्या मोंढ्यामंधीं – गाड्या चालल्या दमानं
वडील देसायाला – अडत्या घालीतो सलाम

माता घाली न्हाऊ – येसीला गेला लोट
बापाजी चंदनानं – माळ्यानं धरली मोट

मह्या बंधवाचं – सेत काजळाची वडी
बारा बैल चौदा गडी – पिता चाले मागं पुढी

खांद्यावरी पोतं – वाणी हिंडतो कहीचा
आई या बापाचा – सौदा[3] मिळना दोहींचा

शिप्याच्या साताला – चुलते दोघं तिघं
बोलले बापाजी – लुगडं न्हाई मनाजोगं

शिप्याच्या साताला – चुलत्या दोघी तिघी
बोलली मायबाई – चोळी न्हाई मनाजोगी

माईला म्हणतें माय – चुलतीला म्हणतें ताई
जरीचा पदर डोई – पित्या तुमची भावजई

१ हृदयांत. २ नवलानें. ३ व्यापार.

माईला म्हणतें माय—चुलतीला म्हणतें गगा
चुलत्या पांडुरंगा—खालीं बसून गोठी[1] सांगा

पाव्हणे आले बाई—बाप पाटलाचे भाऊ
साळीचे तांदूळ—कोण्या उतळणीला[2] पाहूं

घोड्याहून रामराम—कोण पाव्हणा आला बाई
भासा राघोबा बोलला—मुजरा घ्यावा आत्याबाई

काय सांगूं बाई—मह्या माहेरचा ठसा
भावा आधीं बोले भासा—आत्याबाई खालीं बसा

पिकल्या पानाची—पोटारी झाली रिती
बापाजीची भैन—आत्याबाई आली व्हती

सेताच्या बांधाला—कोण घेते मेळवण
बापाजीची भैन—आत्याबाइ गवळण

कुरूळ्या केसाची—मला नाहीं येणी येत
सुगरण तुझी आत

देसाई महादेव—मायबाई ग पार्वती
भाई राजस ग माझे—पुढे नंदी शोभा देती

हरळीची मुळी—जमीनीला सदासुखी
भाऊ राजसा रे माझ्या—तशी तुझी देशमुखी

समस्त सोयरा—ढवळ्या ऊंसाचा पाचट[3]
पाठीचा बंधव—नाहीं करणीला हटत[4]

गांवोगांवचे पाटील—हायेत मगरमस्त[5]
भाई राजस ग म्हे—पंडित जबरदस्त

रस्त्यानं चालले—पंडित डौलत
बंधु देखल्यानं—मव्हं काळीज खुलतं

चार भाऊ मव्हे—दगडाच्या चार भिंती
नाना या बव्याला—चवकटीला तेज किती

---

१ गोष्टी. २ उतरंडीला. ३ वाळलेली पाती. ४ मागें सरत. ५ मग्रूर, [illegible].

वहीण भावंडं — एका भाकरीचा काला
तुहा मव्हा जल्म — एका समिंद्रांत झाला

पुतळ्याची माळ — काढून ठुली[1] ग खुंटीला
पाठीच भाऊ मव्हा — नवा ताईत गाठीला

वडील भाऊ मव्हा — सर्व्या वाड्याचा नाईक
भाऊच्या ग मह्या — गळां सोन्याचे ताईत

साळीच्या भाताची — वाफ चालली दुहेरी
भाऊ ग मह्या — टांगेवाल्याची न्याहारी

मशीला मेळवण — खडीसाखरेचे खडे
कानीं चवकडे — दादा महे दूध काढे

बारा बयलाची — कशी असामी नेटकी
भाऊनं ग मह्या — बैल सोडिले बाटकीं

झाली साई सांज — दिवा वसरी बाईला
रंगीला दादा मव्हा — सोडी वासरं गाईला

मारोतीच्या देवळांत — कोण सांगतो पुराण
भाऊचा ग मह्या — गळा सारंगी परमानं

दुकानाच्या पुढें — कंदील जळती ग दोन
बंधु दयाळाच्या — दुकानीं कारकून

पिकल्या पानाचा — ईडा कचेरी जायाचा
पाठीचा मव्हा बंधु — नवा वकील व्हायाचा

पानाचा खानेवाला — चुना लावतो देठाला
भाऊच्या तरी मह्या — लाली सर्जाच्या व्हटाला

आईबापांच्या पोटीं — पुत्र जल्मला सोनं
बंधु दयाळाचं — वहु मर्जीचं बोलणं

सांगून धाडितें — मह्या माणिक मोत्याला
भाऊचं बसणं — पाठ लाऊन जोत्याला

---

१ ठेवली.

बारा हे ग बैल — तेराव्वं आहे घोडं
भाऊ बंधवाला माझ्या — भारी संपत्तीचं येड

घोड्याचा बसणार — सेताला गेला पायी
भाऊ बंधवाला मह्या — संपत्तीचा गर्व नाहीं

सांगून धाडितें — नाहीं आला सांगल्यानं
कठूर केलं मन — भाऊ मह्या रंगिल्यानं

साळीचे तांदूळ — उभ्याउभ्यानं दंडाळी
बंधव पाव्हणे — संगें सव्वारें मंडळी

साळीचे तांदूळ — म्यां दुकानीं पाहिले
बंधव पाव्हणे — संगें अरब रोहिले

बहीण भावाचा — कसा विचार चांगला
भाऊ पुसे बह्यणीला — माडी बांधू कां बंगला

भारी भारी खण — चाटी वळणीं लावीले
भाऊला मह्या म्यां — तें बोटानें दाविलें

बारीक बांगडी — कासाराच्या बैलावरी
रंगीला भाऊ मव्हा — पारावरी मोल करी

अंगणांत उभा — अंगण मव्हं देतं शोभा
रंगीला दादा मव्हा — खण मझ्या चोळीजोगा

शिण्याच्या साताला — दादा बसले पंडित
दादाच्या मांडीवरी — साडी हिरवी रंगीत

मला मोठी हाऊस — देऊळगांवचं लुगडं
भाऊ घोड्यावरी — चाट्या फडताळ उघड

चौघेजण भाऊ — मला चार चोळ्या घेती
गिरजाबया माही — सौती साडी बलावती

गायीचं गोमीतर — देवामंधीं पवितर
मह्या रंगील्या दादाचं — त्यांत भिजलं धोतर

गायीचं गोमीतर — अंगणीं वाहे गंगा
पाठीच्या भाऊ मह्या — दयव तेथ पांडुरंगा

बैल सईल्याच्या[1] — चारी पायांत केसरी
भाऊला उभारी — जोडी घेयाची दुसरी

मोठा हाने मोठकरी — बोरे देतो बोरकरी
सेताला घाले फेरी — दादा माहे कारभारी

वानी या तिनीचे — भाऊ मन्हे सुखी राव्हं
असा शोभा देत — झाडीमधीं मव्हा गांव

सांगून धाडितें — मह्या मावस भावाला
चांदीचे कळस — टांगा झळकतो शिवेला

वाटेनं चालला — भाऊ मव्हा गोरापान
सोन्याची छतरी — वऱ्ही सूर्व्यनारायण

पुतळ्याची माळ — मह्या ये ग बह्यणी लेती
वडील बाई माही — शोभा बह्यणीला देती

आम्ही तिघी बह्यणी — एकूण एकीच्य पाठच्या
भाई राजसानं मह्या — चोळ्या शिवील्य जरीच्या

शिप्याच्या साताला[2] — सौतं खणाळ फाडलं
ज्याला न्हाई भैन — त्याला नवल वाटलं

मला मोठी हाउस — देऊळगांवच्या बांडाची[3]
वडील मेव्हण्यानं — केली खरेदी दिंडाची

बापाजीचा वाडा — बाई ही रेंघते[4] धांवत
सीता भावजई — आली बिजली लवत

सीता भावजई — पाय धुवून पाणी पेली
बापाजी राजानं — कोण्या अशीलाची केली

तोड्या पैंजणाचा — आवाज येतो घाऊ घाऊ[5]
सीता भावजइ — घाली सासऱ्याला जेवूं

---

१ बैलाचें नांव. २ सांत = बाजार. ३ एक प्रकारचें लुगडें. ४ रांगते, चढते.
५ तालबद्ध आवाज, रुणझुण.

तोडया पैंजणाची — कोण वाडा उतरती
बापाजीची सून — दिवा मारूतीला नेती

सासऱ्याला सून — आवडली मनांतून
तोडे पायजिण्या[1] — हळूं उतर जिन्यांतून

सीता भावजई — कुंखाची लाव चिरी
तुझ्या चिरीसाठीं — नौस केले नानापरी

सीता भावजई — कुंखू लाव कोरणीचं
पाठीचा भाऊ मव्हा — सोनं मझ्या मोरणीचं

सीता भावजई — कुंखू लाव ग टिकला
अंजिराच्या बागा — बंधू राखतो एकला

सीता भावजई — कुंखू लाव पिंपळपान
तुझ्या कुंखावरी — दादा रंगील्याचं ध्यान

बारा बयलाचं शेण — हाये भागेरथी सून
साखळी[2] भावजई — न्हाई पडूं देत उणं

शिण्याच्या साताला — चोळ्या फाडी उडदाणी
रंगीळा दादा मव्हा — वैनी सांगी एक शिणी

दुरून पुसते — मव्हा सोयरा सुखाचा
सीता भावजईला — पुडा धाडतें कुंखाचा

मपलं आऊख — मझ्या बंधवाला देतें
हळदीवरी कुंखू — सीता भावजई लेते

सीता भावजई — नको पडूं मझ्या पाया
वडील भाऊराया — आशीर्वाद जातो वाया

सीता भावजई — जशी गुलालाची पुडी
रंगीला दादा मव्हा — अभीर[3] तिच्या चडी

पातळ पुतळ — कंबर मुठीच्या मोजाची
भाऊच्या। ग मझ्या — राणी चतुर भुजाची

---

१ पैंजण. २ कष्टाळु. ३ अबीर.

सीता भावजई – तुहा मला राग येतो
रंगीला दादा मव्हा – हातानं पाणी घेतो

भाऊ घेतो चोळी – भावजई गुमानांत[1]
दोघांच्या इचारानं – चोळी बांधी रुमालांत

सीता भावजई – तुह्या भावामंधीं मळ
पाटीचा दादा मव्हा – चांद कसा निरमळ

सीता भावजई – हाय कोणाची कोण
भाऊच्या करीतां – तिला दिलं मोठेपण

सीता भावजई – उचल उष्टे दुरुण
जेऊनिया गेले – तुहे नंदई बाह्मण

सीता भावजई – उचल उष्ट्या ताम्हणी
जेऊनिया गेल्या – तुह्या नणंदा बाह्मणी

नणंदा भावजया – हैती एका ग चालीच्या
लोक ग बोलती – लेकी कोण्या मावलीच्या

## सासर :

माझ्या मामंजीची – स्नानसंध्या भारी
– जवळ उभी मंदोदरी

सासू आत्याबाई – तुमच्या पदराला शेव
तुमच्या पोटचा – चुडा मव्हा महादेव

सासू आत्याबाई – तुमचा पदर जरीचा
तुमच्या पोटचा – चुडा सावळ्या रंगाचा

सासू आत्याबाई – तुमच्या पदराला गांठी
सोडीले मायबाप – सावळ्या चुडयासाठीं

---

१ स्तब्ध. गंभीर.

कपाळाचं कुंखू — मह्या कपाळा दंडतं[1]
फूल गुलाबाचं — कोण्या पेठला हिंडतं

बळदुं[2] रे देवा — मला दुबळं राहूं दे
कुंखू कपाळाचं — जोडा जल्माला जाऊं दे

कपाळाचं कुंखू — साता तोळ्याच्या मव्हरा
भाऊच्या ग तरी — तालुकदाराचा सोयरा

कपाळाचं कुंखू — कसं घामानं पांगलं
बोलले बापाजी — लेकी दैयव चांगलं

कपाळाचं कुंखू — लावतें दोन बोटं
तुम्ही पाव्हं सय्याबाई — चुडा मव्हा उजवट

कपाळाचं कुंखू — लावतें डौलदार
जावो जलमाला — चुडयाचा कारभार

नगर पेठला — मव्हा माणिक हिंडतो
गुलाबी पटका — याच्या सुर्तीला दंडतो

किती सांगूं बाई — चाल मह्या चतुराची
— हातीं मिरी धोतराची

माझ्या चुडियाचं — सुख सांगतें माहेरीं
पितळी पलंग — त्याला कांचेची पायरी

सेताच्या बांधाला — कसा पवना[3] मातला
बईल सईला — धनी पेरण्या गुंतला

जातें मी हाटाला — नजर लावतें दुरूनी
चोळीचे घेणार — उभे पालाला धरूनी

काळी चंद्रकळा — नेसाया मन झालं
चुडया मह्या चंदनाला — घेणाराला सांगल कोण

शिणाऱ्या मह्या दादा — सोड दिंडाच्या मोरख्या
अजुनी येईना — माझा कापड पारख्या

---

१ शोभतें. २. देवाचें नांव. ३. एक प्रकारचें गवत.

मह्या मनाची हाऊस – सांगल चुडया चंदनाला
नव खणाची वसरी – सौंती खोली रंधनाला

मह्या मनाची हाऊस – सांगल सेताच्या सेतांत
कडे पाटल्या हातांत – सोनं टाकावं नथींत

माझ्या चुडीयाची – उजवी बाही सोनियाची
काय करायाची – संपत दुनियेची

दुरुनी वळखीतें – तुमच्या पटक्याची बांधणी
गंध कपाळाचं – जणुं सुखाची चांदणी

सासू ग सासरा – सुखाची चांदणी
मह्या कपाळाचं कुंखू – सूर्व्य डोलतो अंगणीं

भरताराचं सुख – हंसून सांगते गोतांत
अंगावरल्या शेल्याची – केली सावली शेतांत

माझ्या अंगणांत – चिमण्या पाणी पेती
हिरव्या पातळाच्या – नणंदा तोंड धूती

कुंखाच्या परीस – मह्या मेणाचा लघटा
चुड्याच्या परीस – नणंदाबाईचा मुखटा

आऊख मागतें – कुंखाखालच्या मेणाला
देराला ग तरी – मह्या पहिलवानाला

वडीलपन्नाला – किती चालू मी गहीन
देरा या बाम्हण्या – तुम्ही भाऊ मी बहीण

वडीलपन्नाचा – मोठेपणा मह्या शिरीं
देर म्हणतो वह्यनी – जावा बाई बाई करी

धाकल्या देराला – काम सांगतें चोरून
वसरीला तांब्या – घ्यावा दादाजी भरून

कवतूक पाहूं – आपण घरच्या घरांत
देर हे बाम्हण – उभे खोलीच्या दारांत

सेताच्या बांधाला – जावा जावांची तगार
देरा बाम्हणाचा – मंधीं हौशाचा नांगर

धाकली मही जाऊ – कामाचा करते हेवा
देरा या सदाशिवा – पाण्याला गडी ठेवा

धाकल्या जावेला – काम सांगी रागंरागं
बारा बयलाचं शेण – दावण झाडूं लाग

धाकली मही जाऊ – बोलते चिडी चिडी
इच्यावरी का यमुना – देर मोतीयाची लडी

धाकली मही जाऊ – बोलते चणाचणा
इच्यावरी का यमुना – देर मोतीयाचा दाणा

धाकल्या जावेचं – जातें कवतूक पाह्याला
भरताराला जेऊं घालून – आपण बसली न्हायाला

भांडती बांधव – जेवती एका ताटीं
सांगतें जाऊ तुला – अबोला कशासाठीं

सुनेला सासुरवास – जिनं आला तिनं केला
राणी बयाबाई – जलम भोळ्यामंधीं गेला

सासरवासीन – मह्या बाईनं पाहिली
हातीं लाल तांब्या – तोंड धुवाया लागली

सासूचा सासरवास – नंदाबाईच्या काचण्य[1]
रंगीला दादा मव्हा – घेतो शिवेहून बातम्या

सासूचा सासरवास – बंधु ऐकतो दारून[2]
कवळी याची शीण – नेत्र आलेत भरून

सासूचा सासरवास – नंदाबाई हळूं बोला
तुमच्या पाठीचा – बंधू बाहेरून आला

सुनंदला सासरवास – नका करूं सासूबाई
तुमच्या पोटच्या – चण्यासाठीं[3] आली जाई

दुरून वळखीतें – मह्या चुड्याचं पाऊल
भाऊच्या मह्यासंगं – सालीयाचा[4] डौल

१ काच, सासुरवास. २ दारूण, कळवळून. ३ गोळ्यासाठीं (मुलासाठीं)
४ मेव्हणा.

दुरून वळखीतें – साल्या मेव्हण्याची चाल
भाऊचा पटका लाल – चुड्याची हिरवी शाल



संग्राहक
सुखराम हिरवाळे
औरंगाबाद

भावजयीच्या बोला भाऊ बहिणीवरी राग
अरुण्या वनांत वधली रागं रागं

भाव आपुला धाकुला भावजयी लोकाची
दोन दिडक्यांत नार आणली फुकाची

भावजईबाई नको बोलूं असं उणं
भाव शंकराचं कसं सांगूं तुला गुण

भावजई बाई कशाची नाई आस
माया परीस भावाची मोतीं पवळ्याचा रास

भावजयी नगं करूं तूं असा हेवा
भाव माजा भोळा सांब सुखी ठेव त्येला देवा

पिता माजा वड, माता माजी वड फांदी
येवढा पिंड झाला, दोहिंच्या कड-खांदी

येवढा माझा पिंड माज्या बाजीच्या मांसाचा
शिरीं झुंबडा केसाचा माज्या मायच्या सायसाचा

माजी मायबाई पेली तुजं थान
तुज्या कुशींत जलमलें पाडस मी ल्हान

माजी मायबाई उपकारी काशी
नव महिने ग वजं वागवीलं डाव्या कुशीं

तुजी निदरा मोडली माज्या जलमल्या दिशीं
दुखा सुखांत झाली ग लई लई येडी पिशी

मायचा उपकार फेडीशी येड्या जिवा
मांडीचा चवरंग नेतराचा केला दिवा

मायची येडी माया तुज्या सर हाय देवा
मायच्या नशिबाचा तुला वाटतोया हेवा

माजी मायबाई माजी साकराची पुडी
पुडीत जलमली येवळी माजी कुडी

सरगीच्या देवा उघड सरगीचा झोपाटा[1]
माय गंधारी काशीचा पाहूं दे मुखवटा

संग्राहिका
डॉ. सरोजिनी बाबर
पुणे

अंबारीचा हत्ती हा लुट ऌा जाईना
भावाची सर माझ्या कोणाला येईना

माझं दळण ग कोण्या वाड्यांत रांधतं
गोकुळीं सखा ग माझं माहेर नांदतं

ल्योक पाजे पाणी सून गंगा मधीं उभी
अजून ग नाहीं आली लेक संसाराची लोभी

बापाचे उपकार फेडीतें काडोकाडी
आईचे उपकार भिनले हाडोहाडीं

१ दार.

दिवाळीच्या दिवशीं भाऊ केला मुसलमान
हातामधीं खण पत्रीं लिहीतो सलाम

बाप म्हणे लेकी माझी हरबऱ्याची डाळ
जाशील परघरां येथें होईल तुझी राळ

गांवाच्या खालती टांगा कोणाचा पळतो
आक्का या बाईचा पदर शालूचा लोळतो

आली ग लक्ष्मी आल्या वाटेनं जाऊं द्या
बाळाचं माझ्या देवघर पाहूं द्या

तेथून दिसते माझ्या माहेराची वाट
निर्मळ ग पाणी हा गंगाबाईचा घाट

दिवाळीच्या दिवशीं माझ्या तबकीं ग खण
आतां कमी करतें माझ्या बाप्पाजीचें ऋण

उगवला सूर्य ऊन पडलं दारांत
सासूंच्या मनामधीं सून नसावी घरांत

पोतेरा घालतें चुली आधीं देव्हाऱ्याला
भोजनाचं ताट लेकी आधीं जांवयाला

लेकूरवाळीला ग नका म्हणूं नादान
काम तिचं बाळाच्या स्वाधीन

चिक्कण सुपारी माझ्या बंधूच्या विड्याला
बाळा माझ्या चातुराणी राणी लावल्या कामाला

सक्रान्तीचा सण पर्वकाळाचा दिवस
भाऊजई सीता आधीं तुळशीला ववस

उन्हाळ्या दिवसांत ऊन लागतं गालाला
छत्री शोभती माझ्या बाई त्या लालाला

जावळाची वेणी मामांनीं उकलली
सावळी राधा कन्यादाना उभी केली

दिवसा करितें काम रात्रीं बसतें निश्चिंत
सांगतें भाईराजा तुला औक्ष चिंतीत

अशी झाली दृष्ट माझ्या राजस बाळीला
तीनी वाटांची माती आणतें लिंबाचाची पाला

काय बोलला मूर्खा वतनदाराला
पांढरीचा[1] भेंडा एकदां बसेल थराला

लावणीचा आंबा पाणी घालितें पळीनं
आंब्या ग शेजारी केला फैलाव केळीनं

गांवाला गेल्याची ग काळजी मी किती करूं
भाई राजाच्या पाठीशीं दत्तगुरू

शेजी हिनवीती तुला भाऊ किती जण
पृथ्वीच्या पाठीवर चंद्रसूर्य दोघे जण

लावणीचा अंबा पाणी घालतें वेळोवेळीं
आंब्याचीही झाली केळी

गांव नेवाशाची नदी कडी कोट
लक्ष्मीबाईला घडीतें सरी गोठ

सकाळीं उठूनी धरणीमाते नमस्कार
लागतात पाय अपराध क्षमा कर

थोर माझं घर माझं आणीक होणार
धाकटे माझे दीर बागणीगांवचे शाहीर

सकाळीं उठूनी हात जोडीतें हरीला
आयुष्य मागतें माझ्या कुंकाच्या चिरीला

दाहाचा पोशीणारा दहाचं मन धरी
पडला नाहीं बाई लेकीला वाटेवरी

हर्षाची गुडी[2] माध्यान रात्रीं आली
भाई राजाला माझ्या आज कन्या झाली

नेणंतेपणी पुत्राचा बाप झाला
भाई राजाला माझ्या हिऱ्याची माळ घाला

---

१ गांवठाण, गांव वसण्यास योग्य अशी जागा. २ गुढी, आनंदाची बातमी.

भाऊ भावजया दोन्ही आधाराच्या मेढी
मावली नसतांनीं माहेरीं गेली वेडी

कोनी नाहीं कोनाचं, भाऊ नाहीं बहिनीचा
कैवार घेतो सखा आपल्या राणीचा

भाऊ म्हणतो ताई नको धुऊं तूं लुगडं
भावजई बोले नाहीं नदीला दगड

भाऊ म्हणतो बहिनीला तुम्ही नित यावं जावं
भावजई पुसे पाव्हनीचं कोन गांव

बाप म्हणे लेकी तूं ग गुलालाची गोणी
सोयऱ्याच्या घरीं लोटीली केरावानी

नवरी पाहूं आले सया म्हणती देऊं देऊं
बोलतो हिचा भाऊ दूर पलुयाला केव्हां जाऊं

सासरीं जाती सया पाहती परसांतून
प्राणसई माझी हरीण नेली कळपांतून

सासरीं जाती गुजरी वसरी भरली सयांची
प्राणसई माझी दूर पलुयाला जायाची

भ्रतार म्हणतो कुठं गेली देवांगना
प्राणसई माझी आली हंसत अंगना

भ्रताराची खूण चाले खांबाच्या आडून
प्राणसई माझी द्यावी सुपारी फोडून

मावशी म्हणून धरीतो माझ्या घोळ
सांगतें सयांनो माझ्या बहिणीचा बाळ

माझ्या पोटींचा नाहीं शोभत माझा मला
सांगतें बाळा तुला आई म्हण मावशीला

भरल्या बाजारीं कंबरीचा सोड पसा
मैना माझी भरील चूडा तिच्या मना येईल तसा

भावाच्या बरोबरी भाचा बाळ मूळ आला
दारांत उभा आत्या माहेराला चला

माझ्या ग बाप्पाजीनं बहू माझं बरं केलं
कुंकाचं नारळ रत्न माझ्या हातीं दिलं

शेर सोनीयाचं कोन वागविती ओझं
कुंकू कपाळींचं नाजूक लेणं माझं

काय मी पुण्य केलं आईसारख्या सासूबाई
सोन्याच्या संपूष्टांत पूजीली अंबाबाई

परवा पुरुष माझ्या अंगणींची शिळा
आंघोळीला बस चुडया माझ्या तूं घननीळा

गांवाला गेला कुण्या माझ्या कुंकवांची चिरी
सावळी सुरत हिरव्या बनातीच्या वरी

आवूक मागतें चुडयामागल्या कंगणीला
माझ्या कुंकवाच्या शिलेदाराच्या बहिणीला

काय करायाची दिरा भावांची पालखी
भ्रतारावाचून नार दिसती हलकी

नारायणा बाप्पा तुला मागत नाहीं कांहीं
माझ्या जोडव्या कुंकवाला आऊक घाल लई

चांदण टिप्पूर चांदण्या जोगी रात
शेजच्या भरताराची देवा सारखी सोबत

स्वर्गीच्या देवा एक अर्ज माझा ध्यावा
माझ्या कपाळीचं कुंकू माझ्या जलमीं जाऊं द्यावा

पाटानं जातं पाणी ऊंसारुंगट कर्दळीला
हावशा माझ्या कांतानं जाई लाविली वर्दळीला

भ्रताराचं राज्य मी ग लुटीतें सान्यावाटं
आजून पावतर नाहीं फियार्द गेली कुठं

सावळी सुरत अशी पाहिली नाहीं कुठं
माझ्या ग राजसाचं ओठ बारीक डोळ नीट

मोठ नी मोठ डोळ जशी लिंबाचीं टोपणं
शेजीला कशी सांगूं रूप कांताचं देखणं

रुक्मीनबाई बोल सुभद्राला धाडा मेणा
द्रुपदाबाईची स्वारी रथामधीं आधीं आणा

पहांटेच्या पाऱ्यामंदीं कोणी वाजवीला वीणा
काकड आरतीला उभ्या भाऊ बोदल्याच्या सुना

पहांटेच्या पाऱ्यामधीं ऐका कर्णा सुरु झाला
दह्या दुधानं देव न्हाला

पहांटेच्या पाऱ्यामंदीं कर्णा वाजतो मंजूळ
पांडुरंगाला माझ्या दह्यादुधाची आंघोळ

पहिल्या पंगतीला रुक्मीन बैसली रांगूळीला
सावळा पांडुरंग देव गेला आंघोळीला

दुसऱ्या पंगतीला रुक्मीन टाकीती पान
भोजना बैसले बार्शीचे भगवान

तीसऱ्या पंगतीला रुक्मीन वाढीती पोळी
भोजना बैसला अरणगांवचा सावता माळी

चवथ्या पंगतीला रुक्मीन वाढती भात
भोजना बैसले पैठणीचे एकनाथ

पांचव्या पंगतीला तुपां तळीती मेथी
रुक्मीन बोलती विठ्ठला साधु पंगतीला आले किती

आपण गुरु बहिणी देशो देशींचीं पांखरं
पांडुरंगाच्या माझ्या एका बाप्याचीं लेकरं

तुझ्या त्या ओसरीला येल लवंगाचा केर
तुझ्या नवतीचा गेला भर

लेकीचं चांगूलपण रूप आईन्यांत मावेना
बापासारखी माझी मैना

चांगुलपणाची लांब गेलीया आवई
बंधुसारखी भावजई

नेसली चंद्रकळा तुझी बारीक कंबर
निरी पडली शंभर

थोरलं माझं घर घराशेजारी पाणई[1]
सून गवळ्याची ठाणई[2]

भाजीमधीं भाजी, भाजी बारीक हरबऱ्याची
माझ्या बंधूजीची नार नाजूक वंजाऱ्याची

जाल्या तूं ईसवरा तुला सुपारी बांधिली
नवऱ्या हळद लाविली

जाल्या तूं ईसवरा तुला बक्षी गव्हाचा बा घास
नवरा मोतीयाचा घोस

बंधू मी करतें याही दीर दाजीबा संगं चला
मांडव नारळीचा पायघड्यांची बोली करा

बंधू मी करतें याही जावानंदांच्या मेळ्यांत
सोन्याची मोहनमाळ सून राध्याच्या गळ्यांत

घाणा ग भरीयला खंडीभर जीरीयाचा
मंडप हिऱ्याचा लखलखाट

घाणा ग भरीयीला खंडीभर बाजरीचा
मंडप देवाचा शोभीवंत

घाणा ग भरीयला पांच कुडवांतीं
सवासनी पांच येती मानाच्या

पिकल्या पानाचा विडा करूनी वाया गेला
पाठीच्या गौळणी भ्रतार रूसला पड पाया

जिचा भ्रतार ज्ञानी अंगीं विसणीतो पाणी
अवघ्या नगरींत नारीला नहीं कोणी

हौशा भ्रतार हौस पुरवीत गेला
डोल्याखालीं सर घागरीचा केला

माय माऊलीचा पान्हा प्यालें मीं सरासरी
कामांत सासूबाइ आलें तुम्हां बरोबरी

---

१ पाणवठा. २ एकाच जागीं बराच वेळ थांबणारी.

बत्तीस धारांचा पान्हा प्यालें मी हंसून
माय मालनी ग तुझ्या मांडीव बसून

बत्तीस धारांचा पान्हा प्यालें मी कोण्यारंगं
माझ्या मावलीनं केला मांडीचा चवरंग

बहिण भावंडांचा नीत झगडा होतो रातीं
बया जामीन मला होती

दळण दळतांना अंग माझं तें घाम्याजलं
माय माउली ग माझे दूध तुझं इरजलं

पालक पाळर्याणा लेकीच्या लेकराचा
झोका टाकीतें कौतुकाचा

अस्तुरी भ्रताराची घरामध्यें किरकीर
लक्ष्मीबाई बोले तेथें धरवेना धीर

खावुनी पिवूनी नारीला आलें हिंव
हौशा भ्रताराचा घाबरला जीव

परनारीसाठीं केला घराचा लीलाव
घरांतील अस्तुरी जशी पाण्याचा तलाव

परनारीसाठीं झाला गल्लीचा कोंबडा
घरांतील अस्तुरी जशी किल्ल्याचा झुंबडा

घरांतील अस्तुरी जशी साबणाची वडी
परनारीसाठीं टाकी संसारांत उडी

भ्रतार बोले नारी हौस तुला कशाची
मन्याला पानपोत नथ दोहीरी फाशाची

नको म्हणूं नारी भ्रतार भोळा भोळा
कशानं भोळा केसानं कापी गळा

हौस पुरविली माझ्या हौसेच्या धन्यानी
मन्याला पानपोत गळा भरला सोन्यानी

आपल्या भ्रताराशी नारी हंसून बोलली
कपाळीचं कुंकू जशी डाळींबी फुलली

भ्रतार बोले कुठं गेली वेडी राधा
पाठीची गौळण हंसतमुख सदा

भ्रतार बोले धरधनीन कुठं गेली
पाठीची गौळण हंसत दारीं आली

दुबळा भ्रतार म्हणूं नको वेळोवेळ
पाठीचे गौळणी राज्य कर त्याचं बळं

लुगडं घेतलं टोप पदर लाल घडी
माझ्या बंधूनी धुंडीली पुणं सातार गंगथडी

तांबोळ्याचे मुली तुझा हिरवा बाजार
माझा बंधुजी विचारतो नवती[1] केवढ्या हाजार

भाऊबीज केली, केली, निम्म्या ग गांवाला
माझ्या बंधवाच्या कोडं एकल्या जीवाला

बोळवण केली पाचहूनही पन्नासाची
हावश्या बंधवानं चोळी घेतली जीन्नसाची

भाऊयाबीज केली, केलीया वरल्या आळा
हावश्या बंधवाला जेवूं घातलं संध्याकाळीं

भरल्या बाजारांत चोळी घेतली गंदापात
आली मनाला टाक हात

लग्नाची लग्नतीथ आधीं नवरीच्या मामांला
सांगतें भाऊराया तुझी आगत आम्हांला

डाग दागीन्यांनीं मधीं भरली कढई
सोन्याच्या सरीसाठीं मामा करतो लढाई

साळीच्या भाताची मोठी आवड देवाला
साळीच्या भातासाठीं जाती जनीच्या गांवाला

एका मागं एक नका जाऊं बाप लेक
बापाच्या परीस आईचं मोठं सुख

---

[1] नवतीचीं (कोवळीं) पानें.

आपलं तुपलं कसं लावलं देवानं
बहिणीचं बाळ कडेवर घेतलं भावानं

वाटेनं चालला कोण आखूड बाहीचा
सांगतें भाऊराया खरा रुपाया चांदाचा

वाटच्या वाटसरा वाट कशाला पुसतो
काय सांगूं बाई हात वैराचा दिसतो

वाटच्या ग वाटसरा अंगावर आला नीट
भाऊरायाच्या नांवासाठीं कळविली मीं वाट

आईवरी शिवी नको देऊं आरवटा[1]
डोंगरी ग सागरगोटा मला बीदोबंदी[2] भाटा

येडा ग माझा जीव उगच वाऱ्यावानी
बंधु वाटतो आल्यावानी

बंधुजी पावयीना शेजी म्हणती कोण राजा
हिरवा मंदील तुरा ताजा

बंधुजीला पावण्याला काय करावं जेवायला
तूप भिनूंदे शेवायाला

उनाच्या रकामंदी रक्त कुणाचं धांवा घेतं
बहिणी कारणं भाऊ येत

चांगुल तुझं पण किती घालू नजरेंत
माझा बंधुराया उभा प्रभूजी बाजारांत

चांगुल तुझं पण माती लागेना अंगुठ्याला
माझ्या बंधवाच्या कुसूंबी पागुट्याला

नका नांवं ठेवूं काळ्या सावळ्या मनुष्याला
माझ्या बंधवाला जानी दंडती गणेशाला

काळ्या सावळ्या मनुष्याला नांवं ठेवाया नाहीं जागा
आंखूड याचा बांधा शिलमण्याच्या[3] माळेजोगा

१ आडदांड, वेडेंवाकडें. २ रस्ता. ३ टपोऱ्या दर्जेदार मण्यांची (माळ).

सावळ्या सुरतीचा वास सुगंध सुटला
माझा बंधुराया कुठं केवढा भेटला

सावळी सुरत कोटाच्या पाकीटांत
बंधुला झाली दृष्ट बाई देशीच्या नाटकांत

सावळ्या सुरतीचा जरी रुमाल शोभा देत
माझ्या बंधुराया वैनी माझ्या गांवा येत

माळ्याच्या मळ्यांत कोण लगोबीगी
सावळा माझा बंधु जाई धुंडतो तुऱ्याजोगी

वाटच्या वाटसरा चल घरला देतें पाणी
सावळी सुरत माझ्या ताईत बंधुवानी

माळ्याच्या मळ्यांत ेण हिंडतो केसाचा
ताईत माझा बंधु चांफा धुंडतो वासाचा

पानाचा खातावणा रंगल्या दांत दाढा
बंधु तुझ्या सुरतीचा येईना कुठं तोडा

पान खाऊ खाऊ खोलीचं तोंड लाल
माझ्या बंधुचा रंगमहाल

पानाचा खातावणा लवंगा देतें पसापसा
दांत हिरकणीचा ठसा तोंड रुमालानी पुसा



संग्राहिका
**सौ. शशिकला पाटील**
इसलांपूर

तांबूळीणबाई पानं कशी हीं शंभर
पान खाणार सुंदर बारा वर्षांची उमर

सावळी सुरत ज्याची त्याला बघा प्यारी
माझा बंधुराया गोऱ्याल ग मागं सारी

पोटीच्यापरास पाठीच्या वेदना
पाठीचा बंधुराया बाळपणीच्या सजना

लुगडं घेतलं पदराला माझ्या भिंग
नारी खेड्याच्या झाल्या दंग

दिवस मावळला माळाच्या आडुशानं[१]
हावशा माझा बंधु चंद्र निघाला कडुशानं[२]

घरांत करती धंदा आहे बाहेर माझा काना
हावश्या माझा बंधु माझ्या भडंग्या[३] गाडीवाना

फाटली माझी चोळी धुन्यांत धुन धुता
हावश्या बंधवाला सांगा वाड्यांत जातां जातां

बहिण भावंडांचं भांडान किलीबिली
पाठीच्या बंधवानं नाहीं अजून शिवी दिली

सकाळच्या पारीं चिमण्या बायांनीं काय खावं
मायबापाची आम्रावली लेकी राजूला काय व्हावं

साळु जाती सासऱ्याला रडूं आलं देवाजीला
पोटींच्या वेदना काय ठावं त्या पांडवाला

वाऱ्याच्य झोक्यानं पान केळीचं फाटलं
दुष्टाच्या बोलण्यानं मन माझं हें विटलं

पहाटेच्या प्रहररात्रीं कोण मंजुळ गाणं गातो
राजस भाईराया पानमळ्याला पाणी देतो

माझ्या ग अंगणांत निशीगंध हे बांधणीला
दृष्ट झाली कां चांदणीला

कोल्हापूर ग शहर दोन्ही बाजूला पानमळा
राजस अंबाबाई पूजा घेते तिन्ही वेळा

---

१ आजूबाजूस. २ नुकताच अंधार पडलेली वेळ. ३ गाडी जोरांत पळविणारा.

कोल्हापूर ग शहर दोन्ही बाजूंनीं तांबट
अंबाबाईच्या पूजेला नित्य चांदीचे ताट

दसरा दिवस वरषाचे दोन सण
नको करूं माझ्याविण वयनीबाई

सासूचा सासूरवास रडवितो पदोपदी
लेक थोराची बोलेना कोणाशी परी कधीं

चंदनासारखी देह मी झिजवीन
लेक तुमची म्हणवीन बाप्पाजी हो

मामाच्या रे घरां नको जाऊं कामावीण
येऊं दे बोलावणं गोपूबाळ

## देवीच्या ओव्या

सडा सारवन मला अंघोळीची घाई
पाव्हनी काय आली घाटमाथां कमळजबाई

स्वप्नांत आली हिरव्या पातळाची नार
घाटमाथां कमळजबाई गळां पुतळ्याचा हार

घाटमाथां कमळजबाई आली स्वप्नीं बसावया
सोन्याचा सुपली मोतीं दिलेत निसाया

शंकराच्या मांडीवर दिवा जळतो लोण्याचा
उजेड काय पडे कमळजबाईच्या रूपाचा

झाडी झडाडती गांव निगडाळ्याची राई
थोरल्या हिंदोळ्यांत वाघ अडवितो गाई

वाजंत्री वाजत्याती गांव निगडाळ्यापासून
आनंदी कमळजबाई आली रथांत बसून

आई कमळजबाई घाटावर उभी राहे
तुझ्या माहेराची हवा कोकणाची पाहे

आई कमळजबाई तुझा सोन्याचा लंगोर[१]
दैत्य मारूनी केला घाटांत संहार

आई कमळजबाई उभी राहे दाखनीला[२]
पिकलं कोकण सुख लागलें कोकणाला

पिकला कोकण जिऱ्या मिऱ्याला आले घड
आई कमळजबाई खेपाला[३] बैल धाड

भरली शिवरात्र भरल्या झाडींतूनी
आनंदी कमळजबाई हवा पाहे गाडींतूनी

आई कमळजबाई गेली साकेरी पाव्हणी
हातीं सर्पाचा चाबूक दिल्या वाघाला दावनी

आई कमळजबाई तिथीमधीं न्हाली
केस वाळवाया चौऱ्या डोंगरावरी गेली

भरली शिवरात्र पानं पडलीं आत्तराचीं
आनंदी कमळजबाई शीव भोगी शेंदराची

निघाली भिमाबाई दुधा तुपाच्या उकळ्या
देवा शंकरानं जटा सोडील्य मोकळ्या

आनंदी कमळजबाई गेली वाडया नह्यारानं[४]
जरीचा पदर ईचा भिजला दैवरानं[५]

भिमाबाई बोल स्थिर स्थिर भिवराई
येणारा तुझा बंधु आजून आला नाहीं

१ साखळदंड. २ देखरेख. ३ येरझारा. ४ गांवाचें नांव. ५ दहिंवर.



संग्राहक
श्री. ग. ह. पाटील
पुणें

सासू सासऱ्याला मैना माझी आवडली
धण्याची कोथिंबीर गुणाला निवडली

वाटेवरचं शेत काट्या लावूनी केलें बंद
अगचूर नार काय करतील भाऊबंद

नवतीचे नारी तुझा नवतीचा बोभाटा
पुढें चाले गाडा, मागें उडतो फुपाटा

माळी हाकी मोटा, माळीण देई बारं
दोहींच्या विचारांनीं मळा झाला हिरवागार

औत्यापरीस मोटकाऱ्याची आरोळी
चपळ तुझे बैल पाणी मावेना थारोळीं

बापानें दिल्या लेकी, कणगी पाहिल्या दाणीयाच्या
भावानें दिल्या बहिणी, विहिरी पाहिल्या पाणीयाच्या

पाऊस नाहीं पाणी, गंगा कुणीकडून आली
माउलीची माझ्या अवचित भेट झाली

पाऊस पाण्याची आली अगूठ[1] रेटून
चाल माझे बाई येऊं आईला भेटून

पाटलाच्या मुला पाटीलकी गाजवावी
तान्हया बाळासारखी रयत वागवावी

---

१. पावसाची सुरवात. पेरणीचे दिवस.

अहेव मरण मला सोमवारीं यावं
आतां बाळा माझ्या वाजंत्री लाव

लावणीचा गळा नको लावूं मोटेवरी
डोई भाकरीच्या पाट्या उभ्या नारी वाटेवरी

उभी राहून बांधावरी काय घेतें खडाखडी
बहिण नाहीं भावा पाठींचा तुझ्या गडी

पहिल्या कामाची लेखणी माझ्या हातीं
मला शिकवाया त्रया पंतोजी झाली होती

बहिण भावंडाचा कोणी झगडा साडानी
अंतरींची माया चिखल पाण्यास सोडीना

जांवई आपला जाऊन बसला लोकांत
पोटींचा पुत्र पाणी घालतों मुखांत

काळी चंद्रकळा चापून चोपून नेसावी
दुबळ्या आईला लेक चंचल नसावी

माझ्या माहेरींचा बागवान आला बाई
सातपुडी आंबा त्याची लवंगीवानी कोयी

पाया पडल्यानं नाहीं कपाळ झिजत
जात्या कुळींच्या नारीला नाहीं सांगावं लागत

तुझा माझा देव एकच आहे बळी
आतां माझे बाई समाईक भरूं तळी

नागपंचमीच्या दिशीं नाग निघाला खेळाया
कोण्या पापिणीनं गहूं काढीले दळाया

जातं ओढूं ओढूं पोटाला पडे पिळा
सासुरवाशीणीला जामीन झाला विळा

संग्राहिका
सौ. मालतीबाई शिरोळे
पुणें

*आई आई म्हणूं, आई साखरफुटाणा*
*आई सांगे गोष्टी मला उठूशी वाटेना*

*बारीक बांगडी, मला भरूशी वाटली*
*आईच्या ठिकाणीं मला मावशी भेटली*

*कपाळीचं कुंकू, पाण्यांत पाहूं नये*
*लग्नाच्या जोड्याला, नांवं ठेवूं नये*

*बाबानं दिली लेक, वाटेवरच्या गोसाव्याला*
*तिच्या नशिबाला पालखी ग बसायाला*

*शेजारीण बाई धन्य तुझ्या ग शेजाराची*
*सय नाहीं माहेराची बारा वर्षे*

*गोरे भावजयी नको करूं ग फुणफूण*
*सांगेन ग तुझे गुण भाईरायाला*

*भाऊराया ग आपुला, वहिनीबाई ग लोकाची*
*मनं राखावीं दोघांची सिंधूताई*

*सावळ्या मेहुण्याला नाहीं सुपारीची चाड*
*दिलं ग लवंगाचं झाड, सिंधूताई*

*नवरी पाहूं आले, बसूं टाकावा दोरवा*
*शालू घ्यावा ग हिरवा वरमाईला*

*सोनसळे गहूं त्याला तूपाचें ग मोहन*
*भाऊबिजेचें जेवण भाऊरायाला*

पाहुण्याला पाहुणचार, मेहुण्याला बुंदी लाडू
एका पंक्तीं दोघी वाढूं वहिनीबाई

मधूपर्कीं कोण बैसलासे हिरा
सखे तुझा ग नवरा इंदूताई

दळण दळितांना अंगाचं होतं पाणी
माय बाई जरी हिनें मला चारिलं सायलोणी

सासरीं जातांना गाडी लागली जाईला
हांका मारितें आईला, बेबीताई

माझ्या ग दारावरनं कोण गेली सवाशीण
काजळ कुंकू बाळंतीण शांताबाई

भरली कृष्णाबाई, पाणी लागलं दोन्ही कड्या
माझा पोहणार टाकी उड्या भाईराया

भाऊची कमाई, पहायला गेलें शेतीं
होती काळी माती वर उमललें मोतीं

सासू आणि सासरा, दीर तो तिसरा
ओव्या गाईन भ्रतारा तूं ये रे बा विठ्ठला

दळण जी दळीलें, पीठ जी भरीलें
सासू पुढें तूं ठेविलें ये रे बा विठ्ठला

शेजीचे ग उपकार हे ग फेडीते भाजीपाला
मायबाईचे उपकार फिटेना कांहीं केल्या

औक्ष मी ग चिंतीतें शेजीच्या ग बाळाला
माझ्या त्या राजसा बरोबर खेळायाला

लांब लांब केस, भांग पडतो कंगणी
वहिनी ग बाई उभी मामाच्या अंगणीं

तुळशीचा पाला, वारियानें गेला
देव विठ्ठलानें आवडीनें गोळा केला

तुळशीबाई तुझ्या खालीं काळी माती
तुझ्या भेटीसाठीं देव आले अर्ध्या रातीं

माउलीची माया काय करील चुलती
पंढरीचा खण चोळी होईना पुरती

सासऱ्याची वाट टाकी लावून घडीवली
बंधू माझ्या ग गणेशाला वाट बघा ती नवी केली

सासुरवाशिणीच्या पाठी लागतो सारा वाडा
माझ्या त्या बाळाईचा कंत भिंतीच्या आड झाला

पाया ग पडूं आतां नको पायाचा मला मान
माझे ग सूनबाई बाळ कांखेला आहे तानं

लावणीचा आंबा ग पाणी घालीतें वाटी लोटी
वाणीचा माझा बंधु आंबा मोहरियासाठीं

भाऊ म्हणे भावजयीला बहिणी आल्यात भेटाया
भावजयी म्हणे नणंदा आल्यात लुटाया

सुनेला सासुरवास नका करूंसा सासूबाई
तुमचा हो सोनचांफा आम्ही परक्याच्या जाई जुई

शितळ ग सावली ती ग बाभळी बाईची
माया ग मध्यें माया, माया वेगळी आईची

गुजर ग भावजयी नको उभ्यानें कुंकूं लावूं
तुला मी ग सांगूं किती साता नवसाचा माझा भाऊ

सूर्या कि महाराजा लेक तुमची लाडकी
आंदण हो द्यावी मला हळद कुंकवाची पालखी

सुनेला ग सासुरवास हा ग कैकयीनं केला
रामाच्या ग शब्दासाठीं सिता राणीनं सोशीयला

बापानं दिल्या लेकी आपण बसेल हो सुखी
मायेला चिंता मोठी वागण्याची

ही ग लक्ष्मी आई आली, आली तशी तूं जाऊं नको
भाई माझ्या राजसाला, अंतर तूं देऊं नको

सांगतें ग शेजीबाई, नको करूं कला कला
बंधू माझा दारू प्याला, त्याचा उतार बंदी घाला

असं उन्हाळ्याचं ऊन, चैताची ग पायपोळ
भाई माझा ग राजस, हा ग सुकला रायघोळ

गोट नी पाटल्याचं ओझं कोणी सोसावं
सयानं सांगू किती लेणं नाजूक कुंकू ल्यावं

सई सासऱ्याला जाते, आडवा लागतो पानमळा
नेती पतीला वानवळा



संग्राहक
**श्री. ल. मा. गायकवाड**
चिखली

नवतीच्या नारी तुझी नवती जालीम
पाण्याच्या वाटला माझ्या बंधूची तालीम

राग मला भारी माझ्या रागाचा धनी कोण
माझा बंधूराया आडवा झाला पहिलवान

दळण दळीतें सूप भरूनी बाजरी
माझ्या ग बंधूचा गाडा जायाचा जेजुरीं

आळंदीच्या वाटे कुणी पिंपरी लावली
माझ्या ग बंधूला वारकऱ्याला सावली

सांज सांजळली सांजबाई जरा थांब
माझा बंधूराया शेतीं दौलतीचा खांब

शिंदेशाही ही पगडी कोण्या पेटला हिंडती
माझिया बंधूला पहिलवानाला दंडती

हौस मला भारी उभ्या पेठेनी जायची
सांगतें बंधू माझ्या, चांदी गोठाला घेयाची

जोंधळ्याचा गाडा आला माळानें गुंगत
काय बघता बायांनो माझ्या बंधूची हिंमत

चले सये जाऊं पिंपळाला पार बांधूं
माझ्या बंधूजीला हवशाला पुत्र मागूं

धावूनि धरितें तुझ्या पडावाचा दोर
माझ्या बंधुराया तांडेला मशी बोल

आशा नाहीं केली शेजीच्या बंधवाची
आवचित आली स्वारी बंधू माझ्या यादवाची

काय सांगूं सये माझ्या बंधूचं नटणं
अंगीं दोरव्याची बंडी वर चांदीचीं बटणं

शिंप्या सौदागरा सोड दिंडाच्या तूं गाठी
बंधू भेटे बाजारांत धरीतें मनगटीं

शिंप्या सौंदागरा सोड दिंडाची सयली
माझा बंधूराया बग बाजारीं बोहिली

बंधूला झाला पुत्र आली साखर माझ्या गांवा
आगाशीं दिवा लावा रामचंद्र नांव ठेवा

बहिण भावंडाची जोडी बसली वावरी
राघू मारितो भरारी मैना झालीया बावरी

सुख सांगतांना दुःख ठेविलं झाकूनी
आनंदलं मन माझ्या बंधूला देखूनी



संग्राहिका
सौ. निर्मला धारप
पुणें

मामंजी सासूबाईंचा वाटतो आदर
आतां शोभिवंत त्यानं माझं घर

मामंजी सासूबाई दोन्ही सोनियाच्या भिंती
माझ्या ग आयुष्याचा वर गिलावा करूं किती

मामंजी सासूबाई आहेत दैववान
शोभिवंत घर त्याचा मला अभिमान

मुलाबाळांनीं भरलं बघा माझं बाई घर
मामंजी सासूबाई नशीब तुमचं आहे थोर

पुढल्या दरवाज्यांत नाहीं उभी मी रहाणार
आतां मामंजीची मला आहे ग कदर

परक्या पुरुषाला कसा देऊं मी कातचूना
आम्ही गृहस्थांच्या सुना

सासरीं जातांना डाळींबी दाटली
सखी जिवाची भेटली सईबाई

सासरीं जातांना डोळ्यांना आलं पाणी
डोळे पुशी शेल्यानीं दादाराया

सावळ्या मेहुण्यांना नाहीं सुपारीची चाढ
दिलं लवंगेचं झाड सईबाई

सावळे मेहुणे आपल्या आईचें बाळक
दिली पूतळी ठळक सईबाई

पहांटेच्या प्रहरांत हांडे घंगाळ वाजती
लेकी सूना वावरती घरामध्यें

आम्ही दोघी जावा आमुचं एक मत
नका घालूं आडभिंत भाऊजीराया

सासऱ्याला जाती लेक भीमाशंकराची
तिला घालवाया येती हात भरूनी बिल्वराची

सासरीं जातांना भर ग नवा चुडा
मायबाईनं तुला दिला कुंकवाचा पुडा

सासऱ्याला जाती बहीण भावाची लेकुरवाळी
बंधवाच्या हातीं दुधाची ग शिंकाळी

माहेराची होते सारखी आठवण
आतां मायबाई कधीं धाडिशी बोलावणं

माहेराची वाट किती पहातें मी भारी
मायबाई माझी राहिली फार दुरी

माहेराची आठवण करीतें मी नीट
मायबाई कधीं होईल तुझी भेट

माहेरीं जातांना लाजली चंद्रभागा
आतां रखमाबाई भेट कधीं होईल सांगा

माहेरी जातांना लागलं पंढरपूर
पाठी उभा राहिला शारंगधर

पड रे पावसा पिकूं दे दाणापाणी
मग भावांना बहिणी आठवती

दळणं दळावं जसं हरणं पळतं
मायबाईचं दूध माझ्या मनगटीं खेळतं

भाऊबीजे दिवशीं भाऊ घालतो ओवाळणी
त्यानं ताटामधीं टाकीला तन्मणी

भाऊबीजे दिवशीं भावानं काय दिलं
आतां मायबाई चंद्रहाराला मापलं

नणंद भावजयी आपण मारगी उभ्या राहूं
हळदी कुंकवाच्या गोण्या खंडुनी नव्या घेऊं

नणंद भावजयी आपण सोनारवाड्या जाऊं
कुंकवाच्या करंड्याला मोत्यांच्या जाळ्या लावूं

नणंद ग भावजयी आपण अंगणीं उभ्या राहूं
एकेमेकींची शीण पाहूं विहिणी दोघी होऊं

आईच्या माघारी लेक माहेरीं जाते वेडी
पुरुषांना माया थोडी

चिकणी सुपारी तुझ्या कंथाला आवडे
दिवा घेऊनी निवडे वहिनी बाई

लांब लांब केस वेणी येते ग केसांची
तुला हौस लेकाची वहिनीबाई

माझ्या ग आयुष्याचा विणतें मी लेप
आतां दादाराया पांघरा बापलेक

माळ्याला शिड्या मी लाविते साळी डाळी मी काढीतें
दुधाचं आंदण ठेवितें साळी डाळी येळीतें
गुळाचं लिंपाण फोडितें बंधूला भोजन वाढितें

काळी चंद्रकळा पदरीं मोतीं जाळी
माझी भैनाबाई नेसली संध्याकाळीं

काळी चंद्रकळा वर कशीदा भिंगाचा
आतां मायबाई तुला प्रसाद गंगेचा

काळी चंद्रकळा फेकुनी दिली अंगणांत
आतां बाबाराया आणाया गेला बाजारांत



संग्राहिका
सौ. गंगूबाई बाबर
पुणें

लांब नी लांब क्यास बयाबाईनं वाढविलं
बाप्पाजी दौलतीनं पाणी गंगेचं आडविलं

लुगडं घेतइलं आंत रेशमी न्हाई काडी
सावळ्या भाऊराया न्हाई नेसत घाल घडी

लुगडं घेतईलं दोन्ही पदर राजाराणी
माहेर मला केलं, माझ्या बंधूच्या मैतरानी

लुगडं घेतईलं दोन्ही पदर मोतींघस
माझे तूं बाळाबाई, द्रिष्ट हुईल खालीं बस

वैराळ सादवितो, आदीं सादीव वईल्या येशी
बया राहिली परदेशी हाट्ट करूं मी कुणापाशीं

वैराळ सादवितो चुडे लियाच्या बाया किती
बया माझी ती मालईन लेकी सुनांचीं नांवं घेती

वैराळ सादवितो बस सोप्याच्या पायरी
मी जायाची सासरीं बया गेली या बाहिईरी

माझ्या आंगायाची चोळी शिंपी दादाला काय ठावं
बंधू आपली भूज दावं

बहिणा चालली सासरीं नको रडूस माळावरी
घाल पदर बाळावरी

सासर एवढा वस जसा डोंगरी आल्या महू
तिथं नांदून मला दावूं

लेकाया परायास लेक कशानं उनी झाली
आईबापांला गातें ववी कैलासीं ऐकूं गेली

नको मला दळूं लागूं तुझीं मनगटं मऊ
कोऱ्या अंबारीला[1] देऊं इंदूबाई

बंधु मला चोळी घेतो रुपयांवरी आणा
चोळी येईना माझ्या मना दादा लेतील तुमच्या सुना

बंधु मला साडी घेतो पदराचा झाला बोळा
रुपये दिले साडे सोळा

बंधु मला साडी घेतो तिला पदर झुरमुळ्याचा
चाटी विनकर करमाळ्याचा

सासू तूं आल्याबाई तुमचं रूसणं कशापायी
बसा चौरंगीं धुतें पायी

सासू सासऱ्यांचे आशीर्वाद माज्या घेती सुना
दारीं कारल्याचा वेल घरीं काय उणा

बंधु मला ग साडी घेतो चाटी म्हणतो कशाला
बंधु म्हणतो आहेराला बहिणी आल्यात माहेराला

बंधु मला घेतो साडी किती सांगूं मी तिची गोडी
पर भावजय डोळे मोडी

माळ्याच्या मळ्यामंदीं कवठीला कवठं दाट
मेला मुद्‌ली[2] चावट काय तो लावतो शेवट

माळ्याच्या माळ्यामंदीं कांदा हिरव्या पातीचा
राखन्या शिव्या देतो मेला उगरीट जातीचा

आंबा तूं आंबराई एकच राहिली कैरी
सवतीवर दिली लेक, बाप जन्माचा वैरी

हौस मला मोठी जावा नंदांत नांदायाची
नांव बापाचं करायाची

१ अंबारी बाळगणारा, राजा. २ मुळांतच, मालक.

बाई भरल्या बाजारांत छत्रीवाल्याची झाली दाटी
बंधु राहिला माझ्यासाठीं

नदीच्या पलीकडं हिरव्या शालूची कोण जाती
माझी नणंद आक्काबाई संगं मुराळी माझे पती

माळीन सादविती घ्या ग बायांनो जाई-जुई
हौंवशा माझा दीर वास घेणारा घरीं नाहीं

भ्रताबीराचं सुख किती सांगूं मी गोतामंदीं
घडीच्या धोतराची केली सावली शेतांमंदीं

गण नी गोतावळ कडेकडेनी पोहणार
हौंशा भ्रतार माझा पल्ला शेवट लावणार

हौंस मला मोठी पतीसंगं बाजाराची
लुगडं घेतलं त्यांनीं लाल लवंग घडी त्याची

सरलं माझं दळण माझ्या मनींचं सरलं नाहीं
शंभर साठ ओवी गुरू दत्ताला पुरली नाहीं

सरलं माझं दळण माझ्या सुपांत पानविडा
दळण संपवितें नऊ लाखाचा माझा चुडा

आम्ही चौघी भैनी एका रंगाच्या साड्या नेसूं
ऊंच पायरीवर बसूं आम्ही थोरांच्या लेकी दिसूं

माझ्या जीवाला भारी जड खडी साखर घोटयीना
बंधु उशाचा उठयीना पाणी डोळ्याचं तुटयीना

काय पाटच्या पाऱ्यामंदीं दिस उगवुनी दारीं आला
येवढ्या हळदी कुंकवाला म्यां का पदर पसरीला

सासू सासयीरा आंबा लावून दिला त्यांनीं
बाळ माझ्याला दिली लेक आंबा उत्तम पाहूयीनी

उन्हाच्या रखामंदीं गाडी जुंपली रेड्यायाची
जोती सागर देवायांनीं दिली दवड घोड्यायाची

उन्हाळ्याचं ऊन काळ्या खडकाची होत लाही
हौंवशा भ्रताराची गोऱ्यापणाची गत कायी

समोर सोप्यावर कुणी ठेवीला तांब्यापेला
बंधु वकील पाणी प्याला
उन्हाच्या रस्तामध्यें कुठं निघालं माझं सोनं
कवळ्या छातीला लागं ऊन घाम पुसीतें पदरानं
वैराळ सादवितो त्याग बायांनो नवी तऱ्हा
बंधु निजला जागा करा
वैराळ सादवितो, तो कां सादवी वैल्यावेशीं
बया राहिली परदेशी छंद सांगूं मी कुणापाशीं
बंधुजीचं बाळ माझं मला म्हणीतो आत्या आक्का
कडी घेऊनी घेतें मुका

संग्राहिका
सौ. सिंधू वारनूळकर
कोल्हापूर

जोंधळ्या परायास वाढवतें मी ग तूरी
लेका परायास लेक मला हाय प्यारी
थोरलं मोठं जातं मला बघून पळईतं
बयाचं दूध माझ्या मनगटी खेळईतं
कामामधीं काम दळण अवघड
गाण्याच्या नादावर ओढावा दगड
माहेरच्या वाटे कोन चालतो तोलाचा[1]
हौशा बंधू माझा हिरा झळके मोलाचा

१ तोलामोलाचा, वजनदार.

बंधुजी पावईनं येताचं गाजतात
घोडीचं घासदाणं, माझ्या घंगाळीं भिजतात

आला बंधूजी पावईना, माझ्या जीवाला धगा धगा
शिंगी अवकाळ नवी जागा

पिवळी पितांबर मला पुशितो सारा गांव
सांवळा बंधुराज म्यां ग लुटीला बाजीराव

पिकलं उंबीयीरं सारा डोंगर दरवळतो
नटवा बंधु माजा पाड कशाचा विचारतो

तुज्या जीवासाठीं जीव माझा हुऱ्या हुऱ्या[1]
कां म्हणूनं सुकलास माझ्या शेतीच्या राजगीऱ्या

सारविल्या भींतीवर काढतें चित्तार
बंधूचं बहिणीला आलंया पत्तार

नदीच्या कांठायाला बेट फुटतं लव्हाळ्याचं
माझ्या हुरद्यांत फुलतं माह्यार जिव्हाळ्याचं

सुकमार माझी बाई कां लागली रडायाला
कुण्या ग पापिणीनं लाविली दळायाला

सासू का सासऱ्यानं धाकल्या ननंदेनं
लावली दळायाला थोरल्या जावेनं

वढना जड जातं हालना जड तळी
घामेजली माझी बाई फुलांत चांफेकळी

सुपांत मोतीं दानं घालतें मूठ मूठ
सजना दळायानं म्हणीना कुणी ऊठ

म्हणीना कोणी ऊठ आईशिवाय माया न्हाई
जिवाला तिच्या जड रडतें ती धाई धाई

कांटा बोचतां पायामंदीं आईची व्हतें सई
आई म्हणूं आई, माझ्या तोंडाला येतं लई

१ चिंतातूर.

आईच्या सईनं ग मोतीं पिकतीं पापण्यांत
गालावर वघळती मोत्यांच्या दळणांत

बंधूजी बोलईतो भैना दिलेल्या घरीं ऱ्हावं
लाडके राजूबाई भांडं न्हवं ते बदलावं

दळण दळीतें मी गीत गाऊं कुणा कुणा
जन्म दिलेल्या दोघा जना

माझा ग पिंड बाप्पाजींच्या दंड भुजा
माझे तूं बयाबाई, तुझीच मी रूपवजा

बाप्पाजी बयाबाई दोन्ही अमृताचीं कुंडं
त्यांत जलमला माजा पिंड

पिताजी दौलतीनं कीर्त केलीया थोडी बहू
वाटेवर त्येची हीर पाणी पितंया सारा गांवू

सासू नि सासईरा माझा देव्हारा कुलूपांचा
चुडया माझ्या त्या राजसाचा हात पूरना मानकाचा

पाण्यांतली नांव तिचा कळना आणभाव[1]
पिरतीचा कंत, कंत बोलवी आवं जावं
मन मोहन पाणी द्यावं

जावा नि जावा आमी, एका ग चालीच्या
जन तें इचारती सूना कुण्या त्या नारीच्या

वळवाचा पाऊस वडया नाल्याला नाहीं धर
हावशा कंतराज कंत मनाचं समींदर

नवस मी ग केलं कोल्हापूरच्या अंबाबाई
आई सारख्या सासूबाई त्यांचा आधार मला लई

स्वर्गीच्या रे देवा तूजी माझी आन भाक[2]
माजं जलम कुंकू राक

---

१ अंदाज. २ प्रार्थना.

जोडव्या झनकारू नित इरुद्या तीन ठसं
माझे ग सूनबाई काम हुईना खालीं बस
जोडव्या झनकार नित इरुद्या तीन रवं
माझी सूनबाई घरादारांत ईज लवं



संग्राहिका
सौ. नलिनीबाई शिंदे
पुणें

सकाळीं उठोयानी जात्यावरला केर लोटी
बापाची बयाबाई रत्न तोंडाला येण्यासाठीं
पहिली माझी ओवी गातें बापाजी गुजराला
बया माझी ती गौळण बया तुळस शेजाराला
द्रौपदीबाईसाठीं धाव झाल्याती रंगारी
त्यांनीं रंगविलीं आपलीं वस्त्रं नानापरी
जग जातंया यात्रेला आपण जाऊंया माहेराला
बापाजी बयाबाई दोन्ही क्षेत्र पाहायाला
बापाजी बयाबाई दोन्ही काशीचीं देवळं
माझा तो बंधुराया मध्यें निशान पिवळं
बापाजी समींदर बया माझी ती वाहाती गंगा
माझ्या तूं बंधुराया तिर्थ करूंया पांडुरंगा
बापाजी माझा वड बया माझी ती वडाबाई
दोघांच्या सावलीची काय सांगूं मी बढाई
बापाजी माझा वड बाई दवन्याची पेंडी
माझा तो बंधुराया नंदी देवळाच्या तोंडीं

बापाजी माझा वड बया माझी ती त्याच्या शेंगा
माझा तो बंधुराया त्यांच्या सेवेला नंदी उभा

आला बंधूजी पावणा शेजी नारीला विचारिती
बंधूच्या भोजनाला घड केळीचा उतरीती

आला बंधुजी पावणा शेजी सांगत आली रंभा
बंधु माझ्या त्या भोजनाला खडी साखर पिवळा आंबा

आला बंधुजी पावणा सांगी निकड जायायाची
बंधु माझ्या त्या भोजनाला दुरडी येळती शेवयाची

गुज बोलतांना घाली दिव्याला जोडवात
माझी तूं भैनीबाई गुज बोलूंया सारी रात

गूजबी बोलतांना त्या कां गुजाला आली गोडी
वाणीच्या बंधुराया शाळू[1] दिवस रात्र थोडी

गुजबी बोलतांना चंद्र माडीचा आड गेला
बया माझीला किती सांगूं बाई गुजाचा झाडा झाला

बया मी म्हणूं बया, बया कोणाची होईयीना
बया माझ्या त्या गौळणीला सर कशाची येईना

लई बी झाल्या लेकी न्हाई केली हेळसांड
माझी ती बाळाबाई पित्या शेजारी पाट मांड

दुरून ओळखिती काळी निळी या दोन्ही घोडी
ताईत बंधु माझ्या मामा भाच्याची आली जोडी

बंधुजी पावना मी कां देखिला कुरणांत
बयाच्या माझ्या बाळा घाली साखर पुरणांत

बंधुजी पावना शेजी नारीला पडलं कोडं
बयाच्या बाळायाला मी कां वाढीतें दूध पेढं

दोघी आम्ही भैनी दोन्ही गांवांचे दोन खांब
ताईत बंधुराया मधीं नांदतो सूर्या चांद

---

१. लहान दिवस.



संग्राहिका
कु. चांद्बीबी शेख
पुणें

पिवळा पितांबर मला पुशीतो सारा गांव
माज्या बाईचीं दोनी बाळं म्यां लुटीलं बाजीराव

समोरल्या सोप्यां गादी टाकीती गुलमुसाची
तानी माजी बाइ आली पावनी ईल्लासाची

समोरल्या सोप्यां हाईती चांदीचं ताट पेलं
माज्या बाळायाचं त्येचं मैतर पानी पेलं

सकाळच्या पारीं तांब्या येतूंया अमृताचा
माज्या पित्यायाचा वाडा पुशीत समृताचा

माज्या बंदुला कालवन घरच्या गाईचं दुधायांत
भजीं तळीतें तुपायांत

गेली वान्याच्या दुकानांत चिकनी सुपारी चिकयीट
चुना कळीचा तिकयीट

म ज्या बंदूचा ग ईडा रंगना देतें कोकणी काळा कात
गेला बयाला बोलवीत भैन असावी जलमात

बंदुजी पावईना शेजीबाई ही खुनवीती
माज्या बंदूच्या भोजनाला लाडू बुंदीचं बनवीती

माज्या ग दारायांत निळ्या घोडीचा पायबंद
हावशा बंदु माजा राती आलाया गोपीचंद

लेका परायास सून करावी गोरीपान
माज्या बाळायाचं ऐन्या शेजारी दरपान

आंब्याची आंबराई केळीचं शिकरन
मावली बाई माझी जेवूं वाडीते सुगरीन

भरल्या बाजारांत शिंप्या दादाची लंका लाल
मावलीबाई माजी उबी पेटला मकमल

नार लेनं लेती ईस पुतळ्या कारलीं
हौशा कंताला मागयीती राम अवतार डोरलीं

सुखाचा भरतार दुःखाचं न्हाई कुनी
आला मावचा क्रिष्णदेव आला बैरागी होऊनी

पुतराचं मुख, मुख पहात्या त्या बहुजनी
सुनमुख हें सोभागिनी

चांगल्या मनुष्याची दुरुनी घ्यावी बला
मुरख्या मनुष्याला वाट सोडूनी द्यावी त्येला

तुळस पतिव्रता कशी रामाला कळयिली
वाऱ्या सजनानं त्येनं मंजुळा हालविली

पिकला उंबयीर सरवा डोंगूर दरवळीतू
वानीचा माजा बंदु पाड कशाचा इच्यारीतु

जोडव्याचा पायपाय टाकीती फुलूनी
माजी भैनाबाई कुन्या गतींची मालिनी

डोंगर कटारीला हिरव्या शालूची कोन येती
भाची मामांनी न्हेली हुती

डोंगर कटारीला हिरव्या शालूच्या दोगी बाया
बाळी माजीला किती सांगूं हाईत्या नणंद भावजया

बंदु तुज्या जिवासाठीं उभी राहिली वाळवंटीं
वानीचा माजा बंदु तूं का डेरा मी न्हाऊयिटी

समोल्या सोप्या चौकट सायासाची
माज्या बंदुजीची रानी वागिती गन्निसाची

बंदुजा घेतो चोळी दंड भरनी रेशमाची
बया विचारीती भैन कुन्याया वकीलाची

तुजी वाट पहातां बाई शिनल्या माज्या कोरा
बाईचा माज्या बाळ कदीं भेटल श्यास म्होरा

दुबळं माझं पन जन लोकांला जाहियींरू
वानीचं माज बंदु हुंडा मोलाचा भाईरू

समोरल्या सोप्यां पंक्ति पडल्या चक्रभुजा
भैना बाळीला किती सांगूं हिरव्या शालूचा कंत तुजा

गांवाला गेला म्हनूं माज्या बुगबीडीचा रवा
ताईता बंदु माजा गांवा गेल्याला यील कवा

लन्या नेसन्याची नको बसूं तूं शेजाराला
वानीचीं माज्या बाळं जर माज्या या पदराला

मोटं मोटं मोतीं, मोतीं छत्रींच्या झालरीला
वानीचा माजा बंदु ऊन लागीतं गवन्याराला

पाटानं जातं पानी उसा संगट जाईला
सुक्र लेकाच्या आईला

पाटानं जातं पानी सपाट बाई व्हातं
पानी अंजीबीराला जातं

माळ्यानं केला मळा माज्या बंदुनी केला बाग
शिनच्या गडयींनीं मला अंजीर तोडूं लागं

देवामंदीं देव देव कुंडलिक किती धट
त्येनीं धारला दिला मठ

देवा महादेवाला रात झाली नात्यापुत्याच्या बाजारांत
गंगा गिरजा वाट पाहती उभी कमानी दरवाज्यांत

नदीच्या पलीकडं कोन पतंग अंग धुतो
वानीचा माजा बंदु चंद्रासारीक ढाळ देतो

शेजीच्या बंदुसंगं उबा ऱ्हाऊनी अंगनांत
आपल्या बंदुसंगं वस्ती करावी जंगलांत

शिंदीं शाई तोडं त्येंची घडन सातान्याची
माजी ती भैनाबाई सून लाडकी सासऱ्याची

जांवाई मनुष्याच्या त्येच्या चौकबीटीला सोनं
माज्या बाळाचा पायगून

दिवाळी दसरा एका म्हईनीन्यांत दोन
वानीच्या माज्या बंदु तुमा घरीं मी पावयीन

शेजी इच्यारीती, माजं अंगान वलं झालं
वानीच माज बंदु भाऊबीजेला रातीं आलं

लोकाच्या आयारानं झाला मांडव लाली लाल
माज्या बंदुच्या आयाराची आली परात हिरवीगार

लोकाच्या आयाराची घडी ठेवली खुंटीवर
माज्या बंदुच्या आयाराचा जरी पदर पाठीवर

ऊंच ऊंच चोळ्या घरा मागली शेजी लेती
मावली बाई माजी तिच्या परास चड घेती

तांबड्य लुगड्याची निरी रुतती माज्या पोटां
चुड्या माज्याच्या जिवावर मला शालूला काय तोटा

परटीन धुनं धुती लिंबं देतें मी ताजीं ताजीं
चुड्या माज्या या राजसाचीं दोनी धोतरं अमदाबाजी

परटीन धुनं धुती लिंब देतें मीं रसायाची
माज्या बंदुजीचीं दोनी धोतरं वासायाचीं

समोरल्या सोप्यां तान्या बाळाचं हातरून
लिंबू टाकीतें उतरून

पाळक पाळना वर खेळना परकराचा
माज्या बाळायाचा मामा मैतर जिनकराचा

बुट्टीचं दळयीनं बाई त्यें दुरडीमंदीं आलं
बया माज्या ग मालनीचं दिवस नाचावीराचं गेलं
बाळ जोडीला तिच्या आलं

संपता आली म्हनूं लाडू बुंदीचं लागं कडू
गेली संपता निगूयींनीं करडं अंबाड्या लागे वाडू

सुबाना संतूबाई तुजी खंगाबीळली न्हानी
वानीचं माज बंदू हिर सापबीडलं दोनी

समरत सोयीयीरा करबीनीला भेला
आयारावरती शेला चड बंदूनी माज्या केला

सुबान संतूबाई तुज्या न्हानीची वली माती
माजी भैनाबाई माजी गर्बीन येती जाती

भैन भावांडं एका डब्याबींतलं मोतीं
मावली बाई माजी भरनी गंगाला आली व्हती



संग्राहिका
**सौ. सावित्रीबाई रेखी**
पुणें

सासू सासऱ्याचें घर, घर दीर नणदाचं
पृथ्वीच्या मोलाचं ग लेणं दिलं भ्रताराचं

सासू सासरे माझ्या घराचें भूषण
कपाळीं कुंकू भरजरीचें निशाण

सासरीं सासुरवास मला नाहीं केला
किर्ती मिळाली तुम्हांला सासूबाई

सासू सासऱ्याचा मला सहवास चांगला
आपुल्या वाड्यांत वेल जाईचा लावला

शिंदेशाही तोडे केलेत दसऱ्याला
हौस माझ्या सासऱ्याला

लक्ष्मी लक्ष्मी हांका मारतो सासरा
अपुल्या वाड्यांत दिवा लावावा दुसरा

वडीलपणाची मानमान्यता आहे बहू
दीर सावळ्याला कशी नांवानं बोलावूं

घर माझें मोठें शंभर येती जाती
सावळा दीर घरीं नाहीं सांगूं किती

बाप हा ईश्वर माय बाई पार्वती
पुढें नंदी शोभा देती बंधुराज

अक्षता टाकितें मी पृथ्वीच्या पाठीवरी
भाईराजा माझा सुखी असो कुठें तरी

आयुष्य मी चिंतीतें माहेराच्या आळीला
सांगतें भावजयी तुझ्या चुडा ग चोळीला

माझं गं माहेर जशी गोकूळाची वजा
सांगतें बाळराजा कृष्णाजी मामा तुझा

दिवाळीची साडी चोळी संक्रांतीचा तीळ लाडू
सांगते भावजयी माझी आशा नको मोडूं

काळी चंद्रकळा पितांबराच्या मोलाची
बहीण भावाच्या तोलाची



संग्राहिका
**सौ. कमलाबाई काळे**
पुणें

जिवाला जड भारी आयाबायांनीं भरला वाडा
मावली आली माझी तुम्ही बायांनो वाट सोडा

जिवाला हुरहूर कां ग वाटत होती बाई
ताईत माझा बंधू लईदीं झालं आला न्हाई

जिवाला हुरहूर काल परवाच्या धरूनी
बंधुराज माझा गेला गांवाच्या वरूनी

आधीं गाईल बाप्पा बया मग गाईल देवा तुला
बाबा माझ्या बयानीं उदरीं जागा दिला

सांगुनी धाडीतें दूर देशीच्या जांवायाला
किड लागली शेवायाला

जांवयांची जात कुंपावरील दोडका
पोटीचं देऊनी झुंजतो रेडका

नको म्हणूं नारी जांवई माझा माझा
पोटीचं पुत्रराज लावी पिठाला बगा धजा

दुबळा भरितार भाजीपाल्याची आणी मोट
आतां ग माझे बाई सोड अबूला बोल नीट

भरताराचं सुख काय सांगती गोतांत
सोडी कंबरचा शेला करी सावली शेतांत

भरताराचं सुख काय सांगती जीलुट
पेटारीचा नाग घडोघडीनं उलट

सासू आल्याबाई बारव चित्रांची
करीतें राजी तुझ्या मी हिऱ्याची

सांगुनी धाडीतें मुंबईपासुनी कलकत्त्याला
सोन्याची घुगरं बंधु माझ्याच्या अडकित्त्याला

कुंकाचा करंडा सासू पुसती सुनेला
सून सावित्रीसारखं असं दैव कुणाला

काय बघतो भीरी भीरी घरीं चालली मारामारी
आतांच्या राज्यामध्यें नवी निघाली केसरी

वाटेचा वाटसरू करीतो पाणी पाणी
भाऊच्या मळ्यामधीं चावऱ्या मोटा दोनी

भाऊची कमाई बघाया गेलें शेतीं
होती खालीं काळी माती वर उगवले मोतीं

भाऊच्या मळ्यामधीं पिकला बरड[1]
मापाला लागला सव्वाखंडीचा करड

भाऊच्या मळ्यामधीं पिकला लसूण
उंच गेला ऊंस पाणी भरतें बसून

पट्टीचा शेतकरी जन बोलती गांवां
बंधवाच्या माझ्या राशी बुडाल्या पेवांत



संग्राहिका
**श्रीमती पार्वतीबाई जोशी**
पुणें

सासूरवासिणी माझ्या बंधूच्या बहिणी
खांद्यावरी माळ आला वैराळ होऊनी

झाली सईसांज जात्या तुझी काय घीर घीर
दादाचं माझ्या आहे सई खटल्याचं घर

दुबळा पावळा बंधू बहिणीला असावा
भुरकी चोळी एक रात्रींचा विसावा

भावजयीबाई भर ओसरीचा केर
पाटील तुझे दीर सभा आली जोत्यावर

दिवाळी बाई तुझं बिगी बिगि येणं
भाऊ भाचीयाचं कूळ उजवाया जाणं

दिवाळीच्या दिवशीं थाळी माझी जड जड
बाळपटी चोळीवर दंडोळीचा जोड

१ किरकोळ धान्य.

येईन माहेराला बसाया टाकीन चवळं[1]
भाचे मांडीवर बंधू बसले जवळ

सरलं दळानं निधळानं मोतीयाचं
अवघ्या गोतांत ऊंच नांव पित्यायाचं

जातं वढूं वढूं माझ्या बाह्या लोखंडाच्या
आईनं दिल्या गुटी जाईफळ येखांडाच्या

जातं वढूं वढूं माझीं तळातं पिवळीं
आईनं दिली गुटी जाईफळं र्तं कवळीं

जातं वढूं वढूं माझ्या हाताला सरदी
आईनं दिली गुटी केली लवगांची गरदी

जातं वढायला नको करूं कुचराई
आई तुजं दूध मी पेलें चतुराई

जातं कां ओढावं चावरीच्या बैलावानी
आईच्या दूधाला नाहीं पडलं धारवनी

जातं कुरुंदाचं याला खुंटा चकमकी
चल माझे मैना आपुन दळूं मायलेकी

जातं कुरुंदाचं याला खुंटा आवळीचा
मैनाचा माझ्या वर गळा सावळीचा

---

१ सुताडा, सुती बैठक. २ आवळीच्या झाडाचा.



संग्राहिका
**कु. विमल तपस्वी**
पुणें

भावजय नारी माझ्या पायावरून गेली
बंधवानं माझ्या कोन्या आक्काळ्याची केली

भावजय नारी माझं पाय धुऊन पाणी प्याली
बंधवानं माझ्या कोन्या असिलाची केली

भावजय नारी तुला झोप आली कशी
शिणला माझा बंधू पाणी मागं आईपाशी

भावजय नारी लाव कुंकवाची चिरी
भरल्या सभेंत भाऊ माझा शिरीहरी

सरलं दळान सरलं म्हणूं नाहीं
सासर माहेर भरलं आहे सई

सासरीं जाते कोणाची लाडकी लेक
सांगत्यें बाळा माझ्या घाल घोड्यावरी लेप

बाप म्हणे लेकी माझी हरबऱ्याची डाळ
जाशील परघरां होईल तुझी राळ

बाप म्हणे लेकी माझी तांब्याची परात
जाशील परघरां सुनं लागेल घरांत

घाटावरला सोयरा घाट उतरून खालीं आला
बाईचं माझ्या रूप पाहून दंग झाला

सोनं झालं जुनं जाईना पिवळंपण
मैना तुला लिंबलोण

लाडकी माझी लेक रात्रीचं मागे दही
जाशील परघरां तुझा छंद बरा नाहीं

काय पंढरीचं कुंकू म्यांबी एकटी कशी लावूं
काय धाकटी माझी जाऊ तिच्या खोलीला कशी जावूं

काय कागल कोल्हापूर तेथून कागल किती दूर
सोनं जिंकीतो माझा दीर बंधु गांठीतो चंद्रहार

माझ्या दारांत लवंगा लागल्या भारोभार
बंधु माझा हौसदार चोळ्या घेतो हिरव्यागार

काय सोन्याची अंगठी बंधु कशानं झिजती
काय हावशा बहिण तुझी रास गव्हाची मोजती

काय बारव्या विहीरीवरी कोणी सुंदर धुणीं धुती
हौशा बंदूला बोलाविती कवळ्या पानाचा विडा देती



संग्राहिका
सौ. चारुशीला गुप्ते
मुंबई

ये दिवाळी ग बाई तूं बिगी बिगी कर येणं
वाणीचा भाऊ भाचा मला ओवाळाया जाणं

दिवाळीच्या दिशीं ताटीं घालितो रूपाया
आईच्या बाळराजा तुला ओवाळीतें शिपाया

बाई दिवाळीच्या दिशीं ताटीं घाली पोवळं सरू
आईचा माझ्या बाळ ओवाळीला सवदागुरू

भावा दिवाळीच्या दिशीं तुला बसाया देतें पीढा[१]
आईच्या बाळा माझ्या सदाचा भर चुडा

बाई दिवाळीच्या दिशीं तार्टी घातलं ग दही
आईच्या बाळा माझ्या ओवाळीतें तान्ही गाई

बाई दिवाळीच्या दिशीं शाळूची कर ओटी
वाणीनी बाई माझ्या मामाची आई मोठी

बाई दिवाळीला चोळी, चोळी फाटूनी जाईल
आंदान दिली गाई तिचा विस्तार होईल

बाई दिवाळीची साडी तिच्या फाटूनी झाल्या चिंध्या
आंदन दिली गाई तिच्या पोटीं ग झाला नांद्या

ये दिवाळी ग बाई तूं बिगी बिगी कर येनं
माय बापाच्या ग घरीं कधीं पासूनचं जाणं



संग्राहिका
सौ. शशिकला देशपांडे
मुंबई

माहेराची वाट मायेची ग मोट
सासरीं ग कष्ट मायेबाई

माझ्या ग सासरीं नणंदेची जोरी
बोलायाची चोरी ताईबाई

१ पाट, बैठक.

माझ्या ग सासरीं सासऱ्याची कटकट
सासूची ती खटखट मायेबाई

माझ्या ग माहेरीं ढवळी अंगणांत
गाय ग गोठ्यांत मायेबाई

माझ्या ग माहेरीं पारिजातक उभा दारीं
सुवास ओटीवरी ताईमाई

जाईन माहेरीं बसेन बाजेवरी
विसावा आपुल्या घरीं मायेबाई

बीजेचा ग चांद घालू पहातो ग साद
ओवाळी गुण गात भाऊरायाचे

आम्ही तिघी बहिणी नांदूं तिन्ही गांवीं
खुशाली धाडावी भाऊराया

माहेरींचा देव तुझा माझा एक
लावूं नंदादीप ताईमाई

घाल घाल पिंगा वाऱ्या माझ्या परसांत
माहेरीं जा सुवासाची कर बरसात

सुखी आहे पोर सांगा आईच्या कानांत
आई भाऊसाठीं परी मन खंतावतं

आले भरून डोळे पुन्हां गळा दाटला
माऊलीच्या भेटीसाठीं जीव माझा व्याकुळला



संग्राहिका
सौ. इंदिराबाई भाटवडेकर
मुंबई

मुलगा पाहूं जाती काय पहातां घरदार
आहे नवरत्नांचा हार दादाराया

मुलगा पाहूं ती काय सांगू त्याचा झोंक
लाखामध्यें एक दादाराया

माझी बाळी ग नाजूक जशी चमेलीची कळी
पण आहे ग सांवळी मनुताई

नवरी पसंत हुंड्याचा काय बेत
कुजबूज ती घरांत चालतसे

हुंड्याची अडचण तुम्हीं घालावे दागिने
करणी करणें सोपें वाटे

मुहूर्त ठरला व्याही भोजनाला चला
मान मिळतो आईला एकदांच

जनांत आनंद हुरहूर मनांत
कशी दाखवूं लोकांत संकोचानें

मनुताई माझी बावरी कां झाली
डोळ्यांत करुण आली वाटतसे

सीमांत पूजन सीमेवरी चला
आणूं जांवयाला मांडवांत

सासरा पाय धुवी सासुबाई पाणी घाला
पोषाख जांवयाला देऊं केला

विहिणीचा मान   काय सांगूं देणें घेणें
शालू शेले सोनें नाणें   देऊं केलें

करवली ग रुसली   तिला हवा मोठा मान
लाडकी बहीण   दादारायाची

गुळाची गोड ढेप   ठेविली पुढती
हलवा देऊनी भेटती   वहिणी बहिणी

वाङ्‌निश्चय करायला   व्याही आले मांडवांत
अश्रु आले नयनांत   माऊलीच्या

आलें ग तेलफळ   हिरवी साडी शकुनाची
वरती जोडी बांगड्यांची   ठेवीयली

नेसली हिरवी साडी   गौरीहारापाशीं चला
मायलेकी ओटी घाला   पांच जणी

वाजंत्री वाजती   चला घाणा भरायाला
मग देवकाल   बोलाविती

आधीं मूळ धाडा   घुंगुराची गाडी
घाल जोडीचें वऱ्हाडीं   गणराज

आधीं मूळ धाडा   चिपळूण गांवा
परशराम देवा   आमंत्रण

देवदेवकाला   बसली मातापीता
आहेर करा आतां   म्हणताती

पुण्याहवाचन   देवतांची केली पूजा
आधीं गणराजा   वंदीयेले

नेले रुखवत   वाजत गाजत
आली मुरडत   करवली

आणिले रुखवत   अगणित ते प्रकार
लाडू, जिलब्या घीवर   मांडीयेले

वाढीले रुखवत   रांगोळ्यांचा थाट
जांवयाचा पाट   चंदनाचा

जांवई बैसले सासूबाई चला कोणी
तुपाची आपोषणी घालावया

काजळाचें बोट लाविती गालाला
दृष्ट नको पडायाला नवरदेवा

हजाराचा घोडा त्याला पन्नसाची झूल
वर बसणारा फूल दादाराया

नवरदेव आला दहीभात ग ओवाळा
पायावरी पाणी घाला दादारायाच्या

औक्षण केलें कुंकू लावूनी कपाळां
नारळ हातीं दिला हलव्याचा

हात धरूनियां आणिलें मांडवांत
चांगला मुहुर्त पाहूनिया

आधीं जेष्ट मान मोठ्या जांवयाला
मग कनिष्ठाला मधूपर्क

लग्नाच्या वेळेला नवरी कापे थरथरा
मामा येईतो धीर धरा दादाराया

आणिली लग्नसाडी ठेविली झांकून
बांधीती कंकण एकमेकां

झालें कन्यादान लेक झाली ग परकी
डोळ्याला गळती लागतसे

लज्ज्या होमाच्या ग वेळीं भाऊ कोठें गेला म्हणती
मानाची टोपी देती नानारायाला

सप्तपदीच्या ग वेळीं अंगठा दाबते करवली
मानाची देवूं केली साडीचोळी

सर्व सोहाळे जाहले राहिली वरात
चला विहीणी घरांत जेवावया

जेवणाचें आमंत्रण मोठयाच्या अक्षता
रांगोळी उदबत्या थाट केला

नवरी घास देते केशरी भाताचा
व्याह्यांच्या पंक्तीचा थाट केला

भोजना बैसले आतां वीहीणी व्याही
जिलबीचा घांस देई दादाराया

विहीणीला दिली साडी, बुट्टे शोभती सुरेख
पहा सूनमूख सासूबाई

घातले दागिने बींदी, पट्टा आणि वाकी
पोत, पेट्या खालीं झाकी चंद्रहार

सासुबाई, घालावेणी मूद राखडी, केतक
गोंडे, फलें तीं सुरेख शोभताती

गोठ, पाटल्या घातल्या पुढें शोभतात तोडे
अंगठीला खडे चकाकती

ठुशी, पेट्याखालीं शेराची ती सरी
कपाळाला चीरी कुंकवाची

माहेराचे दिवे सासरच्या वाती
दिवे प्रकाशती झालीमध्यें

लेक सासरीं निघाली मालत्यानी ओटी भारा
शेल्याची गांठ मारा वन्सबाई

केशरी पाण्यानें आंबा शिंपियेला
आतां दही घाला हातावरी

वाजत गाजत, पातली वरात
माप भरुनी दारांत ठेवियेलें

माप लोटियेलें उजव्या पायानें
थोरल्या जावेनें, भरीयेलें

दार अडवूनी, मान मागते विहीण
तुझी लेक माझी सून दादाराया

झालें लक्ष्मीपूजन   नांव ठेविलें कमल
वंशाचा वृक्षवेल   वाढवील

उठलें देवक,   सोडीलीं कंकणें
मांडव परतणें,   झालें आतां

संग्राहिका
सौ. उषाबाई माटे
मुंबई

भाऊबीजेच्या दिवशीं कां रे सख्या रूसलासी
तुझा शेला माझ्यापाशीं दादाराया

जोडव्याचा पाय हळूं टाका वैनीबाई
सवे बैसले माझे भाई दादाराया

माझ्या माहेराला केळी पोफळी नारळी
छाया त्याची ग दाटली अंगणांत

माऊलीची माया न ये आणिकाला
कोवळ्या माणिकाला रंग बहू

माता पित्यांच्या राज्यांत शिंक्यावरचं दही
भाईराजाच्या राज्यांत ताकाला सत्ता नाहीं

संग्राहिका
**गिरिजाबाई केळकर**
जळगांव

*काळी चंद्रकळा धुवूधुवूनी नेसावी*
*आपल्या जन्माला असावी मायबाई*

*काळी चंद्रकळा धुवुधुवूनी झाला बोळा*
*रूपये दिले साडे सोळा बापाजींनीं*

*पालख पाळणा येतां जातां हालवूं*
*आंत बाळ निजवूं नवसाचा*

*पालख पाळणा मोत्यांनीं विणीला*
*तुझ्या मामांनीं धाडिला तान्ह्या बाळा*

*एक म्हणती नंदाचा एक म्हणती वसुदेवाचा*
*जन म्हणे हो कोणाचा कृष्णनाथ*

*माय तो माहेर बाप तो येऊं जाऊं*
*मग आणतिल भाऊ लोकोपचारा*

*माय तो माहेर बाप तों माझी सत्ता*
*नको बोलूं दशरथा भाईराया*

*माऊलीची माया काय करील चुलती*
*पाण्याविण ती शेवंती कोमेजली*

*सासरचा चारा माहेरचा वारा*
*अंगाला लागतो सुखाचा उबारा*

*प्रेमाचें अमृत हृदयाचे पोटीं*
*ह्याची साक्ष मोठी मायमाऊली*

सासरीं सासुरवास मला नाहीं केला
कीर्ति मिळाली तुम्हांला सासूबाई

सूनाबई आली घरां सोन्याच्या पायानें
सासूबाईचा आनंद कसा सांगूं मी वाणीनें

व्रतामध्यें व्रत, व्रत करावें सोमवार
पुढल्या गोतामध्यें आईला माया फार

सासूबाई सासूबाई, आम्ही सूना लाडक्या
आम्हांला मूळ धाडा ह्याच्यापुढें पालख्या

दसरा संपला दिवाळी कधीं येई
माय ग माऊली माझी वाट पाही

सकाळीं उठूनी दोन्ही हातीं ग धंदा
सासूबाई माझ्या सुखी राहोत सदा



संग्राहिका
**मथुरा ढवळे**
नाशिक

एक लिंबाच्या केल्या आठ फोडी
भाई रायावरी बहिणीची माया वेडी

वहिनीबाई गोरी आखूड तिचे दंड
हिरव्या चोळीवरी तिला पिवळे बाजूबंद

वाटेवरलें घर आल्या गेल्याला ताकभात
माझ्या वहिनीबाई बापाजीचें नांव राख

माखणीचें पाणी कोणाच्या वाड्या जातें
भाऊराया माझा वाक्या बिंदल्याचें तान्हें न्हातें

माहेरून जातां घरीं मना लागते हुरहूर
अंगणांत उभे वाट पाहत माझे दीर

सासूबाई ग प्रेमळ मामंजी शांत मूर्ती
त्यांच्या सहवासांत सुख झालें ग किती किती

घागऱ्याचा नाद येई माझ्या कानीं
माझ्या वन्सबाई खेळती वृंदावनीं

उंचशा ओसरीचा केर लोटतां लोटेना
माझ्या ग मामंजीची सभा बसली उठेन

संग्राहक
**आनंद यादव**
पंढरपूर

माझ्या माहेराला नाहीं कोणाचा सासुरवास
सुना लेकींच्यापरीस वागविती

पाऊसपाण्याची धरणीमाय वाट पाहे
तशी मला आस आहे माहेराची

दिवस मावळला कर्दळी आड झाला
मला माघारा[1] न आला माहेरींचा

माझ्या माहेराला डोलती मोठी बाग
वाटेल तें तूं माग वैनीबाई

माहेरीं जाईन बसेन अंगणीं
जशा लवती कामिनी भावजया

अंगणांत खेळे दणदणली माझी आळी
लेकुरवाळी आली माहेराला

जेवण मी जेवी भाजी भाकरीचें
मायेच्या हातीचें गोड लागे

जेवण मी जेवी जेवण जेवतें पोळीचें
पाणी माहेराचें गोड लागे

माझ्या माहेराला राही सदा उघडें दार
आल्या गेल्याचा पाहुणचार होतसे

माझ्या माहेराला नकार नाहीं कोणा
आला गेला पाहुणा नित्य असे

माझ्या माहेराची सांगूं मी कीर्ति किती ?
लाज वाटे सखी कशी सांगूं माझ्या ओठीं ?

सासू-सासरा भाग्याच्या नारीला
नित माहेर अस्तुरीला

सासू-सासऱ्याची पुण्याई घ्यावी सुनं
पोटीं फळांला नाहीं उणं

लाल पिंजरीचं कुंकू एका करंडीं सासूसुना
असं दैव नाहीं कुणा

माझी सासू मला माय धडयानं तूप घेती
लेकी-सुनांला रोज देती

सकाळच्यापारीं वाडा लोटतें वासराचा
दारीं पलंग सासऱ्याचा

नदीच्या पल्याड माझं सासर कशी जाऊं ?
'त्येंनी' हातांची केली नाऊ

नणंद-भावजया काय बोलल्या कोनामंदीं
विहिनी व्हायचं मनामंदीं

माझ्या चुडियाचं सोनं काय पिवळं हडूळ
चुलत्या बापाजीनं केली पारख वाटूळ

सासरला जाती संगं पालखी बारा भुई
बापाजीनं माझ्या दिली आंदण तानी गाई

भकेलं तान्हेलं मला कोण ग म्हणील
माय माझी एक तोंड कोमेजं जाणील

आई म्हणूं आई तिच्या इकतं गोड काई
साखरबाईला कडूपणाचा लेश नाहीं

अंतरीचं गूज बंधु सांगतें खालीं बैस
भिकबाळीचं तुझ्या मोतीं माझ्या डोरल्या लाव घस

ऊंची ऊंची चोळ्या जावा लेत्यात शेजारला
नेणंत्या माझ्या भावा चल बंधवा बाजारला

पाया पडूं आली कोण नारंग्या पदराची
नेणंत्या बंधवाची राणी प्रताप पवाराची

दूरच्या देशाची काय कळंना भावना
सांगून धाडितें कंता धाडावा पाव्हणा

विद्याच्या वाटेनं डाक टपाला धांवा घेतं
नेणंत्या बहिणीचं खुशालीचं पत्र येतं



संग्राहिका
**शांतादेवी तडवी**
जळगांव

गेले कोण्या गांवीं भाऊ माझे राईरंद[1]
पुरवीती छंद वेळ्या खालीं बाजूबंद

गांवांच्या गांवांत भाऊ बहिणीशीं बोलेना
आस्तुरीच्या पुढें त्याचा विलाज चालेना

---

१ संपन्न.

खेड्याच्या गांवांत हंडे, गंगाळी वाजती
भाऊ माझे माणिकराव इथें गवळी नांदती

किती हांका मारू भाऊ डोंगर धरूनी
मिरगाचा पाणी लवण चाललें भरूनी

जिला नाहीं भाऊ तिनें गुरुभाऊ केला
मांडवाच्या दारीं अहेर चुनडीचा नेला

मांडवाच्या दारीं काय नेसूं बाई
नादारीचे कुई भाऊ अजून आले न्हाई

भाऊ घेतो साडी भावजय आडी तेडी
भाऊ नको भारी साडी माझी सुखाची चुनडी

भाऊ खातो पान चुना लावतो देठाला
मायबाईचे लाल लाली सरजाची ओठाला

भाऊ भाऊ करूं भाऊ चालला दुरून
होती माझी माया नेत्र आले हे भरून

मोठे मोठे लोक माझ्या भाऊचे संगती
शिऱ्याच्या पंगती आडव्या लाविल्या बनाती[1]

तुझा माझा भाऊपणा मुसलमान तुझी बीबी
हातीं काजळाची डबी माझ्या महालाशीं उभी

रामाचें देऊळ दिसतें शोभीवंत
गोरी भावजय पति--पुत्रानं भाग्यवंत

दिवाळी चोळी शिंपीणीला आला शीण
पुसती आयाबाया कोणा हौशाची बहीण

भाऊला झाला लेक बहीण भेटे बाजारांत
सोन्याची परात पेढे वाटी नगरांत

---

१ एक प्रकारच्या कापडाचे मोठे पडदे.

भाऊची आस्तुरी रुसली माझ्यावरी
हातीं पैठणीची घडी समजाऊ कवण्यापरी

दसऱ्याच्या दिशीं आपटा लुटी सारा गांव
मानकरी भाऊ सर्वां आधीं हात लाव



संग्राहिका
सौ. कमलाबाई काटदरे
नागपूर

सासरीं जातांना उन्ह लागतं शालींतून
गाडी चालवा बागेंतून भाईराज

सासूचा सासुरवास नणंदबाई हळूं बोल
जाशील परघरा हीच गति तुम्हाला

भावाच्या घरीं गेलें भाऊराया पाहे वाट
पायांनीं सारी पाट भावजयी

भावजय बाई उगीर बोलाची
मला गरज लालाची भाईरायाची

भाऊ गेला बाजारांत भावजय मारी हांका
आपुल्या बहिणीसाठीं खण भारी घेऊं नका

आम्ही चौघी बहिणी चवी गांवच्या चिमण्या
तुझ्या घरच्या पाहुण्या वहिनीबाई

आम्ही चौघी बहिणी डोंगराच्या आड
खुशालीचें पत्र धाड भाऊराया



संग्राहिका
प्रा. इंदुमति भजने
आर्वी

आपण गुज बोलूं गुजाला आली गोडी
माय बहिणीची शेज थोडी

चिक्कण सुपारी अखंड माझ्या पोटीं
मायबहिणी तुझ्यासाठीं

घराची घर रीत पाहून गेला व्याही
मनीं ठसला जांवई

अग सुने ग मालनी राखून घ्यावा मान
तुझा कंथ माझा प्राण

सुनेला सासुरवास कशाच्या कारणं
पोवळ्याची आली लड मोत्यांच्या भारानं

जांवई गृहस्थाला समईची नाहीं चाड
मैना माझ्या लाडणीचा चंद्रज्योतीचा उजेड

सोयऱ्यांचे बोल जसे पाण्याचे शिंतोडे
सांगतें सख्याला उभे रहा पलीकडे

उभ्या भिंती सारवल्या काढलें ताम्हन
तुझ्या लग्नाचें सामान मैनाबाई
उभ्या भिंती सारवल्या काढलें स्वास्तिक
ज्या लग्नाचें कौतुक मैनाबाई

सारवळ्या तोरड्याचा पाय पडला शाईमध्यें
तला दिली वाईमध्यें मैनाबाई

गोड जेवण जेवली माझ्या माऊलीच्या ताटीं
भरल्या कांठाकांठ दह्यादुधाच्या ग वाटी

कशी जेवण जेवलें गूळमांडा शिरापुरी
वाट्या मांडल्या दोहिरी ताटाच्या हारोहारीं

सासरला जातां गणगोताची मालन
भेटी भलाईनं सारा गेला दिवस कलून

सासरला जातां नको रडूं फुसूं फुसूं
सुजले रडून डोळे किती शालींनं मी पुसूं

सासरला जातां रडते कां सांग तरी
पाठीचा बंधुराजा देतो तुला धूरकरी

माहेरां मी जातें बाई मान कोणाचा पाहीन
सून पित्याची लहान माझ्या बंधूची कामीन

माहेरां मी जातें बाई भावजय चंद्रकळा
वाळू घालतें बंधुच्या ओल्या धोतराचा पिळा

माहेरां मी जातें बाई शिंपीण सयाबाई
आंखूड धर बाही नटुली[१] भावजयी

करी बंधु देणं घेणं माय बांधतें शिदोरी
कशी माहेराची वाट डोळां दिसते साजरी

सोन कुसुंबी[२] शालूचा ओटा नवा उकलला
वहिनी पहा दारीं सडा लवंगाचा झाला

गोड बोला भाऊजी माझी वहिनी प्रीतीची
कशी राघोला दंडते मैना राघोच्या तोलाची

झाडा अंगण साजरें बाई काडीकचऱ्याचें
लाडा कौतुकाचा भाचा अंगणांत नाचे

---

१ नटवी. नखरेल. २ कुसुंबी रंगाचा.

नाहीं दळण कांडण रोज भंगतं[1] रांधणा
नांव पित्याजीला येतें थोर बहुत चंदना

पहा लेकीच्या पित्याचं झालं पांढरं अंगण
बसे पिता पाटावर मांडलें कन्यादान

संग्राहिका
**श्रीमती अनसूयाबाई देशमुख**
चिमूर

बारईणी बयनाबाई तांड्यांत तुझं घर
सावली ग घणघोर[2]

बारईणी बयनाबाई पान देशिल शंभर
भरजाणीची उंबर बंधुची माझ्या

बारईणी बयनाबाई पान देशील लवलाही[3]
उभी घोडी चव पाई बंधुची माझ्या

बारईणी बयनाबाई पान देजो वीस तीस
ढवळ्या घोड्यावर गणेश बंधु माझा

पान ग खाऊ खाऊ रंगली जीबुली[4]
बंधुची ग माझ्या बाई सुर्त सरव्याची चांगली

पीतळेचा ग पलंग नेवार[5] ग काळी दोरी
रामा परस सीता गोरी राणी माझी भावजई

बारईनी बयनाबाई उघडी तुझी ताटी
आल नवतीच्या पानासाठीं बंधु माझे

---

१ थकणें. २ दाट. ३ लवकर. ४ जीभ. ५ नवार-पट्टी.

बारईनी बयानाबाई इकडून नको जाऊं
तुझ्या पानाचा नास गहूं

चिमूर गांव शहरांत हल्ला कशाचा ग झाला
मूल बारयाचा मेला

जांवाई ग पाटील आपल्या मातेचे ब्राह्मण
देऊं केली मी कामीनी शारदाबाई

शारदा ग बाई माझी साखर सव्वा तोर
जांवाई पाटील आपल्या मातेचा पदक हिरा

जांवाई पाटीलाची उशी कशानी गळंदली[1]
मालन बाई माझी मैना उशीरा नाहाली

जांवाई पाटीलांची सूर्यमूख[2] खोली
बाई माझी चांदणी चमकली

जांवाई आले आले घरां संतोसली माझी छाती
मैना मागून येत होती शारदाबाई

जांवई पाटीलाची पहांटेची ग अंघोळ
बाईला तरी माझ्या मैनाला पाणी दूर

निघाला ग नारायण निघतां मी पाहीन
गंध अक्षदा वाहीन

निघाला नारायण निघाला ग घाई घाई
मार्कंड्याचा गोसाई

सनाचा पाडवा माय बसली रागानं
गाडी जुंपली राघोबानं

मांडवाच्या दारीं नूपर गेल्या जांबा
नवऱ्या मुलीचे मामाजी लावे लांबा

माहेरीं मी जाईन मान कोणाचा पाहीन
सूना मातेच्या लहान

---

१ घाण झाली. २ पूर्वेकडे तोंड करून असलेली.

वले ग वले गहूं सेवयासाठीं केले
भाऊ पंडीत गांवा गेले

पाणी ग पडतो मोत्याचा ग शीरवा
बाग बंधूचा हिरवा

पाणी ग पडतो मोतीयाचे सडे
माझ्या बंधुच्या गांवाकडे

पाणी ग पडतो कुठें पडतों कुठें नाहीं
बंधु गांवाला गेला नाहीं







# भाग
# दुसरा

## लोकगीतें-गाणीं (ब)

## अनुक्रम

# स्वर आणि ताल

सणासुदीच्या सांगाव्यानें धरित्रीच्या अंगणांत येणाऱ्या खेळगाण्यांच्या वेळीं लोकगीतांच्या श्रवणाची, पठणाची आणि संगीताची जशी काय बहार उडून जाते. अशावेळीं ऐन तारुण्यामधील भर ज्वानीला सांगाती घेऊन मोठ्या ईर्षेनें हीं लोकगीतें माणसांच्या अंगाखांद्यावर खेळत रहातात. चांगल्या सुरावटीनें आणि तालबद्ध नखऱ्यानें आपली कोणीतरी आळवणी करावी म्हणून त्यांचा जीव उतावीळ होऊन जातो.

त्यामुळें ह्या गीतांनीं गुंफलेल्या लहानमोठ्या कथा मोठ्या बहारीनें रंगत जातात. विशेषत: कृष्णदेवाच्या बाळलीलांचें वर्णन सांगणाऱ्या कथात्मक गीतांच्या श्रवणानें व सांगण्यानें माणूस बेभान होऊन जातो. आणि एखादा चवीचा जिन्नस खावा त्याप्रमाणे हें गीत तीनतीनदां त्याला घोळूनमोळून सांगावेंसें व ऐकावेंसेंही वाटतें.

अशीं लोकगीतें देवादिकांच्या अगर सामान्यांच्या जीवनांतील चटकदार व अद्भुत कथा रंगवीत जातात. त्यामुळें त्यांची रचनाच मुळीं मोजक्या व वेचक शब्दांनीं झालेली असते. या ठिकाणीं येणारा शब्द हा विशिष्ट तालानें डौलदार झालेला असतो आणि सुंदर स्वरानेंही माखलेला असतो. त्यामुळें या शब्दांच्या विशिष्ट पद्धतीनें होणाऱ्या ढंगदार उच्चारासरशीच मानवी जीवनाला एक प्रकारची गती येते, ठेका प्राप्त होतो आणि स्वरविलासही त्यास हस्तगत करता येतो. अशा प्रकारच्या

स्वरांचा व तालांचा त्याला जणुं सरावच झालेला असतो. त्यामुळें हीं लोकगीतें गातांना होणारीं निरनिराळीं लोकनृत्यें प्रेक्षणीय होतात. पिढ्यान् पिढ्यांच्या संस्कारांनीं सुस्नात झालेली त्यांची अंगलट म्हणूनच पहाणारांच्या व ऐकणारांच्या लक्षांत राहूं शकते.

लोकगीतें गातांना स्त्रियांना आपल्याच पायांतील जोडवीं व मासोळ्या, हातांतील बांगड्या व आंगठ्या, कळशी, सूप, लाटणीं, हातांच्या टाळ्या, तोंडानें घातला जाणारा पिंगा आणि मिळाल्याच तर टाळमृदंग न् झांजा ह्यांचा साथीला मोठा सुंदर उपयोग होतो. ह्या पार्श्वसंगीतामुळें या गीतांना लाभलेला ताल आणि स्वर मोठा देखणा होतो आणि सर्वांच्याच अंगवळणी पडण्यासाठीं त्याला कसलाही संकोच वाटत नाहीं. म्हणूनच या गीतांच्याप्रमाणेंच हा ताल आणि स्वरही मानवी जीवनांतील एक सार्वजनिक पण उल्लेखनीय अशी धनदौलत होऊन बसते.



संग्राहिका
डॉ. सौ. चारुशीला गुप्ते
मुंबई

*रुणझुण पांखरा । जा माझ्या माहिरां । हूं हूं ॥*

*तिथं घराचा दरवाजा । चंदनी लांकडाचा ।*
*पेशवाई थाटाचा । त्यावरी बैस जा । हूं हूं ॥*

*माझ्या माहिरां अंगणीं । बघ फुलली निंबोणी ।*
*गोडी दारांत पुरवणी । त्यावरी बैस जा । हूं हूं ॥*

*माझ्या माहिरीचा । झोपाळा आल्याड बांधियला ।*
*फुलांनीं गुंफियला । त्यावरी बैस जा । हूं हूं ॥*

*माझ्या माहिरीं मायबाई । डोळे लावुनी वाट पाही ।*
*तिला खुशाली सांगाया जा । माझ्या माहिरीं पांखरा जा । हूं हूं ॥*

*

सौ. शांतादेवी बाबर
बागणी

## झिम्याचीं गाणीं

१

*लोटझाड केली बाई पाण्याला गेली*
*इसारली माझी जोडवीं ग सई न्हाई मला*
*कळलं माझ्या सासूला ग मारली बाई मला*
*धावल्यात माझ्या दिराला ग दिना बाई मला*
*लोटझाड केली बाई पाण्याला गेली*
*इसरल्या माझ्या साकळ्या ग सई न्हाई मला*
*धावल्यात माझ्या दिराला ग दीनाती मला*
*कळलं माझ्या सासूला ग मारीली मला....*

२

*सासुरवाशीण पाण्याला गेली*
*मगर मास्यानं घागर नेली*
*साखळ्या देतें दाजी*
*घागर काढून द्या जी*
*साकळ्या नको वैनी*
*घागर गेली पौनी*
*सासुरवाशीण पाण्याला गेली*
*मगर मास्यानं घागर नेली*

पैंजण देतें दाजी
घागर काढून द्या जी
पैंजण नको वैनी
घागर गेली पौनी

३

सासऱ्याच्या वाटं कुच कुच काटं
कोन पावना आला ग सई, हुं: हुं:
सासरा पावना आला ग सई, हुं: हुं:
काय घेऊन आला ग सई, हुं: हुं:
साखळ्या घेऊन आला ग सई, हुं: हुं:
नाहीं मी साखळ्या लियाची, हुं: हुं:
नाहीं मी गाडींत बसायाची, हुं: हुं:
नाहीं मी सासऱ्या जायाची हुं: हुं:

[याप्रमाणें सर्व नातेवाईकांना अशीं उत्तरें देऊन शेवटीं ही स्त्री इथें आपल्या पतीबरोबर आनंदानें सासरीं जाते.]

४

पंचमीच्या सणाला बंदू आला नियाला
बाई बंदू आला नियाला
जाऊं काय जी म्हायारला
तपकीर वडत्याला आत्तीईनू, जाऊं काय जी म्हायारला
मला काय विचारती ग विचार तूझ्या सासऱ्याला
चिलीम वडत्याला मामाजींनू, जाऊं काय जी म्हायारला
मला काय विचारती ग विचार तुझ्या दिराला
भांग पाडत्याल्या दाजीबांनू, जाऊं काई जी म्हायारला
मला काय विचारती ग विचार तुझ्या जावला
सैंपाक करत्याल्या जाऊबाई, जाऊं काई जी म्हायारला
मला काय विचारती ग विचार तुझ्या पतीला
आरशांत बगत्याल्या पतींनो, जाऊं काई जी म्हायारला
दोन दिवसाच्या बोलीनं ग जाऊं द्या राणी म्हायारला

५

नणंद पावणी आलीया तीला बसाया कां टाकीना
असल तीतं फाटकं बोतार घेऊन कां बसना
नणंद पावणी आलीया तीला पाणी कां देईना
असल तीथं फुटका तांब्या घेऊन कां पिईना
नणंद पावणी आलीया तीला जेवाई कां वाढीना
आसल बुटींत शिळंपाकं घेऊन कां खाईना
नणंद पावणी आलीया तीला पातळ कां घेईना
आसल तीथं फाटकं लुगडं घेऊन कां नेसना
नणंद पावणी आलीया तीला घालवत कां जाई ना
आसल तीथं लंगडा घोडा बसून कां जाईना

६

दारीं टिपूर चांदणं भावज दिवा लाव ग
नणंद जाती सासऱ्यां काय तो आनंद दाव ग
हाई इसाचं लुगडं नंदंजोगं न्हाई ग
दारीं टिपूर चांदणं भावज दिवा लाव ग
नणंद निघाली सासऱ्यां काय तो आनंद दाव ग
हाई इसाचं डोरलं नंदंजोगं न्हाई ग
दारीं टिपूर चांदणं भावज दिवा लाव ग
नणंद निघाली सासऱ्यां काय तो आनंद दाव ग
हाईतीं ईसाची जोडवीं नंदंजोगी न्हाईत ग...

७

आंदण घावें भाऊराया काय देऊं भैनाबाई
तुझ्या दारांतील जाई हाट पूरीव माझे आई
आंदण घावें भाऊराया काय देऊं भैनाबाई
तुझ्या दारांतला चांफा हाट पूरव माझ्या बापा
आंदण घावें भाऊराया काय देऊं भैनाबाई
तुझ्या दारांतला मक्का हाट पुरव माझे आक्का

आंदण द्यावें भाऊराया काय देऊ भैनाबाई
तुझ्या हातांतला खवा हाट पुरव माझ्या भावा
आंदण द्यावें भाऊराया काय देऊं भैनाबाई
तुझ्या शेतांतली भाजी हाट पूरव माझे आजी

८

आग सकूबाई ग सासरा बोलवितोयी ग
तंबाकू बिंबाकू ओढत आसल
चिलीम बिलीम घावत नसल
हुडकाई मला बोलवत आसल
येत नाहीं म्हणून सांग ग
आग सकूबाई ग दीर बोलवितोयी ग
भांग बिंग पाडत असल
फनी त्याला घावत नसल
हुडकाई मला लावत असल
येत नाहीं म्हणून सांग ग
आग सकूबाई ग सासू बोलवितीया ग
तपकीर बिपकीर ओढत असल
डब्बी तिला घावत नसल
हुडकाई मला लावत असल
येत नाहीं म्हणून सांग ग
आग सकूबाई ग नणंद बोलवितीया ग
गडयीन तिची आली असल
सुपली तीला घावत नसल
हुडकाई मला लावत असल
येत नाहीं म्हणून सांग ग
आग सकूबाई ग जावू तुला बोलावितीया या ग
भाक्री बिक्री करत असल
कारटं तिचं रडत आसल
मलाच घे म्हणत असल
येत नाहीं म्हणून सांग ग

अग सकूबाई ग पती तुझा बोलवितोय ग
अंघोळ बिंगोळ केली असल
अरशांतबिरशांत बघत असल
त्यांत मी त्येला दिसत आसल
येतें म्हणून सांग ग

९

ताटांत वाटी, वाटींत दही, तिथें आमचे मामंजी जेवत होते
मामांजी मामंजी म्हणत होते बाई ग
बंधु आले नियाला धाडीतां कां नाहीं हो
सोन्याचा डेरा चांदीची रवी
तिथं आमच्या आत्याबाई ताक करत होत्या
आत्याबाई, आत्याबाई, म्हणत होतें बाई ग
बंधु आले नियाला धाडीतां कां नाहीं हो
सोन्याची सुपली मोत्यांनीं गुंफली
तिथं आमच्या दिवाणसाब खेळत होत्या
दिवाणसाब, दिवाणसाब, म्हणत होतें बाई ग
बंधु आले नियाला धाडीतां कां नाहीं हो
सोन्याचा दांडू चांदीची विटी
तिथं आमचे रावसाब खेळत होते
रावसाब, रावसाब, म्हणत होतें बाई ग
बंधु आले नियाला धाडीतां कां नाहीं हो
सोन्याची चूल गीलावी फरशी
तिथें आमच्या बाईसाब सैपाक करत होत्या
बाईसाब, बाईसाब, म्हणत होतें बाई ग
बंधु आले नियाला धाडीतां कां नाहीं हो
सोन्याची दौत चांदीची लेखणी
तिथं आमचे पतिराज लिहीत होते
पतिराज, पतिराज, म्हणत होतें बाई ग
बंधु आले नियाला धाडितां कां नाहीं हो

आणा फणी घाला वेणी
जाऊं दे राणी माहेराला

१०

घुंबर पोरी घुंबर ॥ घुंबर कशी घालूं ॥
आडूशाला लाडू ॥ दहींभात वाढूं ॥
आईबापाला सांगत हुतें ग सांगत हुतें ॥
नको देऊंसा गडकऱ्याला ग गडकऱ्याला ॥
आपण बसल्यांत घरामंदीं ग घरामंदीं ॥
मला धाडत्यात पाण्यायाला ग पाण्यायाला ॥
खडे बोचत्यात पायायाला ग पायायाला ॥
आसूं येतंया डोळ्यांयाला ग डोळ्यांयाला ॥
घुंबर पोरी घुंबर घुंबर ॥ कशी घालूं ॥
आडूशाला लाडू ॥ दहींभात वाढूं ॥
आई बापाला सांगत हुतें ग सांगत हुतें ॥
नको देऊंसा मास्तराला ग मास्तराला ॥
आपण बसल्यात खुर्चीवरी ग शाळेमंदीं ॥
मला धाडत्यात भांगलणीला ग भांगलणीला....॥

११

लेकी तुझे डोहाळे कशा ग वरी
आई, आंब्याच्या घोसा ग वरी
आंब्याच घोस चौरंगीं बैस

लेकी तुझे डोहाळे कशा ग वरी
आई, कारल्याच्या घोसा ग वरी
कारल्याचे घोस चौरंगीं बैस

लेकी तुझे डोहाळे कशा ग वरी
आई, वाळकीच्या घोसा ग वरी
वाळकीचा घोस चौरंगीं बैस....



संग्राहक
प्रा. आनंद यादव
पंढरपूर

कारल्याचं बीं पेर गं सुने, मग जा आपुल्या माहेरां
कारल्याचं बीं पेरलं सासूबाई आतां तरी जाऊं का माहेरां
कारल्याचा वेल येऊं दे ग सुने मग जा आपुल्या माहेरां
कारल्याचा वेल आला सासूबाई आतां तरी जाऊं कां माहेरां
कारल्याला कारलं येऊं दे ग सुने मग जा आपुल्या माहेरां
कारल्याला कारलं आलं सासूबाई आतां तरी जाऊं का माहेरां
कारल्याची भाजी चीर ग सुने मग जा आपुल्या माहेरां
कारल्याची भाजी चिरली सासूबाई आतां तरी जाऊं का माहेरां
कारल्याची भाजी केली सासूबाई आतां तरी जाऊं का माहेरां
कारल्याची भाजी खा ग सुने मग जा आपुल्या माहेरां
कारल्याची भाजी खाल्ली सासूबाई आतां तरी जाऊं का माहेरां
कारल्याचं उष्टं काढ ग सुने मग जा आपुल्या माहेरां
कारल्याचं उष्टं काढलं सासूबाई आतां तरी जाऊं का माहेरां माहेरा

संग्राहिका
श्रीमती मालतीबाई परदेशी
पुणें

आरीखालीं पारी, पारीखालीं मळा
असा भाऊ भोळा, भोळा
बायका केल्या सोळा
केल्या तर केल्या पळूं पळूं गेल्या
पळतां पळतां मोडला कांटा
शंभर रूपयाचा आला तोटा
शंभर रूपये ट्रंकेंत ग ट्रंकेंत ग
आमच्या फुगड्या रंगांत ग रंगांत ग
पळीबाई पळी पितळेची पळी
माझ्यासंगं फुगडी खेळती सोन्याची कळी
आमच्या फुगड्या नेटाच्या नेटाच्या
चोळ्या शिवूं या बेताच्या बेताच्या
हंड्यावर हंडा हंड्यावर गंडा
गंड्यावर मोर माझ्यासंगं फुगडी खेळते चंद्राची कोर
भाजी हाटतां हटेना हटेना
म्हाताऱ्या माणसाला नटवेना

२

नदीकिनारीं बंगला ग
पाणी झुळ झुळ जाय
माशानं मारला डंका ग
पाणी झुळ झुळ जाय

पाटलाची लेक गेली पाण्याला
तिथं फुलली जाय ग
नेसली पैठण शालू ग पोरी हंसतील काय
मुखांत रंगला विडा ग पोरी बघतील काय
बसायला बग्गी घोडा ग पोरी बसतील काय
अंगांत गजनी चोळी ग पोरी घालतील काय....

३

तुपातलं कारलं आजिरलं ग सई गोजिरलं ग
कुण्या सुगरणीनं रांदलंय ग सई रांदलंय ग
लीला सुगरणीनं रांदलंय ग सई रांदलंय ग
लीलाचा पती रूसलाय ग सई रूसलाय ग
खुंटीवरचा शालू वाऱ्यानं गेला
समजाव सई समजाव ग
आपल्या पतीला समजाव सई समजाव ग



संग्राहक
श्री. पु. गो. खोंड
चांदा

वेळूं बाई वेळूं कुपाकनी[1] वेळूं
गौर गेली सासरीं आतां काय खेळूं ?
सोंडी बाई सोंडी माजघराची सोंडी
गौर गेली सासरीं जागा झाली भोंडी

१ कुपाकुपातून

२

कारलीचं बीं पेर ग सूनबाई
मंग जा आपल्या माहेरां, माहेरां
ारल्याचं बीं पेरलं हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
कारल्याला पाणी घाल ग सूनबाई
मंग जा आपुल्या माहेरां, माहेरां
कारल्याला पाणी घातलं हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
कारल्याला बूड येऊं दे ग सूनबाई
मंग जा आपल्या माहेरां, माहेरां
कारल्याला बूड आलं हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
कारल्याला मांडव घाल ग सूनबाई
मंग जा आपल्या माहेरां, माहेरां
कारल्याला मांडव घातला हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
कारल्याला फूल येऊं दे ग सूनबाई
मंग जा आपुल्या माहेरां, माहेरां
कारल्याला फूल आलं हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
कारल्याला कारलं लागूं दे ग सूनबाई
मंग जा आपल्या माहेरां, माहेरां
कारल्याला कारलं लागलं हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
कारल्याची भाजी कर ग सूनबाई
मंग जा आपल्या माहेरां, माहेरां
कारल्याची भाजी केली हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
कारल्याची भाजी खा ग सूनबाई
मंग जा आपुल्या माहेरां, माहेरां

कारल्याची भाजी खाल्ली हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
भाजीचा गंज घास ग सूनबाई
मंग जा आपल्या माहेरां, माहेरां
भाजीचा गंज घासला हो सासूबाई
आतां तरी धाडाना, धाडाना
सासूबाई सासूबाई आतां तरी धाडाना
मला काय पुसतेस पूस जा आपल्या सासऱ्याला
मांमाजी मांमाजी आतां तरी धाडाना, धाडाना
मला काय पुसतेस पूस जा आपल्या दिराला
भाऊजी भाऊजी आतां तरी धाडाना, धाडाना
मला काय पुसतेस पूस जा आपल्या जावेला
जाऊबाई जाऊबाई आतां तरी धाडाना, धाडाना
मला काय पुसतेस पूस जा आपल्या नंणदेला
वन्स वन्स आतां तरी धाडाना, धाडाना
मला काय पुसतेस पूस जा आपल्या पतीला
पतिराज पतिराज आतां तरी धाडाना, धाडाना
घेतली चोळी लावली पाठी जाऊन बसली नदीच्या कांठीं

३

चांफा बाई चांफा तेलंगी चांफा
जाईचं लुगडं वालाची चोळी
कांकण पोळी पुरणाची
हातीं वाटी तुपाची, तुपाची
गडू बाई गडू, तांब्याचा गडू
गडूंत होता पैसा
पैशाची घेतली जुडी
जुडी बाई जुडी, सांबाराची जुडी
माहेरचा डोंगा[1] पाहून घेतली उडी

---

१ डवंगा, माणसांनी गजबजलेलें घर.



संग्राहिका
**कु. सुमन बाबुराव पाल्येकर**
सावंतवाडी

*झिरिमिरी झिरिमिरी पावस पडे*
*भावाची भैन खेळत दोघां*
*मारिली भावानं लाथ*
*धरिली सासऱ्याची वाट*
*मिळाली आपले मामंजीक्*
*'लाडके सुनेचा येना कसा जाला ?'*
*"ऐका, ऐका मामंजीनुं सांगतंय् तुमका"*
*भावाची भैन खेळत दोघां....*
*मिळाली सासूबाईक*
*'लाडके सुनेचा येना कसा जाला ?'*
*"आयका आयक सासुबायनुं सांगतंय् तुमूका"*
*भावाची भैन खेळत दोघां...*
*मिळाली न्हानगे भावोजिक्*
*'लाडके वैनीचा येना कसा जाला ?"*
*"आयका, आयका भावोजिनुं सांगतय् तुमूका"*
*भावाची भैन खेळत दोघां...*
*मिळाली ननानूबाईक*
*'लाडके वैनीचा येना कसा जाला ?'*
*"ऐका ऐका ननानूबायनुं सांगतंय् तुमूका"*
*भावाची भैन खेळत दोघां....*
*मिळाली आपुल्या पतीक्*
*'लाडके पत्नीचा येना कसा जाला ?'*

"आय्का आय्का सांगतंय् तुम्का"
भावाची भैन खेळत दोघां
मारिली भावानं लाथ
धरिली सासऱ्याची वाट

२

मामोजी कसे हो मामोजी कसे
हातींत् रुमडी शेतकार कसे ।
सासूबाय कशी हो सासूबाय कशी
हातींत् डवली धरनी जशी ।
भावोजी कसे हो भावोजी कसे
हातीत् रूमाल देवळी कसे ।
जावबाय कशी हो जावबाय कशी
पायार् मिरी भाड्न् कशी
ननान् कशी हो ननान् कशी
चिखलांत् लोळता म्हशी कशी
ते बाई कसे ? हो ते बाई कसे ?
हातींत् लिख्नी कारकून कसे
मियां बाये कसा ?
कपाळाक् चिरी लक्ष्मी जसा

३

सरला शिरवान् लागला भादो — भाव आला भैनीला न्याया हो
पार्वती बोले देवा देवा ईश्वरा — दे माका माहेरा रजा हो
गळ्यांतली माळा घालूतंय् पार्वती — नको जाव तुयां माहेरा हो
गळ्यांतली माळा घालीत माका बंधु — मियां जातंय् ईश्वरानुं माहेरा हो
सरला शिरवान्....
कानांतली बुगडी घालतंय् पार्वती — नको जाव तुयां माहेरा हो
कानांतली बुगडी घालीत् माका बंधु — मियां जातंय् ईश्वरानुं माहेरा हो
सरला शिरवान....

(अशा रीतीनें सर्व प्रकारच्या दागिन्यांची लालूच शंकर पार्वतीला इथें दाखवितो आहे, पण ती आपला हट्ट सोडीत नाहीं.)

४

सासू गेली पान्याला सुनेनं भाजिल्या तुरी
सुनेन् भाजिल्या तुरी ।
खावक् गेल्या वसरेक् सासयेन् लायिली चोरी
हरि हरि भग्वाना माझा माहेर दूरी
धवळ्या नंदीर् लेक बैसुनि आली
बाप्पा म्हनतां लेक भुकेची आली
नाय बाप्पा भुकेची आमचा बारदेशी खाना ।
बुगडेचा लेना ।
आए म्हनता लेक भुकेची आली
नाय आए भुकेची आमचा बारदेशी खाना ।
पुतळ्याचा लेना ।
बंधु म्हनता भैन भुकेची आली
नाय बंधु भुकेची आमचा बारदेशी खाना ।
कापूर–शेला ।

(तुरी चोरून खाल्ल्या म्हणून सुनेला माहेरीं पिटाळलें, परंतु खाष्ट सासूबद्दल कांहीं न सांगतां सून आपल्या सासरच्या चांगल्या परिस्थितीचें वर्णन अभिमानानें येथें करते.)

५

चौथीच्या सनाला बाप्पा आला न्यायाला
धाडतास् का माहेरा ?
मज काय फुसाशि गे फुसा आपुल्या सासुबायशीं
बाजयेंतल्या सासुबायनुं आए आली न्यायाला
धाडतास् का माहेरा ?
मज कांहीं फुसाशि गे फुसा आपुल्या दिराशीं
साळेंत जातल्या भावजीनुं तुम्ही होशार
धाडतास् का माहेरा बंधु आला न्यायाला
मज कांहीं फुसाशि गे फुसा आपुल्या जायेपाशीं
पान खातल्या जावबायनुं भैन आली न्यायाला
धाडतास् कां माहेरा ?

मज कांही फुसशि गे फुसा आपुल्या पतीपाशीं
धोरा राखतल्या भर्तारानुं बंधु आला न्यायाला
धाडतास् कां माहेरा ?
जा फुली ये फुली गे दीड दिवसाची रजा

६

सम्रता भैणीचो दुर्बळ भाव
गेलो गे भैणीच्या घरां
भैणीच्या सासयेन् दुर्सुन् देखिलो
'अगे गे लाडये सुने
तुजो तरी बंधुराया येतो'
"माजो तरी बंधुराया कसलो असा ?"
'नेसूलो लंगोटी, माथ्याक् असा चिंधोटी'
"हाडा गे पाठल्या दारा" ॥

पंगाऱ्याचो सळपो गे करटींत् सून् पानी
सुबंध बंधुचो सत्कार केलो
लाइली माळ्याक शिडी
काढिले वरयो तांदुळ
वरयो आधना वोतिले
वरयाचो भात गे आंबाड्याची भाजी
राखीचे खोपींत् पुरुन् ठेयूलो ॥ १ ॥

गेलो गे मित्राच्या घरा
मित्राच्या आवशीन् दुरसून् देखिलो
चंदनाचो पाट गे झारयेइसून् पानी
सुबंध मित्राचा सत्कार केलो ॥
लायूली माळ्याक शिडी
काढले साळी काय डाळी
साळी काय डाळी आधना वोतीले
सुबंध मित्राक भोजन् सारिला ॥ २ ॥

गेलो गे अष्टी बाजारा
घेतला अष्टी धोतर
घेतलो हिरवो मांजिल
घेतलो नि गे चाबूक
बसलो धवळ्या वारूवर ॥ ३ ॥

गेलो गे भैनीच्या घरा
भैनीच्या सासयेन् दुरसून् देखिलो
'अगे गे लाडये सुने
तुजो तरी बंधुराया येतो'
"माजो तरी बंधुराया कसलो आसा?"
नेसलो अष्टी धोतर माथ्याक् हिरवो मांजिल
धवळ्या वारव र बसकार केलो
हाडा गे फुडल्या दारा
चंदन—पाट गे झारी भरून् पानी
'माका गे खैंचा भैनी पानी?
माका गे खैंची भैनी म्हनी?
पंगाऱ्याचो सळपो गे करटींतूसून पानी
राखयेच्या खोपींत बसकार केलय्' ॥ ४ ॥

काढिले साळी काय डाळी
सुबंध बंधूक् भोजन् सारिला
माका गे खैंचा भैनी भोजन
वरयाचो भात गे आंबाड्याची भाजी
राखयेच्या खोपींत् पुरुन् ठेयूलो
इलो गे आपुल्या घरा ॥ ५ ॥



संग्राहक
**श्री. गो. गं. बाजपेयी**
धरणगांव

गांवना गांवमां, मनं साहेर—माहेर
दोन्ही हेरसले, पानी पुराये एक हेर
गांवना गांवमां, कारभारी याही याही
आईमां अवाई, सासराथी जवाई सवाई
गांवना गांवमां, नांदती यीन्ही यीन्ही
गंगायमुनाना संगम देखवा कोन्ही ?

२

पुसे लेक मना, वास माडी वं कसाना ?
मना माहेरना, वारा ज वाही ऊना
पुसे लेक मना, पूर नदीले कोठना ?
मना माहेरना, नाला ज वाहा ऊना
पुसे लेक मनं, चांदनीले काम्हुन् तेज
माहेर नी देवी— मायनी तिले देखं !
पुसे मनी लेक सूर्या काम्हुन तापना ?
माहेरना देव— बापले राग ऊना !
पुसे मना राम— आज का वं तू खुषींत
माहेरनी ईद, मना हिरदाले भूषीत
पुसे मना राम, हात जोडस कुनाले ?
मनं माहेर पालखी, पालखीना देवसले !

३

मना माहेरना, भाऊ शे मुसलमान
बहीनना साठे, कशी तरमये जान
मना माहेरना, भाऊ लागस हाऊ वान्या
नादार बहीनले, ऊधार देस दाना
मना माहेरना, भाऊ सोभस सोनार
भासीना करिता, मासोया देनार
मना माहेरना, भाऊ हाऊशे चम्हार
भासाना पायले, जोडा नरम देनार

४

भाऊ आज येई, हाड्या[1] कोकाई[2] न्हायना
गना बायसाठे, सोनाना पायना
बंधू आज येई, डोया फडकंस मोठा
भासासाठेंलई, चांदीना भरदोटा
भाऊ आज येई, भरे तोटरं जेवतां
लाल रेसमनी, कुडची भासा लेता

५

एक डोया हुगडू, मी ते एक डोया लावूं
इबाक मना राम, तिबाक मना भाऊ
एक कान खोलूं, मी ते एक कान झाकूं
इबाक सासरा, तिबाकना पिता देखूं
दोन्ही हात जोडूं मी ते दोन्ही हात जोडूं
बहीनना कंथ मना रामना हाऊ साडू
एक जीव राहे मना, एक जीव जाये
सासर-माहेरमां, हाऊ कल्हो[3] कसा बये !

६

गई मायबाई, तिना पोटं न्हाना न्हाना
वडीळ बहीन, मना मानसूं पोटना

१ कावळा. २ कावकाव करणें. ३ कल्लोळ.

गई मायबाई, गई मंदीरनी रया
माय ना मचूक,[1] मी ते लावसू व मया
गई मायबाई, मना पिता किलवाना
पिता रडे धाई धाई, उरे लाई लाई तान्हा !
गई मायबाई मायसमूक माहेर काई ?
पिता रडे धाई धाई, मना जीवले हाई हाइ !

७

आतेना कलीमान, देव झाया व निठूर
मना माहेरले, सोनाना व्हता धूर
आतेना कलीमान, देव व्हई ग्या चगेल
मना माहेरले, देखी काटी हो लागेल
आतेंना कलीमान, देवले नहीं दया
मना माहेरले, उनी मसाननी कया

८

बिना-माहेरची, नको करूं कोना देवा
पहले आंडेर[2] मारवा, मंग मायबा मार वा
बिना-माहेरची, नको करूं शिरीहरी
बंधवा मचूक, काय सोभा ती माहेरीं ?
बिना-माहेरची, नको करूं रे इठ्ठल
माहेर नहीं तिले, काय सासर व्हईल ?
बिना-माहेरची, करशी ते कर देवा
सासू नि सासरा, मायबासारखा होवा

९

लगीन झायावर, तुले कसाले माहेर ?
ज्या घर दिनी पोर त्या घरले मानो बरं
लगीन झाल्यावर, नार झाई पराईनी
देस झाया परदेस, माय बिगर-मयानी !
लगीन झायावर, माहेरनी नको ओढ
सासरनी सुरी गोड, माहेरनी सरी तोड !

---

१ शिवाय, वाचून. २ मूल.

१०

दूरथून देखूं, मनं माहेर सोनानं
जोडे जावा, घर, पडी ऱ्हायनं लोनानं

दूरथून देखूं, मना बाप शे 'माया'-मां
जोडे जावा, कोनी नहीं ऱ्हायना कह्यामां

दूरथून देखूं, भाऊ-ब्हीन जोडीना
जोडे जावा, रडूंज ये, झगडा तोडीना

दूरथून देखूं, माले भूषन माहेर
भासा कसा म्हने, फुई आने ना आहेर

दूरथी देखवा, माहेरले खुशी होवा
जोडे जावा, वास लेवा, 'आरनीं' ना वास येवा

माहेरले जाऊं, माले माहेर कसानं!
पिताना मचूक गांव होयेल मसान!

माहेरले जावा, कोन्या बंधूले भेटना!
एक मांगे दोन, डोंगर मोठाला खसना!

माहेरले जाऊं, नहीं माय मयावाली
'लेक-लेक' करी, तिनें आरोई फोडली!

माहेरल जावं, मनं माहेर मावनं
चुलताना घर, नहीं मनं मन निवायनं

माहेरले जाऊं माहेरना झाया घात!
सुख गरीबानं, नहीं देवले देखात!!

माहेरले जाऊं मनं लागेना ज चीत!
आते ना कली मां, देव व्हई गया दैत!!

माहेरले जावा मी ते झुरस मनांत
मना हिरदाना, परभु तुकडा कयात!

माहेरले जाऊं काय देवनं नांव लिऊं?
नगरी व सुनी! नहीं बाप, नहीं भाऊ!!

माहेर लागना, हाऊ पहाड कसाना?
माले बलावंस, पिता मना हाऊ बानीना!

माहेर-लागनी, हाई नदी व अंजनी
मनी तीस भागाडे, हाई माय शे रंजनी !

माहेर-लागती—देखूं राई शे आमनी
अमरुत चाखूं, वानी भाऊ मीठारामनी !

माहेर लागता—हाऊ मारोतीना पार
पारवरी बठी—मन जीव थंडागार !

संग्राहिका
सौ. सुनंदा किल्लेदार
बेळगांव

## लग्नांतील गाणीं

१

गुंड्यानं बांधलं तळं  राखेनं बांधलं आळं
त्यांत पान येल  रुजूं घातली
एक पानं पानवेली  दोन पानं झालीं
दोन पानं पानवेली  बीं खवली
दोन पानं पानवेली  तीन पानं झालीं
तीन पानं पानवेली  कुडी फुटली
तीन पानं पानवेली  चार पानं झालीं
चार पानं पानवेली  वेलू चढली
चार पानं पानवेली  पांच पानं झालीं
पांच पानं पानवेली  सहा पानं झालीं
सहा पानं पानवेली  फळं कुंबेटी[१] झालीं

---

१ पिकली.

सहा पानं पानवेली   सात पानं झालीं
सात पानं पानवेली   फळं सोकावलीं[1]

२

नकीं तेल ग   चढईलं   चढईलं राजाराणी
महादेवाच्या घरीं यो
तेल जें चढवितांना अंकाराच्या पार्वती   ईश्वराच्या दामावंती
अशा येतील पांचजणी   नवरीस तेल लाविती
पोटरी तेल ग   चढईलं चढईलं राजाराणी
महादेवाच्या घरीं यो
तेल जें चढवितांना अंकाराच्या पार्वती
ईश्वराच्या दामावंती
अशा यतील पांचजणी   नवरीस तेल लाविती

३

माळाच्या माळसेणी   गंगेचं जाय पाणी
पाणी तापीव भैणी   नवरीच्या
आमची नवरी   गिंडीनं[2] पाणी न्हाई
सारंग लोटूं जाई   केळी बनां

४

आठ शेर कापूस   नऊ शेर वळल्या वाती
पांचजणींतली एक सखी   कुंकूं लाविती
आठ शेर कापूस   नऊ शेर वळल्या वाती
पांचजणींतील एक सखी   हळद लाविती
पांचजणींतली एक सखी   आरती करीती

५

करे भरू आल्या रूक्मीणी नारी
थंडसी सावळी फणवसडे दारीं
लेक मागते कमळाबाई   तिला नाकच न्हाई

---

१ सुकली.   २ चरवी, मोठी कासंडी (पसरट भांडें).

६

चीपनळी सारजा  आहा लागली गरजा
लागली गरज  बाशिंगाची
लागली गरज  मंगळसूत्राची

७

गंदा धुपांवरनं चला  मामानं पेरावा केला
शेलीयाचे जोड कृष्णा  लेवूं लागला
गंदा धुपांवरनं चला  मामानं पेरावा केला
गळ्यांतली कंठी कृष्ण  लेऊं लागला

८

भरताराच्या पायी  पुजीयली आकीता
कुळदेव म्हणतो कौतुक लेकी पड गे पाया
पायाजी पडतांना कुळदेव हांसतो
खांबल्या[1] तासतो चंदनाच्या
भरताराच्या पायीं पुजीयली आकीता
आई बाप म्हणती कौतुक लेकी पड गे पाया
पाया जी पडतांना कुळदेव हांसतो
खांबल्या तासतो चंदनाच्या

९

साडे सोळा गहूं दळा  साडे सोळा गहूं दळा
बढाण[2] भर गे भागडणी[3]  नवरीच्या भैणी सुगडीनी[4]
त्या बढणांत काय काय परी
भात भरला शिगोशिगी  पापड लावले ह रोहारीं
डगे लावले परोपरी  तूप ओतलं धारोधारी
त्यांत खोबऱ्याची वाटी  त्यावर नवरंगी सूप
त्यावर चोळीचा खण  त्यावर पानाचा विडा
यावर नवलाक दिवा  घे गा नवऱ्या नवरीचं नांव
घे गे नवरी नवऱ्याचं नांव  उघड बढाण दोघे जेऊं

---

१ छोटे खांब. २ लग्नाच्या पंक्तींत ठराविक लोकांपुढें झाकून ठेवतात तें पक्वान्नाचें ताट.
३ बढाणाचे ताट ठेवणारी स्त्री. ४ चतुर (स्त्री).

१०

दिष्ठ झाली सांवळ्या नवरा नवरीसू
दिष्ठ झाली म्हणुनं त्यांचे आजा आजी उतरूं गेले
गडियावैनं पाय देवुन चला
पाय जे देतानं मिठाचे साकोरे
दुनियांतले कंकोरे बजीर चूड
दिष्ठ झाली म्हणुनी त्याचे आईबाप उतरूं गेले

११

दार धरीयो पाय धरीयो   कां भैनी दार धरीयो ?
बंधु तुझी कन्या   मिया मागो आलो
भरली घागर हालेना डुलेना
बंधु तुझी लेक मागतो   राणी कां बोलेना

१२

मायबापानं दिलं ताट   त्यांत वतलं त्याल
देव्हाऱ्यावर मारले चट्टे   देवाजी मामजींनु हाव पुसूं
आपल्या कुळदेवा घालूं जाती उदू

१३

दे रे देवा बुद जलम जोगी
केसरी त्याल दे उतरीयो   उतरीयो राजाराणी
महादेवाच्या घरीं यो
तेल जे उतरतांना   अंकाराच्या पार्वती
ईश्वराच्या दमावंती
अशा येतिल पांचजणी   नवरीस तेल लावती....
छाती त्याला दे उतरीयो

१४

भवरीयो भवरीयो । परतुन जाई चवकियो
भवरीयो राजाराणी । महादेवाच्या घरीं यो
पाटाचं पाणी सारंगी जातो
हळदीचा लोट पारवा पितो....



संपादिका
सौ. सरलाबाई कर्वे
पुणें

## सकू

बारांनीं बारा वरसा झाली
सकू ग तुझ्या लगीनाशीं
आई मला कंदीं पोचवशी
लेकी तुला सासऱ्या पोचवीन
लेकी तुला साडी नेसवीन
मंग तुला सासऱ्यां पोचवीन
सकू अंगोळीला गेली
हातींचा तांब्या पडला धरणीवरी
आई मला अपशकून झाला
अपसकून न्हवं लेकी, सकून झाला
सकूबा पाताळ नेसूं गेली
हातींच्या निऱ्या पडल्या धरणीवरी
आई मला अपसकून झाला
अपसकून न्हवं लेकी सकून झाला
सकूबा अंगामधीं चोळी चढविती
हातींची चोळी पडली धरणीवरी
सकूबा कुंकूं लावाया गेली
हातींचा करंडा पडला धरणीवरी
सकूबा जोडवीं लेईयेती
हातींचीं जोडवीं पडली धरणीवरी

सकूबा मंगळसूत्र लेती
हातींचं मंगळसूत्र पडलं धरणीवरी
तितून सकू सडाकली गेली बा पहिल्या वनां
अरे अरे हाथीराख्या दादा तुझे हाथी कोण्या नगरीचे
सकू ग तुझ्या सासरींचे
आमचीं माणसं कशी रे हायतीं!
सखे सकू सुखी ग हायीती
गोविंदा दुःखी ग हाय
तितून सकू सडाकली[1]
गेलीबो दुसऱ्या वनां
भेटला ग गाई खिल्लार
अरे अरे गायीराखया दादा
तुझ्या गाथी कोण्या नगरींच्या
सकुबा तुझ्य ग सासरींच्या
आमचीं माणसं कशी रे हायत?
सखे सकू सुखी ग हायती
गोविंदा दुःखी ग हाये
तिथून सकू सडाकली
गेली तिसऱ्या वनां
भेटला महेशी खिल्लार
अरेरे आमचा गोविंदा दुःखी हाय
तेथून सकू सडाकली
गेली बा चवथी या वनां
भेटला बैल
अरेरे आमचा गोविंदा दुःखी हाय
तिथून सकू सडाकली
गेली बा पांचव्या वनां
भेटला मेंढ
अरेरे आमचा गोविंदा दुःखी हाय

---

१ सटकली, ताड्कन निघाली.

तिथून सकू गेली बा साहव्या वनां
भेटला गाढव
अरेरे आमचा गोविंदा दुःखी हाय
तिथून सकू गेली बा सातवीया वनां
भेटली कोंबडी
अरेरे आमचा गोविंदा दुःखी हाय
तिथून सकू सडाकली
गेली बा आपल्या घरीं
आवो आवो सासरे बाबा
तुम्हाला मी नमस्कार करतें
नको ग करूं नमस्कार
सोनं गेलं हाकनी (हरवून गेली)
नाहीं मला सोन्याची गोडी
सासूच्या पाया पडूं गेली
सासूला बोलती झाली
तुम्हांला मी नमस्कार करतें
नको ग करूं नमस्कार
सोनं गेलं नायी मला गोडी
नंदेच्या पाया पडूं गेली
मग सकू घरामंदीं गेली
माळ्याला लावली शिड
शिडी बा पडून गेली
सकुजी रडूं लागली
मंग गेली वडाच्या पारीं
अरे रे वडा तूं माजा दादा
सोड रे सोड पारणा (पारंब्या
पारणा सोडूनी रे आंत मला घेशी
पारण्यानं सकू गेली सरगासी
मारीली दरवाज्यावर हांक
आवो वो सरगींच्या देवा
दरवाजा उघडून आंत मला घेवा

दरवाजा उघडून काय तुझं म्हणणं
माझे नी भरतार आहेत तुम्हापाशीं
तुझ्या ग भरताराला काय ग खूण
डोकींत पगडी गळ्यांत गोफ
आपुला भरतार ओळखून नेशी
धरीला भरताराचा हात
आली सरगांतून बाहीर
सरगाच्या वाटेवर चेपीला शीरा
सासरच्या वाटेवर पेरीला जीरा
आली वडाच्या पाशी
वडा तूं सोड पारणा
मी जातें आपल्या गांवीं
मी जातें आपुल्या घरीं
भरतारासंगं सकू घरीं आली
आवो सासरे बाबा
तुम्हाला मी नमस्कार करतें
जोड्यांनीं नमस्कार करतें
पांच पक्वान्न केला स्वयंपाक
पांची परकारचे लाडू वाढीले पंगतीला
दोघं बसा दुहीकडं
मंदीं बसले पुतर
सकू वाढीती जेवाया
सर्वांना करी नमस्कार
भरतार आनले सरगांतून



संग्राहक
श्री. दा. गो. बोरसे
अकोला

अहो अहो विहीणीबाई
आमचें मागणें कांहीं नाहीं
आमचें मागणें थोडें थोडें
नवऱ्या मुलीला पैंजणतोडे
पैंजण जोडव्यांची हौस फार
नवऱ्या मुलीला चंद्रहार
चंद्रहाराची हौस मोठी
नवऱ्या मुलीला चिंचपेटी
चिंचपेटीला मोतीं थोडे
नवऱ्या मुलीला हत्तीघोडे
हत्तीघोड्यावर बसती
गांवाकडे दोघे जाती
आई पाहते खिडकींतून
बाप पाहतो दारांतून
भाऊ पाहतो ओट्यावरून
हरणी गेली कडल्यांतून
ज्याची होती त्यानं नेली
आमची माया वाया गेली

२

विहीणबाई, विहीणबाई, राग मनांतला सोडा
गोरी गोरी वरमाय
तिचे नाजुक पिवळे पाय

गव्हा तांदळानं भरल्या कोठ्या
खोबऱ्या नारळानं मी भरीतें ओट्या
खणा नारळानं मी भरीतें ओट्या
विहीणबाई राग मनांतला सोडा
जेवण झाल्यावर हात चोळतें साखरीनं
दांत कोरतें लवंगानं
घंगाळीं रुपये तुम्ही घाला
विहीणबाई राग मनांतला सोडा
रेशमी पायघड्यावरून मिरवा
विहीणबाई राग मनांतला सोडा
मोठ्या लोकांचा नवरदेव सासरीं रुसला
कंठी गोफासाठीं जानोसी बसला
नवरदेवाच्या जोरावर सवाष्णी मागती जानोसा
चिरेबंदी वाडा त्यांत जोडीनी हो बसा

२

नवरी आहे गोरी तिला हळद लावली थोडी
लेकीच्या करतां जांवयाची गोडी
माझी लेक आहे खडीसाखरेची पुडी
जांवयाचा मान एवढा केला कशासाठीं
लेकी राजबाई तुझ्या जीवासाठीं
मोहराची वाटी ठेवली बोहोल्याच्या कोना
गोरेबाई माझी तुझ्या वराला दक्षिणा
लक्ष्मी आली घरां आतां तूं जाऊं नको
माझ्या बाळराजाला अंतर देऊं नको
लक्ष्मीबाई आली मागच्या दारानं
कडी उघडावी धाकट्या दिरानं
लक्ष्मीबाई आली सई सांजच्या भरांत
कुंकवाची पुडी साक्ष ठेविली दारांत
पहिला दिवस पुसाव चांगला
हिरव्या चोळीवर काढला बंगला

दुसऱ्या दिवशीं मित्र पुशी सोबत्याला
कां रे गड्या पिवळा घरीं राणीचा सोहळा
तिसऱ्या दिवशीं माय पुसे ब्राह्मणाला
मुहूर्त चांगला हिरवी चोळी कामिनीला
चवथ्या दिवशीं घर गुलालांनीं लाल
पेटचा हा लाल त्याचे शांतीक झालं काल
पांचव्या दिवशीं लिंबा डाळिंबाची पाटी
गोऱ्या राधिकेची मखरीं भरा ओटी
सहाव्या दिवशीं बाजा वाजतो कळसाचा
गोऱ्या राधिकेच्या जवळी बाळ निजे नवसाचा
सातव्या दिवशीं ब्राह्मणाला दिली गाय
ऐकते शांतीपाठ हरखून माय
आठव्या दिवशीं पत्र फुलाऱ्याला धाडा
गोऱ्या राधिकेला गुंफावा जाई तोडा
नवव्या दिवशीं शेजेला फुलं दाटं
गोऱ्या राधिकेनं केला हा थाटमाट
दहाव्या दिवशीं वाजती चौघडे
बाई हर्शीत खुशींत निरोप माहेराला धाडे
बहिणीच्या घरीं भाऊ गेला लई दिसा
हातीं बेल तांब्या बहीण पुजिती तुळसा
बहिणीच्या आशिर्वादें भाऊ झालेत कुबेर
चिरेबंदी वाडे बांघले चहुखोर

४

सई सई भाले
मोगरा डुले
बाबांना हिरा
मोत्यांना तुरा
उना वरथिन बान
मन्ही तुले आन
दन दन फुगडी
तुम्ही मन्ही जोडी

५

असा मन्हा सासरा हातम्हान कासरा
बईलना बईलना
असा मन्हा जेठ गया म्हान गेढ
चांदीना चांदीना
असा मन्ह्या जावा तिले कामना हेवा
असा मन्हा नवरा जसा चंदनी भवरा

६

ये रे चिड्या येई र ऽ येई र ऽ
दखडं काय मन्हं माहेर माहेर
माय त मन्ही मयानी मयानी
भाव-जाई चांदनी चांदनी
भाऊ मन्हा निठूर निठूर
मूय नही येन्हार येन्हार
धल्ला[1] करे याद ना याद ना
कव्हा येही मयना मयना
माय मन्ही सुकती सुकती
मयना कारन झुरनी झुरनी
भाडले ली बोलनी बोलनी
जाय त भाऊ लवकर लवकर
लई ये मन्ही ओडेर ओडेर

७

दोन तीन बइलेस्ना लागव्यात ठुशी
बाई लागव्यात ठुशी
तठे मन्ही कारंव्तायी इसरनी कशी
बाई इसरनी कशी
धाकल्या देरले गवसनी कशी
बाई गवसनी कशी

१ दादला, दाल्ला, नवरा.

धाकल्या देरनी काय काय काय
बाई काय काय काय
दोन तीन चाबूक चमक्यावन्यात
बाई चमक्यावन्यात
दोन तीन चाबूक दूरना दूरी
बाई दूरना दूरी
मन्हऽ माहेर पंढरपुरीं
बाई पंढरपुरीं
पंढरपूरले काय बाई साजे
बाई काय बाई साजे
पंढरपूरले बांगड्या साजे
ताई बांगड्या साजे
येतां जातां खुय खुय वाजे
बाई खुय खुय वाजे
पंढरपूरले काय बाई पाहूं
बाई काय बाई पाहूं
रखमाईनं दरसन लेऊं बाई
बाई दरसन लेऊं बाई

८

घाटावरथीन माय घाटावरथीन
उना एक जोगी माय उना एक जोगी
त्यानंऽ बिऱ्हाड माय त्यानंऽ बिऱ्हाड
चिचिना खालते माय चिचिना खालते
फुई मन्ही मयानी माय फुई मन्ही मयानी
बिऱ्हाड देखलें चालनी माय बिऱ्हाड देखलें चालनी

नका जाऊं फुईजी माय नका जाऊं फुईजी
लाडक्या वाहारी माय लाडक्या वाहारी
नवरा उना फिरी माय नवरा इमा फिरी
तोडेरना जोड लेयना माय तोडेरना जोड लेयना

९

तांबाना घागर शिरीं गयथू[1] मी गंगावरी
तठे ये किरन हरि यांनीं घरनी मन्ही मिरी
सोड सोड कान्हा सासूपासे सांगसू
सोड सोड कान्हा सासऱ्या पासे सांगसू
सोड सोड कान्हा देर पासे सांगसू
सोड सोड कान्हा नवऱ्या पासे सांगसू
खोड तुम्ही मोडसू मार तुले देसू

१०

मयना रानी खेये आंगन झायऽऽथोडं
लवनीत फुल झाडं मामाजीनी
मयनाना खेय आंगनी मोडंना
भातकुल पियना गोड गोड
चांदीच्या थाट माट वाढनी दूध फेनी
जेवस हिरकनी मयनारानी
चांदीचा थाट माट वाढती पूरनपोर्य
जेवस चाफेकयी मयनारानी
लाडकी ग लेक खिडर्क हुबी ऱ्हाये
बापाजीनी वाट पाहे मयनारानी
लाडकी ग लेक लाड सांगस बापाले
मोतीं मागे कापाले मयनारानी

१ गेलें होतें.



संग्राहिका
कु. उषादेवी बागल
कातरखटाव

## विहीण

*विहीणबाईची करणी बघा मग बंधूला लेक मागा*
*विहीन मागते थोडं थोडं नवऱ्या बाळाला कंठी तोडं*
*त्या ग कंठीचं सोनं फिकं बंधु कंगण्या जोगं रूप*
*त्या ग कंगण्या पडल्या काळ्या बंधु आणा हो बेलबाळ्या*
*बेलबाळ्याला बाजूबंद चोळी पातळ मला दंडं*
*त्या ग पातबिळाची निरी निरी रूतते माझे पोटीं*
*बंधू आणा हो लाल लाल दाटी लाल लाल दाटीचा पिवळा सर*
*बंधु लावा वो वर भिंग*

२

*आंदण देई रे भाऊराया काय देऊं ग बहिणी बया*
*वासरासहित पांची गया*
*आंदण देई रे भाऊराया काय देऊं ग बहिणी बया*
*ऊसासहित पानमळा*
*आंदण देई रे भाऊराया बहिण परास लेकीची माया*
*आंदण देई रे भाऊराया*

३

*घाणा भरीला । सव्वाखंडी सुपारी*
*मांडवी व्यापारी । गणराज*
*घाणा भरीला । सव्वा खंडी गहूं*
*नवऱ्या मुलीला गोत बहू । गणराज*

मांडवाच्या दारीं । रोविल्या ग मेढी
मूळ ग वऱ्हाडी । आंबाबाई
मांडवाच्या दारीं । कोण उभ्यानं घास घेतो
चहूंकडे चित्त देतो । गणराज
मांडवाच्या दारीं । इथं तिथं रोवा
लोडाला जागा ठेवा । माणसांच्या
घाणा भरीला । सव्वा खंडी कणिक
मांडवीं माणीक । आंबाबाई

४

पहात होतें चंद्राला
पदर माझ्या कमरेला
बंधु आल्याती नियाला
रजा द्या मला जायाला
मी नाय रजा दियाचा
खारक्या बदाम्या लावायचा
खारकांत खारका तोडीन
बैलाला काढून नेईन
चल ग मैना झपझप
शाळू दिवस कानाडा[1]
कशी मी चालू दादाजी
पायांतलं पैंजण गळतंय जी
गळतंय तर गळूं दे करून आणीन हीनाचं[2]
घडवून घालीन चांदीचं

---

१ प्रतिकूल, लवकर संपणारा. २ रुप्यामध्यें मिसळावयाची धातू.



संग्राहक
श्री. गणपत दामू पाटील
पानेंड

श्रावण सरला काय भादवा निंगाला
भादव्याच्या नव्या दिसाला बंधू आले न्यायाला
सोन्याचा नांगर रूप्याची लुमनी[1]
वावूर पेरीत होतें मी म्हनतें भरतार
एवढ्या दूरचं, बंधू आलें न्यायला
मला रजा द्या जायाला
एवढा राहिला जोंधळा रूजूं दे भारजा
रूजला भरतारा मी जाईतें माहेरां
एवढा राहिला जोंधळा पिकूं दे भारजा
पिकला भरतारा मी जाईतें माहेरां
एवढा राहिला जोंधळा कापूं दे भारजा
कापिलाव भरतारा मी जाईतें माहेरां
एवढा राहिला जोंधळा झोडूं दे भारजा
झोरलाव भरतारा मी जाईतें माहेरां
एवढा राहिला जोंधळा सारवून दे भारजा
सारविला भरतारा मी जईतें माहेरां
आतांशीं वो रजा दिली माझ्या भरतारानं
एका दिशी जावा माहेरां, दिड दिशीं यावा
कंदीं मी ओलंडीन दारींचा पिपळ
कंदीं मला भेटल बाप माझा इट्टल

---

१ रूमणे, नांगराचा उभा खुंटा.

कंदीं मी ओलंडीन नदीची साखळी
कंदी मला भेटेल बहिन माझी धाकली
कंदीं मी ओलंडीन घरचा हुंबरटा
कंदीं मला भेटेल भाव माझा गोमटा
कंदीं मला भेटेल आई माझी रुक्मीण

२

सोळा बंदी सूप घेईन भारजा
नको जाऊं दुबळ्या माहेरां
केळीच्या पानावर ववशीन[1] भरतारा
जातें मी दुबळ्या माहेरां
पिटाच लाडू करीन भारजा
नको जाऊं दुबळ्या माहेरां
कोंड्यांचं लाडू करीन भरतारा
जातें मी दुबळ्या माहेरां
भिलोरी बांगडी भरीन भारजा
नको जाऊं दुबळ्या माहेरां
साध्याच बांगड्या ववशीन भरतारा
जातें मी दुबळ्या माहेरां
चांगला लुगडा घेईन भारजा
नको जाऊं दुबळ्या माहेरां
साधा लुगडा नेसन भरतारा
जातें मी दुबळ्या माहेरां
भरजरी चोळी घेईन भारजा
नको जाऊं दुबळ्या माहेरां
साधीच चोळी घालीन भरतारा
जातें मी दुबळ्या माहेरां
सोन्याचे डाग घालीन भारजा
नको जाऊं दुबळ्या माहेरां

---

१ वसा, व्रत.

चांदीचे डाग घालीन भरतारा
जातें मी दुबळ्या माहेरां
एवरें देईतो भारजा, तरी नाय राहसी सासऱ्या
मग आतां निंगून जा माहेरां
पतीची परवानगी घेऊन भारजा गेली आपल्या माहेरां

३

यमुना आईची लाडकी   यमुना बापाची लाडकी
यमुनानी खोबरा लाविला   यमुनानी डोकीशीं धुतली
घातली गजनीची चोळी   नेसली पिवळं पाताळ
बांधला बोचका काचका   यमुना गेली सासऱ्याला
गांवामधीं गारूड्याचा खेळ   यमुना गेली खेळ पहायला
यमुना आली खेळ पाहूनी   यमुनाची सासू बोलूं लागली
यमुनाचा सासरा गांजूं लागला   यमुनाचा दीर बोलूं लागला
यमुनाची नणंद गांजूं लागली   यमुनाचा नवरा बोलूं लागला
यमुना तितून निंगाली   गेली बापाच्या दरविजाशीं
अरे तूं माझ्या बाबा होशी   उघर[1] दाराची कावर[2]
आमची कावर सायाची   किली कुलपा लोखंडाची
मना नाय लेकी तुझी चाडी   मला आहे जांवयाची गोडी
यमुना तेथून निघाली   गेली आईच्या दरविजाशीं
अग तूं माझ्या आई होशीं   उघड दाराची कावर
आमची कावर सायाची   किली कुलपा लोखंडाची
मला नाय लेकी तुझी चाडी   मला जांवयाची गोडी
यमुना तितून निंगाली   गेली भावाच्या दरविजाशीं
अग तूं माझ्या वहिनी होशी   उघड दाराची कावर
आमची कावर सायाची   किली कुलपा लोखंडाची
मना नाय तुमची चाडी   मना आहे दादोजींची गोडी
यमना तिथून निंगाली   गेली बहिणीच्या दरविजाशीं
अग तूं माझ्या बहिणी होशी   उगर दाराची कावर
आमची कावर सायाची   किली कुलपा लोखंडाची

---

१ उघड. २ कवाड, दार.

मना नाय बहिणी तुझी चाडी मला आहे मेहुण्याची गोडी
यमुना तितून निंगाली गेली पहिल्या वनाला
पहिला वन टाकिला यमुना गेली दुसऱ्या वनाला
दुसरा वन टाकिला यमुना गेली तिसऱ्या वनाला
चवथा वन टाकिला यमुना गेली पांचव्या वनाला
तितं होता अंजन ढव[1] तठी बोचका ठेवल चिऱ्यावरी
बस्ता ठेवली बोचक्यावरी
यमनानी ढवामंजी उडीशी टाकिली
यमना आईच्या स्वप्नीं गेली आतां लेकी कुणाला म्हणशील
यमनाची आई रडूं लागली यमना बापाच्या स्वप्नीं गेली
आतां तूं चोळी बांगरी कुणाला करशील
यमनाचा भाव रडूं लागला यमुना बहिणीच्या स्वप्नीं गेली
आतां वेणी कुणाल घालशील यमुनाची बहिण रडूं लागली
यमुना भावजयच्या स्वप्नीं गेली
आतां तूं बोचका कुणाचा बांधशील
यमुनाची भावजय रडूं लागली...



संग्राहिका
श्रीमती अनुसूयाबाई देशमुख
चिमूर

उठा उठा सासूबाई झाडूं द्या ना ओसरी
तुमच्या लेकाची कचेरी
उठा उठा सासूबाई झाडूं द्या ना कोनाडा
तुमच्या लेकाचा पानपुडा

१ डोह.

उठा उठा सासूबाई सोडा बागांतल्या गाई
राजहंस माझे शाही
उठा उठा सासूबाई सोडा बागांतले हत्ती
राजहंस माझे पति
उठा उठा सासूबाई सोडा बागांतले मोर
राजहंस माझा दीर
चीकन सुपारी खिशांत दाटली
राणी वाटेंत भेटली
दळण दळतां उरले पांच गहूं
कृष्णासारखे माझे भाऊ
दळण दळतां उरले पांच मोतीं
कृष्णासारखे माझे पति
माता माझी ग पाठवते काशींतले खण
भूजवरी राघू दोन
माता माझी ग पाठविते काशींतल्या चोळ्या
भूजवरी ग मासळ्या
वाण्याच्या दुकानांत बंधु बसला चिंतामणी
साडी निवडे मीरादाणी
सासरा माझा बाळराजा सासू माझी कमळजा
नवरत्नाचा दरवाजा गेला ग पडून
सणाचा पाडवा माय बाईला आठवला
मला मुरारी पाठवला



संग्राहिका
सौ. सत्यवतीबाई तावडे
कोल्हापूर

## डोहाळे

*पहिले मासीं रुक्मिणीसी आली अन्नाची शिसारी*
*द्राक्षबाग डाळिंबी बकुळ केळी नारिंगी*
*दिली ताकीद माळ्याला दिवस सोनियाचा आला*
*कृष्ण बोले रुक्मिणीला दिवस आनंदाचा आला*

*दुसऱ्या मासीं भिमक तनया चढलीसे गर्भ छाया*
*पालटली सुरुपकाया हांसतमुख यादवराया*
*तिरभुवनीं आनंद झाला दिवस सोनियाचा आला*

*तिसरे मासीं भिमकबाळी घालूनिया चिरचोळी*
*ताट पाट रांगोळी गूळ पोळी जेवणाला*
*उशीर झाला भोजनाला दिवस सोनियाचा आला*

*चौथ्या मासीं उभी दारीं नारी पुसीती कोण्या परी*
*विनोद करी नानापरी लाजे रुक्मिणी सुंदरी*
*आज व्रत आम्हां कळला दिवस सोनियाचा आला*

*पांच महिन्यांत सोहाळे कृष्ण पुसतसे डोहाळे*
*रुक्मिणीचें वय कवळें आंबे पाडाचे पिवळे*
*मर्वा खविला बुचड्यांत पुष्पहार ग गळ्यांत*
*उभी ऐन्या ग महालांत कृष्ण हांसतो गालांत*
*कृष्ण बोले रुक्मिणीला दिवस आनंदाचा आला*

सहावा महिना जी लागला डाळिंबी बागशीं जाऊं चला
पांची परकाराचा थाट पंक्ति बैसल्या अचाट
मंदीं बसवा रुक्मिणीला दिवस सोनियाचा आला

सात महिने सात परी खिरी वाढील्या नानापरी
चोळी किनखापी भरजरी पिवळं पातळ केशरी
हिरवा शालू नेसायाला दिवस सोनीयाचा आला
कृष्ण पुसे रुक्मिणीला दिवस आनंदाचा आला

आठ महिने आठंगळ गळीं उंबराची माळ
हार तुरे कृष्णाजीला दिवस सोनीयाचा आला
नऊ महिने नऊ दिवस झाली रुक्मीण प्रसूत
पोटीं जन्मला मदन जैसे सूर्याचे किरण
सूर्य लाजूयिनी गेला दिवस सोनियाचा आला
कृष्ण बोले रुक्मिणीला दिवस आनंदाचा आला

संग्राहिका
सौ. हव्वाबी रमजान खान
पुणें

## पाळणा

आवो सुहागन झूला झूलाने नूर[1] नजर को मनवाने[2]
आल्ला नबीके जावूं मैं वारी लालों का मैंने झूला संवारी
प्यारे के आंखोमें आई खुमारी सदके मैं तेरी, सुरत प्यारी
आवो सुहागन झुला झुलाने नूरे नजको मनवानें

उतरा जमींपर लखते सुलेमां नगमाये सहेराजहूरा जबीना
चलो आगाये मर्दये रुखशा फुर्कोंजी पढकर सुरये फरखां
आवो सुहागन झुला झूलाने नूरे नजर को मनवानें

---

१ दृष्टि. २ प्रवृत्त करणें.

नूरानी सुरत कैसा रंगिला कब हैं जहां मे आयसा सजीला
रहात जान है जानी छबेला आया हैं हटमें देखो हटेला
आवो सुहागन झुला झूलानें नूरे नजर को मनवानें

आये दिलबर माहे मुनव्वर वारूं मैं तुझपर गोहर व अखतर
शाहे तख्तका साया हो सरपर हम हैं तेरी खातूने महेशर
आवो सुहागन झुला झूलाने नूरे नजर को मनवानें

चष्मे तरम उपर हो यारब पावे तरकी हररोज हरशब
अहमद मुनशी खुब लिखा है झुले का मजमून लुरफसे य सब
आवो सुहागन झुला झूलाने नूरे नजरको मनवानें

झुलोरे ताने गुनके सीयाने शहरे हरके मांके दिवानें
वारूं मैं तुझपर मोतीयों के दाने गले रखूं हिरें शिरानें
आवो सुहागन झुला झुलाने नूरे नजर को मनवानें

झूलोरे ताने लाडले झुलो आपने खुदाको हरगीज नाभुलो
फजले खुदा हो लुत्फे नबी हो झूले जनाबे हजरत आली हो
आवो सुहागन झुला झूलाने नूरे नजर को मनवानें

शर्म हयासे दुनीयामें रहेना येशाख इसका है याद रखना
उमर खुदापर सर आपना धरना आल्ला का शुक्र हरवक्त करना
आवो सुहागन झुला झुलाने नूरे नजर को मनवानें

आये हो ताने गुन खूब रखना रबका इरादा जो कुछ हो सहेना
अपने नबी को खूब यार रखना खोफे खुदाको दिल बिच रखना
आवो सुहागन झुला झूलाने नूरे नजर को मनवानें

साया जनाबे खैरुलवरा का हो तुझपे साया कुल आवलीयांका
अरफा हो हासील तुझको खुदाका साया हो सरपर इल्लीलाका
आवो सुहागन झुला झुलाने नूरे नजर को मनवानें



संग्राहिका
**सौ. शरदिनी मोहिते**
सांगली

काय गडणी केलं म्यांबी
एका जीवाच्या बाराजणी
नव्या घागरीनं पाणी आणी
चल गडच्या बाजाराला
साळी खंडीतो हजाराला
चाटी राहिना उधाऱ्याला
देतें जमीन गुजराला
काय गडणी केलं म्यांबी
एका स्नेहाच्या दोघीजणी
माझ्या स्नेहाला काय देऊं
एक लवंग दोघी खाऊं
एका माहेरीं दोघी जाऊं
एक रंगाच्या चोळ्या घेऊं
माझ्या अंगणांत तुळशी वृंदावन
तुळशी वृंदावन चंदनाचं झाड
चंदनाचं झाड गुलाबाचं फूल
देवा ज्योतीबाला त्याची भारी आवड
सर्व बनीं ग बनीं ग
कचली माझी वेणी ग
दिराला जेवूं कशी वाढूं ग
कशी वाढूं ग

दुधांत भाकरी सोडू ग सोडूं ग
सई बनीं ग बनीं ग
कचली माझी वेणी ग
नंदला जेवूं कशी वाढूं ग
नंदला वाढूं ग

धयांत भाकरी सोडूं ग सोडूं ग
सई बनीं ग बनीं ग
कचली माझी वेणी ग
सासऱ्याला जेवूं कशी वाढूं ग
कशी वाढूं ग



# मानपान आणि आहेर



आपल्या घरीं कोणी पै पाहुणा आला अगर पाव्हण्यांपैकीं या ना त्या कारणान आपला कोणाशीं संबंध आला म्हणजे मानवी स्वभावाला आपलें म्हणून खास असें कांहीं करावेंसें वाटतें. समोरचा माणूस बघून त्याच्या इतमामाप्रमाणें व आपल्या ऐपतीप्रमाणें अशा वेळीं कांहीं देवघेव केली जाते. आपला व इतरांचा मानपान राहील हें पाहिलें जातें. विशेषत: स्त्रियांच्या जीवनांत असे मानपान फार बारकाईनें राखले जातात, सांभाळले जातात.

चारचौघीजणी लग्नकार्याच्या कारणानें, मुंजीच्या निमित्तानें, डोहाळजेवणाच्या निमंत्रणाकारणानें, बारशाच्या मंगल समारंभाच्या निमित्तानें, किंवा नव्या नवरीच्या कोडकौतुकाच्या आनंदाकारणानें एकत्र आल्या म्हणजे आपला स्वत:चा मानपान चांगला कसा राहील याबद्दल फार दक्षता घेतात. अशा वेळीं आपलें स्वत:चें रहातें घर चंद्रमौळी असलें तरीहि एखादा राजवाडा मागें सरावा अशा थाटानें त्यांना बोलावेंसें वाटतें. त्यासाठीं आपल्या पतिदेवाचें नांव घ्यावयाच्या कारणानें त्या आपल्या कल्पनेला भव्य उड्डाण घ्यायला सांगतात. उत्तमोत्तम शब्दरचनेला सामोरी यायला लावतात. आणि लहान लहान पण यमकबद्ध अशी वाक्यरचना करीत फार चित्ताकर्षक बोलणीं करूं लागतात. कधीं हें बोलणें लहानसें, आटोपशीर, असें असतें

तर कधीं तें बरेंच लांबतेंहि. अशावेळीं हें लांबलेलें बोलणें, ऐश्वर्यशाली बोलणें, तर ती करतेच पण त्याचबरोबर आपलीं नातीं गोतीं, हौसेमौजे कारणानें पतिदेवाचा होणारा प्रवास, विडा खाण्याच्या निमित्तानें एकत्र गोळा होणारा देशाचा भूगोल, सणासुदींचा वैशिष्ट्यपूर्ण इतिहास, मायघरची चालरीत, सासूच्या घरचें वळण इत्यादि अनेक गोष्टींना गुंफीत भारी सुरेख वातावरण उभें करते. ऐकणाराची मति जशा वेळीं गुंगून जाते आणि बोलणाराच्या चित्ताची सावधानता भंग पावते! कारण या परीच्या बोलण्याकारणानें बुद्धिवैभवाची पारख होते, पाठांतराची चाचणी घेतली जाते आणि घरच्या चालीरीतींचा थांगपत्ता लागतो! म्हणून नव्या नवरीच्या जिवाची नुसती धांदल उडून जाते आणि म्हाताऱ्या सवाष्णीची लाजून लाजून पुरेवाट होते.

स्त्रियांच्या तोंडवळणीं पडणाऱ्या या प्रकारच्या बोलण्याला '**उखाणा**' अगर '**आहाणा**' म्हणतात. हा उखाणा कधीं भव्यदिव्य विचार बोलून दाखवितो तर कधीं थट्टामस्करी अगर विनोदहि निर्माण करून मोकळा होतो. त्यामुळें एकप्रकारच्या ईर्षेनेंच पतिदेवाचें नांव घेण्यासाठीं स्त्रिया उखाण्यांचा वापर करतांना दिसून येतात. आपल्या पतिदेवाचें नुसतेंच नांव घेतलें तर त्याचें आयुष्य कमी होतें या भीतीनें व खुळ्या समजुतीनें त्या उखाणे घालतात.

फुगडी खेळतांना देखील मुलीबाळी असे उखाणे घालीत असतात आणि मोठ्या बायका सहजगत्या बोलतांना सुद्धां म्हणींचा वापर करतांना दिसून येतात. जी गोष्ट बोलायची ती साधी सरळ अशी न बोलतांना काव्यमय रीतीनें बोलणें त्यांना अधिक आवडते.

स्त्रियांच्या प्रमाणेंच पुरुष मंडळीहि आपल्या पत्नीचें नांव घेतांना क्वचित प्रसंगीं उखाण्यांचा वापर करतांना आढळून येतात. परंतु हा भाग अपवादात्मकच होय.

पतीचें नांव घेतांना जसे उखाणे घालतात तसेच ते 'रुखवता'चे वेळींहि घालतात. मात्र या प्रकारच्या उखाण्यामध्यें अतिशयोक्तीची भाषा अधिक असते वा विनोदाला भरपूर वाव दिला जातो. म्हणून अशा उखाण्यांना फोडणी अगर लवंगी मिरचीची उपमा दिली जाते!

'रुखवता'साठीं वापरल्या जाणाऱ्या उखाण्यांच्यामुळें कित्येकदां लग्नघरांतील वातावरण भारी तंग होऊन भांडणें उभीं राहातात. परंतु—

"आला आला रुखवत, त्यावर ठेवला भोत, वाकडा तिकडा आणा घालूं नका दुहीकडचं जमलंय गोत"

असा इषारा देऊन त्याला पायबंदही घातला जातो! आणि मुलीकडील मंडळींनीं मुलाकडील मंडळींना व विशेषतः नवरदेवास आणलेल्या या 'न्यारी'ला

शोभा येईल याची खबरदारी घेतली जाते. म्हणून या प्रकारच्या बोलण्याचा समावेश जसा 'मानपानां'त होतो तसाच तो 'आहेरां'तहि जमा होतो. त्यासाठीं या प्रकारच्या बोलण्याची जेवढी चंगळ असते तेवढीच तारीफहि केली जाईल याबद्दल दक्षता घेण्यांत येते. कारण या बोलण्यामुळें बोलणाराची चालरीत व त्याच्या घरचें वळण पारखण्याचा प्रघात पडलेला आहे.

त्यामुळें लुगडेंचोळी देऊन, भांडींकुंडीं घेऊन, पैसा अडका मोजून अगर करणीधरणी करूनहि जो मानपान लक्षांत घेतला जाईल व ज्या आहेराची चर्चा होईल त्यापेक्षांही या बोलण्याकारणानें होणारा मानपान आणि आहेर अधिक मोलाचा ठरतो. कारण बाकी कांहींहि नसलें तरी चालेल पण चांगल्या वळणाचीं माणसें मिळावींत ही अपेक्षा मुलीचें लग्न करतांना बाळगली जाते. त्याचप्रमाणें या उखाण्यासाठीं वापरण्यांत येणाऱ्या भाषेवरून व कल्पनेवरून माहेरच्या घराण्याचें मोजमाप केलें जातें. अशा वेळीं एकच गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत घेतली जाते ती ही कीं, मुलगी आईकडून हे धडे घेते आणि सासरीं ते पुढें गिरवीत रहाते! म्हणून हे उखाणे अतिशय मोलाचे मानले जातात. ह्या उखण्यांचें अंतःकरण मोकळें असतें, त्यामधील विचार खेळकर असतात आणि त्यांचेसाठीं वापरली जाणारी भाषा चटकदार असते.

रामायणमहाभारतापासूनहि या उखाणे घालण्याच्या चालीरीतींचे धागेदोरे गवसतात. म्हणून परंपरेनें बराच काळ चालत आलेलें असें मायमराठीचें हें एक मौल्यवान लेणें समजलें जातें.

# साधी राहणी

अनुक्रम



संग्राहिका
**सौ. सुशीलाबाई दाणी**
बुलढाणा

१ बुलढाण्याला जातांना लागतो अजिंठ्याचा घाट × × × रावांचा आहे पाटलांसारखा थाट

२ कपाशीचं शेत बोंडांनीं फुललं, भिरभिर नजर टाकतांना × × × पाटील खुललं.

३ जवारीचं पीक मोत्यांचे दाणे, भरल्या शेतांतून चालले × × × पाटील राणे.

४ शेताचे दागिने नांगर, ईळा, कोयता; मी रांधतें बिगी बिगी × × × पाटील खातो आयता.

५ बुलढाण्याच्या घाटांतून मोटार चालली वळणानं लक्ष्मीसंगं × × × बुवा गप्पा करतात ऐटीनं.

६ विद्येचा अभिमान नसावा, स्वाभिमान देशाचा राखावा × × × रावांसह करावी मी स्वदेशाची सेवा.

७ कन्या होतें मी मातृगृहीं, स्नुषा होऊनि आलें सासरीं × × × राव पति मिळाले भाग्यवान मी ठरलें खरी.

८ लालन पालन आजवरी मातेचं पांघरूण मायेचं × × × पति मिळाले जीवन सौंगडी, खरंच नशीब माझं भाग्याचं.

९ हृदयाची श्रीमंती, नीति, धर्म न त्यजीन कधीं ××× रावांचें लाभो सहकाय विनंती थोरपदीं.

१० कुणाची करूं नये निंदा, कुणाचं काढूं नये वर्म, ××× रावांच्या जीवावर हाच पाळीन धर्म.

११ ऋण काढून सण करणं संसाराला दूषण ××× रावांच्या सह मानानं जगणं हेंच आहे भूषण.

१२ मानापानासाठीं खोटेपणा नसावा ××× रावांच्या पत्नीनं हाच नियम पाळावा.

१३ धनदौलत मिळवतांना लाचलुचपत नसावी ××× रावांची पत सर्व लोकांत असावी.

१४ नोकरी असो, धंदा असो, नीतिमत्ता पाळावी ××× रावांच्या सहवासांत सुंदर तत्त्वें असावीं.

संग्राहिका
सौ. सुशीलाबाई बोरसे
अकोला

१ यमुनेच्या तीरावर कृष्ण वाजवितो मुरली ××× रावांच्या जिवावर सगळी हौस माझी पुरली.

२ देशांत देश हिंदुस्थान सरसा ××× रावांना घास घालतें गोड अनारसा.

३ तूप वाढण्याला घेतें चांदीचा चमचा ××× रावांना घास घालतें बुंदीच्या लाडूचा.

४ नागपूर माझें माहेर, नाशिक माझें गांव, ××× रावांचें नांव घेतें शेवंती माझें नांव.

५ लावीत होतें कुंकू, त्यांत होतें मोतीं ××× रावांसारखे भर्तार जन्मोजन्मीं चिंतीं.

६ चंदनाचे पाट त्यावर रुप्याचें ताट ××× राव माझे भुकेले सोडा माझी वाट.

७ ठाण्याच्या डोंगरावर फुलला पळस × × × रावांच्या छत्रीला सोन्याचा कळस.

८ झारी झारी पाऊस लागे मोत्यांच्या धारा × × × रावांच्या छत्रीला लावला पोवळ्यांचा तुरा.

९ मुंबईपासून पुण्यापर्यंत पेरला लसूण × × × राव गेले रूसून तर आणतें त्यावर बसून.

१० दारीं होता कोंबडा त्यांत होता पैका × × × रावांचं नांव घेतें सर्वजण ऐका.

११ आदघर मधघर मदघरांत घालीत होतें वेणी तिकडून आले × × × राव त्यांनीं फेकली गुलाबदाणी.

१२ कांचेची फुलदाणी धक्क्यानें फुटली, उठा उठा × × × राव तुमची माझी शपथ सुटली.

१३ आमच्या मागच्या दारीं आहे द्राक्षांचा वेल, × × × राव बसले पुजेला मी देतें वेल.

१४ आदघर मदघर, मदघरांत होती चूल, चुलीवर होता तवा, त्यावर भाजला रवा मी जातें माहेराला सासूबाई तुमी × × × रावांना जीव लावा.

१५ पुणेरी तांगा, मद्रासी घोडें, × × × रावांचें नांव घेतें सत्यनारायणाच्या पुढें.

१६ हुंड्यावर गुंडा, गुंड्यावर परात × × × राव बसले पुजेला तिकडून जा घरांत.

१७ रामासारखे पुत्र जन्मले कौसल्येच्या कुशीं × × × रामांचें नांव घेतें आनंदाच्या दिवशीं.

१८ तुळशीला घालतें प्रदक्षिणा, विष्णूला करतें नवस × × × रावांचें नांव घेतें आज आनंदाचा दिवस.

१९ जाई जुईच्या फुलांची माळी गुंफितो जाळी × × × रावांचें नांव घेतें संध्याकाळच्या वेळीं.

२० दारापुढें ओटा, ओट्यावर लावली तुळस × × × रावांच्या घरीं होईल संसार सुखाचा कळस.

२१ करंज्या, पुऱ्यांनीं भरला रुखवत × × × रावांनीं माझा हात धरला सर्वांच्या देखत.

२२ उभी होतें माडीला ऊन लागलें साडीला चांदीचीं घुंगरं × × × रावांच्या गाडीला.

२३ वाण घेतां घेतां माथ्यावर आलं ऊन × × × रावांना सांगतें राहावं जपून.

२४ इकडून डोंगर, तिकडून डोंगर, मध्यें भालू कुत्रं भुंकतं ××× रावांना पाहून माझं डोकं उठतं.

२५ बैठकीच्या खोलींत चांदीचा गल्लास ××× रावांच्या जीवासाठीं मी आपला जीव केला खल्लास.

२६ कांचेचं घंगाळ, गुलाबाचं पाणी, ××× रावांचं नांव घेतें मोहनराणी.

२७ कांचेच्या ग्लासांत गुलाबी सरबत ××× रावांच्या वाचून मला नाहीं करमत.

२८ मसाल्याची सुपारी चांदीच्या वाटींत ××× रावांना ठेवीन म्हणतें मी माझ्याच मुठींत.

२९ शुक्राची चांदणी उगवली ढगांत, जाऊं द्या मला घरीं ××× राव आहेत भारी रागांत.

३० उगवला सूर्यदेव, जगाचा राजा, ××× रावांचं नांव घेतें पहिला नंबर माझा.

३१ सोन्याच्या कर्णफुलांना मोत्यांचे झुबे ××× रावांची वाट पहात सारें गांव राहिलें उभें.



संग्राहिका
**श्रीमती अनसूयाबाई देशमुख**
चिमूर

१ कांचेची तसबीर धक्क्यानें फुटली ××× रावांच्या करतां मोटार बोदवडची सुटली.

२ साखरेची करंजी लाल झाली सपीटा सारणानें ××× रावांचें नांव घेतें संक्राती कारणानें.

३ राजवरकी बांगडी मागें पुढें केरवा ××× रावांच्या जिवावर शालू नेसतें हिरवा.

४ राजवरकी बांगडी मोल करी किंमतीनें ××× रावांच्या राज्यांत दिवस जातो गंमतीनें.

५ वर्तमानपत्रांत लिहून आली वार्ता ××× रावांचें नांव घेतें तुमच्या म्हणण्याकरितां.

६ पौर्णिमेच्या दिवशीं चंद्र होता ढगांत ××× रावांची कीर्ति पसरली जगांत.

७ चतुर्थीच्या दिवशीं मी निवडतें दुर्वा ××× रावांच्या जिवावर शालू नेसतें हिरवा.



संग्राहिका
**सौ. हव्वाबी रमजान खान**
पुणें

१ चांदी के रिहालपर सोनेका कलाम ××× का नाम लेती हूं सब महिफिलोंको[1] मेरा सलाम.

२ हरी हरी मेहंदी लगाई दोनो हात ××× का नाम लेती हूं बिस्मिल्लाके साथ.

३ तन्दूरके रोट रखा पुदीनमे ××× का नाम लेती हूं मक्कमदीनेमें.

४ सौ की साडी पचास का घोल ××× के राजमें हमारा तोल.

५ चांदीके गल्लास में सोने के काजू ××× की आई सवारी देशमुखने दिये बाजू.

६ सोनेके सुई में रेशमकी सुतली ××× के महेलमें ××× है पुतली.

७ चलती है गाडी उडती है धूल ××× के जेबमें गुलाब का फूल.

८ अछरदानी मछरदानी पलंग बिछाई नवा ××× के राजमें ××× देखती है बंबई की हवा.

९ कांचकी बावडी, मोती का पानी, मूं धोती है ××× की रानी.

१० चंदनके झाडको नागका येडा ××× और ××× का हमेशा के लिए जोडा.

११ आम्रा लगाई, मोगरा लगाई, चंबेली लगाई दाट ××× के महेलमें कजबनोंका[2] नाच.

---

१ मैफल, बैठक. २ कलावंतिणींचा.

१२ चांदीकी दिवार सोनेसे लिपी ××× का नाम कुरआनपर लिखी.

१३ लंबे लंबे बाल, पतली पतली चोटी ××× का नाम लेती ××× की बेटी.

१४ अबतक थी महेकेमें, अब चली सुसराल ××× का नाम लेती हूं रहे खुशहाल.

१५ आसमान की बात कुदरतके हात ××× और मेरा हमेशा का साथ.

१६ बेंड बजे जोरसे, शादी हुवी धूमसे ××× के राजमें जिंदगी गुजरे आरामसे.

१७ शहेतूतके झाडपर निले निले कबूतर ××× का नाम लेती हूं सुबहमें मूं धोकर.

१८ हरे हरे खेत, खेतों में थी बाजरी, बाजरीमें लगाई थी मेथी ××× मेरे हमेशा के साथी.

संग्राहिका
सौ. निर्मला धारप
पुणें

१ सोन्याची सुपली मोत्यानं गुंफली ××× रावांची राणी कामाला गुंतली.

२ निसर्गाच्या अंतरंगांत पावित्र्याचा सुवास ××× रावांच्या जोडीनं करीन आयुष्याचा प्रवास.

३ लता डोले, फूल डोले, डोले वनश्री ××× रावांचं नांव घेतें ××× भाग्यश्री.

४ लक्ष्मी शोभते दानानं, विद्या शोभते विनयानं ××× च्या जीवावर मी राहतें मानानं.

५ यमुनेच्या तीरावर कृष्ण वाजवतो पावा, बाळानं उजळला ××× रावांच्या वंशाचा दिवा.

६ जीवनाच्या प्रवासांत कधीं दुःखाचं ऊन तर कधी सुखाचा पाऊस ××× रावांचं नांव घेतें सासूबाईंनीं केली मंगळागौरीची हौस.

७ कमळांत उभी लक्ष्मी, मोरावरची सरस्वति ××× रावांचं नांव घेतें ××× भाग्यवती.

८ भारतमातेच्या पूजेला स्वदेशप्रेमाची पत्री × × × रावांचं नांव घेतें मंगळागौरीच्या रात्रीं.

९ गंगा यमुना सरस्वति येऊन मिळाल्या थेट, संसाराच्या सारीपाटावर × × × न् × × × ची झाली भेट.

१० संसाररूपी सागरांत उसळल्या लाटा × × × रावांच्या सुखदु:खांत माझा अर्धा वाटा.



संग्राहिका
सौ. द्वारकाबाई अरणकल्ले
खरपुडी बु ॥ (पुणे)

१ पाण्याचे हंड्यावर फुलांचं झांकण × × × रावाचे हातांत सोन्याचं कांकण.

२ इकडून वारा तिकडून वारा मध्यें पावसाच्या धारा × × × राव बसले कचेरीला वरून पडती गारा.

३ मला नाहीं कळत मी आहें साधी × × × रावांचं नांव घेतें सर्व मैत्रिणींच्या आधीं.



संग्राहिका
**सौ. गंगाबाई पेठकर**
पुणें

१ माझा नमस्कार फुकाचा, मिळालेला आशिर्वाद लक्ष मोलाचा ××× रावांचा संसार होवो सुखाचा.

२ काळी चंद्रकळा खसखशी कांठ ××× रावांच्या नांवासाठीं केला समारंभाचा थाट.

३ देव मंदिरांत रत्नांच्या राशी ××× रावांचं नांव घेते समारंभाच्या दिवशीं.

४ पंगतींतल्या पानापुढें उदबत्तीचा वास ××× रावांचं नांव घेत मी देतें जिलेबीचा घास.

५ देवाची करणी नारळांत पाणी माझें मन ××× रावांच्या चरणीं.

६ आंब्याच्या झाडाला कोवळीं कोवळीं पत्री ××× रावांच्या डोक्यावरती मोत्यांची छत्री.

७ चोहोकडे चार लावल्या समया मध्यें आंथरलें आसन ××× राव बसले पुजेला तर लक्ष्मी झाली प्रसन्न.

८ गंधानीं भरले कचोळें त्यांत पडली मसूर त्यांच्या घराण्यांत ××× राव चतूर.

९ आवळीच्या झाडावर पंचरंगी पक्षी ××× रावांचं नांव घेतें चंद्रसूर्य साक्षी.

१० रत्नजडित सिंहासन भोंवताली मरवा ××× राव बसले पुजेला मी देतें दुर्वा.

११ समोर होतें तळें, त्यांत होतीं कमळें, त्यावर होता भुंगा, माझा निरोप ××× रावांना सांगा.

१२ रंगीत पाट, चांदीचें ताट ××× रावांचं नांव घेतें सोडा मला वाट.

१३ विष्णूला प्रिय गाय महादेवाला प्रिय नंदी ××× रावांचं नांव घेण्यास अशीच यावी संधी.

१४ सोन्याची वाटी, चांदीचा चमचा ××× रावांचं नांव घेण्यास आग्रह फार तुमचा.

१५ हिमालय पर्वतावर बर्फाचे खडे ××× रावांचं नांव घेतें सत्यनारायणापुढें.

१६ फुलांची वेणी गुंफीतो माळी ××× नांव घेतें हळदीकुंकवाच्या वेळीं.

१७ तुळशीची करतें पूजा, विष्णूची करतें शांति ××× राव दीर्घायु व्हावेत अशी माझी विनंति.

१८ मंद वाहे वारा, चंद्रभागेंत स्थिर चाले होडी ××× रावांची व माझी सुखी आहे जोडी.

१९ जन्म दिला मातेनं, पालन केलें पित्यानं ××× रावांचं नांव घेतें पत्नी या नात्यानं.

२० हिंदमातेच्या हातांत रत्नजडावाचे तोडे ××× रावांचं नांव घेतें वडील माणसांच्या पुढें.

२१ जाईजुईच्या झाडाखालीं फुलांचा विणला शेला ××× रावांचं नांव घेतें दिवस अस्ताला गेला.



संग्राहिका
**सौ. मंगला नावडीकर**
पुणें

१ लक्ष प्रदक्षणा घालतें उंबराला ××× रावांचं नांव घेतें पहिल्या नंबराला.

२ नऊ दिवस नवरात्र, दहाव्या दिवशीं दसरा ××× रावांचं नांव घ्यायला नंबर माझा दुसरा.

३ चांदीच्या ताटांत बर्फीची चवड ××× रावांच्या नांवाची सर्वांना आवड.

४ संध्येच्या पळीवर नागाची खूण ××× रावांचं नांव घेतें ××× सून.

५ हिमालय पर्वतावर बर्फाच्या राशी ××× रावांचं नांव घेतें ××× दिवशीं.



संग्राहिका
श्रीमती मालतीबाई परदेशी
पुणें

१ रत्नजडित सिंहासनावर उभा दत्तराज ××× रावांचं नांव घेतें अखंड चुडा भरा आज.

२ प्राथमिक शाळेंत ज्ञानाची वाहते सरिता ××× रावांचं नांव घेतें मैत्रिणींच्या आग्रहाकरितां.

३ रूणझुण जातें, खिडकीवाटे पाहतें, खिडकीला तीन तारा, आडकित्याला घुंगरं बारा, पान खातें तेरा तेरा, घाम आला दरादरा ××× राव बसले पलंगावर तर मी घालतें वारा.

४ रातराणीच्या सुगंधानं निशिगंध झाला मोहित ××× रावांना आयुष्य मागतें सासुसासऱ्यासहित.

५ उभी होतें मळ्यांत, नजर गेली तळ्यांत, पांचशेंची कंठी ××× रावांच्या गळ्यांत.

६ वेणीफणीच्या पेटीला बिलवरी आरसा ××× रावांना घास घालतें अनारसा.

७ अनुसया, सीता, सावित्री होऊन गेल्या जगीं सती तीन ××× रावांच्या चरणीं बाई मी असतें सदा लीन.

८ गळ्यांत सरी वाकूं कशी, पायांत पैंजण चालूं कशी ××× राव बसले मित्रापाशीं तर मोठ्यानं मी बोलूं कशी ?

९ पिकलेल्या पानांत बदाम घातले किसून ××× रावांना विडा देतें पलंगावर बसून.

१० चहा केला, चिवडा केला, कॉफी केली ताजी ××× रावांचं नांव घेतें सर्वांची होती म्हणून मर्जी.

११ मोठमोठ्या आकाराचे मोतीं वेचून काढले बारा ××× रावांचें नांव घेते माझं नांव तारा.

१२ सोन्याची बुगडी, मोत्यांचा कळस ××× रावांचं नांव घेण्याला मला नाहीं आळस.

१३ आले राम सीता न् लक्ष्मण दीर, ××× रावांचं नांव घेतें मंडळींनो व्हा स्थीर.

१४ काळ्या गाईचें लोणी, कड कड कढविलें, ××× रावांचे महालांत कारंजें उडविलें.

१५ हापूस आंबा पायरी, त्याच्या केल्या फोडी, ××× रावांच्या आंगठीवर राधाकृष्णांची जोडी.

१६ मी होतें मळ्यांत, चंद्र दिसतो तळ्यांत ××× रावांच्या नांवानें मंगळसूत्र बांधतें गळ्यांत.



संग्राहिका
सौ. इंदिराबाई भाटवडेकर
मुंबई

१ समुद्राला आली भरती, नदीला आला पूर ××× रावांच्यासाठीं आईबाप केले दूर.

२ गणपतीच्या डोक्यावर ठेवलें हिरेमाणकांचें छत्र ××× रावांच्या नांवानें बांधतें मंगळसूत्र.

३ सोळा वर्षांपर्यंत होतें माहेरच्या मायेंत ××× रावांच्यासाठीं जाईन सासरच्या छायेंत.

४ विद्येचा नसावा अभिमान, श्रीमंतीचा नसावा गर्व ××× रावांचं नांव घेतें ऐकत आहेत सर्व.

५ द्वारकेचा राजा, पाठीराखा द्रौपदीचा ××× रावांना मी घांस देतें साखरभाताचा.

६ आप्तांची भेट प्रेमाला येते भरती ××× रावांची जोड हीच जीवनाची पूर्ती.

७ स्वराज्याच्या बागेमध्यें गांधी झाले माळी ××× रावांचं नांव घेतें वरातीचे वेळीं.

८ वसंत ऋतूंमध्यें जशी येते कोकीळेची चाहूल तशीच मी टाकितें ××× रावांच्या घरामध्यें पाउल.

९ जिजाईनीं केला शिवादेवीला नवस, आज माधव मालतीचा आला भाग्याचा दिवस.

१० नमस्कार फुकाचा, आशिर्वाद मोलाचा ××× रावांचा संसार करीन मी सुखाचा.

११ श्रीकृष्णाची राधा, शंकराची पार्वती माधव मालतीच्या जोडीला आशीर्वाद देती.

१२ माहेच्या परिसरांत वेंचले मी ज्ञानकण ××× रावांचें नांव घेऊन सोडतें मी गुंफलेलं कंकण.

१३ शंकराचा सोमवार, गणपतीची चतुर्थी, माझ्या हृदयांत कोरली ××× रावांची सुंदर मूर्ती.

१४ भारतीय युद्धांत कृष्णांनीं सांगितली गीता ××× रावांचं नांव घेतें मी ××× त्यांची कांता.

१५ मृग नक्षत्रांत आनंदानं नाच करतो मोर ××× रावांच्या जिवावर लावीन कुंकवाची कोर.



संग्राहिका
**सौ. कुमुदिनी पवार**
चितळी

१ हिंदमातेच्या गळ्यांत स्वातंत्र्यफुलांची जाळी ××× रावांचं नांव घेतें बारशाचे वेळीं.

२ पेटी तबला शिकतां शिकतां वाजवली सतार ××× रावांच्या संसारांत धन्य झालें मी फार.

३ ज्योतिबा फुले यांनीं घेतला स्त्रीशिक्षणाचा कैवार ××× रावांच्या घरीं मन रमवितो माझा संसार.

४ नको मोतीं, नको चंद्रहार ××× रावांचं नांव हाच माझा अलंकार.

५ चंद्रोदयाला येती समुद्राला भरती ××× रावांना बघून सारे श्रम हरपती.

६ गोदावरी कांठची मुलगी कृष्णाकांठीं आली ××× रावांच्या नांवाचं मंगळसूत्र ल्याली.

७ चांदीच्या कढईंत कढविलं तूप ××× रावांचं दिसतं त्यांत कृष्णासारखं रूप.

८ वासांत वास घ्यावा केशराचा ××× रावांच्या नांवाचा आग्रह आहे फुकाचा.

९ आंब्याच्या झाडावर कोकिळा करितें कूजन ××× रावांच्या मूर्तीचें माझ्या अंतरीं चालें पूजन.

१० पुण्यापासून मुंबईपर्यंत लावल्या आगगाडीच्या तारा ××× रावांना मागतें औक्ष देवापाशीं शंभरावर सतरा.

११ आंत जातें, बाहेर येतें, घड्याळ्यांत वाजला एक ××× रावांचं नांव घेतें बाबरांची लेक.

१२ राधाकृष्णाची मूर्ति पहातें मी आरशांत ××× रावांचं नांव घेतें घरच्या बारशांत.

१३ दया, क्षमा, शांति, हेंच सुखाचं माहेर ××× रावांनीं केला सौभाग्याचा आहेर.

१४ बिल्वर केले, पाटल्या केल्या, सरी आतां करावयाची ××× रावांचं नांव घ्यायला मागं नाहीं सरायची.

१५ गोमंतकीय आंबा चवीला लागतो गोड ××× रावांची मिळूं दे जन्मोजन्मीं जोड.

१६ चमकली रोहिणी हंसला रजनीनाथ ××× रावांच्या जीवनांत माझी आहे साथ.

१७ सुशील सासू सासरे, सद्गुणी मातापिता ××× रावांचं नांव घेतें सर्वांच्याकरितां.

१८ काव्यामध्यें श्रेष्ठ अलंकार आहेत उपमा उत्प्रेक्षा ××× राव सुखी असोत हीच माझी अपेक्षा.

१९ चांगल्या कुळीं जन्मलें, चांगल्या कुळीं आलें ××× रावांच्या मुळं भाग्यशाली झालें.

२० सृष्टीच्या बागेंत सूर्यनारायण झाले माळी ××× रावांचं नांव घेतें सर्वांच्या पंक्तीच्या वेळीं.

२१ घर भरावं लक्ष्मीनं, जग भरावं कीर्तीनं ××× रावांचं जीवन उजळीत मी रहावं प्रीतीच्या ज्योतीनं.

२२ काश्मीरशोभा पाहून थक्क झाले कवी ××× रावांचं नांव घेतांना थबकला रवी.

२३ राम झाले विजयी सीतेला स्मरून ××× रावांचं नांव घेतें शांता-दुर्गेला स्मरून.

२४ सोन्याच्या कामाला सोनार लागतो कुशल ××× रावांचं नांव घेतें चांगलं अस्सल.

२५ चंदन कापूर कस्तुरी अत्तराचा वास ××× रावांचं नांव घेतें तुमच्याचकरतां खास.

२६ संसाररूपी बागेंत प्रेमरूपी सरोवर. आयुष्याचा प्रवास करतें ××× रावांच्या बरोबर.

२७ क्षत्रीय कुळीं जन्मलें भाग्य या कन्येचें ××× रावांचं नांव झालें सार्थक या जन्माचें.

२८ सौभाग्याच्या साक्षीनं काळ्या मण्याची पोत आली जीवनांत ××× रावांच्या असूं दे मी नित्य स्मरणांत.

२९. कण्वमुनीचा आश्रम शकुंतलेचं माहेर ××× रावांनीं दिला मला सौभाग्याचा आहेर.

३० सासू नी सासरे, जसा वाड्याचा कळस, नणंद अक्कावाई जशी दारींची तुळस, ××× रावांचं नांव घ्यायला मला नाहीं आळस.

३१ निळें पाणी, निळे डोंगर, हिरवें हिरवें रान ××× रावांचं नांव घेऊन. राखतें सर्वांचा मान.

३२ काशीच्या तांब्याला रामेश्वराची खूण ××× नांव घेतें ××× सून.

३३ गोट केले, पाटल्या केल्या. मध्यें लेतें केरवा ××× रावांच्या जीवावर शालू नेसतें हिरवा.

३४ चंदनाच्या पाटाला रुप्याचे ठसे ××× राव पाटावर बसे तर चंद्रसूर्य हंसे.

३५ गुलाबाचं फूल माळ्याच्या मळ्यांत ××× रावांचं नांव घेतें सवाष्णींच्या मळ्यांत.

३६ अंजिरी चोळीला मिऱ्यायेवढी गांठ ××× रावांचं नांव घेतें हळदी कुंकवाचा थाट.

३७ काळी निळी घोडी मुंबईच्या बाजारीं ××× रावांची खुर्ची वकिलाशेजारी.

३८ चांदीच्या ताटांत खडी साखरचे काजू ××× राव निघाले कचेरीला फौजदार देती बाजू.

३९. पैठणी नको, शालू नको, नको भरजरी शेला ××× रावांच्या हृदयांत जागा आहे मला.

४० सहस्र कमळामध्यें वास आहे लक्ष्मीचा, मला आहे अभिमान ××× रावांच्या नांवाचा.

४१ अहमदाबादी चंद्रकळा, तिला मोत्यांचा पदर ××× रावांच्या जिवावर हळदीकुंकवाचा गजर.

४२ रुप्याचा चौफुला त्याला लवंगा वेलदोड्यांचा सांठा ××× रावांच्या विड्यांत माझा आहे वांटा.

४३ गंगेची वाळू चाळणीनं चाळू, घरीं गेल्यावर × × × राव आपण सारीपाट खेळू.

४४ सोन्याच्या सोंगट्या, रुप्याचे फांसे, जज्यांच्या कचेरींत × × × राव खासे.

४५ वाटल्या डाळीचं केलं पिठलं, त्यांत खोबरं घातलं किसून × × × राव गेले रुसून तेव्हां सावित्रीनं तें खाल्लं चाटून पुसून.

४६ कोऱ्या घागरींत ठेवला लिंबांचा सार × × × रावांच्या राणीच्या गळ्यांत मोत्यांचा हार.

४७ रुप्याच्या ताटांत रायपुरी साखर × × × रावांना भूक लागली आतां जाऊं द्या मला लवकर.

४८ रत्नखचित डबी, त्यांत मोत्यांचा दाणा × × × रावांच्या स्वारीबरोबर सरस्वतीचा आला मेणा.

४९ प्रभातकाळीं निळ्या आभाळांत उगवतो सूर्यकांत, मनाचा लागत नाहीं थांग पण × × × राव दिसतात शांत.

५० कुरूदाची सहाण, चंदनाचं खोड × × × रावांचा शब्द अमृतापेक्षां गोड.



संग्राहिका
**सौ. मालती यादव**
कडेपूर

१ चंद्राची जशी चंद्रिका वशिष्ठांची अरुंधती तशीच मी आहें × × × रावांची आवडती.

२ पुण्यास जलमलें, मुंबईस शिकलें × × × रावांच्या जिवासाठीं नागपूर पाहिलें.

३ घोड्यावरला स्वार उंटावरला जोजला[1] × × × रावांचें नांव घेण्यास जाऊं द्या मला.

४ पेशव्यांच्या फौजेंत बिनीचे स्वार × × × रावांचें नांव घेतलें उघडा आतां दार.

---

१ उंट हाकणारा.

५ पेशव्यांच्या फौजेंत हत्तीवर निशाण × × × राव मला चाहतात जीव की प्राण.

६ चंदनी पलंग, चांदीचे खूर × × × रावांचें नांव सर्वांना मशहूर.

७ पूर्वदिशा फांकली, उदयास आला रवी, आमच्या कुलांत × × × राव जन्मले कवी.

८ दिल्लीचें सिंहासन पेशव्यांनीं फोडलें × × × रावांच्या जिवाकरतां मीं माहेर सोडलें.

९ स्वतःचा धर्म परधर्माहून मानावा श्रेष्ठ × × × रावांना मी ठेवीन सदा संतुष्ट.

१० चांदीच्या ताटांत दहींभाताचा काला × × × रावांचं नांव घेतें जयहिंद बोला.

११ सागवानी टेबलावर रूमाल टाकतें विणून × × × रावांचं नांव घेतें आग्रह केला म्हणून.

१२ विठोबाच्या शिखराला सोन्याचा कळस × × × रावांचं नांव घ्यायला मला नाहीं आळस.

१३ चांदीच्या ताटांत सोन्याच्या गिन्न्या × × × रावांचं नांव घेतें पवारांची कन्या.

१४ सोन्याची आंगठी हिरव्या शालूंतून झळकली × × × रावांची मूर्ति आगगाडींतून वळखली.

१५ मोठे मोठे मोतीं कानांतील कुडीला × × × रावांचं नांव घेतें मैत्रिणींच्या जोडीला.

१६ आत्तांच्या राज्यांत बांगड्या भरतें तीन तीन × × × रावांच्या खमीसाला फौन्टपेन एकच यीयमीन.

१७ चांदीच्या ताटांत, वेलदोडे घातले भातांत, × × × रावांची स्वारी निघाली कचेरीस, छत्री देतें हातांत.

१८ धाकट्यानें राखावा वडिलांचा आदर × × × रावांचं नांव घेतलें सोडा आतां पदर.

१९ सुनेस जशी सासू, तसा मुलास पंतोजी × × × रावांची झाली नाहीं कधीं मजवर नाराजी.



संग्राहक
**श्री. ग. वि. मिरजकर**
रहिमतपूर

१ चंदनाच्या झाडावरती देवी घेते विसावा ××× रावांचें नांव घेतें आशीर्वाद असावा.

२ साखरेच्या गाठया निरीच्या घोळ्यांत ××× रावांचं नांव घेतें सुवासिनींच्या मेळ्यांत.

३ माळ्याच्या मळ्यांत चालली होती मोट ××× राव घ्या पाण्याचा घोट.

४ गणेशचतुर्थीच्या दिवशीं गणपती केला शाडूचा ××× राव घांस घ्या लाडूचा.

५ द्राक्षाच्या वेलाला त्रिकोणी पान, मी हिंडलें हिंदुस्थान ××× राव मिळाले ही रत्नाची खाण.

६ चंदनाच्या झाडाखालीं नागिणीची वस्ती ××× रावांचें नांव घेतें आग्रह झाला जास्ती.

७ सोनेरी डबींत अत्तराचा बोळा ××× रावांचं नांव घेतें शंभर रुपये तोळा.

८ पंढरपूरचा चुडा, काशीचा विडा, मथुरेचीं पानं, खायला छान, चिमणा आंबा, त्याच्या केल्या फोडी, आईबापांना गोडी, समोर होती तुळसीची बाग, बागेंत होती सीता, तिच्याजवळ होती कळशी, कळशींत होतं गंगेचं पाणी ××× रावांचं नांव घेतें पंचामृतावाणी.

९ समोर होता कोनाडा, कोनाडयांत होती सरी, सरी गेली सरकून, नांव घेतें पारखून ××× रावांच्या हाताखालीं पांचशें कारकून.

१० काळ्या मण्यांची पोत हें सौभाग्याचं लेणं ××× रावांच्या जिवावर ××× चं अवलंबून जिणं.

१२ चंदनाच्या झाडाला नागिणीचा वेढा × × × रावचं नांव घेतें माझी वाट सोडा.

१३ सौभाग्याचं लेणं, काळया मण्यांची पोत × × × रावांच्या चरणीं अर्पण करतें माझी जीवनज्योत.

संग्राहिका
**सौ. जुबेदाबी शेख**
गोंदवलें बु॥

१ सासू सासरे भाग्याचे दीर माझे हौशी × × × रावांचें नांव घेतें हळदी कुंकवाचे दिवशीं.

२ मंगलदेवी मंगलमाते नमन करतें तुला × × × रावांचं नांव घेतें अखंड सौभाग्य दे मला.

३ आशिर्वाद लाखाचा, अहंकार फुकाचा × × × रावांचा संसार करीन मी सुखाचा.

४ सकाळच्या प्रहरीं नमन करतें दत्ताला × × × रावांचं नांव घेतांना आनंद होतो चित्ताला.

५ काशीसारखें शहर, प्रजेसारखा राजा × × × रावांचं नांव घेतें केल्या पुण्यांत अर्धा हिस्सा माझा.

६ रुक्मीणीनं पण केला कृष्णाला मी वरीन × × × रावांचा संसार सुखाचा मी करीन.

७ पांची पांडव सहावी द्रौपदी × × × रावांसारखे मिळाले पति, तर देवाचे आभार मानूं किती.

८ द्राक्षाच्या वेलाखालीं चरत होत्या हरिणी × × × रावांचं नांव घेतें वडील मंडळींच्या चरणीं.

९ जीवनरूपी सागरांत पतीपत्नींचा खेळ × × × रावांचं नांव घेतें संध्याकाळची वेळ.

१० मणी मंगळसूत्र हें माझें द्रव्य × × × रावांच्या आज्ञेंत रहाणें हेंच माझें कर्तव्य.

संग्राहिका
सौ. शरदिनी मोहिते
सांगली

१ देशांत देश हिंदुस्थान, जगामध्यें त्याचा मान ××× रावांची कांता देशासाठीं करील दान.

२ हत्तीवर अंबारी, उंटावर झारी ××× रावांची आली स्वारी, तर पहातात नगरच्या नारी.

३ संसाराच्या देव्हाऱ्यांत नंदादीप समाधानाचा, ××× रावांचा संसार करतें भाग्याचा.

४ संसारामध्यें मुख्य असतात कनक आणि कांता, ××× रावांना जन्म देणारी धन्य ती माता.

५ चमकली शुक्राची चांदणी, चंद्र बुडाला ढगांत, ××× राव पडले पदरांत तर सौभाग्यवती झालें जगांत.

६ दोनशेचा शालू, त्याला तीनशेंचा पदर, ××× रावांच्या नांवानं लेतें हळदी कुंकवाचा गजर.

७ चांदीच्या ताटांत सोन्याची सरी, ××× रावांचं नांव घेतें तुमच्या घरीं.

८ जटाधारी शंकराची गौरवर्ण कांति, ××× राव सुखी असोत हीच देवाजवळ विनंती.

९ संगीत नाटक सुभद्राहरण, ××× रावांच्या नांवाचं आज काय कारण ?

१० दाट मणीमंगळसूत्र मोतीं लावा आणिक, आत्याबाईच्या पोटीं ××× राव जन्मले माणिक.

११ आयाबाया म्हणतात, नांव घे नांव घे, लाजूं कशी नांव घ्याया ? मी तर ××× रावांची जाया.

१२ कृष्णाबाई नदी मध्यभागीं कमान, ××× रावांची मूर्ती कृष्णदेवासमान.

१३ चांदीच्या ताटांत दहिभाताचा काला, ××× रावांचं नांव घ्यायला आजपासून आरंभ केला.

१४ चांदीच्या तबकांत मोत्यांचे गेरे, ××× राव दिसतात बरे पण वागतील तेव्हां खरे.

१५ तिपेडी वेणींत मोती गुंफले एक लाख, ××× रावांचं नांव घेतें आशीर्वाद द्या लाख लाख.

१६ सोन्याची पाटली हाताला दाटली, ××× रावांचं नांव घेतांना खुशाली वाटली.

१७ मागें घालते पाटल्या, मध्यें घालतें बिल्वर, पुढें घालते छंद, ××× रावांचं नांव घेतें कला करा बंद.

१८ शिणगारलेला हत्ती मांडवापुढें झुले, ××× रावांच्या हातांत सुवासिक फुलें.

१९ भरल्या पंगतींत रांगोळी काढतें ठिपक्यांची, ××× रावांच्या भोंवतीं पंगत पडली मित्रांची.

२० शंकरासारखा पिता, गिरजेसारखी माता, ××× रावांची मी आवडती कांता.

२१ बारीक बांगडी भरतें किंमतीनं, ××× रावांचे सहवासांत दिवस जातात गंमतीनं.

२२ मेनकेच्या पोटीं जन्मली शकुंतला, ×××× रावांचे गुण पाहून अर्पण केली मला.

२३ गणपती हरिश्चंद्र सुटला वारा, रास करा, गाड्या भरा, ××× राव तुम्ही पेवाला जागा करा.

२४ एक शेर दुधाचा पावशेर खवा, ×××× रावांचं नांव घेतें लक्षांत ठेवा.

२५ चंद्रभागेंत बुडवितें चांदीचा घडा, ××× रावांनीं दिला मला सातारचा पेढा.

२६ चहा केला निवून गेला, पेरू देतें चिरून, केळीची काढतें साल, ××× रावांच्या जिवावर कुंकू लेतें लाल.

२७ अत्तरदाणी, गुलाबदाणी, चौफुला केला नवा, ××× राव कोल्हापुरची दाखवा मला हवा.

२८ काळी चंद्रकळा नेसतें कसून, ××× रावांनीं दिलेले पेढे खातें हंसून.

२९ काळी चंद्रकळा तिला कस्तुरी चांदणी, ××× रावांचं नांव घेतें मोहित्यांची राणी.

३० द्राक्षांच्या वेलीला त्रिकोणी पान, बाबा हिंडले हिंदुस्थान, तेव्हां सापडले ×××× राव छान.

३१ भाग्य उजळलं पत्नीचं, अंगठीवर चमकला हिरा, आकाशांत चमकला तारा, ×××× रावांचं नांव घेतें हाच माझा भाग्योदय खरा.

३२ नव्या संसारांत स्त्री असावी हौशी, ××× रावांचं नांव घेतें मंगलकार्यी दिवशीं.

३३ एकादशीच्या दिवशीं विठ्ठलाला वहातात तुळशी, ××× रावांचं नांव घेतें मंगळागौरीच्या दिवशीं.

३४ राम बसले रथांत, सीता बसली अंकावर, ××× रावांचं तेज झळकें माझ्या कुंकवावर.

३५ नीलवर्ण आकाशांत चमकतो शशी, ××× रावांचं नांव घेतें संक्रांतीच्या दिवशीं.

३६ कनकाच्या कोंदणांत हिरकणी शोभते ××× रावांची नि माझी जोडी अशीच खुलून दिसते.

३७ सोन्याचं तबक झाकतें शालूच्या पदरानं, शीलवती मी ××× रावांचं नांव घेतें विनयानं.

३८ शोधिली वसुंधरा प्रेमलुब्ध माता, ××× रावांची मी सुशीला कांता.



संग्राहिका
**कु. उषा जोशी**
औदुंबर

१ अक्राळ विक्राळ वीज चमकते ढगांत ××× रावांचं नांव घेतें धन्य झालें मनांत.

२ खोल्यांत खोल्या सात खोल्या, उघडून गेलें आंत, मदल्या खोलींत ताट लाडवानं भरलं काठोकांठ, ताटाला केली खूण ××× रावांचं नांव घेतें ×××ची सून.

३ तुळशी तुळशी, तूं माझी काशी, वृंदावनीं एकादशी, पाणी घालीन गंगेचं, विमान येईल महाविष्णूचं, विष्णू तूं गाता, जवळ, होती रूक्मीणी माता, तिनं सांगितल्या दोन खुणा, आम्ही अज्ञान लेकरूं, कृपा करून चालवावी माय भक्तीनं, वाढवावें सन्मानानं दे सत्यनारायणा आशीर्वाद, तुला करतें भक्तीचा नमस्कार.

४ तुळशी तुळशी, चंद्रभागा सुंदरी, तुझ्या उदकांत भिजली माझी निरी, हातीं ओल्या पडादिनीच्या निऱ्या उभी द्वारकेच्या दारीं, भेटूं दे गोकुळचा श्रीहरी.

५ उत्तम ऋषी, गौतमऋषी फुलं तोडतें निशिगंधाची न् भेट घेतें पांडुरंगाची.

६ सीतेला चालणं पडलं रामाच्या रथांत सुखी राहीन ××× रावांच्या संसारांत.

७ जिर साळीचा करतें भात, येळ लवंगाची केली शाक, वनगाईचं पिवळं तूप, दारीं चंदनाचा पाट, चुळ भरावी नदीची, कृष्णाबाईचं तिरीथ, दारीं दवबिन्याचं रोप, चांदीच्या ताटाळ्यांत चिकनी सुपारी, कडुकांत जातें, बंदुला शेला पदर पालवीतें, जा ग वहिनी उद्यां येतें, ××× रावांचं नांव तुमच्या देखत घेतें.

८ जरीचा पदूर अडकला तोड्यांत ××× रावांचं नांव घेतें बाळातनीच्या वाड्यांत.

९ चांदीच्या ताटांत केशरी बर्फी ××× मालक निवडून आले आमच्या ग्रामपंचायती तर्फी.



संग्राहिका
**सौ. यशोदा पाटील**
बागणी

१ आपुल्या मुलुखांतच व्हायचा आपल्या भाषेचा मान ××× रावांचं नांव घेतें ऐका देऊन कान.

२ उशाखालचा शेला पायाखालीं गेला, उठा उठा ××× राव कासराभर दिवस आला.

३ लावीत होतें कुंकू त्यांत पडलें मोतीं ××× रावांसारखा भ्रतार जन्मोजन्मीं चिंती.

४ आधी घातला चंद्रहार मग घातली ठुशी ××× रावांचं नांव घ्यायला नेहेमींच माझी खुशी.

५ एक पाय घरांत, एक पाय दारांत जडावाचं पदक ××× रावांच्या हारांत.

६ सागवानी पेटीला पोलादी चूक ××× रावांच्या हातांत कायद्याचं बूक.

७ शिसवी लांकडाचा देव्हारा त्यांत चांदीची मूर्ति ××× रावांची देशभक्त म्हणून जगभर कीर्ति.

८ काळी चंद्रकळा तिला मोतीचूर पदर ××× रावांच्या जिवावर हळद कुंकवाचा गजर.

९ चाकणच्या किल्ल्यावर ठेवल्या फौजा ××× रावांच्या जिवावर मारतें मौजा.

१० देवापुढं लावला ऊद; वास सुटला छान, ××× रावांचं नांव घेतें ऐका देऊन कान.

११ पूजेच्या साहित्यांत उदबत्त्यांचा पुडा ××× रावांच्या जिवावर भरतें हातभर चुडा.

१२ काळ्या चंद्रकळेवर ताऱ्यासारख्या टिकल्या ××× रावांच्या मळ्यांत खूप तुरी पिकल्या.

१३ काळ्या चंद्रकळेवर नक्षत्रासारखे ठिपके ××× रावांच्या हातांत गुलाबाचे झुबके.

१४ गाईच्या शिंगाना लावला सोनेरी रंग ××× राव बसले कामाला कीं, होतात त्यांतच दंग.

१५ गाण्याच्या मैफलींत पेटीचा सूर ××× रावांच्या भेटीसाठीं जनलोकांचा पूर.

१६ आईनं वाढवलं, वडिलांनीं पढवलं ××× रावांची होतांच सोन्यानं मढवलं.

१७ दारापुढं वृंदावन त्यांत तुळशीचं झाड ××× रावांच्या गुणापुढं दागिन्यांचा काय पाड.

१८ करवतकांठी धोतर आणि डोक्याला पगडी ××× रावांची स्वारी पहिलवाना-सारखी तगडी.

१९ वैशाखाच्या महिन्यांत उन्हाळ्याचा जोर ××× घराण्यांत ××× राव पुरुष थोर.

२० श्रावणाच्या महिन्यांत जिकडे तिकडे पाणी ××× रावांच्या भेटीसाठीं मी झालें आतुर चातकपक्षावाणी.

२१ नांवामध्यें आहे काय, नका हट्ट धरूं ××× रावांच्या नावांचा उखाणा चांगलासा जुळत नाहीं त्याला मी काय करूं ?

२२ घरोघरीं त्याचपरीं, कोणाला सांगायचं काय ××× रावांच्या आज्ञेशिवाय पुढें टाकत नाहीं पाय.

२३ सोन्याच्या घागरी गुलालांनीं घासल्या ××× रावांचं नांव घेतां सख्या सगळ्या हंसल्या.

२४ नको गोट पाटल्या, नको पिळाची सरी, ××× रावांच्या जीवावर काळी गळसुरी बरी.

२५ कौलारू घर त्याला मुरूमाची भर, अंबीरशाही फेटा, नारळी पदर ××× रावांच्या चेहऱ्याकडे पाहतांना थांबत नाहीं नजर.

२६ कल्चर मोत्याला सुईसारखे वेज ××× रावांच्या चेहऱ्यावर सूर्यासारखं तेज.

२७ साजूक तुपांत नाजूक चमचा ××× रावांचं नांव घेतें आशीर्वाद तुमचा.

२८ दशक नको, सुट्टे नको, अंक मोजा साठ ××× रावांचं नांव घेऊन बांधतें आठवणीची गांठ.



संग्राहक
**श्री. बा. रा. माणगांवे**
कोल्हापूर

## पतीनें पत्नीचें नांव घेण्याचे उखाणे

१ नळाची जशी दमयंती, अन् हरिश्चंद्राची तारामती, तशी सत्वाची तूं ××× धन्य मी तुझा पति.

२ भिल्लीणीच्या नृत्यानं शंकर झाला वेडा ××× च्या हातचा मिळतो रोज जंजीर विडा.

३ बायकोच्या पायगुणानं, पिकलं माझं ज्यात, न्यारी घेऊन येती × × × घोलांतल्या मळ्यांत.

४ देशावरचा सण मोठा बेंदराचा पोळा, × × × चं नांव ऐकायला लोक झाल्यात गोळा.

५ हिरवीगार साडी तिला लाल भडक घडी × × × च्या चोळीवर काढलीय रुपेरी खडी.

६ मोट ओढून ओढून बैल दोन्ही शिणती, × × × ला बघून माझी तहानभूक हरती.

७ उंसाला घातलं सल्फेट, गूळ एकरीं दहा गाडी, × × × च्या प्रेमासाठीं बांधली रंगीत माडी.

८ हातका गडगडतो आभाळांत, वीज झाली मोठी × × × गेली भिऊन मारली मला मिठी.

९ डब्बा भरून ठेवल्या गुळाच्या शाईच्या वड्या, × × × ला खुलून दिसतात हिरव्या रेशमी बांगड्या.

१० करलाच्या खोपींत गार पाण्याचा घडा, × × × शिकती लिहा वाचायला मी देतों धडा.

११ कोंड्याचा करती मांडा, हातीं अमृताची बुधली, × × × माझी सुगरीण मला दैवयोगानं लाभली.

१२ वनस्पतींचा रस, औषध रोज ताजं × × × नं केली शुश्रूषा दुखणं गेलं माझं.

१३ गुळाच्या गाडीचं हुतात रूपये पांचशें घट्ट, साजाच्या डोरल्यासाठीं धरला × × × नं हट्ट.

१४ तेलणीवर रूसली अन् अंधारांत बसली, माझी × × × मुळींच नाहीं आडमुठी तसली.

१५ दांत मोठा नांगराचा, फूल मोठं कापसाचं, धर्म मोठा कुणब्याचा न् मन मोठं × × × चं.

१६ दिवस नव्हत नटायचं, ढासं वारं सुटायचं, काम आतां सुगीचं × × × भरभर आटपायचं.

१७ भूंबीपूनव शेतांत, इष्ट मैतर येणार × × × माझी सुगरीण आग्रह करून वाढणार.

१८ दुध्या भोपळ्याचा ताणा छपरावर फुलणार × × ×च्या हातचा पेरा उमाप पीक येणार.

१९ जिराईत शेतीला लागतो जोडधंदा, × × × नं घेतली म्हस तर येतोय रोज रुपाया बंदा.

२० गूळ आपला पिवळा जरद, बाजारांत नंबर पहिला, × × × ठेव लागवडीचा हिशेब ऊंस कसा कसा पिकला.

* *

# जनपद उखाणे

अ नु क्र म



संग्राहिका
**सौ. कमलाबाई बडवे**
पंढरपूर

१ काळी डीचकी कंगोऱ्याची, आंत भाजी लिंबोऱ्याची, ईन मोठी ठकोऱ्याची,[1] कुंकूं लेती बारदानी, बारदानीचा आरसा, आरसा मागं परसा, परसांत होतीं केळं, केळीला आल्या तीन कळ्या, तीन कळ्यांची बांधली माडी, माडीवर होती तुळस, तुळशीची करतें सेवा × × × रावांचा न् माजा जोडा जन्माला जावा.

२ संबूच्या शिखरावरी पाऊस पडतो झीरीमिरी, परका[2] झाल्या बरोबरी, सुटली नानापरी, कोकणची भोरडी खडी काढण्या केल्या इलायावरी, गोळा केलं नदीवरी, खळं केलं सुर्यातळीं, मोडाया सांगितल्या कोकणच्या नारी, हात्तीवर हौदा, उंटावर झारी, कळस घ्यायला निघाली × × × रावांची स्वारी, तर पाहतात मिळून नगराच्या नारी.

३ रूणझुणू येत होती, खिडकी वाटं पहात होती, खिडकीला तीन तारा, अडकित्याला घुंगरं बारा, पानं खाती तेरा तेरा × × × राव बसले पलंगावर मी घालतें वारा.

४ नांव घ्या म्हणतां, जीव माझा नेणता, नेणत्याची कोवळी बुद्धि, ताक म्हणून वाढलं दुध, दुधावरली साय, तूप लावूनी केली चपाती मऊ, चपाती वरला भजा, आनंदानं जेवला राजा, निरीचा बघा थाट, ब्रह्मदेवाची गांठ, गांठ सोडावी राहूनी उभा, कपाळीं

---

१ फणकाऱ्याची. २ अनोळखी.

शोभा, कुंकवाची बघा, बघा ललाटीं, खालीं हळदीची दाटी, हळदीचा पिवळा रंग, कंवरपट्टयाची कडी, गरसुळीं गाती, आयना डाव्या हातीं, मुख न्याहाळीत होती, हातांत सुवर्णाचा चुरा × × × रावांचा मंदीलाला सोन्याचा तुरा.

५ बाबुळगांव शहर, तिथं भरती बाजार, वाघाचीं पिल्लीं खरेदी केलीं, हाजाराचा खिरज कमरेच्या शिरीं, स्वामी उतरले परवरीं, घेतला वऱ्हाडाचा छंद, तिथं घेतल्या पंचरंगी गाद्या, गाद्या लावल्या घरां, आपण मोठ्या शहरां, कळवातिणी घालतात वारा, सराफाच्या माड्या उघड्या, तिथं घेतल्या बुगड्या, बुगड्या टाकल्या खिशांत, आपण करांडे देशांत, तिथं बोलविली ऊदी रंगाची पैठणी, पैठणीचा रंग फिक्का, फिक्क्या रंगाची घेऊं नका, तिथं बोलाविली वाकडी नथ, वाकड्या नथीचा दुहेरी फासा, हाजाराचे मोतीं दोन, आशी लेणार कोण × × × × × × ची सून.

६ बसायला चंदनाचा पाट, चंदनाच्या पाटाला ठसे शंभर, रंगमहालीं मोत्यांचं झुंबर, मोत्याच्या झुंबराला दांड्या, रंगमहालीं बिलवरी हांड्या, बिल्बरी हांड्याची हवा किती जळं, अगरबत्तीची दिव्याचीं तेलं, असा कुणाचा रंगमहाल, रंगमहालीच्या अंगणीं जाईजुईचीं झाडं, त्याच्या तोडतें कळ्या, गळां गुफतें माळा, बसायला चौपाळा, चौफाळ्याच्या कड्या लानी[1], कळसाच्या बुगड्या, बुगड्याला मागतें झुबाराजा, माझ्या चित्ता जोगा, मार्ग म्होरं फरशी, मधें काढला आड × × × × रावांचं नांव साखरेपेक्षां ग्वाड.

७ पलंगाला दिला पलंग, लावला घरां, आपण गेलं शहरां, कळवंतीणी घालतात वारा, शहराच्या पेठं, तिथं घेतला चंद्रहार, चंद्रहाराचं सोनं मोठं नाजूक फार, चंद्रहाराची घडण मोठी नक्षीदार, गांठवायाला लागले तीनचार, तिथं घेतली चोरमाळ, तिथं होत्या सराफाच्या माड्या उघड्या, तिथं घेतल्या हजाराच्या बुगड्या, टाकल्या खिशांत, गेले कानडी देशांत, तिथं मागविली पैठणी, पैठणीचा रंग उदी फीका, कागदावर लिहून धाडतें फिक्क्या रंगाची घेऊं नका, वाकडी नथ, दुहेरी फासा, गेले बंगाली देशां, तिथं घेतले हजाराचे तोडे, तिथं घेतल्या विरोदी कोयऱ्या, जोडण्याची घडण मोठी नक्षीदार, तिथं घेतल्या गोठ पाटल्या, हातीं मनगटीं दाडल्या, तिथून परत येणं झालं, हैदराबादला, तिथं घेतलं जडीताचं मंगळसूत्र, तिथं घेतली टीका पानाडी, तिथं घेतले हजाराचे मोतीं, नथीला बसीवली टीक, कुडकाला बसवले मोतीं, अशी लेणारीन कोण होती, जाधवाची सून नेणती. सासु सासऱ्याचं नांव घेतलं पुसून, सराफानं घेतली खूण, तिथून परत येणं झालं, अशीलाच्या पोटीं घेतला जन्म उतरलं समुद्राच्या काठीं, मोत्या पोळ्याला

---

१ सुवक.

केली शालुची ओटी, तिथून परत येणं झालं, पहिला मुक्काम कुठं? कानगांवच्या पेठं, दुकानामधीं ऊभे कुड्याला बसवले झुबे, तिथून परत येणं झालं, दुसरा मुक्काम कुठं तर तासगांवच्या पेठं. तिथं घेतली मोहनमुदी, तिथून परत येणं झालं. तिसरा मुक्काम कुठं? साताऱ्याच्या पेठं. तिथं घेतली मोहनमाळ, तिथून परत येणं झालं. चौथा मुक्काम कुठं? पंढरपूरच्या पेठं. तिथं घेतला खळणीचा शालू, तिथं घेतला मलमलीचा सदरा, तिथं घेतला जरीचा मंदील, तिथं आली सर्व शृंगाराला शोभा. तिथून येणं झालं, पांचवा मुक्काम कुठं माढ्याच्या पेठं, तिथं घेतली तांदळ्याची लिंबोळीं, तांदळ्याची लिंबोळी, पांचपदरी शेजारी, मोत्याची गजरी, तिथून परत येणं झालं, सहावा मुक्काम कुठं? पुण्याच्या पेठं. तिथं घेतला कुलपाचा कारदोरा, तिथून परत येणं झालं, सातवा मुक्काम कुठं? बारशीच्या पेठं, तिथं घेतली कुंडलं, तिथून परत येणं झालं, आठवा मुक्काम कुठं? मुंबईच्या पेठं, तिथं घेतली सरपळी, तिथून येणं झालं. नववा मुक्काम कुठं? सांगलीच्या पेठं. तिथं घेतली घोसाची वजरटीक, तिथून परत येणं झालं. दहावा मुक्काम कुठं? दहाव्या मुक्कामाला काढलं आगीनगाडीचं तिकीट. आगीनगाडी सुटली वाऱ्याच्या पळीं, उतरले मोहळच्या स्टेशनावरी. तिथं घेतली घुंगराची गरसोळी, स्वामी आले, आनंद झाला. आकरावा मुक्काम कुठं? सोलापूरच्या पेठं. तिथं केल सर्व बाजार, रुपये झाले हजार, त्याची गणती कोणी केली? सोलापूरच्या सराफानं, तिथून परत येणं झालं. बाराव्यां मुक्कामाला आले आपल्या घरीं, जडीताचं मंगळसूत्र गाठविलं तुळजापुरीं. स्वामी आले आपल्या घरीं. श्रृंगार ठेवला, मंदीरीं जाऊनी बसलें, मैदानीं ऊन ऊन पाणी, विसणलं घंगाळांत, जलदी अंगोळ करा, ताट काढून केली तयारी, गेलें मंदीरीं सर्व शृंगार घातला अंगावरी, शंभर गांवच्या सोनाराची पारख केली. आपल्या जीवाची कसोशी केली. पण ××× राव माझ्या जडीताच्या मंगळसूत्राची घडण नाहीं बरोबर झाली.

८ कैलास माडी कांचेच्या पायऱ्या, आरं[1] लावा त्याला, हाजाराची पैठणी मला, पांचशाचा मंदील त्याला, जरीच्या चोळीला इस्तर[2] दिला, नक्षीच्या धोतराला चाटी गेला अमरावतीला, अमरावतीहून आणल्या पाटल्या, त्या माझ्या मनगटीं दाटल्या. आरलं कारलं, सोन्याचं सरलं, सर वजरटीक सोनारानं गाठवली, माझ्या गळ्याला दाटली, आशी नार कशी सभेशीं उभी? छत्तीसगांवचा कारभारी त्याची केली माती, मातीचं केलं कुसूं, मला आलं हांसूं, हंसली गालांतल्या गालांत, मला पुसती रंगमहालांत, रंगमहालांतून चालल्या नावा तर ××× राव सर्वी कामं सोडून मला आधीं आळंदी दावा.

---

१ अणकुचीदार खिळे. २ अस्तर



संग्राहिका
विद्या देसाई
भिलवडी

१ झुण् झुण् झुण्यांत एक पाय पुण्यांत, पुण्याचा बाजार, म्हशी घेतल्या हजार, पावशेर दुधाचा केला खवा ×××× राव तुम्ही दमानं जेवा पण भाजी तोंडीं लावा.

२ झुल झुंबराचं, फूल उंबराचं, कळी चांफ्याची, लेक बापाची, सून सासऱ्याची, रानी भ्रताराची, भरतार काय म्हनले नाहीं नांव कधीं घेतलं नाहीं.

३ काकरीत काकरी तुरीची, अवघड पायरी विहिरीची ××× राव म्हणतात भाकरी घेऊन ये न्याहरीची, तरच चोळी घेतो जरीची.

४ नदीचे कांठी तरंगते नौका ××× रावांचा नांव घेतें सर्वजण ऐका.

५ चांदीचा वाडा, रुप्याचं कडवेढा ××× रावांचा आला घोडा दिवाणसाब वाट सोडा.

६ मोहोळ गांव खेडं, कळवातीनीचा महाल वेशीपुढं, स्वामी झाले वेडे, स्वामींना लागले छंद, छंदाला बाजूबंद, स्वामी गेले बार्शी, बार्शीं घेतली गादी, आणली सतरंजी, परांज्याचा सुतार, मोठा कारागीर, जागा लागते सव्वा वीत, आणला पलंग, ठेवला घरीं, स्वामी गेले शहराला, शहारापाठीं घेतला चंद्रहार, चंद्रहाराचं सोनं मोठं नाजुकदार, घडणीस लागले तीन वार, तिथं घेतली बोरमाळ, बिरूदी मासूळ्याची घडण काय, जोडव्याची घडण बरोबर नाय, वाकडी नथ, दुहेरी फासा, स्वामी गेले मुंबई देशा, तिथ घेतल्या साड्या पैठण्या, साड्यापैठण्यांचा रंग उदी, माझ्या नांवाचा रंग घेऊं नका, फिक्क मलमली कुडतं, जरतारी फेटा, साऱ्या सिणगाराला शोभा आली, तेथून स्वामी परत आले, पहिला मुक्काम कुठं ? सांगलीच्या पेठं, तिथं घेतला मोत्याचा पदर, तेथून स्वामी परत आले. दुसरा मुक्काम कुठं ? कराड पेठं. तिथं मोटार चाले हवापरी, स्वामी आले आपले नगरीं, पाटपाणी करून मंदिरीं, पांची पक्वान्नांची केली तैयारी, एवढ्यांत आली ××× रावांची स्वारी.

८ खण खण कुदळी, मण मण माती, सारीविल्या भिंती, चितारले खांब, आत्याबाईच्या पोटीं जन्मले राम, रामन्हाई म्हनलें, नांव न्हाई घेतलं, पिवळ्या पिंतांबराचे सोडले झगे ××× शेताच्या बांधावर उभे.

९ ताग तागाची, मिशी वाघाची, झाड झुंबराचं, लांकूड उंबराचं, कळी चांफ्याची, लेक बापाची, सून सासऱ्याची, राणी भरताराची, भरतार भरतार म्हनलें काय, नांवासाठीं झुंजला गेलें, झुंजेचे बैल झुंजत ठेवले, गेलें सोन्याऱ्याच्या समोरच्या खोलीं, नेसलें पैठण घडी, पैठण घडीच्या पोटांत होती फणी, अशी सावित्री राणी शाणी ××× रावांच्या रागाचं तवाच केलं पाणी.

१० देवळांत होता खांब, त्याला आला घाम, उठा उठा ××× राव बैल गेला लांब. पाऊस पडतो झिरीमीरी, पाभरी चालल्या नानापरी, शेताला जातें हरकत, राशीला माझ्या बरकत, अधोली माप ××× राव म्हणतात ××× माझी सखी न् कोल्ह्यांनीं टाकली हुकी.

११ खळ्यांतली ज्वारी झाली पक्की न् ××× राव उभ्यानी गोण्या झोकी.

१२ पाडला पाटा, वाटला हिंग ××× राव जसे आरशांतलें भिंग.

१३ अष्टं गांव शार ? चारी भवतानी येशी, चारमोत्या पवळ्यांनीं भरला बाजार, नथीला रुपये दिले हजार, टिक्केला गोंडं चार, बाजूबंदाला रवा अनिवार, हातची पाटली, गळ्याची टीक, मासुळ्याचीं बोटं बारीक, मासुळ्याचीं बोटं उघडीं, मागल्या कानाच्या बुगडीचा जुबा ××× रावांना राणी ××× देते शोभा.

१४ आत्याबाई मायाळू, मामंजी प्रेमळ, जाऊबाई सुगारीण, तात्यासाब हौशी, ××× रावांचं नांव घेतें ××× दिवशीं.

१५ पाडाचा अंबा दिला दारींच्या पोपटाला ××× नांव घेतें चंद्रसूर्य साक्षीला.

१६ श्रावण महिन्यांत दर सोमवारीं येतो सण ××× रावांना सुखी करीन असा मीं केला आहे पण.

१७ मी आपली साधी, नेसतें खादी, ×××× रावांचं नांव घेतें सर्वांच्या आधीं.

१८ हिरवी चोळी पातळ मानाचं ×××× रावांच्या जीवावर लावते हळदी कुंकू मानाचं.

१९ पाडला पाटा फोडला हिंग दिली फोडणी, कडाडली ताकावर ×××× रावांचं नांव घेतें सर्वांच्या नाकावर.

२० तुन तुन तारा, पैशाला बारा ××× राव बसले खुर्चीवर मी घालतें वारा.

२१ सोन्याचं वृंदावन, त्याला मोत्यांचा गिलावा ××× रावांसारखा भ्रतार जन्मोजन्मीं मिळावा.

२२ जडावाचं मंगळसूत्र सोन्यामध्यें मढवलं ××× रावांच्या नांवामध्यें एवढं कां अडवलं ?

२३ झिरीमिरी पाऊस लागे मोत्यांचा धारा ××× रावांच्या छत्रीला हिऱ्यामाणकांचा तुरा.



संग्राहिका
**सौ. शशिकला पाटील**
उरूण—इस्लामपूर

१ चांदीचं तपेलं आंघोळीला, चंदनाचा पाट बसायला, जरीकांठी धोतर नेसायला, सान येवल्याचं, खोड बडोद्याचं, केशरीगंध लियाला, सोन्याचं पात्र, तऱ्हेतऱ्हेच्या कोशिंबिऱ्या, पक्वान्नाचीं ताटं, रांगोळ्यावरी पाट, उदबत्त्याच्या समया मोराच्या, ताट बिंदल्याचं, डबा गझनीचा, अडकित्ता धारवाडचा, चुना भोकरनचा, जायपत्री विजापूरची, चिकनी सुपारी कोकणची, पान मालेगांवचं, उभी राहिली मळ्यांत, सवासुनींच्या मेळ्यांत, नवरत्नांचा हार सासुबाईंच्या गळ्यांत, पांचशेंचा तुरा मामासाहेबांच्या मंदिलांत, डाव्या डोळ्याचा रोख, पायांवर धोतराचा झोक, कमरीं करदुऱ्याचा गोप, अत्तरदानीचा ताल, गुलाबदाणीचा भार, पलंग सातवाडचा, तक्या साटनीचा, गादी खुतनीची, वर जरीकांठी लोड, बोलणं तर असं कांहीं अमृतावानी गोड, त्या बोलण्याचं मला आलं हंसं, विसरलें आईबाप, बहिण भावंडांची नाहीं झाली आठवण, अशी तर कल्पना किती, एका खेड्याचे मालक आहे म्हणत्याती, ह्या हौसेला पडले तरी पैसे किती ? ह्या हौसेला बारा हजार पडला पैका, ××× पाटलांचें नांव घेतें सर्व मंडळी लक्ष देऊन ऐका.

२ आदघर—मादघर, त्यांत नांदं कृष्णराव बाबरांची नात, अशी काय लाडी, सदाशिव बाबरांची ध्वाडी, अशी काय घैण, विलासराव बाबरांची बहीण, अशी काय खूण, पुणदीकरांची सून, अशी काय खाची, उरूणकरांची भाची, अशी काय पाहुणी, येलूरकरांची मेहुणी, अशी काय तानी, ×××× रावांचं नांव घेतें अमृतावाणी.



संग्राहिका
श्रीमती मालतीबाई परदेशी
पुणें

१ खण खण कुदळी, नऊ मण माती, उभारले खांब, आत्याबाईच्या पोटीं जन्मले राम, रामांनीं पिवळ्या पितांबराचे सोडले सोगे × × × राव ऑफिसमध्यें उभे.

२ चांदीचा तस्त अंघोळीला, जरीकांठी धोतर नेसायला, चंदनाचा पाट बसायला, सहाण नवलाची, खोड बडोद्याचें, केशरी गंध लावयाला, चांदीचे गडवे, सोन्याचे पेले, आंत गंगाभागीरथीचें पाणी, पक्वान्नांचं भोजन, वर परोपरीच्या कोशिंबिऱ्या, पानं रामटेकचीं, डबा गोकर्णाचा, चुना महाबळेश्वराचा, चिकणी सुपारी सोलापूरची, वेलदोडा बागलकोटचा, जायपत्री विजापूरची, लवंग सातारची, गझनीच्या गाद्या, किनखापाचे लोड, हंड्या झुंबरांचा लखलखाट, × × × रावांच्या जिवावर माझा सारा थाट.

३ उभी होतें सुवासिनींच्या मेळ्यांत, गुलाबाचें फूल माळ्याचे मळ्यांत, नवरत्नांचा हार सासुबाईच्या गळ्यांत, मामंजीच्या मंदिलाला मोत्यांचा तुरा, दारीं परशीं तुळस, तेथें सांपडला कळस, डाळिंबीला आला बहर, अंजीर लागतो गोड, नाजुक केळ्याचा गाभा, पायीं पैंजणांचा भार, वर निऱ्यांचा घोळ, कंवरीं करगुट्याचा गोफ, मी हांसलें गालांत, त्यांनीं विचारलें रंगमहालांत, रंग महालाची काय हवा, गादी चौफुल्याची, उशी मोत्यांची, चांदीचें घंगाळ अंघोळीला, जरी पितांबर नेसायला, चंदनी पाट बसायला, केशरी गंध लावायला, केळीचें पान जेवायला, केशरी–भात पानावरी, पुढें उदबत्या रांगोळी, गरम भजी खायला, कात येवल्याचा, चुना बडोद्याचा, चिक्कन सुपारी नाशीकची, पिवळीं पानं मुंबईचीं, आईबापांची नाहीं आठवण, बहीण भावंडांची नाहीं सयी, असें शहाणेंपण किती, गाड्या गांवचा हत्ती, असें सोनें किती, तीन तळ बांधली माडी, उपर खण लाल, तिथें रामकळीचं झाड, जोडीला संत्रा मोसंबीच्या फोडी, लवंग खोचली विड्यावरी, विडा देतें रंगमहालीं, × × × रावांच्या हातांवर राधाकृष्णांची जोडी.



संग्राहिका
सौ. कुमुदिनी पवार
चितळी

१ 'झूल झुंबराची, पालखी सोन्याची
मांडी चंदनाची, आहे लाखाची.
लेक कोणाची ?—लेक देसायांची.
सून कोणाची ?—पवारांची.
रुखवत गेला सासूबाईकडे – सासूबाई म्हणतात नांव घे.
नांव आहे हळदीसाठीं, नांव आहे कुंकवासाठीं.
कुंकवानं भरल्या वाट्या – हळदीला नाहीं तोटा.
रांगोळ्यांची आरास – दरवळतो उदबत्त्यांचा सुवास.
सुवर्णाचं ताट, मांडला चंदनाचा पाट.
××× राव बसले जेवायला तर केला समयांचा थाटमाट.

२ रुणूझुणू झुण्यांत, बसून आलें मेण्यांत,
खणचोळी अंगांत, शेंदूर भांगांत,
लवंगा वाटींत, वेलची मुठींत,
सोन्याची किल्ली, उघडली खोली,
खोलींत होते हंडे सात, हंड्यावर परात,
परातींत भात, भातावर तूप,
सोन्यासारखं 'इकडचं' रूप,
रुप्यासारखा चिरेबंदी वाडा
××× राव तुम्ही हातांतील काम सोडा,
अन् मला पहिली माहेरीं धाडा.



संग्राहिका
**श्रीमती गंगाबाई खाडिलकर**
माधवनगर

१ *एक होती नगरी, नगरींत होतं तळं, तळ्याजवळ होता कंदील, कंदीलाजवळ होता शिपाई, शिपाईजवळ होता वाडा, वाड्यांत होता पाडा, पाड्याजवळ होता घोडा, तिथें होता चौक, चौकांत होतं देऊळ महादेवाचं, तिथें होती खुंटी, खुंटीवर होतं सोळं, सोळ्यावर होती चोळी × × × रावांची गंगाबाई भोळी.*

२ *एक होती नगरी, नगरींत होतं तळं, ततं होता खांब, त्याला होता कंदिल, शिपायानं बांधला होता मंदिल, ततं होता वाडा, वाड्यांत होता पाडा, पाड्याजवळ होता घोडा, वाडा होता चौसोपी, चौसोपींत होतं देवाळ, ततं होता महादेव, महादेवाम्होरं होता नंदी, तत होतं पुजेचं, तितं होतं सवळं, सवळ्याजवळ होती खुंटी, खुंटीवर होती चोळी, दत्तोपंत सांगत्यात राणीसाहेब महाराजांना संभाळून घ्या गंगा माझी भोळी.*

संग्राहक
**श्री. मधुकर इनामदार**
औंध

१ त्रिमली गांव शहर, भवतांनीं वेशी चार, मर्दी बांधला चिरेबंदी पार, रुपये दिले व्हते हज्जार, वर मोत्या पवळ्या बाजार, जवार आलं पेटं, लावा कुलुपासनी काटं, जवार गेलं निघून; पान पुतळ्या बघून, वजरटिकीला गोंडं चार, तोळबंदी भवरा अणिदार, मागं म्होरं बांगड्या चार, बांगड्याला टिकं, इरूद्या मासुळ्याची बोरं टीकं, इरूद्या मासुळ्याचीं बोटं उघडीं, मागती कानाची बुगडी, कानाच्या बुगडीला झुत्रे ×××× राव नित्य कचेरीला उभे. (माणदेश)

२ चौरंगावर बसायले, तांब्याचा घंगाळ अंग धुवायले, जरीचे धोतर नेसायले, केसरी गंध लयेयायले, केसरी गंध परोपरी कुसुमबरीचा आहे थाट, पांची पक्वांनांचा घमघमाट, डब्बे पडले तिनसे साठ, एक डबा धानुरचा, सुपारी चांदुरची, लवंग कुऱ्हयाची, पानं उमरावतीचीं, सुपारी धामनगांवची, चुना तयगांवचा, अडकित्ता नागपूरचा, ओत्रा आरवीचा, बाईलेला ठसा, ठसा सांगाडे मोतीं, चाळीसगांवचा कारभार ×××× रावांचे हातीं. (कौंडिण्यपूर--विदर्भ)

३ इकडच्या किम्यावर बरम्हांची खाण, आप्पाजीलें मिळाला हिंदुस्थान ××× रावांना सारखा पति मला मिळाला छान.

४ चांदीचं घंगाळ अंघुळीला, जरीकांटी धोतर नेसायला, चंदनाचा पाट बसायला, सान (सहाण) येवल्याची, खोड बडोद्याचं, केसरी गंध लेयाला, बारा मोसंब्या खायला, सोन्याचं ताट जेवायला, नासिकचा गडवा पाणी प्यायला, असे जेवणाचे विलास, रांगोळ्याचा थाट, उदबत्त्यांचा घमघमाट, जाईपत्री जाईपुरची, लंवग सातारची, कात बडुद्याचा, चुना लोनाळचा, पानपुडा पुण्याचा, वेलदोडा मुंबईचा, खाल्लीं पानं, रंगलीं तोंडं, भरगच्च गादी, रंगारंगानं भरला कळस ××× रावांच्या नांवावर मी करीत नाहीं कसलाच आळस.

 



संग्राहिका

**सौ. निर्मला धारप**

पुणें

१ फुगडी खेळतां खेळतां जमीन झाली काळी,
माझ्याशीं फुगडी खेळते लेकुरवाळी.

२ लाही बाई लाही साळीची लाही,
मुक्यानं फुगडी खेळणं शोभत नाहीं.

३ गणपतीच्या मागें उंदराचीं पिलं,
सगुणा म्हणते तींच माझीं मुलं.

४ पैंजण बाई पैंजण छुमछुम पैंजण,
माझ्याशीं फुगडी खेळते बूटबैंगण.

५ खार बाई खार लोणच्याचा खार,
माझ्याशीं फुगडी खेळते नाजुक नार.

६ आपण दोघी मैत्रिणी गळां घालूं वेढा,
गोड गोड बोलूं आपण साखरपेढा.

७ बारा वाजले एक वाजला समोर पडली आहेत उष्टी,
नवरा आणि बायको बसून करताहेत गोष्टी.

८ तुझी माझी फुगडी किलवर ग,
संभाळ अपुले बिलवर ग.

९ आपण दोघी मैत्रिणी गळां घालूं मिठी,
गोड गोड बोलूं आपण साखरपिठी.

१० नमस्कार करतें आशीर्वाद द्या,
लहान आहे सासूबाई संभाळून घ्या.

११ फुगडी फुलेदार भाऊ शिलेदार,
नणंदा मोकाणी जावा कोल्हटिणी.

१२ हरबऱ्याचं घाटं माज्या फुगडीला दाटं,
फुगडी पापा तेलणी चांफा,
सईची साडी राहिली घरीं,
बाप सोनारा नथ घडूं दे,
नथीचा जोड सवती बोल,
सवत कां बोलं ना,
यील मेल्या सांगीन त्येला, तुला ग मार दियाला,
बकरं कापीन गांवाला, हरीख माज्या जीवाला.



संग्राहिका
**सौ. शरदिनी मोहिते**
सांगली

(कोंबडा घालतांना म्हणावयाचा उखाणा)

घोडा घोडा एकीचा, एकीचा
पेठकरणी लेकीचा, लेकीचा

अशी लेक गोरी, गोरी
हळद लावा थोडी, थोडी
हळदीचा उंडा, उंडा
रेशमाचा गोंडा, गोंडा
गोंड्यांत होती काडी, काडी
काडींत होता रूपाया, रूपाया
भाऊ माझा शिपाया, शिपाया.

२

शिळ्या चुलींत चांफा, चांफा
नांव ठेवा गोपा, गोपा
गोपा गेला ताकाला, ताकाला
विंचू लावला नाकाला
विंचवाची झाली गुळवणी, गुळवणी
त्यांत माझी मिळवणी, मिळवणी
मिळवणीचा रहाट ग, रहाट ग
कोल्हापूरची पेठ ग, पेठ ग
पेठेला लागल्या शेंगा, शेंगा
अशी शेंग गोड ग, गोड ग
जिभेला उठला फोड ग, फोड ग
फोड कांहीं फुटेना, फुटेना
घरचा मामा उठेना, उठेना
घरचा मामा खैस ग, खैस ग
त्यानं घेतली म्हैस ग, म्हैस ग
म्हैस गेली चरायला, चरायला
मामा गेला मरायला, मरायला.

३

अरंड्यावर करंडा करंड्यावर मोर,
माझ्यासंगं फुगडी खेळती चंद्राची कोर.

४

ओवा बाई ओवा रानोमाळ ओवा,
माझ्यासंगं फुगडी खेळतो गणपतिबुवा.

५

आम्ही दोघी मैत्रिणी अट्टीच्या, अट्टीच्या,
साड्या नेसूं पट्टीच्या, पट्टीच्या.

६

खोल खोल विहिरीला उंच उंच चिरे,
तुझी माझी फुगडी गरगर फिरे.

७

आपण दोघी मैत्रिणी जोडीच्या, जोडीच्या
हातांत पाटल्या तोडीच्या, तोडीच्या.

८

चहा बाई चहा, गवती चहा
माया लेकींच्या फुगड्या पहा.

९

पहा तर पहा, उठून जा
आमच्या फुगडीला जागा द्या.

१०

अक्कण माती चिक्कण माती पाय घसरला,
प्रेमाचा नवरा शेला आणायला विसरला.

११

तुझ्या घरीं माझ्या घरीं आहे बिंदली सरी,
फुगडी खेळतांना बाई नको तालीवारी.

१२

एवढासा पाटा बाई जिरीमिरी वाटा,
छोट्या सुनेचा ठमकारा मोठा.

१३

आमच्या चुलीवर सांडगा, सांडगा
लिलूचा नवरा लांडगा, लांडगा.

१४

आपण दोघी मैत्रिणी जोडीच्या, जोडीच्या
वेण्या माळू फुलांच्या, फुलांच्या.

संग्राहिका
सौ. कुमुदिनी पवार
चितळी

१ आज मला ऐतवार, उद्यां मला सोमवार,
जोडवीं झनूकार, बिरूद्या कणखार,
दारीं होती मेख, मी कदमांची लेक,

२ चिकी बाई चिकी परातभर चिकी,
सारवल्या भिंती आम्ही देसायांच्या लेकी.

३ चुनाबाई चुना परातभर चुना,
सारवल्या भिंती आम्ही पवारांच्या सुना

४ पत्रीबाई पत्री रानमाळ पत्री,
जेजुरीच्या खंडोबाला सोन्याची छत्री.

५ लाहीबाई लाही मक्याची लाही,
मुक्यांनीं फुगडी शोभत नाहीं.

६ तवाबाई तवा, लोखंडी तवा,
भारूच्या लग्नांत बेंडबाजा लावा.

७ तुझ्या माझ्या घरांत उदबत्त्यांचा वास,
आपण दोघी मैत्रिणी फायनल पास.

८ सहाण बाई सहाण, कुरंजी सहाण,
मी पडलें लहान, पण तुला टाकीन गहाण.

९ गोण बाई गोण, भाताचं गोण,
तूं मला गहाण टाकणारी आहेसच कोण ?

१० लोणी बाई लोणी, ताकावरलं लोणी,
तुला गहाण टाकीन असं अग म्हटलंच कोणी ?

११ पावसाचं पाणी कौलांत ग कौलांत,
× × × मुली तुम्ही डौलांत ग.



संग्राहिका
**सौ. पार्वतीबाई किर्लोस्कर**
घटप्रभा

१ फुगडी फुलती, दोघे बोलती,
चौरीखालनं साप गेला चौरी डुलती.

२ आलंगडीवर पलंगडी, पलंगडीवर हार,
आज माझी मंगळागौर बोलूं नका फार.

३ काळा कासोटा भुईं लोळतो,
जेजूरीचा खंडोबा चक्र खेळतो.

४ समुद्रांतली वाळू चाळनीनें चाळूं
आपण दोघी मैत्रणी गंजीफानीं खेळूं.

५ हार बाई हार गुलाबाचा हार,
अण्णांनी बायको केली नाजूक नार.

६ खारिक बाई खारीक, साखरी खारीक,
दादांनीं बायको केली आपल्यापेक्षां बारीक.

७ चुना बाई चुना परातभर चुना,
पोत पेट्या घालूं आम्ही किर्लोस्करांच्या सुना.

८ चिपाड बाई चिपाड जोंधळ्याचें चिपाड,
अण्णांनीं बायको केली आपल्यापेक्षां धिप्पाड.

९ वरी बाई वरी डोंगरी वरी,
आमच्या गौरीला सोन्याची सरी.

१० आपट्याचं पान माझ्या झपाट्याखालीं,
काळ्यांच्या मुली माझ्या डाव्या हाताखालीं.

११ तुझी माझी फुगडी बनांत ग,
हाजाराची कुडीं माझ्या कानांत ग.

१२ फुगडी खेळूं एकी नदीच्या टोकीं,
आला कोल्हा घेऊन गेला आठल्यांच्या लेकी.

१३ कौल बाई कौल, कांचेचा कौल,
आमच्या विहीणबाईंना श्रीमंतीचा डौल.

# धैर्यवतीचे उखाणे

अनुक्रम



संग्राहिका
**सौ. गंगूबाई बाबर**
पुणें

१ *आला आला रुखवत वाजत गाजत, आंत उघडून बघती तर बदामाचं ताट, दोनशें खांडवा कापण्या तीनशेंसाठ;*

*दुसऱ्या दुरडींत गुलालाचा भार, व्याही केला हौसेदार, तिसऱ्या दुरडींत हळदी कुंकवाचे पुडे, रुखवत उघडतें आयाबायांच्या पुढें;*

*चवथ्या दुरडींत मुळाची शाई, रुखवत उघडती नवऱ्याची आई;*

*पांचव्या दुरडींत केळीची फणी, रुखवत उघडती नवऱ्याच्या बहिणी;*

*सहाव्या दुरडींत शेवया नखुली, रुखवत उघडते नवऱ्याची करवली;*

*सातव्या दुरडींत खांडवे निघाले ताजे तवानें, रुखवत ऊघडती नवऱ्याची भावजय जोमानें;*

*आठव्या दुरडींत चंद्राची कोर, रुखवत उघडती सासू माझी थोर;*

*नवव्या दुरडींत साखऱ्याची गवळण, रुखवत उघडती नवऱ्याची मावळण;*

*दहाव्या दुरडींत दिसला पन्हाळगड, रुखवत उघडून बघतेंय तर निघाले केळी नारळाचे घड.*

आकराव्या दुरडींत चोळीचे खण, रुखवत उघडून बघणारीचें खुलें दिसतें मन;
बाराव्या दुरडींत शेवायी ताजी, रुखवत उघडून बघती नवऱ्याची आजी;
तेराव्या दुरडींत वाजंत्र्यांचा ताफा, रुखवत उघडून बघतेंय तर सोळा सतरा गोपींनीं भरला सोपा;
चौदाव्या दुरडींत साखऱ्याचे पुडे, नवऱ्यांचे भावाला रुखवत उघडायला बोलवा पुढें;
पंधराव्या दुरडींत निघाला माल धडेधडे, नवऱ्याचे हातांत सोन्याचे तोडे;
सोळाव्या दुरडींत निघाली आरती, नवऱ्याकडे पाहून तहानभूक हरती;
सतराव्या दुरडींत निघाला ऊस, नवऱ्याकडे पाहून नवरी झाली खूश;
अठराव्या दुरडींत निघाला चहा, नवरा मागेल ते त्याला देऊन पहा;
एकोणीसाव्या दुरडींत वेळला भात, नवरानवरीचं आहे येवढं भलं दांडगं ग्वात;
विसाव्या दुरडींत करतें चहा कॉफी, कांहीं चुकलें असलें तर करावी आतां तुम्ही आम्हांला विहीनबाई माफी.

२ आला आला रुखवत, त्यांत होती बुगडी, विहीणी विहीणी घालतात मांडवांत फुगडी.

३ आला आला रुखवत, त्यांत होता पारवा, नवरीचा भाऊ म्हणतो माझें लग्न ठरवा.

४ आला आला रुखवत, त्यांत होतं फवं, विहीणीला आहे चहाची फार सवं.

५ आला आला रुखवत, त्यांत होते रुपये कांठोकांठ, विहीणीला तपकीर ओढतांना नाकांत बोटं घालायची सवय होती भरमसाठ.

६ आला आला रुखवत, त्यांत होता भोपळा, काका काकींचा घरच्या लग्नांतून जीव झाला मोकळा.

७ आला आला रुखवत, त्यांत होता तवा; विहीणीनं कपडे धुतले पानिपतची लढाई झाली तवा!

८ आला आला रुखवत, त्यांत होतं दावं, तेव्हां लुगडं धुतलेलं तुला काय ठावं?

९ आला आला रुखवत, त्यांत होती पेटी, आमची मुलगी बोलणारी नाहीं खोटी.

१० आला आला रुखवत, त्यांत होती नोट, विहीणबाई मागती पॅंट आणि कोट.

११ आला आला रुखवत, त्यांत होता बत्ता, आणि आमच्या मुलीवर नाहीं राहिली आमचीच सत्ता.

१२ आला आला रुखवत, त्यांत होतं खाण्याचं, नवरी नवऱ्याला म्हणते वेगळं कधीं रहायचं ?

१३ आला आला रुखवत, त्यांत होते गहूं, नवरा नवरीला म्हणतो उद्यां सवतं राहूं.

१४ आला आला रुखवत, त्यांत चोळीचा होता खण, विहीणबाई घालतात त्यावर फुकट मन.

१५ आला आला रुखवत, झाकत माकत, अर्ध्या पोळीसाठीं कां बसलात तुम्ही ठोकत ?

१६ आला आला रुखवत, त्यांत होती कट्यार, नवरा मागतो पंधरा हजाराची जमीन काळीशार.

१७ आला आला रुखवत त्यांत होतं गोण, आम्ही जमीन दिली तरी कसणार हा कोण ?

१८ आला आला रुखवत त्यांत होता आणा, आमचा मुलगा शेतकी करण्यांत आहे शहाणा.

१९ आला आला रुखवत, त्यांत होती किटली, जांवई शहाणा म्हणण्यांत हौस नाहीं कां फिटली ?

२० आला आला रुखवत, त्यांत होता पेढा, विहीणबाई चला आतां जेवायला वाढा.

२१ आला आला रुखवत, त्यांत होती पुरी, विहीणीच्या नाकापेक्षां नथीचंच वजन भारी.



संग्राहिका
**सौ. कमळाबाई काळे**
पुणें

१ आला आला रुखवत, त्यावर होतं जांभाळ, आमच्या नवरीला नीट संभाळ नाहीं तर आमचा भैरोबा हाय लई वंगाळ.

२ विहीणीच्या बहिणी, नका बोलूं उणं, आडवं लागलं पुणं, पुण्याची पायरी, नऊ लाखाची धायरी, धायरीची वडी, आडवी लागली किरकटवाडी, किरकटवाडींत फसलं, आडवं आलं खडकवासलं, खडकवासल्याचं पाणी नदीनाल्यांतून खेळवलं, व्याह्यांनीं विहीणीला उगीचच भुलीवलं.

३ पाणी आणा गंगेचं, मखर बांधा भिंगाचं, साती खिडक्या रंगमहाल, फुलं लावलीं हारोहार, विहीणी आल्या डोंगराच्या, पट्टया पाडा भांगाच्या, भांगीं भरला गुलाल, नेत्रीं घातलं काजळ, कुंकू लावलं टिळंटिळं, विहिणव्याही पलंगावर लोळं, मध्य तानं बाळ खेळं; तान्ह्या बाळाच्या हातांत नाजूक शेला, गरम झाल्या वारा घाला, नऊ महिन्याचे नवशे, कात बोळ्याचं तीनशें, दूध प्यायला दोन म्हशी, दोन म्हशीवर दोन हेलगं,[1] नऊ मण हुलगं, दहा मण गहूं, त्याचे प्रकार केले बहू, व्याह्याला विहीणीला घाला पोटभर जेऊं आणि आनंदानं उद्यां वऱ्हाड लावून देऊं.

४ विहीणीच्या बहिणी नका बोलूं उणं, आडवं लागलं पुणं, पुण्याची वारी, मधीं आली धायरी, धायरीचं वांगं कांहीं पोसना, भाऊराया पुसना, भावाला नाहीं माया, जातो तळेगांवा, तळेगांवचा कांदा, दोन्ही टाकळी बांधा, दोन्ही टाकळीमधीं भेंड्याच्या भिंती, कवठाला जाती, कवठ्याचा बाजार, थैमान शेजार, व्याही पडाला तुरुंगांत, रुपये गेले तीनशें साठ, धरा थेऊर कौलवची वाट, थेऊर कौलवच्या जमल्या आयाबाया, चला बोलाई पहाया, बोलाईचं आडनांव भारी, डोंगरी पेरले शेजारी, डोंगरी पेरणींतून घसरली, लोणीमधीं जावून पसरली, थोरली डुक्कर, धाकली ओंढूळकर, थोरलीच्या

---

१ रेडके

घरीं तळमळ, घेऊन आपटी करमळ, करडं लिंबू भरले दारीं, विहीण व्याह्याची गांठ पडली घोड नदीच्या बाजारीं, विहीण पडती व्याह्याच्या गळीं, आंदण मागती पानमळा आणि नदीकाठची मळी.

५ रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर अंडं, नवरदेवाच्या करवलीला मुलगा झाला कवडभांडं, तर तो साऱ्या मांडवांत हिंडं.

६ रुखवत आला, रुखवत आला डोंगरांनीं, विहीण डोकं खाजवी लोखंडी नांगरांनीं. रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर चंची, भाड्यानं डाग घालणारी विहीण कंची. रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर जांभूळ, उघडून पाहती तर लक्ष्मण रामाचं देऊळ. मांडवाच्या दारीं वेल गेला जाईचा, वाकडा तिकडा आणा घालूं नका आम्ही मर्जीतलीं माणसं म्हणून विचार करा त्यांचा.

७ रुखवत आला, रुखवतावर कट्यार, नवरदेवाला द्यायची होती मोटार पण आडवं आलं गटार.

८ माडीचा जानवसा कोण मागती हौशी, ती आहे नवऱ्या बाळाची मावशी.

९ मांडवाच्या दारीं हळदीबाईचा पाट गेला, नवऱ्या बाळाचा बाप न्हाला.

१० मांडवाच्या दारीं विहीण बोलती व्याह्याशीं परतीवाचून नाहीं झाल मी घ्यायची.

११ मांडवाच्या दारीं, विहीण चालली झुरझुर, वाट नाहीं डोंगर फोडा; तोंड धुवायला मोठा हांडा, हांडा पुरेना रांजण मांडा, दांत घासायला दिला वासा, वासा पुरेना तुळई तासा, तोंड धुवून बसली जेवायला, बारा पायलीच्या केल्या शेवया, पोट नाहीं भरलं जावया, बारा पायलीच्या केल्या तेलच्या विहीण म्हणते कालच्या, बारा पायलीच्या असतील त्या घ्या न्हाईतर वाटा धरा बघू सोईच्या.

१२ मांडवाच्या दारीं पिवळं झालं माझं बोट, रुखवत उघडतांना नवऱ्या बाळाला लावा हळदीचं बोट.

१३ मांडवाच्या दारीं पिवळी झाली माझी चोळी, रुखवत उघडायला बोलवा माझ्या नवऱ्या बाळाच्या करवली.

१४ पुऱ्या विहीण म्हणते झाल्या झुरझुऱ्या, बारा पायलीच्या केल्या रोट्या, विहीण म्हणते लहान मोठ्या, बारा पायलीच्या केल्या वड्या, विहीण म्हणते तिखट झाल्या थोड्या बारा मणांचा केला भात, विहीणीनं आखडला हात, बारा शेर खाल्लं तूप, विहीण म्हणते मला आलं नाहीं रूप, बारा खणांची शिवली चोळी, चौदा तोळ्यांची घातली ठुशी, आणिक मग विहीण आणि व्याही झाले खुशी !



संग्राहिका
**श्रीमती जानकीबाई पाटील**
बागणी

१ आला आला रुखवत त्यावर ठेवली विळती
नवऱ्याची करवली कोंबडीसंगं खेळती.

२ आला आला रुखवत त्यावर होत खोबऱ्याचं भकाल
रुखवत नेतां नेतां उसळलं गुरवाचं टकाल !

३ बागणीपासून कुंडलवाडीपर्यंत पेरले जवस
कुंडलवाडीच्या लोकांनीं बागणीचा मिळावा नवरा म्हणून केला नवस.

४ आला आला रुखवत त्यावर होतं दावं
आमक्याचा आम्ही नवरा केलेला तुम्हाला वो काय ठावं ?

५ आला आला रुखवत त्यावर होती भेंडी,
नवरीची करवली चोंबडी मेंढी.

६ आला आला रुखवत त्यावर होती कडी,
विहीणबाई आंत उघडून बघती तर होती तपकीरीची पुडी.

७ आला आला रुखवत त्यावर होता आंबा
रुखवत उघडती रंभा.

८ आला आला रुखवत त्यावर होती केळीची फणी,
रुखवताचा आणा घालणारी लयी दिसतीया शहाणी.

९ आला आला रुखवत आळी बोळांनीं
विहीणबाईचा कान खाल्ला टोळांनीं.

१० आला आला रुखवत दणाणलं जोतं,
आंत उघडून बघतें तर होतं साखरेचं पोतं.

११ आला आला रुखवत त्यावर होती कांद्याची पात,
रुखवत चांगला आणा नाहीं तर नवऱ्या मुलाचं भांडायला हाय लई ग्वात.

१२ आला आला रुखवत जाई जुईचा,
आयबायांनो कांहीं बोलूं नका रुखवत माझ्या आईचा.

१३ आला आला रुखवत त्यावर ठेवली झारी,
विहीणबाईला खोटं बोलण्याची सवय भारी.

१४ आला आला रुखवत रामाच्या सीतेचा,
विहीणबाईला नाद आहे पोथी ऐकायचा.

१५ आला आला रुखवत त्यावर होता मोर,
नवरा नवरी चंद्राची कोर.

१६ आला आला रुखवत, त्यांत आळं राखेचं,
विहीणबाई हळूच बसा पातळ आहे लोकाचं.

१७ आला आला रुखवत, त्यांत होता फवा,
विहीणबाईनं पातळ धुतलं मायणीचा तलाव बांधला तवा.

१८ आला आला रुखवत, त्यांत होती आंगठी,
जानूबाई असली वंगाळ तर नवरदेव तुमची करील चेचून दामटी.

१९ आला आला रुखवत, त्यांत होती पणती,
आमची विहीणबाई बेडकावाणी कणती.

२० आला आला रुखवत, त्यांत होती काडी,
विहीणीच्या डोक्यावरून गेली आगीनगाडी.



संग्राहिका
**सौ. कमलाबाई बडवे**
पंढरपूर

१ मांडवाच्या दारी यीन युवायानं विचार केला, मिळून गारदौंडचा बाजार केला; धारण पहिली कोल्हापूरीं, माप केलं सोलापूरीं, दळण केलं पंढरपूरीं, पेठ महाडांत, बाजार केला भोरांत, तिरीथ केलं यिहीनीनं, डोल दावलं पुण्यांत, दिवाळी दावली मुंबईंत, इनीला नव्हती साडी, इवाय मुंबईचं तिकीट काढी, बसाय कुई बाक्डी उतराय उप्पर माडी; बाजार कराया लालवाडी, हिंडाय फिराय मुंबईची चाळ, काम कराय ठकसाळ, ईनीसाब कराया संनूसार, म्हागली बावनचाळ; इतक्यांचा केला ठाव, इसलामपुरावर सोडली नांव, गावांचं नांव कोडीत, खिडक्या तिनशेसाठ, येरवड आणलं ओढीत, झांज चाले सोन्याचा लोट, जावून सांगी तानाजीच्या कानीं गोष्ट, भाजी घेतली भिंगरांत, परकार केलं पेठ नगरांत, यिरवडांत पाणी महाडांत, बैठक पिसवडांत, तांदूळ घेतले पुण्यासी, धुतलं पेठेसी, आदण ठेवलं गडावरी, चुळा भरल्या जुरीवरी यीन इवायाचा रुखवत आला वाघूलीवरी, काय सांगू यीनबाय मानपान घेतलं पानवाडी, विडे केले खांदवडीं, चुना लावला महमंद वाडी, कुरवल्या दोनी भावल्या लोणी, जळगांवांत वहातं पाणी, भिवर तिची न्हाणी, बोटवे तोडलें वंगपूरी पानाचं पिंपळ झोक्याचं लिंबगांव, करकंब कोरेगांव, दगडाचं वडगांव, गेंदाचं कुलगांव, उदास तावशी, चोराची मावशी, कुरवाय कुरली, सांगलींत शिरली, लोहकळी मोहकळी, कांडज वांगज, सरड लाट कुठ? कांबळी सराचं लिंबूर मोठं, ताडमाड मोत्यांचा वर माळा गोठं, खरंच सांगा ईनीबाय गांवाचं नांव हितं सांगू कां म्होरं कुठं? दादा, माझ्या गांवाचं नांव मिरकरोळ, भन भन करतं नेवर, नांदोर उठून पळतं, माकडाचं म्हाळूंग, अर्जा करी, नकटी पाळखांबी संसार करी, अड्याल तोंडलं, पड्याल बोंडलं मर्दी एक दसूर कोंडलं, कलदाने मायनी, आतांच्या कलीयुगांत पुरुषापरास स्त्री निघाली शानी, वजवाडी मुंडवी, आतांच्या कलीयुगांत स्त्री पुरुषाला वेड लावी, आडवं कातरखटाव, घोड दटाव, आतांच्या कलीयुगांत पुरुषापरीस स्त्री निघाली शिराव, खरं

सांगा यीनाबाय गांवाचं नांव? हितं सांगू दादा माझ्या गांवाचं नांव? कां म्होरं जावावं? आंबेगांव पाडेगांव अस्कली भारी गिरविला ईचारनी सारी, घेऊनिया मका पिकती भारी, हिचा इकरा हुतो फलटणावरी, बाल्याल केळं, परित्याला पान मळं, कुरगांव कुमटं सातारं एकटं, जळगांव जळतं, लसूरनं वलवल करतं. घटांत पडली माळ. माळाला देती गांठी, शिलंगणांनी केली गांठी. शिलंगणांचं सोनं, दिवाळीबाईनं केलं येणं. दिवाळीची पंती, सट झाली नेणती, सटीचं वांगं, सक्रान्त आली संगं, नव्या संक्रान्तीचं सुगड, पुनवेची लोंबी, शिपनाचा खेळ झोंबी, शिमग्याची पोळी होळीच्या पोटीं, शिंपन्यानं केली दाटी, शिपन्याचा पाडवा आला जबर दंग. पाडण्याची उभारती गुडी, आखईनं टाकली उडी. अखीतीची पूजती पांच कळस, बारा सणांचा आंबरस. कोण घेती तान्ही ××× पाटलांची राणी.

२ आला आला रुखवत पंढरीच्या ठायीं, विठ्ठल करी आंघोळ रुक्मीणी धुती पायीं, नऊ लाखाचा पितांबर नेसली नवरदेवाची आई.

३ आला आला रुखवत रुखवतावर तुरी, रुखवत उघडून बघा आंत रावण मंडोदरी.

४ आला आला रुखवत, रुखवतावर मका, रुखवत उघडून बघा आंत थेऊरचा सोपानकाका.

५ आला आला रुखवत, रुखवतावर दींड, आंत उघडून बघा महादेवाची पिंड.

६ आला आला रुखवत, रुखवतावर हारला, रुखवत पंढरींत करला, वैरागींत दुरडींत भरला, बार्शींत मिरविला; इंदापूरांत आतां आला, जमखिंडींत लागला खटला, गोतवडींत घरोघर वाटला. तितनं ईन उठली, म्हमई रानांत बसली, म्हमई रानांत भरला बाजार, माल पडला तीनशें हजार, दस्तूरी कल्याणचा शेजार, येतांना ईनबाई रुपये हजार घेती मांडवांत भांडण खेळण्या जाती.

७ मांडवाच्या दारीं ईन आली वरच्या येशीं, युवाय आला खाल्या येशीं; ईनीबाय ईनीबाय, मोकळ्या कां केशी? आमच्या एकादशी, फरावळीला काय करशी? नऊ नारळ· पन्नास केळी घेती, मनाच्या लाह्या सहज जाती, चंद्रभागेला काकड्याचं याल, खावावती बार्शीला, काय बारा मनाचा चाराचुरा, तांब्यावरल्या बारा तेरा मनांचं वज्जं, पुढाऱ्याची उपटा दाढी, पुढारी म्हणे माझं काय वाकडं, भटाच्या पाठींत घाला लांकडं, भट म्हणे मी केलं सोईचं, आतां तुमी नशीब बघा दोघांचं.

८ आला आला रुखवत, मांडवाच्या दारीं, उघडून पहातें आंत काय काय परी, शेवाया साजूक तेलच्या नाजूक, उडदाचे वडे, साखरेचे खडे, तुपाची केली दांतवनाची कळी, सायासाची फणी, आरकार परकार पन्नास फळं, आंबा, जांबळ, करवंद काळं,

शेंडी सकट पांच नारळ, देठासकठ पिकलीं केळं, जेवायाला काय वाढलं? जांब पेला, ताट वाटी, येवढी करणी कशासाठीं? तर सांगतें ऐका कीं, नवऱ्या मुलाच्या ऐपतीसाठींच. मांडवाच्या दारीं करंजाचा पाला नवरी बघून नवरा आला, इंद्रसभेला गेला इंद्रसभेचा आणला हात्ती. चंद्रसूर्याला पुसून, वर गांधारी कुंती बसून, विहीण न्हाली रात्रीं, चंद्रावळीचं घातलं इसान, त्याचं वर्तमान पुसून घेती तर विहीण मांडवांत येण्यास कां बरं भेती?

९ मांडवाच्या दारीं टाकले आंबेमोहर तांदूळ, विजापुरीं धुतले, कोल्हापुरीं शिजविले, गोपाळपूरीं पाठविल्या चिठ्ठ्या, गांव गुरसाळें बरोबरी, परत्यांत न्याहरी करी करकंबमधीं धुतले हात न् भोशांत झाली रुखवत उघडायाला लई रात.

मुक्ताबाई बहीण धाकटी, बालवयाची, आई हळद कुठं आहे? रुक्मिणीच्या हातीं सोन्याचा करा, लिंबू नारळ उतारा, मारण्या निघाला दुपारा, गेला मारुतीच्या पायरीवर. शिरहरी बोले झडझडा, आणा नवरदेवाच्या शिरठोणा, मग बोले सत्यभामा. नवरीचा कोठें गेला मामा? मग बोले सुभा, नवरदेव मांडवांत उभा, मांडवांच्या दारीं टाकला चौरंग पाट, नवरी-नवऱ्याचें लग्न लावण्यास देव आले तीनशें साठ.

काळ्या रानीं पाऊस पडला दनादनीं, गंगाजमुनास आलं पाणी, राही रुक्मिणीचा रुखवत, सीताबाई हळदीकुंकू देती, याचं वर्तमान सांगून घेती, आणि मांडवांत येण्यासच का विहीनबाई अनुमान करती?

१० आला आला रुखवत, रुखवतावर सरी, मारुतीनं आणला द्रोणागिरी.

११ आला आला रुखवत, मांडवाच्या दारीं, चिरेबंद हेळ, आंत उघडून बघतीया तर, राम लक्ष्मणाचा खेळ.

१२ आला आला रुखवत, रुखवतावर चांगली दिली असती मोटार, पण तुमच्या घरची वाटच नाहीं चांगली त्येनं घोर पडलाय फार.

आला आला रुखवत, रुखवतावर पेरू, मोटार यायचीच होती तर आम्हीं म्हटलं असतं कसंबी करू.

आला आला रुखवत, रुखवतावर हुता लसून मोटार कुठली आणावी जावा कैकाड्याच्या गाढवावर बसून.

१३ आला आला रुखवत, रुखवतावर तुरी, नवरी दिसली बरी पण नांदल तवा खरी.

आला आला रुखवत, रुखवतावर बेगडाचं पान, नवरी दिली छान पण नवरदेव दिसतो लहान.

१४ आला आला रुखवत, मांडवाच्या दारीं, काय काय वरी, बेगडाच्या कमानी झळकल्या नारळांच्या तोरणानं नानापरी, दरवाज्यावरी चौकट चार पार करी, पाहीन म्हणलं खन खन करी, तुमार लहुबंदी वाजं भिंगरी, हा दनका म्हनावा कशाचा तरी! जांवयाला बुंदीची न्याहारी, करिती साखरेचा पाक, साखरेचा पक्का झाला पाक, थोडा करितें खव्याचा पेढा, पेढा झाला इयाक, खव्याच्या पेढ्याला तूप आटतं भारी, अनारस करतें तरी, कसकस लावूनी वरी, पांडवाच्या कोनीं समया लावा दोनी, समई जळाल्या दोनी, ह्या अन्यायाला उत्तर द्या बऱ्या बोलानं, काय? मगच ईनीबाय मांडवांत पाय टाका पाय!

१५ मांडवाच्या दारीं खिरीचं गाडगं कानपडतं[1], यीन मागती तानवडतं[2], तानवड्याला न्हाय बळ. यीन मागती उसाचा थळ उसासाच्या थळाला न्हाय गुंडी, ईन मागती हरभऱ्याच्या डाळीची वडी, डाळीच्या वडीचा लागला ठसका, ईनीच्या झिंझीला बसला हिस्का. झिंझीच्या हिस्क्याला ईवाय राजस भ्याला. गाईचं दावं म्हशीची म्होरकी आणि वासराचं पेंडकं, तिनीचा विनला शेला. यीवाय राजस गेला. यीनीला भेला न् मग लहान थोरांना राम राम केला.

१६ मांडवाच्या दारीं काव ईनवाय तुमच्या बोलण्याची तस्ती, शेरा खाली वस्ती; ईनवाय आद्यांत मद्यांत नसती. वाकरी घोळांत दिसती. बोसल्याची नदी खळखळ वाजती. सांगुल्याचा मेला कुष्टी. बांधीन म्हणलं ईनीच्या पाष्टी तर तीच पडना दिष्टीं.

१७ आला आला रुखवत, रुखवतावर दागीन्याचा डबा, आंत उघडून बघा तर राम लक्ष्मणाची सभा.

१८ आला आला रुखवत, रुखवतावर गाजार, आंत उघडून बघा तर विठ्ठल रुक्मिणीचा बाजार.

१९ आला आला रुखवत, रुखतावर पान आंत उघडून बघा तर राम लक्ष्मणाचं धनुष्य बाण.

२० आला आला रुखवत, रुखवतावर कात आंत उघडून बघा तर, मुंगी पैठणचा एकनाथ.

२१ आला आला रुखवत, रुखवतावर तुरी, आंत उघडून बघा तर, सीता जानकी मंदोदरी. आला आला रुखवत, रुखवतावर मोत्यांची जाळी, आंत उघडून बघा तर सावता माळी. मांडवाच्या दारीं बांधली गाई, आंत उघडून बघा तर रामाची आई. काळ्या रानीं पेरला हरभरा, तिणी वावरला खालीं उरला काडीमोडा त्याचा बांधला

१ कांठतुटकं २ कर्णभूषण

भारा, तो नेला नंदूरच्या बाजारांत, त्याला आला रुपया. रुपाया मोडला सोयरा जोडला तिथं, एक आणा खर्च केला. आणे राहीले पंधरा, ईवायाचा बैल गेला बंदरां, तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले तेरा, बहिणीला घेतला डेरा. आणे उरले बारा खाण्यास घेतला कांद्याचा भारा. आणे उरले अकरा, इवायाच्या शेतांत होता डावरा. तिथं घेतला बकरा तर तिथं एक आणा खर्च केला, आणे राहिले दहा, आला विहिणीचा बा, त्यांना केला शेला पागुटा, तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले नऊ. आला विहिणीचा भाऊ त्याला आणली पान सुपारी, तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले आठ बहिणीला घेतला रहाट, तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले सात, विहीणीच्या राहटाचें मोडलें चाक. तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले सहा, विहीण रुसली, कोणांत बसली तिला केली चोळी कांकनं, तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले पांच, आणला कळवातणीचा नाच. तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले चार, आल्या विहीणीच्या बहिणी चार. त्या रुसल्या, त्यांना केले जेवण. तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले तीन ईवायाच्या घोडीला नव्हतं जीन, तिथं एक आणा खर्च केला. आणे उरले दोन, आली विहीणीची कुणाची कोण, तर ती रुसली, घेतलं पातळ, तिथं एक आणा खर्च केला, आतां आणा उरल एक तर सांगते ऐका उखाणा घालणारी आहे वाखरीकरांची लेक.

२२ मांडवाच्या दारीं ठेवली पेढ्यांची परात, नामदेवाचें लग्न झालें बेदरीं न् पंढरपुरी निघाली वरात. विठ्ठलाच्या रावळीं सोन्याची गाई, त्यांचा दर्शनाला आली रामाची आई. सोन्याच्या गाईचे पिवळे पाय, जरीचा पीतांबर नेसली रामाची माय.

२३ मांडवाच्या दारीं टाकली सेन्नी, नवऱ्याची कुरवली शुक्राची चांदणी. विहीण होती कुंदीं, नेसली चिंदी, धुतली केव्हां राजवाडीचं तळं बांधलं तेव्हां. राजवाडीचं तळं बांधलं परवां, विहीण नेसली पितांबर हिरवा, पितांबराला लागला वासा, लागला कसा तो वाजंत्र्याला पुसा.

२४ आला आला रुखवत मांडवाच्या दारीं, रुखवतावर कुंकवाचा पुडा, ईन मागती चिंतामणी घोडा. चिंतामणी घोड्याची चाल हालकी, ईन मागती पालखी. पालखीला चांदीचा खिळा ईन मागती सागवानी चौफळा. चौफळ्याला लावलें मोती, ईन मागती अंबारीचा हत्ती.

२५ अंबारीच्या हत्तीला रेशमाचा कोरडा, ईन मागती चैत्राच्या महिन्यांत हिरवा चुडा. मांडवाच्या दारीं शिद्याची पाटी, ईनीच्या कपाळाला पडली आठी. आतां ही आठी कशानं काढूं, बारा भुयांची पालखी धाडूं, ईन म्हणती मला कशाला पालखी, मी

तुळशीच्या फुलावानी हालकी. ईनीनं सहज पालखीला दिली मांडी, तर मोडली पालखीची दांडी, म्हणून ती न्हीऊन तोलली तर भरली सव्वा खंडी चांगली.

२६ नऊ महिन्याचं नरुशीं, काना बोलचं तिनशीं रुपये दिले बाराशें, बनवल्या मोहरा केढीचं मोल करा, पटला तर रुखवत भरा, न्हाईतर मागारी फिरा.

२७ शिवरात्रीचं पारणं करती जीवाच्या कारणं, नऊ नारळ, बत्तीस केळं, द्राक्ष सीताफळं, अंजीर, काशी भोपळं, विहीणीनं फराळ केला बळं, खाल्ली पाटीभर केळं, विहीणीनं फराळ केला नागर, खाल्ली पोतभर भगर, विहीणीनं फराळ केला बारका, खाल्ल्या पोतभर खारका. विहीणीनं फराळ केला, विहीण माळ्याला गेली, एक रसाची (पाद) पेली, एक गुळाची ढेप पार केली, चार पायल्या भाजले शेंगदाणे, मक्याच्या भाजल्या लाह्या ईवायी दादा जातां खजुरीचीं झाडं आणाया, कां बसूं धपाटं खाया ?



संग्राहिका
सौ. कमल दरेकर
मोहोळ

१ यीन आली पावनी करीन म्हणलं घाट, यीन गेली बघून पहांट, करायचं नव्हतं का मी करन्याची नव्हती ?

यीन आली पावनी, भाकरी होत्या शिळ्या तर ताज्या करावयाच्या राहूनच गेल्या, कां मी करण्याची नव्हती का करणारी नव्हती ?

यीन आली पावनी, करीन म्हणलं रोटी तर गहूं खपलीच्या पोटीं, म्हणून राहून गेली करायाची पोळी तर मी कां करायजोगी नव्हती का करणारी नव्हती ?

यीन आली पावनी, करीन म्हटलं भात तर तांदूळ साळी अंबाऱ्याच्या आंत, तर मग राहूनच गेलं, कां मी करणारी नव्हती का करायजोगी नव्हती ?

यीन आली पावनी, घेईन म्हटलं बोरं, यीनीच्या मागं खंडीभर पोरं, तर राहूनच गेलं कां मी करण्याजोगी नव्हती का करायची नव्हती ?

यीन आली पावनी, भरील म्हणलं कांकणं तर कासाराला आलं दुखणं, कां मी करण्याजोगी नव्हती का करणारी नव्हती ?

यीन आली पावनी, बस म्हणती खालीं तर घर निघालं वलं, म्हणून बसायला टाकीन म्हटलं पोतं, तर मुंबईला पोतं राहूनच गेलं ! तशी बसाय टाकायचंबी राहूनच गेलं म्हणून कां करायची नव्हती का करणारी नव्हती ?

यीन आली पावनी करील म्हटलं भाकरी तर तवाच चिलटानं नेला ! म्हणून राहून गेलं— तर कां मी करायची नव्हती कां करण्याजोगी नव्हती ? नव्हं तुम्हीच सांगा ?

यीन आली पावनी, घेईल म्हटलं लुगडं तर चाट्याचं दुकानच नव्हतं उघडं, म्हणून राहूनच गेलं. तर कां मी करावयाची नव्हती का करणारी नव्हती ?

यीन आली पावनी, भरीन म्हटलं तिची वटी तर वाण्याच्या दुकानीं नव्हती खोबऱ्याची वाटी, आतां काय करावं बाई ? म्हणतांना कशाच्या तरी नादांत राहूनच गेलं, म्हणून कां मी करण्याजोगी नव्हती का करणारी नव्हती ? शप्पथ हाय खरं सांगा.

या यीनीबाई मांडवांत, यीन रूसली काय मागती ? मागती वजरटीक. पण आधीं पिकूं दे बालेघाट नू मंग दिऊं म्हणावं वजरटीकी आठ.

या यीनीबाई मांडवांत, यीन रूसली काय मागती ? मागती वजरटीकीला गोंडं येऊंद्यात म्हणावं पैशाचं हांडं मंग दिऊं वजरटीकीला गोंडं.

या यीनीबाई मांडवांत, यीन रूसली काय मागती ? मागती हातचीं कांकणं, घरीं होऊंद्यात म्हणावं सराफाचीं दुकानं मंग दिऊं हातचीं कांकणं.

या यीनीबाई मांडवांत, यीन रूसली काय मागती ? मागती तांब्याची परात, बोली केली घरांत तवा नर नाहीं ठरलं नू आतां कुठली वो तांब्याची परात ?

या यीनीबाई मांडवांत, यीन रूसली काय मागती ? मागती तांब्याची घागर लेक दिली नागर नू आतां कुठली म्हणावं तांब्याची घागर ?

या यीनीबाई मांडवांत, यीन रूसली काय मागती ? मागती घंगाळी नू झारी, घाला म्हणावं आदीं नवरीला सोन्याची सरी नू मंग दिऊं तुमाला घंघाळी नू झारी.

या यीनीबाई मांडवांत यीन रूसली काय मागती ? मागती पलंगावर गादी, म्हणावं पडूं द्या पाऊस, येऊंद्या नदीला पाणी, पिकूं द्या कापूस आधीं अन् दिऊं म्हणावं मंग पलंगावर चांगली गादी.



संग्राहिका
श्रीमती मालतीबाई परदेशी
पुणें

१ मांडवाच्या दारीं पेरले धणे, विहीणबाईच्या बेंबींत बेडूक कन्हे.

२ मांडवाच्या दारीं पडला डबा, विहीणबाईच्या बेंबीवर दीडशें शिपाई उभा.

३ मांडवाच्या दारीं सांडला ओवा, विहीणबाईच्या बेंबींत बागुलबुवा.

४ मांडवाच्या दारीं, सजावटीची शोभा, विहीणबाईचा मोडला खुबा, तर विहीणदादानं डॉक्टर केला उभा.

५ मांडवाच्या दारीं, मकेची खंदाडी आणि विहीणबाईला विहीणदादांचा व्हंडा बैल हुंदाडी.

६ मांडवाच्या दारीं, मकेचीं कणसं, वाईट उखाणे घालूं नका, आम्ही लायकीचीं माणसं.

मांडवाच्या दारीं करवंदाची जाळी, विहीणीबाईच्या झिंज्याखालीं माकड ऊन टाळी.

मांडवाच्या दारीं, रुखवत आला भाराचा कमरीं करदोरा मोराचा, पायांत तोडा कुलपाचा, अंगांत बंडी झिलमिली, पहातात नगरच्या नारी, दृष्ट झाली लालाला; काजळ लावते गालाला, पुढाईताला आणा पुढं आणि आमच्या नवरदेवाला घाला कंठयाबद्दल सोन्याचं कडं.

७ मांडवाच्या दारीं, वरमाई काळी मोरी, तिच्या बंधूच्या आहेराचं शिंग वाजविती शिवेवरी.

८ मांडवाच्या दारीं आहे रंगीत पाळणा, सया नारीला सांगूं किती करवलीचा आहे गोपा तान्हा.

९ मंडपाच्या दारीं हलगी शिंगाडी कुणीकडे, नवरा मांगाच्या वाड्यापुढें.



संग्राहिका
डॉ. सरोजिनी बाबर
पुणें

१ आला आला रुखवत, गाड्या आल्या बारामतीं, माप केलें सोलापुरीं, दळण टाकलं इंदापुरीं, बाजार केला महाडांत, पाणी पेली भोरांत, नांदगांव तारगांव, बिवरून गोपगांव, पाण्यांतील पानगांव, धयांतील धयगांव, नको मला तोंड दावूं, गांवाचं पुडीद नांवू, गांवाचं नांव जावळी, ऊशाला पानं संवळी, ईवाय केला चांदाचा, शिरीं टिकला गंधाचा, खाईना धोंडा बांधाचा, नवऱ्याचा भाव उठा तिरसींग राव, त्याला विनवितो सारा गांव, नवरा म्हणतो नवरी आणा, करवल्या म्हणतात आम्हां पासी काय, धरा वाजंत्र्याचे पाय, वाजंत्री म्हणतात आमचा मेळा, धरा बामनाचा गळा, विहीण रुसली परोपरी, जाऊन बसली जानवस घरीं, बसाया टाकला ऊंच पाट, चोळी शिवली जरी कांठ, जरीकांठी महागाचा, चुडा भिंगाचा, असा आणा घातला कोणी, आईबापांची लेक शहाणी, रुखवत उघडती ××× रावांची राणी.

२ आला आला रुखवत, मांडवाच्या दारीं, झाडाचा पाला, नवरा नवरीचा जन्म झाला, खरं का खोटं बरम्याला पुसा. बरम्यानं सांगीतली कांचबंदी न्हाणी, आंत गंगा भागीरथीचं पाणी, यीन न्हाली रातीं, भांग भरून मोतीं, हातीं चंदनाची फणी, कुंकू लेती चोहूकोणी, त्याला मोतीं बारदाणी, ब्याही गेला इंद्रसभं, काशी गांधारी बसून, रामा चंद्रास पुसून, विहीणबाई आमच्या वाड्याला या, पायघड्या घ्या, वटीचा मान घ्या, हाळदं कुंकूं ल्या, आणि रुखवत उघडायला असं पुढं या.

३ आला आला रुखवत, त्यांत रूपये होते सतरा, मायणीची आली जत्रा, तिथं एक रूपाया खर्च झाला. रूपये राहिले सोळा, विहीणबाईचा गेला डोळा, तिथं एक रूपाया खर्च झाला. रूपये राहिले पंधरा, विहीणीबाईला नेली बंदरा, तिथं येक रूपाया खर्च झाला. रूपये राहिले चौदा, विहीणीबाईला न्हवता सौदा, तिथं एक रूपाया खर्च झाला. रूपये राहिले तेरा, विहीणीला न्हवता पाण्याला डेरा, तिथं एक रूपाया खर्च झाला. रूपये राहिले बारा आकरा, विहीणीनं मागीतला शिंगारी बकरा, तिथं एक रुपाया खर्च झाला. रुपये राहिले

दहा, विहीणबाईच्या संगं कोण आलं पहा, तिथं एक रूपाया खर्च झाला. रुपये राहिले नऊ, विहीणीचा आला भाऊ, तिथं एक रुपाया खर्च झाला, रुपये राहिले आठ, विहीण-बाईनं मागितला बसाया पाट, तिथं एक रुपया खर्च झाला. रुपये राहिले सात, विहीण-बाईचे आले गोत तिथं एक रुपाया खर्च झाला रुपये राहिले सहा. विहीणीचा आला बा कव्हां, तिथं एक एक रुपाया खर्च झाला. रुपये राहिले पांच, विहीणीबाईनं घातला नाच, तिथं एक रुपाया खर्च झाला. रुपये राहिले चार, विहीणीनं मागितला घोडेस्वार तिथं एक रुपाया खर्च झाला. रुपये राहिले तीन, विहीणीनं मागितला घोड्यास जीन, तिथं एक रुपाया खर्च झाला. रुपये राहिले दोन, विहीणीनं मागितली तांदळाची गोण, तिथं एक रुपाया खर्च झाला. रुपाया राहिला एक, विहीणबाईस झाला लेक, तिथं एक रुपाया खर्च झाला. सभा जागी झाली, सभा उठली, विहीण व्याह्याला करणी केली, तर तुम्हांला कां हो ही गोष्ट नवलाची वाटली ?

४ आला आला रुखवत, त्यांत होता गोंडा, विहीणबाईस बसाया टाका धोंडा, धोंडा पुरना चौरंग मांडा. तोंड धुण्यास घ्या हंडा, हंडा पुरना रांजन मांडा. दांत घासायला घ्या वासा, वासा पुरना तुळया तासा. बारा पायलीचा केला रसा, बिहीणबाई म्हणतात पुरेल कसा ? बारा पायलीच्या केल्या वड्या, विहीणबाई म्हणल्या आहेत थोड्या. बारा पायलीचा भात, विहीणीनं धुतला हात. बारा पायलीच्या केल्या रोट्या, विहीणबाई म्हणतात आहेत बारीक मोठ्या. बारा पायलीच्या केल्या पोळ्या, विहीणबाई म्हणतात आहेत शिळ्या. बारा पायल्यांचे केले उंडे, विहीण म्हणते आहेत माळ्यावरी धोंडे. तिथून विहीणीला व्याही भ्याला, पुण्यास गेला. पुण्याहून आणली चोळी, विहीण झाली गोरी काळी तिथून व्याही मुंबईला गेला, तिथून आणली साडी, विहीणबाई मोडीनात घडी. तिथून व्याही सातारला गेला, सातारहून आणली ठुशी, मग विहीणीच्या मनाची झाली खुशी, आणि शेस भरायला आली भावल्यापाशीं.

५ आला आला रुखवत थोराचा, कमरीं करदूडा मोराचा, पायांत तोडा कुलपाचा. शिरीं मंदिल झुलपाचा, अंगांत खमीस झीरझीरी, पाहल्याती नगरच्या नारी, द्रिष्ट झाली लालाला, काळं लावा गालाला, येवढा रुसवा कशासाठीं ? नवरदेवाच्या हौसेसाठीं.

६ आला आला रुखवत न्हाव्याच्या आळीं, उघडा दाराची फळी, दाराच्या फळींत शेराचा भात, शेराच्या भातावर वडाचं पान, धरा कुरवलीचा कान, कुरवली म्हणती मी एकली, लावा वरमायला टिकली, वरमाय म्हणती मी पंचगंगा, जाऊन वऱ्हाडास सांगा, वराड म्हणतं आम्ही सुखाचीं पांखरं, धरा वाजंत्र्याचीं धोतरं, वाजंत्री म्हणतात आम्ही काय केलं, नवरानवरीचं घरदार दावून दिलं.

७ आला आला रुखवत, गुल धुंबराचं, फूल हुंबराचं, आठशें दुरून, नऊशें झारी, उघडून बघती काय काय परी; हळदीच्या वाट्या, पानाच्या पट्टया, गुळाचे खडे, उडदाचे वडे, पापड फरफरी, सांडगा नकसगिरी, वर भांडं गमज्या करी, जिरसाळीचे तांदूळ, दोन्ही आण्याबरोबरच घेतलं जांभूळ, पेढे बर्फी जिलबी न्याहरी, देटासकाट पिकलीं केळं, विहीणबाईनं करणी केली धन संपत्तीच्या बळं.

८ आला आला रुखवत मांडवाच्या दारीं, उघाडल्या निंदयापरीं, गूळ वाटला घरोघरीं, हातपाय आंथरून कांबराय लासरून, निजली बारामतींत, पाय टाकला पुण्यांत, उजाडलं मुंबई ठाण्यांत, मुंबई ठाण्यांत बांधला वाडा, बग्गीला जुंपला घोडा, बग्गीच्या घोड्याची चाल स्थीर, केली तीन मणाची खीर, तीन मणांच्या खिरीनं करणी केली ईनीनं, न्हारी गेली मंमादेवीला लवाजम्यानं, मंमादेवीचं तिनशें हत्ती, त्या गांवांत खाती न् चितळीला पाणी प्याला येती.

९ मुंबईत झाली मारामारी, पुण्यांत आली वर्दी, इस्लामपुरचे खटले, साताऱ्यांत मिटले, बंदरचा मेवा, कोकणाची खारीक, लोकं झाली बारीक, वाटी गांवाचं वाटानं, कडी गांवचं फुटानं, डीम्रीजीच्या दांतवानाची भरली कळी, आली शामगांवची हाळी, शामगांवची वलांडली शीव, चला पंढरपूरला जाऊं, पंढरपूरला फार छान पाहूं, दिवस उगवला नवझ्यार, वजरटीला गोंडं चार, ठुशीला पुतळ्या आनीवार, रात्रीं आणली मोहनमाळ, मोहनमाळेचं लेनं अवघड, पुन्हां आणली सवंगड, सवंगडचे मोतीं, नथ आनली रातीं, नथीचा फासा लवचीक, डोरलं आणलं आवचित, डोरल्याची झाली घडामोड, सोनाराची मोडली खोड, हडावळी जूडवीं इरूद्या चार, मधीं तोळबंदी तार, वर साकळ्यांचा भार, कंबरपट्ट्याला कुलपं चार, मागं पुढं गोठ पाटल्या, मधीं भरती छंद, इलायती केकती, नव्या नवतीचा कोका न् रुखवत उघडतांना नांव घेतांना काय काय म्हणतें नीट लक्षांत राका.

१० हिरे, माणिक, मोतीं, दोन्ही जोडून करती आरती, जुन्नरगांव पुणें धर्ती, उखलगांव बडा, सोमवारीं वाजे चौघडा, वराडाला गेला आडवा, आली कोळ्याची कावड, आली मारुतीची दवड, मारुतीला शेला, वेशींत गलबला कशाचा झाला, वेस्कारानं रस्ता आडविला, वेस्कराला कडी, आली ब्राह्मणाची उडी, ब्राह्मण म्हणतो आटपा, लग्न राहिलं दोन घटका, लग्न लावून नवरा हंसला, मामा कन्यादानाला बसला, कन्यादानाची थाळावाटी, जानवस घरीं मानवसपटी, व्याहीदादा विहीणबाईच्या हातीं. म्हणून ओवाळा इंद्रसभेच्या तुम्ही मंगलमूर्ति.

११ महा पुण्याची पुण्यनगरी, पुणें नगरीला नऊ नऊ पेठा, नऊ नऊ पेठांना नऊ नऊ वेशी, नऊ नऊ वेशींना नऊ नऊ बुरुज, नऊ नऊ बुरुजांना नऊ नऊ करंड, नऊ नऊ करंड्यावर नऊ नऊ मोर, नऊ नऊ मोरांना नऊ नऊ तुरे, एवढ्या तुऱ्यांची गणती करा, पुणें नगरीचा नवस खरा, पांचशें रुपयांचा मानपान जांवयाला करा नाहींतर मागं फिरा.

१२ लगीन ठरलं धोगावला, सोयरा जोडला कुंडलंतला, गुळभात केलाय बुरजाला, जातीं टाकल्यातीं कुंभारगांवला, गव्हाचं सामान पळसाला, मांडव घातला कोल्हापूरला, छत दिलाय बोरगांवला, कमानी काढल्यांत ताकारीला, गाड्याचा तांडा तडसारला, यींनीचं भांडण चिंचणीला, वाजरती वाजीवत्याती पंढरपूरला, चक्यार आलंय थोरल्या मदुदाला, आरतीवर घागर कटपाळ्याला, वर बाप चुकून गेला कुरंदवाडला, नवरा निगाला शिवरभाला, वळ जांबूळणीच्या रानाला, घोडा ईसारला कापूसखेडला, कुरवली चुकून आली निमसोडाला, आरतीचं भांडण ईंकल्याला, चितळी मायाणी पैल्या पंगतीला, वाडाय चालल्या नागवाडीला, पंगती पडल्यात्या भाळवणीला, ईस्ताऱ्या टाकत्याती हिंगणगांवाला, पुरण देत्याती रायगांवाला, भात वाडत्याती पुसेवळीला, कुंडली म्हणत्याती कळंबीला, बेंडबाज्या वाजतूंया औंधाला, पाणी काय तापतंय ल्हासूर्णाला, कळस घातल्याती येतगांवला, पाट टाकल्याती खेराड्याला, नवरा नवरी पाणी न्हात्याती आळ्याला, औषाद उडतंया कडीपूरला, हंडे पेटवल्याती तुपारीला, परकास पडलाय शिरस्याला, लग्नं लागत्यातीं तारनांदगांवला, शास भरत्याती कोरेगांवला वया बांधल्याती साकळ्याला, गोपा खेळतूंया लोणंदला, वराड चाललंया वाई देशाला न् रुखवत उघडाय लावताय तुमी हितं आमाला.

१३ पाऊस आला झीरीमीरी, चिखल झाला सरासरी, मूठ धरली चाड्यावरी, कोळपन केली खुरप्यावरी, काडणी काडली इळ्यावरी, पेंढ्या बांधल्या मेंढीवरी, गोळा केलं दड्डावरी, आसेगांव नगरीं, भवतनं डगरी, डगरीवर बुराज, बुरजावर बळी, बळीच्या नाकांत नथ, नथीचें मोतीं किती, मोत्यांची गणती करा, रुखवत उघडतांना × × × रावांचं नांव घेतें अबदागिरी धरा.

१४ आला रुखवत, रूखवतांत होता चहाचा कप, जांवई म्हणतो मला पाहूं द्या तिचं रूप, सासू म्हणते अगोदर द्या तिला तूप मग पहा तिचें रूप.

१५ आला आला रूखवत, रूखवतांत होता पेढा, व्याही म्हणतो मला हवा दहा हजाराचा जोडा, विहीन म्हणते नवरा नवरीचा जमला जोडा, कुरवली म्हणते तुमचे राहूंद्या सर्व बाजूला मला आधीं जेवायला वाढा.

१६ आला आला रुखवत, रुखवतावर होता खडा आनू भावजी आमचा पखालीचा जोडा.

१७ आला आला रुखवत रुखवतावर होती करपी पोळी, विहीन म्हणते मला शिवा जुन्या खणाची चोळी, व्याही म्हणतो शिवीन येत्या दिवाळीं तर रुसावयाची आली मेव्हणीवर पाळी.

१८ आला आला रुखवत मांडवाचे दारीं, लाडू कमी म्हणून व्याही करी मारामारी, विहीन म्हणते नका करूं मारामारी, उद्यां होईल त्यांची बरोबरी मग खाऊं सर्वजण शिरापुरी.

१९ आला आला रुखवत, रुखवतावर टाकलं गोळं, म्हवळाचं वऱ्हाड उकिरड्यावर लोळं.

२० खळ्याच्या कांठीं मदनाची पाटी यीनीबाई रुसल्या सागुतीसाठीं.

२१ आला आला रुखवत, रुखवतावर टाकले पेढे, आतां रुसले आमचे वेडे.

२४ आला आला रुखवत, रुखवतावर टाकली नोट, विहीणबाई मागतात जाकीट आणि कोट.

२५ आला आला रुखवत, रुखवतावर होती केळी, आंत उघडून बघतात तो दशरथाची बाळी.

२६ आला आला रुखवत, रुखवतावर होता पेढा, आमची लेक शहाणी नवरदेव आहे वेडा.

२७ आला आला रुखवत, रुखवतावर होती आरती, आंत उघडून बघतें तर शंकरपार्वती.

२८ रुखवत आला रुखवत आला काय काय परी, करडई नाजूक, पापडी साजूक, हळदीची वाटी, बेल्ह्याचीं पानें, मुंबईचा चुना, पुण्याचा कात, जुन्नरची सुपारी, नारायणगांवचा व्यापारी, उंबर तो झुंबर, ती गेली रुक्मिणीच्या काना, विहीणीनें आणला रुखवत येईना आमच्या मना.

२९. कोरी तवली कुंभाराची, विहीन बोल टचकाऱ्याची, करी कदुरीची, चितांगाचा फासा, ईनीबाई पलंगावर बसा, व्याह्यानी विहीण घेतली कडं नेली हलवायाच्याकडं, तिथं बांधलं जिलबीचं पुडं, विहीन फुंदू फुंदू रडं, मला तिकडच न्या म्हणं, व्याह्यांनीं विहीण घेतली कडं, नेली सोनाऱ्याकडं तिथं घडवलं सोन्याचं तोडं, व्याह्यांनीं विहीण

घेतली कडं, नेली अत्तराच्याकडे तिथं बांदल हळदीकुंकांचं पुडं, व्याह्यांनीं नेली विहीन आंब्याच्या वनीं, तिथं हातारला गंजीखाना विहीणीचा व्याही आला मना, बसाया पाट, तोंड धुवायला घंगाळ, विहीन म्हणते व्याही लई वंगाळ.

३० रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर मोर, नवरा बिजलीची बत्ती, नवरी चंद्राची कोर.

३१ रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर मेथीची भाजी आणि नवरीच्या बहिणीच्या नाकांतील नथ माझी.

३२ शिवरात्रीचं पारणं करतें जीवाच्या कारणं, नऊ नारळ बत्तीस केळं, द्राक्ष अंजीर सीताफळं, काशी भोपळा, विहीणीनं फराळ केला, बळंबळं खाल्ली पाटीभर केळं, पोतंभर भगर, पोटभर खारका, विहीन मळ्याला गेली एक रसाची नांद पेली, एक गुळाची ढेप खाल्ली, चार पायलीचे खाल्ले शेंगदाणे, मणाच्या भाजल्या लाह्या, हवाईदादा जाताय तुमी खजुरीचं झाड आणाया का बसूं धपाटं खाया?

३३ आला आला रुखवत विहीणबाई विचार करी, गहूं घेतले नळगांवीं, जाती टाकली तळगांवीं, आंदण ठेवले विल्यावरी, भात वेरला पेठेवरी, चुळभरा चुळवदी, पंगती पडल्या विनरवडी पान आणा पानवडी, कात आणा खडकत, खानावळी विडबांधा मजंवडी, वस्कार टाका सासवडी तो फरडे परांडेच्या किल्ल्यावरी, गाडी जुंपा बारामतीं, धारण केली सोलापुरीं, माप केले कोल्हापुरीं, बस्ता बांधला ब्रह्मपुरीं, भाजी घेतली नगरांत, रोख केली बिंगरांत, पाणी प्याली बागेंत, निजरा केला मोदात, आंघोळ केली, घोमत तिथून विहीण म्हणती दादा, हवा पाहू शिरवळची, पेठ पाहू आळंदीची, शिलंगन पाहू बडोद्याचे, डोले पाहू पुण्याचे, दिवाळी पाहू मुंबईची खडकीवडकी महंमदवाडी, पुण्याला काय दाट झाडी, तिथुन आगीनगाडी वरून पळं घाटाखालीं, कळवातणींचं तळं, तळ्याचीं खडकं, निमळे खडकावरला दिवा, दिव्याची वाडी मोरेकोन, गांव जाधववाडी, भंडारवाडीत बंदुक सोडी, अंजीर डाळिंबीची दाट झाडी, विहीणबाई बसली शिसारी, धनावड खोतावड, खडत खनावड, एकतपुर मंजवड मका पिकतो भारी, विकरा होतो जेजुरीवरी, जेजुरीखालीं सात खेडी, विहीन इरवाल्यात मंगळवार सोडी, व्याही म्हणतो विहीण किती हौसी एका इळात गांठली दमनवाडी तलावतोडी, तलावतोडीचा पराण ठावं, विहीण चिंतावली मनीं, गेली केसरच्या रानीं, केसरनाहीबरी वाई दिसती खरी, केंगाई किकळी हरणाई, बतूशी सरनदी सरली, एक नदी धावती, विहीणीला हिंडून आला फेरा, कराड कोल्हापूर, कोंकणचा वारा, पाडघरावर दिलाय धारा, तिथून समींदर दिसतो

सारा, पंचमुखी मारुती नेत्रधरी तपसरी, परांडेच्या डोंगरावरी नऊ लाख पायरी, भवतनी भारी वनगाई दारीं, तिथून विहीण पंढरपूरीं गेली, महाद्वारीं घेतले पेढे, विठ्ठल रखुमाईला घालती वेढे, तिकडून आला वैकुंठाचा तुका, विहीण म्हणती मला लेऊंद्या देवाचा बुक्का, नामदेव जनाबाई सोपानकाका, मुक्ताबाई यांचें दर्शन झालें फार पुंडलीकाच्या देवळाला विनातार, तिकडून आली तुळजापूरची कांठी, तुकाबाई केली दाटी, सहज आले देवदर्शनासाठीं, बोदलेबुवा सांवतामाळी यांच्या आरत्या हुल्या अरण गांवावरी, व्याही म्हणतो विहीणबाई साऱ्या नवसाचा झाला का झाडा, जुन्या दहिवडींत लक्ष्मण आर्यचा वाडा, जित्या रेड्याचं काळीज काढा, दहिटीच्या पाठला पुढं कोंबड्याचा भोदवाडा, तिथुन विहीण बाळोबाच्या डोंगरावर गेली व वचन दिलं खरं, पण साहेब बंगला बांधून देईना, भुई मारले सारे, काय सांगूं मस्कोबाची· बडाई राक्षसाची लढाई, लढाईचं उठलं थाळं, रावणाची लंका जळं, वानराचं तोंड काळं, कडीभाई रोडखिळा चिचकुकलीला दिला धका, काळा घोडा कोंठयाच्या मैदानीं, सखा उभा पारशाला, म्हणती खुशाल आहे काका विहीणबाई चालण्याच्या मैदानांत तिकडचं झुका. तोंड धुतले रत्नापुरीं, कुंकू ल्याली तुळजापूरीं, बाजार केला तारापुरीं, चांदसूर्य मेघराज्यानं कळ उत्पन्न केली थोर, तिथुन विहीण पडली पार, विहीणीला हिंडून आलं फेफरं, विहीणीला हिंडून आली भोवळ, विहीणीची वाट पहातो किल्ल्यांतील गारवौंड, विहीणीचे हिंडून सुजले पाय, विहीणीची वाट पाहती घाईटी, शिरभाय अंगणीं हुती परशी लावली जाई, या आन्याची उतर घाल काय, मंग टाका मांडवांत पाय, या रुखवतावर चढवा आण्याला आणा भिडवा नाहींतर सांदडीला तोंड दडवा.

३४ आला आला रुखवत, रुखवतावर फणी, विहीणीची बोलणी, नका बोलूं वनीं, आडवं लागतं पुणं पुण्याची पायरी, आडवी लागती जायरी, जायरीचं वांगं, गांग्यागत राहू, दिसल्यात भाऊ, भाऊला नाहीं माया, तळेगांव पाया, तळेगांव कांदां दवड टाकला बांदा, बांधल्या भेंड्याच्या भिंती शिखरापूर घाव घेती, शिखरापूरचा आड, मुख्यानं धाडला पाड, मुख्यानं धरला जोरा, पिंपळगांवानं केला फेरा, पिंपळगांवची येवत, म्होर लागती दवत, दवतीच्या गाया, त्याक झालं बाया, आजारी बाजारी डोंगरगांव शेजारी डोंगरगांव, कासाकुस निऱ्यात हुतं माझं भात, निऱ्यातळं पाटील जहागिरदार, म्होरं लागती गोईल नदी, गोईल नदीच कावळ, म्होरं लागं जवळ, जावळीचा कायगत मालची कायागत मळइंयात निघाल्यात हाती, काठयाला जाती, कवठयाचा भरला बाजार, सई म्हणती शेजार, सेमणला विकला मूळ, धाडा मांजरीला मूळ, मांजरीण पैक्याच्या जोरात, व्याही पडला तुरुंगांत, खरचले तीनशेंहजार, मोत्यांच्या भिवयांच्या आयाबाया, चला जाऊं बोलावया, बोलण्यांत निसरली, लोण्यांतून घसरली, लोणकरानं

दिली लाथ, डोंगरावर गेली, वचन दिलं साहेब बंगला बांधून देईना. भुई मारले सारे काय सांगूं म्हास्कोबाची बढाई, राक्षसाची लढाई, लढाईचं उठलं थाळ, रावणाची लंका जळं, वानराचं तोंड काळं, या आव्याचीं उत्तरं द्या बळं, पाय मग टाका मांडवांत, या रुखवतावर आण्याला आणा भिडवा नाहींतर सांदडीला जाऊन तोंड दडवा.

३५ आला आला रुखवत पाटलाच्या आळी आंत उघडून बघते तर दीडच पोळी. विहीण आली पाटलाच्या दारीं, हातीं तुपाची चरवी, वाढीना पोटभर नू उगचच करिती येरझार.

३६ आला आला रुखवत रुखवतावर होती करपलेली पोळी, विहीण म्हणते मला शिवा जुन्या खणाची चोळी.

३७ आला आला रुखवत, रुखवतावर तीनशें पापड ऐंशी वडा, कोन रुखवत फोडा म्हणल त्याचं नाकच धरून ओढा.

३८ आला आला रुखवत, रुखवतावर मोत्यांचा हार, आमची नवरी सुकुमार तर तिला सासुरवास करूं नका फार.



संग्राहक
**श्री. मधुकर इनामदार**
औंध

१ आला आला रुखवत, रुखवतांत नंदी,
रुखवत उघडाया आले कुंडलिक बंधु आधीं.

२ आला आला रुखवत, रुखवतांत चांदी सोन्याचा गडू,
नवरा नवरीचं लगीन लावाया आले तेहतीस कोटीच देव तर वाट सोडा बघूं.
ब्रह्मा विष्णू शंकर येती नवरा नवरीचं लग्न लावून जाती
उमा लक्ष्मी पार्वती, हळदी कुंकवाचं वाण देती.

३ आला आला रुखवत रुखवतांत लाह्या
रुखवत उघडाया आली अत्री ऋषीची अनुसूया.

४ आला आला रुखवत, रुखवतांत खेळाची फणी
रुखवत उघडाया आली नामदेवाची जनी.

५ आला आला रुखवत, रुखवतांत मोत्यांची आरती
रुखवत उघडाया आली लाडकी सून कमळावंती.

६ आला आला रुखवत, पांच दुरड्या रुखवताच्या,
सहावी दुरडी पानाची, रुखवत उघडाया आली विठ्ठल रुक्मिणी मानाची.

७ आला आला रुखवत, रुखवतांत काई बाई
रुखवत उघडाया आली रामाची सीताबाई.

८ आला आला रुखवत, साखरेचा घोडा, काशीचा चुडा, पंढरीचा हुडा, राही रुक्मिणीचा वाडा. पंढरपुरीं यात्रा मिळाली, गोपाळपुरची गर्दी फार, गोपाळपुरांत साधुसंतांची दाटी, चाफळच्या रामाची आली चिठ्ठी, चाफळचा पाहिला राम, नासिकचा निवृत्ती राहिला लांब, त्याला वाहतें बुक्का, पुढें आहे देहूचा तुका, त्याला वाहतें सोनं, फिरून मला आळंदीला जाणं, आळंदींत ज्ञानोबा मुक्ताबाईचं दर्शन घेतें, इंद्रावनीच्या माशाला पांचीं पक्वानांचं ताट देतें, इंद्रावनीं बनं दाट, लागली काशीची वाट, काशींत जातें, सारे देव पहातें, चांदी सोन्याचे तांदूळ विश्वनाथाला वाहतें, काशींत गेले, पाहिले सारे देव, पांची पांडव पांच जण भाव (भाऊ) पांडवाचा चढले डोंगर, पुढें दिसे शिंगणापूर, शिंगणापूरचा चढतें कड (कडा), वाईचा गणपती आहे पुढं, तो येईना हातीं, पुढें आहे पुण्याची पारबती (पार्वती-पर्वती), तिचा पाहिला हात, पुढें आहे गोरक्षनाथ, तिथं झालं हंसं, जोतीबा केदारी डोंगर दिसं, त्याला वाहतें गुलाल, त्याचं काळभैरी हळाल, काळभैरीच्या देवळाला चांदी सोन्याचं दार, औदुंबरीं यात्रा मिळाली फार दत्तात्रयाच्या दाराम्होरं देखीली तानी गाय, फिरून पंढरीला जाण हाय, पंढरींत जातें, विठ्ठलाचं दर्शन घेतें, पुंडलीकाच्या दाराम्होरं चंद्रभागेचं पाणी रुखवत उघडतें × × × × रावांची राणी.




## अनुक्रम



संग्राहिका
**सौ. मंगलाबाई नावडीकर**
पुणें

१ आधळ्याच्या गाई देव राखी.
२ भाऊ भाऊ शेजारी भेट नाहीं संसारीं.
३ वारा वाहील तशी पाठ फिरवावी.
४ सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं.
५ टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाहीं.
६ खाई त्याला खवखवे.
७ भित्यापाठीमागें ब्रह्मराक्षस.



संग्राहक
**श्री. बा. रा. माणगांवे**
कोल्हापूर

१ पाडव्याची गुढी अन् पावसाची उडी.
२ घरांत नाहीं दाणा, केळीचं दांतवण आणा.

३ खोबरं तिकडं चांगभला.

४ बसेल त्याचा मासा, फिरेल त्याचा ससा.

५ घे घे म्हणतां मोल पडे, दे दे म्हणतां मोल चढे.

६ काडी धरून डोंगर चढणें.

७ हानी सांगावी मनाला, लाभ सांगावा जनाला.

८ सारा गांव मामाचा, पण एक नाहीं कामाचा.

९ तरण्याचं झालं कोळसं, म्हाताऱ्याला आलं बाळसं.

१० तेलणीवर रुसली अन् अंधारांत बसली.

११ मारणाराचा हात धरवेल पण बोलणाराचें तोंड धरवत नाहीं.

१२ मेलेलं मेंढरूं आगीला भीत नाहीं.

१३ रंगीत वाडा न् मंदीं बांधला रेडा.

१४ उभं आहे तोवर लाखाचं, मेलं म्हणजे फुकाचं.



संग्राहिका
**श्रीमती पार्वतीबाई जोशी**
पुणें

१ म्हशीचीं शिंगं म्हशीला जड नसतात.

२ राजाची निघाली स्वारी आणि मशालजीचा घानवार.

३ नकटीच्या लग्नाला सतराशें सात विघ्नं.

४ हलवायाच्या घरावर तुळशीपत्र.

५ बैल गेला आणि झोपा केला.

६ बोलेल तो करेल काय आणि गर्जेल तो पडेल काय.

७ आयत्या पिठावर नागोबा.

८ नळी फुंकिली सोनारें इकडून तिकडे गेलें वारें.

९ कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ.

१० नांव सोनुबाई, हातीं कथलाचा वाळा.

११ चोराच्या मनांत चांदणें.

१२ चोर सोडून संन्याशाला सुळी.

१३ चोराच्या उलट्या बोंबा.

१४ आंधळं दळतं अन् कुत्रं पीठ खातं.

१५ न कर्त्याचा वार शनिवार

१६ ताकाला जायचं, भांडं लपवायचं.



संग्राहिका
**सौ. पार्वतीबाई किर्लोस्कर**
घटप्रभा

१ जळांत राहून माशाशीं वैर कशाला.

२ कानापाठीमागून आली तिखट झाली.

३ डोंगर पोखरून उंदीर निघाला.

४ वेलदोड्यानें थंडी व लवंगेनें उष्णता.

५ उथळ पाण्याला खळखळाट फार.

६ कधीं न घडे तें आवसे पौर्णिमेला घडे.

७ खाणें थोडें पण मचमच फार.

८ वाहत्या गंगेंत हात धुऊन घ्यावेत.

९ भीक नको पण कुत्रा आवर.

१० आधींच भट रडवा न् त्यांत मेली बायको.

११ आळशाला दुप्पट काम नि कृपणाला तिप्पट खर्च.



संग्राहिका
विद्या देसाई
सांगली

१ पोळी पहावी कांठांत, बायको पहावी ओठांत, भाजी पहावी देठांत.

२ ज्याचं करावं बरं तें म्हणतं माझंच खरं.

३ माझं मला होईना, पाहुणा दळून कां खाईना.

४ वर तेल फणी, आंत माया बहिणी.

५ पाहुण्याचा पाहुणा, कोंडिबाचा मेहुणा.

६ आधीच रडवं, त्यांत माहेर आडवं.

७ आधींच उल्हास त्यांत फाल्गुन मास.

८ करायला गेलो गणपति पण झाला मारूती.

९ भरोशाच्या म्हशीला टोणगा.

१० पिकतं तिथं विकत नाहीं.

११ माय मरो, मावशी उरो.

१२ अंगापेक्षा बोंगा, कुठं जातोस सोंगा.

१३ कामापुरता मामा, ताकापुरती आजीबाई.

१४ एक नाहीं कामाचा, सारा गांव मामाचा.

१५ कधीं नाहीं बग, डोळे उघडून बघ.

१६ घरचं झालं थोडं, सोयऱ्यानं धाडलं घोडं.

१७ हातच्या कांकणाला आरसा कशाला.

१८ उडत्याचं जाणील तर पडत्याचं काय.

१९ चोराची आई मुळू मुळू रडे.

२० आडरानांत विहीर महाराच्या घरांत खीर.

२१ जगांत नाहीं आपलें कोणी, जग हें आळवावरचें पाणी.

२२ तोंडावर आजी आजी, पाठीमागं दगलबाजी.

२३ वरून म्हणायचं आई बाई, आंतून काळीज झोके खाई.

२४ अग अग म्हशी, मला कुठं नेशी.

२५ आलं कानावर सोडलं रानावर.

२६ घर गदाळ त्याचं दार उजाळ.

२७ घरांत घण्ण न् म्हणे बाई मी गोरीपान.

२८ अंगणावरून घराची परीक्षा.

२९ असतील शीतं तर जमतील भुतं.

३० अंगांत नाहीं करणी, मला म्हणा तरणी.

३१ नांवं ठेवती लोकाला, शेंबूड आपल्या नाकाला.

३२ आपलं ठेवायचं झाकून न् लोकाचं बघायचं वाकून.

३३ लोकाचं कुसळ दिसतं, पण आपलं मुसळ दिसत नाहीं.

३४ आतां काय करूं काराला, म्हातारी बांधावी दाराला.

३५ आला बला गेला, गोसावी दानाला दिला.

३६ मिंदं गाणं नि पंदं खाणं.

३७ आधीं घालावं पांचा मुखीं मग आपण होतों सुखी.

३८ कधींच नव्हतं न् घुबडाला पवतं.

३९ चोराच्या उलट्या बोंबा.

४० नाकापातूर पदर नि येशीपातूर नजर.

४१ खाल मुंडी नी पाताळ धुंडी.

४२ रातभर जागली अन् कांदाभाकर रांधली.

४३ जोड्यानं हाणा पण पाटील म्हणा.

४४ वेळ न् वखत, म्हातारी बसली खोकत.

४५ दिवस गेला उटारेटी, चांदण्यांनीं कापूस निटी.

४६ आयजीच्या जीवावर बायजी उदार.

४७ सतीच्या घरीं बत्ती, शिंदळकीच्या घरीं हत्ती.

४८ आई पदर पसरूं देईना, बाप भीक मागूं देईना.

४९ सांपडला तर चोर, नाहींतर बादशहाहून थोर.

५० काखेला कळसा अन् गांवाला वळसा.

५१ काखेला बरणी कुठं गेली हरणी.

५२ हात ओला तर सज्जन भला.

५३ ज्याच्या हातांत आणा तो शहाणा.

५४ शेजीचं घेणं सवाई देणं.

५५ घरोघरीं त्याच परी सांगेना तीच बरी.

५६ शालजोडीला गोणपाटाचं ठिगळ.

५७ धनगराच्या गळ्यांत माणिक.

५८ ढवळ्याशेजारी बांधला पवळा, वाण नहीं पण गुण लागला

५९ खाण तशी माती, मावळण तशी भाची.

६० सासूसारखी सून, घरासारखा गुण.

६१ गाडीबरोबर नळ्याची जत्रा.

६२ पचेल तें खावं, शोभेल तें ल्यावं नू रुचेल तें बोलावं.

६३ स्वतःला घ्यावं घासून पण दुसऱ्याचं घेऊं नये हंसून.

६४ रीणपण फिटतं पण हीणपण फिटत नाहीं.

६५ घरीं रीण दारीं पेव.

६६ हात पाय पसरून, मागचं म्होरं विसरून.

६७ पायावर पाय नाकावर विळा.

६८ हात दाखवून अवलक्षण.

६९ आपलं नाक कापून दुसऱ्याला अपशकून.

७० झुरुक्यांतून भुरुकं मारायची.

७१ तारामती बोरं खाती, एवढ्या रात्रीं कुठं जाती.

७२ भुरट्या गाईला माया भारी, चाटून चाटून वासरं मारी.

७३ आण मेल्या पायली करतें मी वायली.

७४ चोरून पोळी, आरडून गुळवणी.

७५ गालाचं गुळवणी, ओठाचं येळवणी.

७६ आण मेल्या मण तर करीन सण.

७७ काम नाहीं घरीं अन् सांडून भरी.

७८ तेलहि गेलं तूपहि गेलं, हातीं धुपाटणं आलं.

७९ आईच्या कुशीचं अन् बापाच्या मिशीचं.

८० गांवाला भारी अन् बायकोच्या आरी.

८१ बाहेर वाघोबा घरांत राघोबा.

८२ शाबास रे वाघा तुझी चुलीपुढें जागा.

८३ रिकामा न्हावी कुडाला तुंबड्या लावी.

८४ आंत बाहेर मिरवं अन् कानवलं हिरवं.

८५ वरू तर सारूनी, अन् पोरं तर मारूनी.

८६ हातचं सुटेना, अन् बाजारांतून उठेना.

८७ पैसा अन् आडका, रिकाम्या धडका.

८८ हातनं होईना कांहीं, तोंड घेतं धाई.

८९ हात पाय लुले तोंड चुरु चुरु बोले.

९० माझ्या जिवाचा सखा, बाळ मला देतो मुका.

९१ बोलण्यांत पटराघू सगळ्या कामाला आग लागू.

९२ खवट खोबरं नासकं गिऱ्हाईक.

९३ मनीं नाहीं भाव देवा मला पाव.

९४ गरीब वाणाची माणसं ताणायची.

९५ उठ रे छंदा नि तेवढाच धंदा.

९६ गोरी गोमटी नि कपाळ करंटी.

९७ सर घोड्या, पाणी खोल.

९८ चट्टी पट्टीचा बोभाटा झिपरी मारती झपाटा.

९९ दरवाजा उघडा ठेवायचा, अन् सोन्याला बोलायचा.

१०० बाप तसा बेटा, कुंभार तसा लोटा.

१०१ अडला हरी गाढवाचे पाय धरी.

१०२ असतील बाळं तर फेडतील काळं.

१०३ पुत्र व्हावा ऐसा गुंडा, त्याचा त्रिलोकीं झेंडा.

१०४ नकटें व्हावें पण धाकटें होऊं नये.

१०५ छडी वाजे छम् छम् विद्या येई घमघम.

१०६ जया अंगीं मोठेंपण तया यातना कठीण.

१०७ ऐरावती रत्न थोर, त्याशीं अंकुशाचा मार.

१०८ शितावरून भाताची परीक्षा.

१०९ असेल हरी तर देईल पलंगावरी.

११० निसकाला दिला हिसका ते म्हणतं मला जो जो केला.

१११ पदरचं द्या नि पांचांत न्या.

११२ मयाची भोरडी, खालींवर कोरडी.

११३ माता माऊली, फजिती पावली अस्तुरीनें दुनिया दावली

११४ नाल सांपडला कीं घोडा विकत घ्यायचा.

११५ पळस गेला घाटा, तीन पानें देठा.

११६ दैव आलं द्यायला, पदर नाहीं घ्यायला.

११७ दैव देतें नि कर्म नेतें.

११८ ज्याचें जळें, त्याला कळें.

११९ ऐकावें जनाचें, करावें मनाचें.

१२० दाम करी काम, बिबी करी सलाम.

१२१ मियाबिबी राजी तो क्या करेगा काजी.

१२२ मनीं वसे तें स्वप्नीं दिसे.

१२३ चिंतीं परा तें येई घरा.

१२४ शेळी जाते जिवानिशी खाणारा म्हणतो वातड कशी.

१२५ भुकेला कोंडा अन् झोपेला धोंडा.

१२६ ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी.

१२७ मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात.

१२८ नावडतीचें मीठ आळणी.

१२९ श्रीमंताचें जळूं नये घर अन् गरिबाची मरूं नये बायको.

१३० गरज सरो नि वैद्य मरो.

१३१ कोल्हा काकडीला राजी.

१३२ कितीही नळींत घातलें तरी कुत्र्याचें शेंपूट वाकडें तें वाकडेंच.

१३३ देखल्या देवाला दंडवत.

१३४ बुडत्याचा पाय खोलांत.

१३५ कडू कारलें तुपांत तळलें, साखरेंत घोळलें तरी कडू तें कडूच.

१३६ पालथ्या घड्यावर पाणी.

१३७ बडा घर पोकळ वासा.

१३८ तळें राखील तो पाणी चाखील.

१३९ ज्याचें हंसत मुख त्याला सदा सुख.

१४० अंथरूण पाहून पाय पसरावे.

१४१ भटाला दिली ओसरी तो हळूंहळूं पाय पसरी.

१४२ धर्म करितां कर्म उभें राहतें.

१४३ शहाण्याला मार शब्दाचा मूर्खाला टोमण्याचा.

१४४ देश तसा वेश, उफराटं लुगडं नेस.

१४५ लग्न पहावें करून, घर पहावें बांधून आणि विहीर पहावी खांदून.

१४६ सरडाची धांव कुंपणापर्यंत.

१४७ ओसाड गांवांत गाढवी सवाष्ण.

१४८ पायांतली वहाण पायांतच बरी.

१४९ फावडें आपल्याकडे माती ओढतें.

१५० शेण माती घेऊन उठल्याशिवाय रहात नाहीं.

१५१ डुकराची मुसांडी जाईल तिकडे जाईल.

१५२ पहिल्या वरा तूंच बरा.

१५३ पाणी उताराकडे धांवते.

१५४ दगडापेक्षां वीट मऊ.

१५५ चमत्कार दाखविल्याखेरीज कोणी नमस्कार करीत नाहींत.

१५६ आडांतच नाहीं तर पोहऱ्यांत कुठलें.

१५७ वेश असावा बावळा अंगीं असाव्या नाना कळा.

१५८ बेडकी फुगली म्हणून काय बैलाएवढी होणार ?

१५९ प्रयत्नांतीं परमेश्वर.

१६० वासरांत लंगडी गाय शहाणी.

१६१ खाईन तर तुपाशीं नाहींतर उपाशी.

१६२ नेसीन तर शालूच नेसीन नाहींतर नागडी बसीन.

१६३ काम कराया सगळी आळी अन् खायला मी माझी बाळी.

१६४ लाज नाहीं तुला अन् भेटाया येती मला.

१६५ जांवई माझा भला अन् लेक बाईलबुद्धा झाला.

१६६ आपला तो बाब्या अन् लोकाचं तें कारटं.

१६७ श्रीमंतानीं खाल्लं कीं औषधासाठीं अन् गरीबांनीं खाल्लं कीं पोटासाठीं.

१६८ शहाण्याचे व्हावे चाकर पण मूर्खाचे होऊं नये धनी.

१६९ हिताची कुडी अन् निवदाचा कांठ मोडी.

१७० ज्याचं याड त्याला ग्वाड.

१७१ जिवावर आलं पण बोटावर निभावलं.

१७२ शेजारणीच्या मांडवांत सुनेची माया.

१७३ ज्याच्या पोटांत दुखतं तेंच ओवा मागतं.

१७४ मोळा पोटीं केरसुणी.

१७५ जत्रेला जाऊं कां खेत्रेला जाऊं, घरचा धावडधिंगा कुणीकडे नेऊं.

१७६ उधारीचें पोतं हातभर रितं.

१७७ संसाराची भारी अन् जोडव्या कांकणाला पैसे सारी.

१७८ मोडतोड अन् सोनाराला जोड.

१७९ संसारांत काडीपासून जोडावं अन् लाखापासून मोडावं.

१८० उपकाराची फेड अपकारांनीं करूं नये.

१८१ चित्त नाहीं थारी न् मन तीर्थ करी.

१८२ लेणं तातडी अंगाच्या निघाल्या कातडी.

१८३ कुणाला कशाचं तर बलुत्याला पैशाचं.

१८४ बारीक चिमटा अन् सहा महिने भुगभूग.

१८५ विटकं नेसावं पण फाटकं नेसूं नये.



संग्राहिका
**कु. विमल तपस्वी**
पुणें

१ सरलं साल वर वसारलं गाल.

२ सुटली सुगी आणि बसली उगी.

३ नादी लावलं आणि गादीगांव दावलं.

४ दुखणं दुखण्यावाणी पण खाणं रोजच्यावाणी.

५ भुरड गाय मोह मोठा, हामरु हामरु फोडाला गोठा.

६ चावडी सारव म्हणलें तर मामलेदार केव्हां येणार.

७ सुरत बाम्नि डोळे हुलग्यावाणी.

८ कानावर पगडी आन् घरची बायको उघडी.

९ घरभर कण्या जेवणार शहाण्या.

१० घरची ऐकेना नू बाहेरचीला म्हणतो डोक्यावर पदर का घेईना.

११ कुठं जातोस भोगा मी तुझ्यापुढं हाय उभा.

१२ जातीसाठीं माती खावी.

१३ आचार सोडावा पण विचार सोडूं नये.

१४ लंगडं तें लंगडं कुरणांत चराया जातं.

१५ मुसलमान व्हायला अन् रोजाचा महिना यायला.

१६ साप म्हणूं नये धाकला अन् नवरा म्हणूं नये आपला.

१७ हात पसरी हातारी देईना तो भिकारी.

१८ घरांत नाहीं दाणा पण कोष्टी उताणा.

१९ आढें फिरलें की वासेहि फिरतात.

२० उंदराला मांजर साक्षी.

२१ दिसतं तसं नसतं म्हणून जग फसतं.

२२ कुठं जातोस उळगा नशीबाला खाचखळगा.

२३ लाज नाहीं मला भेटाया येती तुला.

२४ मला नको तुला नको घाल कुत्र्याला.

२५ भुकेला कोंडा, झोपेला धोंडा.

२६ ऊंस गोड लागला म्हणून मुळासकट खाऊं नये.

२७ आगं आगं बायीलं सगळं तुला वाहिलं.

२८ आग आग बायकू कुठंवर तुझं ऐकूं.

२९. जास्त दिवस राहणं अन् म्हणे तुझ्या बापाचं काय देणं.

३० फाटक्याला शिवून काय अन् गरिबाला देऊन काय.

३१ शेजीच्या भाजींत झाला बिघाड खातांना म्हटलं पाहिजे ग्वाड.

३२ शेजीनं दिली भाजी, नको कशी म्हणूं ती होईल नाराजी.

३३ उंदराला सांपडली चिंधी तो म्हणतो बाजार कधीं.

३४ एक नूर आदमी और दस नूर कपडा.

३५ जेणे काम तेणे थाय बिदा करे तो गोता खाय.



## परिशिष्ट

# रांगोळया

| *रांगोळी* | *कृति* |
|---|---|
| १. वेलदोड्यांचा वेल | सात ठिपके उभे व आडवे घेणें. |
| २. *बिल्वदळ* | पांच ठिपके दोन्ही बाजूंनीं एकापर्यंत. |
| ३. *ज्ञानकमळ* | अकरा ठिपके दोन्हीकडून तीनपर्यंत. |
| ४. नारळ | आठ ठिपके दोन्हीकडून एकापर्यंत. |
| ५. *कोयरी* | पांच ठिपके दोन्हीकडून तीनापर्यंत. |
| ६. करल्याचा वेल | नऊ ठिपके एकापर्यंत दोन्ही बाजूंनीं. |
| ७. *चेंडूफळी* | तेरा ठिपके दोन्हीकडून सातापर्यंत. |
| ८. *रामाचा पाळणा* | आठ ठिपके आठ ओळी. |
| ९. कोयरी | अकरा ठिपके दोन्ही बाजूंस सहापर्यंत. |
| १०. कासव | पंधरा ठिपके दोन्ही बाजूंनीं सातापर्यंत. |
| ११. *उभी–जोड कोयरी* | ठिपक्या—मागील कोयरीप्रमाणेंच घेणें. |
| १२. पोपट कोयरी | तेरा ठिपके दोन्ही बाजूंनीं सातापर्यंत. |
| १३. *आकाशदिवा* | तेरा ठिपके सातापर्यंत दोन्ही बाजूंनीं. |
| १४. वृंदावन | दहा ठिपके, दहा ओळी. |




आमच्या मराठी प्रदेशामध्यें दररोज सकाळच्या प्रहरीं सडासंमार्जन करून दारींच्या अंगणांत आणि उंबरठ्यावर रांगोळी घालण्याची चाल आहे. आमच्या घराण्याची एक प्रभावी चालरीत म्हणून ह्या रांगोळीची जोपासना प्रत्येक घरच्या मालकिणीकडून केली जाते. यामुळें मुलीच्या बालवयांतच त्या घरची वडीलधारी स्त्री आपल्या मुलीबाळींना ही रांगोळी शिकवीत असते. अशा वेळीं घरची शोभा वाढविणें हा तर त्या करणीमागें हेतु असतोच; परंतु त्याहीपेक्षां महत्त्वाचें म्हणजे देवादिकांचे पाय त्या कारणानें आपल्या घराला लागतात, अशी एक प्रबळ समजूत रांगोळीमागें उभी असते. म्हणून शिरगोळ्याच्या पिठानें काढलेल्या रांगोळीवर हळदकुंकू वहावयाचें आणि मगच देवाची पूजा करावयाची अशी प्रथा महाराष्ट्रांत रूढ झालेली आहे.

ह्या रांगोळीची रचना विविध प्रकारची असते; आणि तिच्यासाठीं तुळशी-वृंदावनाचा पायथा, घराचा उंबरठा, दारींचें अंगण, घरांतील देवघर व भोजनाच्या ताटाभोंवतालची जागा प्रामुख्यानें निवडण्यांत येते.

रांगोळीचे प्रमुख प्रकार तीन चार आहेत. पैकीं पहिली म्हणजे रेघोट्या काढून त्यांची मनोवेधक गुंफण करावयाची हा होयं. यांपैकीं दुसऱ्या प्रकारांत ठिपके काढून ते रेघांच्या साहाय्यानें जुळवीत उत्तम चित्ररचना उभी करावयाची असते.

त्यासाठीं चलाख बुद्धीनें हात फिरावा लागतो; आणि ठराविक रांगोळ्यांचे ठिपके व त्यांची जुळणी तोंडपाठ असावी लागते. म्हणून ही रांगोळी विशेष महत्त्वाची वा मोलाची मानली जाते. रांगोळीचा तिसरा प्रकार म्हणजे 'रांगोळ्यांत' पीठ भरून वेगवेगळ्या चित्राकृति तयार करावयाच्या. यांपैकीं चौथ्या प्रकारांत पत्र्यावर भोकें पाडून कोरलेल्या ठराविक चित्रांवर रांगोळीचें पीठ घालून हे छाप उठवीत जावयाचें ही गोष्ट मोडते.

आईच्या घरचें एक वळण म्हणून रांगोळीवर बसणाऱ्या सराईत हाताची पारख सासरच्या घरीं केली जाते. त्यामुळें सूनबाईला उत्तम रांगोळी काढतां आली पाहिजे, हा एक मानाचा विषय होऊन बसतो. अशा वेळीं या विषयांतील पारंगत सुनेचें कौतुक नणंदा, जावा आणि सासूबाई यांचेकडून भरपूर होत राहतें.

स्वस्तिक, गोपद्म, बिल्वदळ, कासव आणि कमळ ही रांगोळी नित्याच्या वापरांतील असते. त्यामुळें बहुतेक सर्व मुलींच्या व स्त्रियांच्या हातांत ती सराईतपणें बसलेली असते. अशा रांगोळ्या दररोज देवघरांत, उंबरठ्यावर व अंगणांत काढण्यांत येतात. बारीक वळणदार रेघ हें या रांगोळीचें मुख्य वैशिष्ट्य मानलें जातें.

या रांगोळीच्या मागें कांहीं चांगल्या कल्पना उभ्या केलेल्या असतात आणि म्हणूनच त्यांचा सर्रास वापर होत रहातो.

स्वस्तिकाचा—उजव्या हाताच्या स्वस्तिकाचा—उपयोग कोणत्याहि शुभ कामासाठीं केला जातो. हेतु हा कीं, त्यामुळें परमेश्वराचे आशीर्वाद आपणास लाभावेत.

अखिल विश्वाची उत्पत्ति करणाऱ्या शिवदेवाच्या पायाखालीं असणाऱ्या सोळा रेखाचित्रांपैकीं स्वस्तिक ही एक रेखा मानली जाते. तर कित्येकांच्या कल्पनेप्रमाणें स्वस्तिकामध्यें श्रीगणपतीचें दर्शन घडतें. तसेंच हें स्वस्तिक म्हणजे सूर्याचें एक प्रतीक मानलें जातें; आणि या स्वस्तिकाचे चारी हात म्हणजे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या मानवी जीवनांतील इच्छाआकांक्षांच्या खुणा मानल्या जातात.

कित्येकांच्या मतें पृथ्वीपासून स्वर्गापर्यंत जाण्यासाठीं उभारलेली एक प्रकारची शिडी म्हणजेच जणुं स्वस्तिक होय! त्याचप्रमाणें कुणाकुणाच्या कल्पनेप्रमाणें उदयाचल, अस्ताचल, मेरू आणि मंदारचल या पर्वतांच्या प्रतिनिधित्वाचें कामही हें स्वस्तिक करीत असतें!

खेड्यांमधून ज्यावेळीं स्वस्तिक हें भिंतीवर काढलें जातें, त्यावेळीं तें जगन्मायेचें प्रतिनिधित्व करतें, असें मानलें जातें.

स्वस्तिकाबद्दलच्या अशा अनेक कल्पना मराठी मुलुखांत रूढ असून त्या कल्पनांना अनुसरूनच ही स्वस्तिकाची रांगोळी काढण्यांत येते. आपल्या मनांतील सर्वोच्च अशा परमेश्वराचें एक पवित्र आसन म्हणूनही या रांगोळीचें महत्त्व मानलें जातें.

गाय ही एक पवित्र देवता आहे. तिच्या दर्शनानें मनाला शांति मिळते. तिच्या पादस्पर्शानें घर पवित्र होतें आणि तिच्या सहवासानें घराचा उत्कर्ष होतो, या कल्पनेनें घराच्या उंबरठ्यावर, अंगणांतील तुळशीपुढें व देवापुढें गोपद्म रांगोळीनें काढण्याची प्रथा पडलेली आहे.

मराठी प्रदेशामध्यें काढण्यांत येणाऱ्या रांगोळीच्या मागें या प्रकारच्या धार्मिक कल्पना आहेत. उच्च विचार आहेत. मराठी संस्कृती आहे.

फार प्राचीन काळापासून रांगोळी काढून मनाची प्रसन्नता वाढविल्याचे व संस्कृतीचें संगोपन केल्याचे दाखले जुन्या ग्रंथांतून आढळून येतात.

ठिपक्यांची रांगोळी ही परंपरेनें चालत आलेली रांगोळी आहे. तिला कित्येक पिढ्यांचा इतिहास आहे. अशा ठिपक्यांच्या रांगोळ्यांचे अनेक प्रकार आहेत. येथें वानगीदाखल म्हणून कांहीं देत आहोंत.

या ग्रंथांत देण्यांत आलेल्या रांगोळ्या त्यांच्या मूळस्वरूपांत व कृतीसह सादर करण्यांत आलेल्या आहेत. रेखीव ठिपके, वळणदार रेघा आणि आटोपशीर मांडणी हें या रांगोळ्यांचें वैशिष्ट्य होय.

ही रांगोळी खेड्यांतील स्त्रियांच्या प्रमाणेंच शहरांतील स्त्रियांच्याही हातीं रुळलेली अशी आहे. या स्त्रियांचा व तिचा निकटचा स्नेहभाव जडलेला आहे. एकमेकींचें वैशिष्ट्य सांगणें व तें सांभाळून ठेवणें हा त्यांच्या मनींचा स्थायीभाव आहे.

रांगोळी ही एक प्रभावी लोककला असून ती प्रत्येक स्त्रीच्या हातीं रुळलेली असली पाहिजे हा महाराष्ट्राच्या संस्कृतीचा एक स्वभावधर्म आहे.



# ५० गोंदण

आपल्या माहेरची खूण आपल्याबरोबर कायमची अशी असावी म्हणून फार पूर्वीं-पासून मुलीबाळी आपल्या हातावर गोंदून घेत असत. अशा वेळीं आपले, आपल्या वडिलांचें व आपल्या भावाचें नांव त्या गोंदणांत अवश्य समाविष्ट होत असे. अशा काळीं सर्वसामान्यांचेंबरोबर राजाची राणीदेखील अपवाद ठरत नसे. त्यामुळें उखाणे घालीत ही मुलगी कुणाची कोण हें सांगण्याची जी परंपरागत चालरीत असे, ती या गोंदणाकारणानें शिक्कामोर्तब केली जाई! आणि त्याचा अभिमान आमच्या स्त्रिया विशेषत्वानें पदरीं बाळगून असत.

अगदीं बालवयांत मुलींच्या कपाळावर चंद्रकोर, गहूं व टिकली; आखांचेवर माशी, हनुवटीवर व नाकावर (डावे बाजूस) टिकली गोंदण्यांत येई. तसेंच दोन्ही हातांच्या पेरांवर पुढल्या बाजूनें निरनिराळें गोंदण कोरलें जाई; व दोन्ही हातांच्या पांचीं बोटांचेवर माशी, मनगटावर सूर्यफूल किंवा वाघनख असे कांहीं आवर्जून गोंदून घेण्यांत येई.

त्यासाठीं एखादी भिकारीण दारोदार भटकत फिरत असतांना "सुयाऽऽ घेऽऽ बिब्बंऽऽ घेऽऽऽ, काळी पोऽत घेऽऽ गोंदूऽऽन" असें सादवीत[१]

१ पुकारा करणें, जाहीर करणें.

असे. त्या कारणानें एखादी वडीलधारी स्त्री तिला घरांत आवर्जून बोलवीत असे व आपल्या पोरीबाळींना गोंदून घेत असे. अशावेळीं त्या भिकारणीच्या हातांत गोंदण्याच्या रसायनाची बाटली व सुयांचा जुडगा असे. आणिक, "तुळस, इच्चू, रथ, झाड, गवळणी गोंदतंस का आनिक काय ?" असा प्रश्न ती विचारीत असे. त्यानंतर मग काय गोंदावयाचें तें ठरत असे व मग प्रत्यक्ष गोंदल्यानंतर एरंडीच्या बियांतील मगज खोबरेल तेलांत वाटून घेऊन आणि त्यांत हळद मिसळून तें मिश्रण त्यावर लावण्यांत येत असे.

सध्यां जत्रेच्या ठिकाणीं देखील गोंदून घेण्याची सोय झालेली असून यंत्रानें हें काम उरकण्यांत येत असतें. परंतु अलीकडे शिकलेल्या स्त्रिया असें गोंदून घेणें कमीपणाचें मानीत असल्यामुळें शहरापेक्षां खेड्यापाड्यांतूनच ही गोंदून घेण्याची चाल अद्यापही रूढ असलेली दिसून येते.

आपल्या आवडत्या नांवांचेपेक्षां सीतेचा पदर, गवळणी, ऊंसमळा, पानमळा, मोत्यांची आरती, चांदणी, देवाचें बाशिंग, वाघनख, विठ्ठलरखुमाई, रामसीता, नागराज, तुळशीवृंदावन वगैरे अनेक प्रकारचीं चित्रें हातावर गोंदून घेण्याकडे स्त्रियांचें विशेष लक्ष असतें. अशा चित्रांचे कारणानें आपल्या धार्मिक प्रवृत्तींची जोपासना आपण करतों, अशी स्त्रियांची समजूत असते. त्याचबरोबर आपल्या माहेरच्या घरची धनदौलत या चित्रांचेमुळें न सांगतांही आपण इतरांचेपुढें ठेवूं शकतो याचा त्यांना विशेष आनंद होतो. वाघनखांसारख्या गोंदणानें घराण्याचा इतिहास जसा प्रकट होतो तसाच तो गौळणींच्या व नागराजाच्या गोंदणाकारणानेंही प्रकट होऊं शकतो. म्हणून एकदां गोंदून घेतल्यानंतर जन्मभर मनाला शांती देणारी ही हिरवी चित्रकला स्त्रीजीवनांत विशेष अपूर्वाईचें स्थान मिळवून राहिली आहे, यांत शंका नाहीं.

माहेरप्रमाणेंच सासरीं देखील पूर्वीच्या काळीं गोंदून घेण्यांत येत असे. त्यामुळें या दोन्ही घराण्यांची चालरीत अखंडपणें जवळ बाळगणारी ही स्त्री भाग्याची मानली जात असे.

प्रस्तुत ग्रंथामध्यें स्त्रियांचें हातावरील या गोंदणाचें कांहीं प्रकार नमुन्यादाखल म्हणून दिलेले आहेत. ही लोककला किती वैभवशाली आहे याची कल्पना तेवढ्यावरूनहि यावयास हरकत नसावी.

स्त्रियांचेप्रमाणेंच कांहीं पुरुषमंडळीही आपल्या हातावर गोंदून घेत असतात. मात्र त्यांचें हें गोंदण प्रामुख्यानें वीरपुरुषांच्या व आराध्यदैवतांच्या चित्रानें माखलेलें असतें.

❧ ❧

# वृत्तपत्रांचे अभिप्राय

...महाराष्ट्राच्या बहुतेक सर्व विभागांतील लोकसाहित्य मिळविलें गेलें आहे हें या ग्रंथाचें प्रमुख वैशिष्ट्य आहे. आणखी एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे पुस्तकाच्या पहिल्या भागांत प्रकाशित झालेले निरनिराळ्या लेखकांचे अभ्यासपूर्ण लेख. या लेखांमुळें महाराष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांतील सामाजिक व सांस्कृतिक जीवनाची चांगली कल्पना येते... डॉ० सरोजिनी बाबर यांनीं या ग्रंथासाठीं घेतलेले परिश्रम किती मौलिक आहेत याची साक्ष या ग्रंथाचें प्रत्येक पृष्ठ दिल्याशिवाय रहात नाहीं. चित्रकार श्री. दलाल यांच्या आकर्षक चित्रांमुळें हा ग्रंथ पहातांक्षणीच चटकन् नजरेंत भरतो.

—**नवाकाळ**, मुंबई

...पुस्तकाचा खास वैशिष्ट्याचा भाग परिशिष्टाच्या रूपानें रांगोळी व गोंदणांच्या आकृत्यांत दिला आहे. या पुस्तकाचें हें एक उल्लेखनीय आकर्षण आहे...मोहरेदार मुखपृष्ठ...लोकसाहित्याचा बराच मोठा खजिना, अत्यल्प किंमतींत आणि आकर्षक स्वरूपांत मराठी वाचकांच्या हातीं या पुस्तकाचे रूपानें लागतो.

—**धनुर्धारी**, मुंबई

...लोकसाहित्यापैकीं अत्यंत निवडक अशा हृद्य साहित्याचा हा संग्रह रसिकांना आल्हाददायक व सामान्यांना अनेक अनुभवांचा मनोरम पुनःप्रत्यय देणारा आहे...अखिल महाराष्ट्रांतून संग्रहित करण्यांत आलेल्या ओव्या म्हणजे स्त्रीमनाचें आल्हाददायक चांदणेंच ! ...ग्रामीण भागांतील संपन्न संस्कृतीची व आत्मनिरपेक्ष जीवन जगण्याची लालसा 'ओव्यां'तून अस्सल मराठमोळ्या भाषेंत प्रतिबिंबित झाली आहे....'उखाण्यां'मधून समृद्ध जीवनाचा गंध दरवळतो...

—**विशाल सह्याद्री**, पुणें

...प्रस्तुत ग्रंथाचें अंतरंग अत्यंत विलोभनीय आहेच परंतु त्याची श्रमपूर्वक केलेली संपादणीही डॉ. सरोजिनी बाबर यांच्या रसिकतेची खात्री पटविते. ओवीगीतांचा व व स्त्रीगीतांचा भाग अतीव समृद्ध आहे. स्त्रीजीवनाशीं निगडित अशा गोष्टींची रेलचेल आहे. उखाण्यांतून पेरलेले विनोद पुरुषांच्या कानांवर आडून पडले तर पडतात. परंतु येथें ते सर्व एकत्र वाचतां येतील...

—**माणूस**, पुणें

...सोन्याच्या अलंकारांनीं वक्षःस्थळालाच काय ती शोभा येते पण हा लोकगीतांचा चंद्रहार केवळ गळ्यांत रुळणारा नसून काळजाला हात घालणारा आहे हे बोल सार्थ आहेत. साहित्याच्या विशाल उद्यानांतील ही एक प्रकारच्या सौगंधिक पुष्पांची वाटिका आहे. या वाटिकेंत प्रवेश केला म्हणजे डोळे पाणावतात. हृदय हेलावतें, शरीर रोमांचतें आणि मन बेभान होतें. सुख तें सुखच! पण दुःखाच्या आणि वियोगाच्या भावनाही येथें सुखद वाटूं लागतात.

...'सासर माहेर' हा प्रस्तुत ग्रंथाचा विषय सनातनकाळापासून आजपावेतो जन-मनाला रिझविणारा आहे. तो विषय आज लोकसाहित्याच्या रूपानें कौशल्यपूर्ण मांडणींत लोकांपुढें येत आहे.

—**स्वदेश, दिपावली अंक**

...लोकसाहित्याचा अभ्यास करणाऱ्यांना हा संग्रह उपयोगी पडेल...रांगोळ्यांनीं संग्रहाला शोभा आली; त्यावरून धार्मिक कल्पना व सामाजिक पद्धतीची कल्पना येते. गोंदण—जो प्रकार जवळ जवळ नाहींसा झाला आहे—त्या मागील भावना व इतिहास वाचून नवी माहिती मिळते...हा संग्रह म्हणजे 'स्त्रीजीवनाचें यथार्थ दर्शन' हेंच म्हणणें योग्य होईल.

—**लोकवाणी**, भंडारा

...ह्या ग्रंथांतील प्रत्येक पान हें स्त्रीजीवनांतील सुखदुःखानें भारावलेलें व अंतरीच्या जिव्हाळ्यानें नटलेलें आहे.

—**चऱ्हाटा**, नागपूर

...मानवी जीवनांतील सात्विकता, आंतरिकता व आत्मीयता यांचा आविष्कार स्त्रीगीतांतून होतो. येथेंच खरी जिव्हाळ्याची अभिव्यक्ति आहे. स्त्रीहृदयाचें घडलेलें दर्शन मनोरम आहे.

—**तरुण भारत**, नागपूर

...मराठी भाषेंत स्त्रीविषयक भावनांचा किती ओलावा व उदात्तपणा आहे हें पहायचें असल्यास हें पुस्तक एकदां तरी जरूर वाचावें. डोळे ओले झाल्याशिवाय यांतला एकहि लेख वाचतां येत नाहीं हीच या पुस्तकाच्या चांगुलपणाची बहुमोल साक्ष होय!

—**जनता**, वर्धा

...हातीं घेतल्यानंतर हा ग्रंथ गोडी लावील आणि त्या गोडींत वाचनाचा वेळ केव्हां निघून जाईल हें समजूनहि येणार नाहीं.

—**गोफण**, पंढरपूर





रामाचा रथ



बाशिंग



रामाचें बाशिंग

